"श्रुतिबोध"

(उत्तर खण्ड)

# ऋग्वेदाचें मराठी भाषान्तर.

[मूळ संहितेसह].

## मंडलें ८ व ९



रामचंद्र विनायक पटवर्धन.

“ श्रुतिबोध ”

( उत्तर खण्ड )

# ऋग्वेदाचें मराठी भाषान्तर.

## मंडलें ८ व ९

रामचंद्र विनायक पटवर्धन,

बी. ए. एल्एल्. बी.

किंमत रु. २

शिवशक २५४ सन १९२८

पौष शुद्ध नवमी १ जानेवारी.

# वाचकांशीं हितगुज.

१९१२ सालीं श्रुतिबोध मासिकाच्याद्वारें वेदांचें भाषांतर करण्याची योजना प्रसिद्ध झाल्याबरोबर एका भविष्यवादी सन्मित्रानें 'हें भाषांतराचें काम तुमच्या हातून तडीस जाणार नाहीं, कारण आजपर्यंत हें काम कोणाच्याहि हातून पूर्णपणें पार पडलें नाहीं—पडूं नये असाच ईश्वरी संकेत दिसतो आहे, इतक्या उपर तें शेवटास नेण्याचा तुम्ही दुराग्रहच केला तर ईश्वरीसंकेत तसा नसल्यामुळें आपली इहलोकची यात्राच लवकर संपवण्याचा तुमच्यावर प्रसंग येईल' असें भविष्यकथन केलें होतें ! वेदांचें भाषांतर करून तें मूळ संहितेसह दर महिन्यास मोठ्या रॉयल साईजच्या ६४ पृष्ठांच्या मासिकपुस्तकांत प्रसिद्ध करून त्याकरितां टपाल हंशीलासुद्धां वार्षिक मूल्य फक्त दोन रु. घेणें ह्यांत, त्या काळच्या स्वस्ताईच्या दिवसांतसुद्धां एक प्रकारचा अद्भुतपणा होता खरा; पण तें कार्य कोणत्याहि प्रकारच्या प्राप्तीची इच्छा न करितां हौसेनें अंगावर घेतलें असल्यामुळें कांहींशी अद्भुत वाटणारी गोष्टहि तडीस नेण्याची महत्त्वाकांक्षा संपादकांनीं बाळगिली होती. अशा रीतीनें जवळ जवळ सव्वा तीन वर्षेंपर्यंत श्रुतिबोधाचें काम अव्याहत चालून ऋग्वेदाचीं चार अष्टकें व पांचव्या अष्टकाचे सात अध्याय एवढें भाषांतर प्रसिद्ध झालें. परंतु पुढें जगद्व्याल स्वरूपाची महागाई उत्पन्न करणाऱ्या महायुद्धामुळें श्रुतिबोधाला इतिश्री मिळाली; व पुढेंहि अनेकविध कारणांमुळें त्या इतिश्रीला आतांपर्यंत सजीवता आणतां आली नाहीं, परंतु त्यांतल्या त्यांत ईश्वरी कृपा एवढीच कीं पूर्वोक्त सन्मित्राच्या भविष्यकथनानुरूप आम्हां त्रिवर्ग संपादकांपैकीं एकाचीहि अद्यापि 'इतिश्री' झालेली नाहीं ! त्यामुळें भाविकबुद्धीनें वर्तविलेलें मित्राचें भविष्य खोटें पाडण्याची महत्त्वाकांक्षा पुन: उद्भूत झाली. परंतु खंड पडलेला बारा वर्षांचा काळ एवढा मोठा होता कीं, तेवढ्या अवधींत निरनिराळे मार्ग आक्रमण करीत असणाऱ्या आम्हां त्रिवर्गाची ह्या कार्याकरितां जरूर असणारी तोंडमिळवणी होणें फारच दुरापास्त व कठिण होतें. अशा स्थितींत आपला वडिलकीचा मान लक्षांत घेऊन ह्या कार्याची सर्व जबाबदारी आपल्या स्वतःच्या शिरावर घेण्यास बाबासाहेब पटवर्धन जर उद्युक्त झाले नसते तर मात्र पूर्वोक्त मित्राचें भविष्यकथन खरें ठरण्याचा कुयोग आला असता खरा !

महाराष्ट्र-वाचकांच्या ऋणांतून आम्हांला मुक्त करण्याचें श्रेय घेतल्याबद्दल मी व अच्युतराव कोल्हटकर यांनीं पटवर्धनांचे आभार मानणें म्हणजे त्यांना तर तें आवडणार नाहींच, पण सदभिरुचीलाहि तें शोभून दिसणार नाहीं, म्हणून त्या भानगडींत मी पडत नाहीं. परंतु त्याचबरोबर वेदाचा अभिमानी व मराठीचा भक्त, एक महाराष्ट्रवाचक ह्या नात्यानें त्यांचें अभिनंदन करण्याची आलेली सुसंधि मी गमावूं इच्छित नाहीं. अभिनंदनाचा हा पुरोडाश अर्पण करण्याच्या कार्यांत अच्युतराव कोल्हटकर हेहि माझ्याबरोबर सहऋत्विज् या नात्यानें अंशभाक् आहेत.

श्रुतिबोधाची मांडणी हल्लींच्या योजनेपेक्षां बरीचशी निराळ्या स्वरूपाची होती. प्रथम बत्तीस पृष्ठें स्वरांसहित मूळसंहिता व त्याच्या खालीं पदपाठ देऊन पुढील बत्तीस पृष्ठांत त्याचें भाषांतर व भाषांतराच्या खालीं मूळ संहितेचा अन्वय, अशी श्रुतिबोधाची योजना होती. वेदांचें भाषांतर दर महिन्यास मासिक पुस्तकाच्या द्वारें प्रसिद्ध करणें हीच कल्पना हल्लींच्या काळीं लोकांना फारशी पसंत पडण्यासारखी नव्हती. त्यांतून वरील पद्धतीचा अंगिकार केल्यास सर्व भाषांतर प्रसिद्ध होण्यास लागणारा कालावधि महाराष्ट्रवाचकांना असह्यच झाला असता. म्हणून कालावधि किंवा दीर्घसूत्रीपणा ज्यांत होणार नाहीं अशा नव्या योजनेनेंच हल्लींचा ग्रंथ महाराष्ट्र वाचकांना सादर करण्यांत येत आहे. पठनाच्या सोईकरितां ऋग्वेदाची विभागणी अष्टक, अध्याय, वर्ग व ऋचा अशी केलेली आहे; ती बहुतेक सारख्या प्रमाणांत आहे. ऋग्वेदांत एकंदर सूक्तें १०२६ असून ऋचांची संख्या सुमारें १०००० आहे. ह्या दहा हजार ऋचांचे जवळ जवळ सारखे असे आठ भाग केले आहेत, त्या प्रत्येक भागाला 'अष्टक' म्हणतात. प्रत्येक अष्टकांत आठ आठ अध्याय आहेत, व प्रत्येक अध्यायाचे वर्ग व ऋचा असे भाग आहेत. परंतु ही विभागणी कोणत्याहि विशिष्ट तत्त्वावर केलेली नसून केवळ पठनाच्या व स्वाहाकाराच्या सोईकरितां केलेली आहे. वेदमंत्रांचे कर्तृत्व किंवा द्रष्टृत्व ज्या ऋषीकडे आहे त्या ऋषींच्या किंवा ऋषिकुलांच्या नांवावरून सर्व ऋक्संहितेची दहा मंडलांत दुसरी एक विभागणी केलेली आहे. फक्त पहिलें व दहावें हीं दोन मंडलें संकीर्ण स्वरूपाचीं म्हणजे निरनिराळ्या ऋषींचीं मिळून अशी आहेत, व सबंध नववें मंडल सोमरसाला वाहिलेलें आहे. गृत्समदांचें दुसरें मंडल असून तिसरें विश्वामित्रांचें, चवथें वामदेवांचें, पांचवें अत्रींचें, सहावें भरद्वाजांचें, सातवें वसिष्ठांचें आणि आठवें कण्वांचें, ह्याप्रमाणें दहा मंडलें आहेत. ही विभागणी अर्थातच सारख्या प्रमाणांत नाहीं. परंतु ती जास्त सशास्त्र आहे हें उघड आहे. श्रुतिबोधांत पांचव्या अष्टकाचा शेवटला म्हणजे आठवा अध्याय आलेला नव्हता. परंतु आठव्या मंडलास पांचव्या अष्टकाच्या सातव्या अध्यायाच्या जवळ जवळ मध्यावर सुरवात झाली असल्यामुळें व हल्लींचें भाषांतर एकदम ग्रंथरूपानेंच वाचकांच्या हातांत द्यावयाची इच्छा असल्यामुळें मंडलांचीच विभागणी जास्त पसंत वाटली, म्हणून आठव्या मंडलाच्या आरंभापासून ह्या ग्रंथाची सुरवात केली आहे. त्यांत सातव्या अध्यायाचा कांहीं भाग पुनः द्यावा लागला एवढेंच काय तें. ह्या खंडांत **आठवें आणि नववें** अशीं **दोन मंडलें** आलीं आहेत. जवळ जवळ ह्या दोन्हीं मंडलांइतकाच दहाव्या मंडलाचा विस्तार आहे. त्याचा एक स्वतंत्र भाग होईल, व तोहि छापण्यास सुरवात झाली आहे.

दुसऱ्या एका बाबतींत हल्लींच्या ग्रंथांत बदल केलेला आहे. स्वरांसहित मूळ संहिता, पदपाठ व पुनः अन्वय ही पूर्वीची पद्धत ह्यांत कायम ठेविली असती तर ग्रंथाचा विस्तार फारच मोठा झाला असता. ह्या पद्धतीची तादृश अवश्यकता राहूं नये अशा हेतूनेंच संहिता व पदें हीं दोन्ही, जिज्ञासूंस सहज समजतील व साधारण श्लोकांप्रमाणें म्हणतां येतील.

अशा रीतीनेंच मूळ ऋचा दिल्या आहेत, व ही योजना सर्वसाधारण वाचकवर्गास पसंत पडेल अशी खात्री आहे. पुस्तकाचा आकारहि मासिक पुस्तकाचा न धरितां डेमी अष्टपत्री असा आटोपशीर धरला आहे.

वेदांच्या अर्थासंबंधानें अद्यापिहि लोकांत विलक्षण समजुती प्रचलित आहेत. कोणी म्हणतात वेदांचा अर्थच करूं नये, कारण त्यांचा खरा अर्थ समजणें अशक्य आहे. कोणी म्हणतात वेदमंत्राचा अर्थ केल्यास त्याचें शब्दप्रामाण्य नाहींसें होईल, म्हणून त्याचा रहस्यमय गूढार्थ दुसऱ्या भाषेंत सांगण्याचें पातक करण्यास कोणीहि उद्युक्त होऊं नये. अशाच तऱ्हेच्या भ्रामक कल्पनेमुळें आरंभीं दिलेल्या विलक्षण समजुतीप्रमाणें विचित्र प्रकारच्या समजुती लोकांत रूढ झाल्या आहेत. वेदांचा अर्थ करणें अशक्य असतें किंवा इष्ट नसतें तर यास्काचार्यांनीं त्यांचा अर्थ केला नसता–सायणाचार्य व महीधर अशा सारख्यांनींहि केला नसता. वेदांचा अर्थ कसा करावा ह्याबद्दल मतभेद होईल,पण मुळींच अर्थ करूं नये हें म्हणणें केव्हांहि सयुक्तिक होणार नाहीं. भाषा जुनाट झाली म्हणजे शब्दांचे अर्थ दुर्बोध होतात किंबहुना विपरीत होतात, तशीच स्थिति वेदांसंबंधानें झालेली आहे, आणि म्हणूनच वेदांचा अर्थ करणें हें फार प्रयासाचें व सत्बुद्धीचें काम आहे. बुद्धि चकली कीं अर्थ चुकला. कोणत्याहि ग्रंथाचा अर्थ करतांना सावधगिरी बाळगलीच पाहिजे. पण वेद हे धर्माला आधारभूत असल्यानें त्यांच्या संबंधानें तर फारच दक्षता बाळगिली पाहिजे. अशा तऱ्हेनें लक्षपूर्वक केलेलीं वेदांचीं जितकीं भाषांतरें होतील तितकीं थोडींच आहेत. श्रीमत् भगवद्गीतेचीं हजारों भाषांतरें झालीं आहेत, तथापि नव्या भाषांतरांची अवश्यकता वाटतेच. मग गीतेचें मूळ जे वेद त्यांच्या भाषांतरांची गोष्टच विचारावयास नको. होतील तितकीं पाहिजेतच.

वेदांच्या अर्थासंबंधानें शास्त्रीय विवेचन दहाव्या मंडलाच्या पुढील भागांत प्रसिद्ध होईल; कारण संपूर्ण भाषांतर प्रसिद्ध झाल्याशिवाय अशा तऱ्हेचें विवेचन करणें योग्य होणार नाहीं. त्याचप्रमाणें या ग्रंथास जोडलेला उपोद्घात हा, दहाव्या मंडलाच्या अखेरच्या भागाकरितां वेदासंबंधीं व वैदिकवाङ्मयासंबंधीं चिकित्सक बुद्धीनें लिहिलेल्या विस्तृत उपोद्घाताची केवळ रूपरेषाच आहे.

दहाव्या मंडलाचा अखेरचा खंड प्रसिद्ध झाल्यानंतर श्रुतिबोधाचें निदान ऋग्वेदापुरतें तरी–कार्य हातावेगळें झालें असें होईल. पूर्वी श्रुतिबोधांत प्रसिद्ध झालेलें सर्व भाषांतर हल्लींच्या पद्धतीनें व ग्रंथरूपानें दोन किंवा तीन खंडांत पुनः प्रसिद्ध करावें म्हणजे सबंध ऋग्वेदाच्या भाषांतराचा 'एकसंधी' ग्रंथ तयार होईल अशी सूचना बऱ्याच लोकांकडून आलेली आहे. ही सूचना अंमलांत आणणें कांहींसें कष्टसाध्य असलें तरी विचारार्ह आहे.

टाईप बारीक, आकार डेमी अष्टपत्री, पृष्ठें ३५० व बांधणी मजबूत–अशा ह्या पुस्तकाची किंमत २ रु. ठेवणें म्हणजे वेदांचें भाषांतर अत्यंत स्वल्प किंमतींत देण्याचें

श्रुतिबोधाच्या आरंभीचें 'वेड' कायम ठेवण्यासारखेंच आहे. ह्या वेडेपणाबद्दल मात्र सर्व वाचकवर्ग ग्रंथकर्त्यांचे आभार मानण्यास खात्रीनें तयार होईल !

आतां वाचकांशीं आणखीं एक 'हितगुज' करावयाचें राहिलें आहे. तें एवढेंचकीं, त्यांनीं हें भाषांतर वरवर न वाचतां प्रेमानें, सद्भावनेनें आणि चिकित्सक बुद्धीनें वाचावें. ज्या प्रेमानें तुम्ही तुकाराममहाराजांचें अभंग वाचतां, ज्या आतुरतेनें गीतेचा अर्थ तुम्ही समजून घेतां, ज्या निश्चयानें योगवासिष्ठादि ग्रंथांच्या भाषांतरांचें तुम्ही अध्ययन करितां त्याच प्रेमानें, आतुरतेनें व निष्ठेनें वेदाची प्रत्येक ऋचा वाचून तिचा अर्थ समजून घ्या, म्हणजे हा एवढाच खंड जरी तुम्ही स्वस्थ अंतःकरणानें वाचला तरी त्यांतील प्रमेयांची सत्यता तुमच्या बुद्धीस पटून तुमचें अंतःकरण हलून जाईल अशी खात्री आहे.—

मुंबई
ता. १ जानेवारी १९२८
पौष शु. ९ शिवशक २५४

दत्तो अप्पाजी तुळजापुरकर



# उपोद्घात

## ( ऋग्वेदाची रूपरेषा )

आपणां भारतीयांच्या वेदग्रंथांची योग्यता कांहीं अपूर्व आहे. सध्यां हिंदुस्थानांत अनुयायांच्या संख्येच्या दृष्टीनें पाहतां वैदिक अथवा हिंदुधर्म ह्याच्या शिवाय मुसलमानी, ख्रिस्ती, आणि पारसी असे तीन धर्म प्रचलित आहेत. शीखपंथ हा हिंदुधर्माव्यतिरिक्त स्वतंत्र धर्म नव्हे, आणि जैनधर्म हा जरी निराळा मानला तरी जैनधर्मीयांचा समावेश हिंदुधर्मीयांत करण्यास कांहींच अडचण नाहीं. बौद्ध धर्माचा प्रसार हिंदुस्थानाबाहेर आहे. कोणत्याहि धर्माला आधारभूत असा एखादा धर्मग्रंथ असतोच, त्याप्रमाणें वैदिक धर्माचा म्हणजे हिंदुधर्माचा मूलाधार ग्रंथ " **वेद** " होय. आपल्या धर्माचा उगम वेदांपासून आहे, म्हणूनच " वेदोखिलो धर्ममूलम् " असे शास्त्र सांगतें. प्रत्येकाचें धर्मपुस्तक ज्याला त्याला प्रियच आहे; जो तो आपआपल्या धर्माची व धर्मपुस्तकाची महती गातच असतो; परंतु आनंदाची गोष्ट अशी कीं, आपल्या **वेदाची** योग्यता अन्यधर्मीयांच्या धर्मपुस्तकांपेक्षांहि अधिक आहे असें सहज दाखवितां येईल. तथापि या गोष्टीबद्दल वाद माजविणें इष्ट नाहीं म्हणून हें विधान क्षणभर बाजूस ठेवलें तरीहि वेदाचा किंवा ऋग्वेदाचा दर्जा कोणत्याहि देशाच्या धार्मिक, नैतिक किंवा तात्त्विक वाङ्मयांत अतिशय उच्च आहे हें केव्हांहि सिद्ध करून देतां येईल. जगांतील उपलब्ध अशा सर्व ग्रंथांत ऋग्वेद अथवा ऋक्संहिता हा अत्यंत प्राचीन ग्रंथ होय. मिसर देशांतील मनोरे, देवालयें, व त्यांतील चित्र-लिपीचे लेख, हे फार तर ख्रिस्तीसनापूर्वी साडेचार हजार वर्षांचे आहेत. असुरदेश म्हणजे असीरिया येथील शिल्पकाम ख्रिस्तीशकापूर्वी पांच हजार वर्षांचें आहे. परंतु त्या काळचा असीरियन ग्रंथ उपलब्ध नाहीं. असीरियाचा राजा **खामुराबी** यानें आपले कायदे एका शिलास्तंभावर ख्रिस्तसीनापूर्वी २३०० वर्षे कोरून ठेवले आहेत. खामुराबी याचे पूर्वीचे कांहीं त्रुटित कोरीव लेख सांपडतात; परंतु त्या देशांतील अत्यंत जुना असा ग्रंथ "खामुराबीचे कायदे" हाच. या वस्तूंचा व लेखांचा प्राचीनपणा पाहून मनुष्य चकित होतो, मग या सर्वांतहि प्राचीनत्वाचा मान ऋग्वेदास मिळालेला पाहून आपल्यास किती आश्चर्य आणि अभिमान वाटला पाहिजे ? कारण ऋग्वेदांतील बहुतेक सूक्तें कमींत कमीं ख्रिस्ती शकापूर्वी **सहा हजार** वर्षांइतकीं जुनीं आहेत. अर्थात् धर्ममूलत्वाचा मान वेदासच मिळणें अगदीं योग्य आहे. परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, **वेद** म्हणजे एखादा विशिष्ट ग्रंथ नव्हे. **वेद हें वाङ्मय आहे.** आकाशांत जसा सूर्य, समुद्रांत जसें मोतीं, पृथ्वीवर जसा हिमाचल तसा हिंदूंच्या धार्मिक वाङ्मयांत वेद हा होय. प्रार्थनासूक्तें, यज्ञयागप्रक्रिया, आचाराचे नियम, तत्त्वज्ञान इत्यादि अनेक विषयांचा समावेश वेदांमध्यें आहे. म्हणून प्राचीन काळींच त्याचे निरनिराळे भाग केले गेले. त्यांत प्रार्थना-विभाग, यज्ञ-विभाग, गान-विभाग, हे तीन मुख्य विभाग करून त्यांस अनुक्रमें **ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद** अशीं नांवें दिलीं. यांनाच त्रयी, किंवा वेदत्रयी अशी संज्ञा आहे. **अथर्ववेद** म्हणून वेदाचा चौथा विभागहि मानतात म्हणून **वेद** हे चार आहेत असें म्हणण्याचा परिपाठ आहे. परंतु

## वेद म्हटला म्हणजे मूलतः एकच आहे.

ऋग्वेद हा वेदाचा प्रतिनिधि आहे. यजुर्वेद हाहि वेदाचा प्रतिनिधि म्हणून म्हणतां येईल. परंतु तो यज्ञविभागापुरता. तसेंच ऋग्वेद हाहि प्रार्थना किंवा उपासना विभागाचाच विशेषेंकरून प्रतिनिधि आहे. ऋक्संहितेंत अनेक ऋषींचीं प्रार्थनापद्यें संकलित केलीं आहेत.

ऋग्वेदाची पद्यरचना अनेक वृत्तांमध्यें आहे. त्या वृत्तांना छंद म्हणतात. त्यांत अष्टि, जगती, त्रिष्टुप्, बृहती, अनुष्टुप्, पङ्क्ति, गायत्री, विराट् असे अनेक प्रकार आहेत. या पैकीं अनुष्टुप् छन्दाशिवाय बाकीचे छन्द वेदोत्तरकालीन वाङ्मयांत अगदीं तशाच स्वरूपानें आढळत नाहींत. जगती छन्द वंशस्थ वृत्ताला जवळ आहे, आणि उपजाती वृत्त त्रिष्टुप् छन्दाच्या धर्तीवर आहे. महाभारतांत पुष्कळ श्लोक वैदिक छन्दोपद्धतीचे आढळतात, परंतु त्यांत थोडा फरकहि असतो. वैदिक पद्यरचना आणि वेदोत्तर कालीन पद्यरचना ह्या जशा भिन्न, तशीच वैदिक भाषा ही संस्कृत खरी, परंतु वेदोत्तरकालीन अथवा लौकिक संस्कृतापासून ती बरीच भिन्न आहे. म्हणून लौकिक संस्कृतांत प्राविण्य संपादन केलें तरी वैदिक ग्रंथांचा आणि विशेषत: ऋक्संहितेचा अर्थ समजेलच असें नाहीं. अर्वाचीन मराठी आणि ज्ञानेश्वरकालीन मराठी यांचा जो परस्पर सापेक्ष संबंध, तोच लौकिक संस्कृत आणि वैदिक संस्कृत यांचा आहे. ऋक्संहितेची भाषा ही जुनाट आहे. त्यामुळें ऋग्वेदाचा अर्थ समजणें अशक्यच झालें असतें, किंवा कोणीतरी, कसा तरी अर्थ कल्पनेनें लावला असता; परंतु आपल्या इकडील पूर्वीच्या विद्वानांनीं वेदांचा पदच्छेद किंवा पदपाठ, वेदांचा कोश, वैदिक भाषेचें व्याकरण, आणि वैदिक शब्दांचें निर्वचन अथवा व्युत्पत्ति व्यवस्थित लिहून ठेविली आहे, त्यामुळें वेदांचा अर्थ करणें पुष्कळ सुकर झालें आहे. तथापि अजूनहि वेदांतील पुष्कळ जुनाट अपरिचित शब्दांचा अर्थ निश्चितपणें समजत नाहीं, कांहीं ठिकाणीं ऋचांचाहि अर्थ नीटसा लागत नाहीं. परंतु यांत कांहीं आश्चर्य नाहीं. उलट आश्चर्य हेंच कीं, इतक्या अडचणी असूनहि वेदांचा अर्थ आपणास बराचसा कळतो. आणि त्यामुळें त्यांची खरी योग्यता मनावर ठसते. व्याकरण आणि मीमांसा या शास्त्रांचें पूर्ण अध्ययन झाल्याशिवाय वेदांचा अर्थ करण्याचा खटाटोप व्यर्थ आहे, असा पुष्कळ शास्त्रीमंडळींचा समज आहे; व यूरोपियन लोकांनीं वेदासंबंधानें जे अकटोविकट विचित्र तारे तोडलेले आहेत त्यांकडे पाहिलें म्हणजे वेदांचा अर्थ करण्याच्या भानगडींत न पडणारी शास्त्रीमंडळीच बरी असें वाटूं लागतें. परंतु भलतेच परकी लोक अज्ञानानें किंवा जाणूनबुजून आपल्या धर्मग्रंथांचा विपरीत आणि चुकीचा अर्थ करीत असतां आपण मीमांसेच्याच मीमांसेंत गुरफटून जाऊन स्वस्थ राहणें हें हल्लींच्या काळीं आत्मघातकीपणाचें होईल, म्हणून आपण अर्थ केलेला जरी थोडाबहुत वादग्रस्त ठरला, तरी परकीयांच्या पापबुद्धिप्रेरित अर्थापेक्षां तो बरा, हीच विचारसरणी आतां हिंदुबांधवांस पटेल अशी माझी खात्री आहे.

वैदिक संस्कृत भाषा ही जोमदार आणि विकास पावलेली भाषा आहे. इतकेंच काय, पण लौकिक संस्कृतांत न आढळणारे असे प्रयोग व धातूंचीं रूपें वैदिक संस्कृतांत आढळतात. लिट्, लुङ्, लेट आणि लोट् यांचीं कांहीं रूपें लौकिक संस्कृतांत लुप्त झाला

आहेत, तीं वैदिक संस्कृतांत आढळतात. महाभारताचा काल शककालापूर्वी १४०० वर्षांहून अर्वाचीन नाहीं हें बहुतेक शोधकांच्या मतानें निश्चित आहे. तरी महाभारतकालीं सुद्धां वैदिक वाङ्मय अतिशय प्राचीन म्हणूनच समजलें जात होतें; म्हणून केवळ प्राचीनत्वामुळें देखील वेदांना पूज्यत्व येणें अगदीं अपरिहार्य आहे. वेदांचा केवल तत्त्वज्ञानविषयक भाग, ज्याला **उपनिषदें** असें नांव आहे, त्याचें वैदिक वाङ्मयांतील स्थान अगदी स्वतंत्र आहे.

ऋक्संहिता हा ग्रंथ काव्यमय आहे. तिच्यामध्यें जीं अनेक सूक्तें आहेत तीं निरनिराळ्या ऋषींनीं, (किंवा आधुनिक भाषेंत बोलावयाचें म्हणजे संतांनीं) रचलीं आहेत. तरी देखील आपण वेदांना **अपौरुषेय** म्हणजे ईश्वरप्रणीत असें मानतों. त्याचें कारण हेंच कीं, ऋषींचा उद्देश सूक्तें रचून पोट भरण्याचा किंवा कीर्ति मिळविण्याचा नव्हता. त्यांनीं जीं सूक्तें गायिलीं, त्यांनीं जें काव्य केलें, किंवा त्यांनीं जी पद्यरचना केली ती ईश्वरभक्तीच्या स्फूर्तींत अंतःकरणाच्या तळमळीनें केली. ईश्वराचे टिकाणीं मन तल्लीन झालेलें असतां जे सहजोद्गार निघतात ते ईश्वराच्याच प्रेरणेमुळें निघतात याविषयीं कोणाहि भाविक मनुष्याला संशय वाटणार नाहीं. आतां, मीमांसाकार वेदांच्या अपौरुषेयाची उपपत्ति निराळ्या रीतीनें लावतात, तीहि ज्यास पसंत पडेल त्यानें स्वीकारावी. ऋग्वेद हा काव्यमय आहे त्याचें कारण हेंच कीं ईश्वरभक्ति किंवा तत्त्वविवेचन हें काव्यमय वाणीनें जास्तच खुलून दिसतें. ज्ञानेश्वरी किंवा एकनाथी भागवत हे ग्रंथ भक्तिज्ञानवैराग्यपर असून सुद्धां त्यांत उच्च प्रतीचें काव्य आढळतें, मग तें आपला आद्यग्रंथ जो ऋग्वेद त्यांतहि कां सांपडणार नाहीं ? उदाहरणार्थ पुढील वर्णन वाचा.

"हा पहा प्रेमळ **उषेचा** भव्य रथ जोडून सिद्ध झाला आहे, आणि त्याच्या भोंवतीं हा नाशरहित तेजःपुञ्ज तारागण कसा चमकत आहे ! काळ्याभोर अन्धकारांतून ही थोर स्वामिनी जी प्रकट झाली त्यांत तिचा हेतु मनुष्यांच्या निवासस्थानावर प्रकाश पाडून अनुग्रह करावा इतकाच आहे. आतां सत्यपूर्ण हृदयंगम स्तवनें गाण्यास प्रारंभ होऊं द्या; कविप्रतिभाहि प्रकट होऊं द्या; कारण वेदीवरील अग्नि प्रदीप्त झाला आहे; आणि जगांतील आल्हादकारक संपत्ति जी आतांपर्यंत अन्धकारांत गडप झालेली होती, तिला उषेनें आमच्या दृष्टीस पुनः पाडलें आहे.

"बाष्प आणि धुकें यांनीं भरून गेलेल्या पूर्वेकडील आकाशांत या उषेनें पहा कसा आपला ध्वज रोंवून दिला आहे ? त्याची प्रभा इतकी फांकते कीं, आपल्या आईबापांच्या ज्या क्षितिजरूपी अंकावर ही उषा बसत असते तें क्षितिजच तिनें प्रकाशानें धनदाट भरून टाकिलें आहे" ( मंडल १–१२३, १२४ ).

"हीं जीं नक्षत्रें आकाशांत चमकत आहेत, तीं अनुचरांप्रमाणें आपल्या तेजःपुञ्ज प्रभूच्या योजनेंत गढून गेलीं आहेत, आणि परिचारक गण त्याच्या रथाला अगदीं एकसारखे मनोल्हादी असे अश्व जोडीत आहेत ! अहाहा ! अचेतनास चैतन्य देऊन, आणि जें आकाररहित होतें तें आकारास आणून तूं उषेसह प्रकट झालास ! !" (मं. १-६).

आतां वादळें उत्पन्न करणारे जे 'मरुत्' त्यांच्या पराक्रमाचें वर्णन ऐका:–

"जेव्हां विक्रान्त मरुत् आपल्या गडगडाटाच्या प्रतिध्वनीनें गिरिकन्दरं दुमदुमून टाकतात, किंवा आकाशाचा प्रचंड घुमट देखील गदगदां हलवितात, तेव्हां त्यांच्या मार्गांतील मोठमोठे वृक्ष भयानें उन्मळून पडतात, आणि बारीक सारीक झुडपें तर चाकाप्रमाणें वेगानें गिरक्या घेत घेत दूर उडून जाऊन आपटतात. मरुत् हे घनगर्जनेनें जयघोष करितात त्या वेळीं त्यांच्या रथचक्रांच्या रगड्यानें मेघसमुद्र खवळून सिंहनाद करतो, आणि ते जेव्हां पृथ्वीतलावर अमृतवृष्टि करतात त्या वेळीं विद्युल्लता चमकत चमकत स्मित हास्य करित असते.

"स्वयंप्रकाश मरुतांच्या सैन्याची मी प्रशंसा करितों. ते मरुत् असे कीं, ते पर्वताप्रमाणें प्रचंड मेघांना हलवून सोडतात, सूर्याचा उष्मा आंवरून धरतात, आणि आकाशाच्या अत्युच्च प्रदेशीं आपला यज्ञसमारंभ करतात. त्यांची ओजस्विता प्रख्यातच आहे. मरुतांनो, तुमचें सैन्य जिकडे तिकडे धुमश्चक्री उडवून देतें आणि जलवृष्टि करतें, त्यामुळें प्राण्यांच्या ज्वानीचा भर वाढतो, रथाला अश्व जोडले जातात, विद्युल्लतेशीं गांठ पडून मेघ मोठ्यानें गडगडाट करतात, आणि नद्या व ओढे यांचीं उदकें पळटे मारीत मारीत खळखळ आवाजानें वाहतात. विजेप्रमाणें मरुतांचा झोत; तुटणाऱ्या ताऱ्यांप्रमाणें त्यांची झळाळी; झंझावाताप्रमाणें त्यांची धडाडी; आणि जोर तर इतका कीं, पर्वत देखील हादरतात. पाऊस पाडण्याचें मनांत आल्यावरोबर ते अगोदर गारांचा वर्षाव करतात; हे रुद्रानों, तुम्हीं रात्रींना उधळून लावतां, दिवसांनाहि पार घालवून देतां. हे धुधाट वीरांनों, जेव्हां तुम्ही अन्तरिक्ष आणि रजोलोक खळवळून सोडतां, आणि उभीं पिकें वाऱ्यापुढें लवावीं त्याप्रमाणें जेव्हां जहाजांना ह्या बाजूवरून त्या बाजूकडे कलंडून देतां अशा प्रसंगीं मोठमोठे मजवूत किल्लेहि कोसळून पडतील कीं काय असें वाटतें. हे जगताची व्यवस्था ठेवणाऱ्या विभूतींनों, वावटळीमध्यें वृक्षांना जोरानें मुळासकट उपटून एखाद्या कसपटाप्रमाणें दूर फेंकून देतां, अशा वेळीं तुमच्या सामर्थ्याची चमक दिसून येते. परंतु हे प्रेमळ विभूतींनों, वाटसरूला त्याचे डोळे मार्ग अचूक दाखवितात त्याप्रमाणें आमच्या ईश्वरभक्तीला योग्य मार्गानें घेऊन चला. (५-५४).

भाविका, पर्जन्याची प्रशंसा कर,...तो प्रचण्ड वृक्ष उलथून पाडतो आणि राक्षसांचा सप्पा उडवितो; त्याचें प्रखर शस्त्र पाहिल्यावरोबर जगताची भयानें गाळण उडते, ती इतकी कीं, जेव्हां आपल्या गडगडाटानें **पर्जन्य** हा पातक्याला ठार मारतो, तेव्हां निरपराधी मनुष्यहि दूर पळूं लागतो, वादळीवारे सोसाट्यानें वाहतात, विजा कोसळूं लागतात, नभोमण्डल मेघांनीं गर्द भरून जातें, आणि प्राणिमात्रांकरितां पृथ्वीवर धान्यसमृद्धि होते. परंतु हा सर्व चमत्कार **पर्जन्यराज** आपल्या तडफेच्या जलवर्षावानें धरणीवर कृपा करतो तेव्हांच घडून येतो."

ऋग्वेदकालीं समाजाची सुधारणा कोणत्या प्रतीची होती हा प्रश्न नंतर सहजच उपस्थित होतो. पण या संबंधानें येवढें खास म्हणतां येईल कीं, वेदकालीं भौतिक शास्त्रांचें ान व यन्त्रविद्या अगदीं आतांच्या प्रमाणें तंतोतंत संपूर्ण जरी अवगत नसली तरी आर्य

लोकांची सुधारणा उच्च प्रतीची होती ह्यांत संशय नाहीं. समाजाच्या प्रगतीचा साधारण नियम असा आहे कीं, जी भाषा उच्च दर्जाची असते ती भाषा बोलणारा समाजहि उच्च संस्कृतीनें संपन्न असतो. यूरोपियन विद्वानांच्या मतानें पांच हजार वर्षांपूर्वीचा कोणताहीं समाज हल्लींप्रमाणें सुधारलेला व शास्त्रसंपन्न असणें शक्य नाहीं. याच्या उलट आपल्या इकडील कांहीं विद्वानांच्या मतानें वैदिक समाजांत आगगाड्या, तारायन्त्रें, विमानें, छापखाने, इत्यादि सर्व आधुनिक सुधारणा प्रचलित होत्या. परंतु माझें नम्र मत असें आहे कीं, हा वादच अप्रस्तुत आहे. वेदकाळीं अग्निरथादि साधनें नसलीं तरी त्या समाजाच्या उच्च संस्कृतीला कांहीं एक कमीपणा नाहीं. समाजाची संस्कृति आगगाडी, तारायंत्र, छापखाने यांवर अवलंबून नाहीं. भाषा, धर्म, नीतिमत्ता, काव्यसंपत्ति, कलाकौशल्य, वैद्यक, तत्त्वज्ञान या गोष्टींत समाज प्रगतिपर असला म्हणजे तो समाज सुधारलेला आहे असें समजण्यास मुळींच हरकत नाहीं. समाजसुधारणा ही आगगाडी, तारायंत्र यांच्याकरितां तटलेली नाहीं. आचार, व्यवहार व वाङ्मय यांत समाजाचा दर्जा उच्च असला म्हणजे पुरे. या दृष्टीनें पाहतां वेदकालीन नीतिमत्ता, तत्त्वज्ञान आणि ईश्वरभक्ति या सर्व गोष्टी ऋग्वेदामध्यें अतिशय प्रगल्भ स्थितींत आढळतात. इतकेंच नाहीं तर, तत्त्वज्ञानाशिवाय वैद्यक, शस्त्रक्रिया, शिल्प, नौकागमन, इत्यादि व्यवसायांतहि संस्कृत आर्यांची उत्तम प्रगति झालेली होती. संपत्तीच्या बाजूनें पाहिलें तर सुवर्ण, रत्नें, मोतीं, जरतारी कापड, यांचे उल्लेख ऋग्वेदांत आहेत. लोहदुर्गांच्या व तटबन्दीच्या उल्लेखावरून तत्कालीन लोकांचें शिल्पप्राविण्य नजरेस येतें. चालविण्याला शंभर वल्हीं लागत अशा नौकेचें वर्णन ऋग्वेदांत आहे; यावरून नौकाबंधनविद्या त्या वेळीं चांगली अवगत असावी. अनेक तऱ्हेचीं औषधें, व्रणावर शस्त्रक्रिया करणें, पाय वगैरे अवयव लोखंडाचें करणें, वृद्धांना पुन्हां तरुण करणें इत्यादि उल्लेखांवरून वैद्यक व शस्त्रक्रिया यांचें ज्ञानहि त्या वेळीं उत्तम होतें असेंच दिसून येतें. युद्धविद्येसंबंधानें पाहतां तरवारी, भाले, बाण, चिलखतें, रथ, घोडेस्वार, अशा तऱ्हेचीं पुष्कळ प्रकारचीं साधनें व आयुधें यांचा उपयोग योद्धे करित असत. राजकीय बाबतींत राजाचा अधिकार **लोकांच्या संमतिवर** अवलंबून असे, व लोकमत धर्मसमितींतून व्यक्त केलें जात असे, अशा तऱ्हेच्या उच्च प्रतीच्या समाजस्थितीचें चित्र ऋग्वेदांत प्रतिबिंबित झालेलें आढळतें.

ऋग्वेद हा सात हजार वर्षांचा जुना आहे, त्यांत कविप्रतिभा उत्तम रीतीनें दृग्गोचर झाली आहे, व तत्कालीन समाजाचें चित्रहि सुधारलेलें व प्रगतिपर असेंच आहे, इत्यादि गोष्टी जरी मान्य झाल्या, तरी तेवढ्यावरून **वेद** हे आपल्या सनातन आर्यधर्माला आधारभूत कसे झाले त्याची उपपत्ति लागणार नाहीं. ज्या ग्रंथावरून ईश्वरीज्ञान, नीति, न्याय, व्यवहार,तत्त्वज्ञान यांचा उत्कृष्ट बोध होतो तोच प्रबन्ध धर्मग्रंथ ह्या संज्ञेला पात्र ठरेल. त्यामुळें वेद हे जर धर्मग्रंथ असतील तर त्यावरून ईश्वरज्ञान, भक्ति, नीति यांचा उत्तम रीतीनें उलगडा झाला पाहिजे; आणि तो होतो यांतच वेदांचें श्रेष्ठत्व आहे; यांतच त्यांचें धर्ममूलत्त्व आहे.

ऋग्वेदावरून धर्माचें ज्ञान कसें करून घ्यावें हा प्रश्न अवघड नाहीं. "सत्यं वद" "धर्मं चर" अशा प्रकारचीं आज्ञापक वाक्यें ऋक्संहितेंत फारशीं आढळणार नाहींत. कारण जी संहिता प्रार्थनारूप आणि वर्णनात्मक आहे तिच्यांत अशीं विधायक वाक्यें

येण्याला अवकाशच नसतो. परंतु मंत्रद्रष्टे ऋषि कसे वागले, त्यांनीं कशाची महती गाथिली, आणि त्यांनीं देवापाशीं काय मागितलें हें पाहिलें असतां ऋक्संहितेवरून धर्माचा बोध होण्यास अडचण पडणार नाहीं, इतकेंच नव्हे, तर धर्माचें स्वरूप खुलासेवार समजेल. "धर्म" या शब्दानें ज्या भावनेचा आणि आचरणाचा बोध होतो ती भावना आणि आचरण यांचा निर्देश "**ऋत**" या शब्दानें ऋक्संहितेंत केला आहे. ईश्वरभक्ति, न्याय, दया, पवित्रपणा इत्यादि कायिक वर्तनक्रम आणि मानसिक वृत्ति यांचा अन्तर्भाव "**ऋत**" अथवा **सद्धर्म** या शब्दांत होतो. वैदिक धर्म हा "**ऋत**" आणि "**सत्य**" या दोन्ही शब्दांनीं व्यक्त होतो. वस्तुस्थिति हें "**सत्य,**" आणि ईश्वभक्ति, **न्याय,** दया, दुर्जनशासन हें "**ऋत**" हें सांगण्याचा ऋग्वेदाचा उद्देश आहे अशी ऋक्संहिता वरवर पहाणाराचीहि खात्री होईल. सनातन अशी जी वस्तु आहे ती "ऋत" आणि "सत्य" हीच होय. "**ऋत**" आणि "**सत्य**" **हेंच देवाचें स्वरूप.** "**पृथ्वी ही सत्याच्या आधारावर उभारली आहे, आकाश हेंहि सत्यावरच अधिष्ठित आहे.**" ( १०-८५-१ ) **आकाशाचा आधार धर्म, आणि धर्मांतच सत्य सांठविलेलें आहे.**" ( १०-१७०-२ ) देवता या निर्मळ उदकधारेप्रमाणें पवित्र, निष्कपट, निष्पाप, आणि पीडारहित असतात, ( २-२७-२ ); यापेक्षां "ऋता"च्या स्वरूपाचें यथातथ्य वर्णन दुसरें कोणतें असणार? "लोकांचें सत्याचरण आणि अधर्माचरण अशीं दोन्हीं अवलोकन करीत भगवान अन्तरिक्षोदकांतून जात असतो; आणि धर्मापासून उत्पन्न झालेल्या अनुशासनांचेंच देव परिपालन करितात." ( १-६५-२ ). देव हे 'ऋतावान' म्हणजे न्यायनीतीस उत्तेजन देणारे आणि "ऋतावृध" म्हणजे न्यायधर्मपालनांत आनंद मानणारे असे आहेत. "सर्वोत्कृष्ठ आणि **कार्यक्षम सामर्थ्य आणि पुण्यकर्म यांची सांगड**" घालण्याचें कार्य मित्रावरुण करितात (१-१५१-४) हाच "ऋताचा" अथवा सद्धर्माचा उद्देश आहे. आणि देव हा **ऋतजात** म्हणजे न्यायनीतिरूपानें अवतीर्ण होणारा आणि **सत्य** असा आहे. याप्रमाणें "**ऋत**" या शब्दाचा अर्थ ऋग्वेदावरून कळतो.

आतां ऋषींनीं ज्या प्रार्थना केल्या आहेत, त्यांवरूनही सद्धर्माचें ध्येय कोणतें त्याचा उलगडा होतो, याचा नमुना म्हणूनच कांहीं प्रार्थना संक्षेपानें देतों:—

"सर्वव्यापी अग्निदेवा, जो मनुष्य पापमार्गाचें अवलंबन करतो त्यास तूं योग्य मार्गाकडे प्रवृत्त कर. तुझें अंतःकरण अत्यंत दयाशील आहे. तूं आमचा पिता आहेस. सर्व जगताचें आयुष्य तुजवर अवलंबून आहे. ( १. ३१. )—कपटाचा उपसर्ग आम्हांस लागूं देऊं नकोस. तूं अमर आहेस, तुझा जो भक्त **न्यायमार्गाच्या** अत्युच्च-शिखरावर अधिष्ठित होतो त्याला तूं आपल्या पोटाशीं धरतोस ( १-४३-९ )—आम्हांस असें वैभव दे कीं, जें अढळ राहील, ज्याच्या योगानें शूर लोक आमचे पदरीं राहतील, ज्याच्या योगानें शत्रु जेरीस येतील, आणि जें नेहमीं वृद्धिंगत होईल. ( १-६४. )—आम्हांस असे वैभव दे कीं, जें निरंतर टिकेल, जें आम्हांस स्पृहणीय वाटेल आणि जें आमच्यापासून कोणत्याहि युद्धांत

शत्रूस हिसकावून घेतां येणार नाहीं; आम्हांस सुखावह होणारी आणि सर्व आयुष्य-भर उपयोगी पडणारी संपत्ति आमचा जीवनक्रम चालण्यासाठीं आम्हांस अर्पण कर. (१–७९.)—हे अग्नि तूं सर्व धर्म जाणतोस, तर आम्हांस **सन्मार्गानें** श्रेष्ठ-संपत्तीकडे ने. पातक मनुष्यास सन्मार्गापासून भ्रष्ट करतें म्हणून आमच्यापासून तें दूर कर. आम्हीं अत्यंत नम्रपणानें तुझें स्तवन करतों. आपल्या मंगल साधनांनीं संकटांतून फार पाड, आणि आमच्या पुत्रपौत्रांचें दैव उघडावें म्हणून तूं एखाद्या प्रचंड प्राकाराप्रमाणें त्यांचा संरक्षक हो. सर्व आधिव्याधि आमच्यापासून पार दूर पिटाळून लाव. आणि आमचें खरेंखुरें कल्याण व्हावें म्हणून आपल्या अमरविभूतीं-सह या भूलोकीं ये. देवा, आम्हांला पातक्यांच्या, घातक्यांच्या, शत्रूंच्या किंवा घोर अपत्तीच्या तडाक्यांत सांपडूं देऊं नको. हे सवकषा, क्रूर किंवा हिंस्र मनुष्याच्या अथवा पशूच्याहि सपाट्यांत सांपडूं देऊं नको. ( १–१८९ ) हे दिव्य निधींच्या पते, हे दिव्यनिधींच्या दात्या, तूं आम्हांस आपल्या कृपेचें दान करणारा असा यजमान हो. द्वेष्ट्यांचें आणि द्वेषबुद्धीचें उच्चाटन कर. आकाशांतून पर्जन्य वृष्टि कर. अविनाशी सत्वसामर्थ्य दे. आणि सहस्रावधि प्रकारचा उत्साह आमच्या अंगीं राहील असें कर. ( २–६–४ ). जो भक्त सनातन धर्माचें पालन करितो, आणि सत्यावर निष्ठा ठेऊन आनंदानें राहतो, त्याला **दिव्य प्रकाशाची प्राप्ति** होते.

ऋग्वेदावरून जी आणखी एक गोष्ट प्रामुख्यानें मनावर ठसते ती ऋषींच्या भक्तीचा जिव्हाळा, अन्तःकरणाची तळमळ आणि तल्लीनता ही होय. तुकाराम महाराजांच्या अभंगांत जें अलोट प्रेम दिसतें तसेंच उत्कट प्रेम आपल्यास ऋग्वेदांतहि पहावयास मिळतें-ऋषि म्हणतातः—

"अग्ने, तूं आमच्या ध्यानयोगाचा आद्यप्रवर्तक आहेस; हे दीनोद्धारा, आम्हां मानवांचा कैवारी आणि आईबाप तूंच आहेस. (६.१) बाप ज्याप्रमाणें लडिवाळपणानें पुत्राला आपल्या दोन्ही हातांनीं उचलून घेतो, त्याप्रमाणें दिव्यविभूतींनों, तुम्हीं आम्हांस केव्हां उचलून धराल वरें ? कोणता शूर भक्त तुमच्या आनंदाचा विभागी झाला ? देवाच्या दयार्द्र बुद्धीशीं कोणाचा योग घडला ? देवाचें अद्भुत प्रेम आमच्या केव्हां दृष्टीस पडेल ? स्तवनरत भक्ताची उन्नति तो केव्हां करील ? ( ४.२३ ). प्रभातसमय होऊन दिशा सुद्धां उजळल्या; आतां तरी भगवंतानें मज दीन मानवांशीं सख्य केलें अशी गोष्ट घडेल काय ? प्रिय भक्तावर त्याचा लोभ कशानें जडेल ? तान्हुल्याला मातेनें पोटाशीं कवटाळावें त्याप्रमाणें हें माझें स्तोत्र चित्शक्ति ग्रहण करो. माझी जी प्रार्थना सुंदर असेल, जी देवाला पटेल, जी तो कल्याणप्रद करील तीच मीं त्याच्या पायीं वहातों ( ५–४२ ). देवा पुढें नम्र होणें हेंच महत् तप. मी ही वन्दनभक्तीच करितों. वन्दनभक्तीनेंच पृथ्वी आणि आकाश यांना आधार मिळाला आहे, म्हणूनच देवाला प्रणाम असो. जें कांहीं पातक आमच्या हातून घडलें असेल तें मीं वन्दनभक्तीनें दूर करतों. माझे कान त्याच्याकडे लागले आहेत, आणि डोळेहि त्याच्यावरच जडले आहेत, त्याचें तेज

मी हृदयांत सांठविलें आहे, आणि माझें मन त्याच्याच निदिध्यासांत गर्क झालें आहे, तर आतां मीं बोलूं काय आणि विचार तरी करूं कसला ? सत्धर्मज्ञा देवा, ही आमची सेवा आतां तरी लक्षांत घे. स्वाधीनचित्त असा तूंच आहेस, तर यज्ञ-समारंभांत म्हणावयाचीं स्तोत्रें आमच्याकडून केव्हां म्हटलीं जातील, आणि तुझा निकट सहवास केव्हां होईल असें आम्हांस झालें आहे."

या पेक्षां अन्तःकरणाची तळमळ जास्त कळकळीनें व्यक्त करणारे विचार दुसऱ्या कोठें तरी सांपडतील काय ?

ऋग्वेदाचा आणखी विशेष हा आहे कीं, अधार्मिक, दुष्ट यांचा नाश व्हावा, तसेंच भक्त पापनिर्मुक्त व्हावा अशी प्रार्थना वारंवार केलेली आढळते.

"अग्नि प्रकाशित होऊन त्या प्रकाशानें आमचें पातक तो घालवून देवो. देवा, द्वेषबुद्धि विलयास ने; समुद्राची लाट जशी नौका फोडून टाकते त्याप्रमाणें आमचा घात होऊं देऊं नको. मी जर कोणाचा द्वेष केला असेल किंवा शिव्याशाप दिले असतील किंवा खोटें भाषण केलें असेल तर तें पातक धुवून जावो."

अशा प्रार्थना अनेक आहेत. त्याचप्रमाणें "हे अग्नि, दुर्जनांना जाळून खाक कर, जो आमचा घात करूं पहातो त्याचाहि नाश कर. शत्रूंना चिरडून टाक, त्यांची दाणादाण उडव. तूं रक्षण केलेले आम्ही भक्तजन युद्धांत शत्रूंचा फडशा उडवून देऊं; घातक्यांचा निःपात करूं असें घडीव. सज्जनद्वेष्टयांना आमच्या स्वाधीन कर. आम्हांला द्वेष्टयांच्या हवालीं करूं नको."

याप्रमाणें दुष्टांचा नायनाट करण्याविषयींच्याही प्रार्थना आहेत. आतां पापमोचना-विषयींच्या प्रार्थना योग्य आहेत, परंतु अधार्मिकांचा, शत्रूंचा, किंवा देवनिन्दकांचा संहार व्हावा अशी प्रार्थना ऋषींनीं कां करावी ? दुष्टांना प्रेमानेंच वश कां करून घेऊं नये अशी शंका कदाचित् कोणास येईल. कारण बौद्ध धर्माच्यावेळीं जसें अहिंसेचें थोतांड माजलें होतें, :तसेंच हल्लींहि माजलें आहे, अहिंसेविषयींच्या व दुष्टांस प्रेमानें जिंकण्याविषयींच्या खोटया कल्पनांचा प्रसार होऊन वास्तविक अहिंसा कोणती, आणि अयोग्य अहिंसा कोणती हा भेदहि बहुतेक लुप्त झाला आहे. अशा स्थितींत वरील शंका येणें साहजिक आहे. यावर इतकेंच म्हणावयाचें कीं, ज्याला प्रेमानें किंवा गोड शब्दानें वश करणें शक्य असतें तो दुष्ट नव्हेच. दुष्ट मनुष्य प्रेमानें कधींहि वश होत नसतो, . त्यामुळें दुष्टांचें शासन करणें ही खरोखर अहिंसाच ठरते. दुष्टांचें उच्चाटन न केलें तर हिंसा करण्याचा उद्देश नसतांहि हातून हिंसा घडते हें तत्त्व ऋषींना उत्कृष्ट कळलें होतें. शिक्षा म्हणजे हिंसा नव्हे. निरपराध्यांना छळणें किंवा त्यांचा घात करणें हीच हिंसा होय. अर्थात् जे निरपराध्यांना छळतात, त्यांना यातना भोगावयास लागतात, किंवा त्यांचा घात करितात अशा दुष्टांचा निःपात करणें हें कर्तव्यच ठरतें. ही गोष्ट वैदिककालीं समाजाच्या हृत्पटला-वर पक्की बिंबलेली होती. दुर्जनांना शिक्षा करणें यालाच "दण्ड" म्हणतात. म्हणून आपल्या शास्त्रांत दण्डाची महती वर्णन केलेली आहे. "दण्डः शास्ति प्रजाः सर्वाः दण्ड एवाभिरक्षति । दण्डः सुप्तेषु जागर्ति दण्डं धर्मं विदुर्बुधाः ॥ अशा रीतीनें मनुस्मृतीमध्यें

" दण्ड " आणि " धर्म " हे एकच होत असें सांगितलें आहे. याप्रमाणें, ऋग्वेदांत सदाचरण, ईशभक्ति, आणि दुष्टशासन अशा स्वरूपाचा धर्म सांगितलेला आहे.

ईश्वरीसामर्थ्यांचें वर्णन ऋक्संहितेमध्यें अत्यंत हृदयंगम असें केलेलें आहे. कांहीं मनुष्यांची प्रवृत्ति देवाचें नानाविधत्व मानण्याकडे असते. कांहींचा ओढा अनेकामध्यें एकत्व पाहण्याकडे असतो, आणि कांहींचा तर असा निश्चयच असतो कीं, देव असेल तर तो **एकच** असणार आणि तो **एकच** आहे; म्हणून देव अनेक मानणें हा भयंकर प्रमाद होय. परंतु चमत्कार असा कीं, अशा सर्व मनःप्रवृत्तींना अनुरूप अशा प्रार्थना ऋक्संहितेंत आहेत. ऋग्वेदांत, अग्नि, इन्द्र, मित्र, वरुण, मरुत्, सोम, अश्वी, उषा, विष्णु अशा अनेक दिव्य विभूति आहेत. परंतु त्यांत वैशिष्ट्य हें आहे कीं, सर्वांचें वर्णन जवळ जवळ एकसारखेंच आहे; सर्वच देव सारखेच न्यायी, पराक्रमी, आणि भक्तरक्षक आहेत. परंतु ऋग्वेदाचें एकंदर धोरण पाहिल्यास **देव एकच** आहे असें दिसून येतें. ही गोष्ट पाश्चात्य पण्डितांनाहि कबूल करणें प्राप्त झालें आहे. ईश्वरासंबंधानें ऋग्वेदांत म्हटलें आहे कीं,—

**" ईश्वर एकच असूनहि तो अनेक स्वरूपाचा आहे असें समजतात "** ( एकं सन्तं बहुधा कल्पयन्ति ), त्यालाच इन्द्र, मित्र, वरुण, अग्नि असें म्हणतात. तो वस्तुतः एकच आहे. तरी त्याला पुष्कळ प्रकारचीं नांवें देतात. ( १–१६४. ) हे अग्ने, इन्द्र तूंच, आणि अमितविक्रम जो विष्णु तोहि तूंच." " हे अग्ने तूं प्रकट होतोस तेव्हां वरुण, आणि प्रज्वलित होतोस तेव्हां मित्र असतोस" (५–३). "मी अग्नि आहे, मी स्वभावतःच सर्वज्ञ आहे, मीच रजोलोकाला व्यापणारा आहे, आणि " हविं " म्हणतात तोहि खरोखर मीच." (३–२७).

याप्रमाणें ईश्वर एक आहे, किंवा अनेक देवतांच्या रूपानें तोच भक्तांचा उद्धार करतो असें निश्चितपणें सांगितल्यावर त्या देवाधिदेवाचें सामर्थ्य कशा प्रकारचें आहे त्याचें दिग्दर्शन वेदांमध्यें पाहिजे हें ओघानेंच येतें; आणि त्या प्रमाणें ईश्वरी सामर्थ्यांचें यथायोग्य वर्णन ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आलें आहे.

" इन्द्रा ( ईश्वरा ), तुझ्यासारखा कोणी नाहीं. पूर्वीं झाला नाहीं आणि पुढेंहि होणार नाहीं. तूं विश्वाला भरून टाकून वाढला आहेस. तूं या रजोलोकाच्या आणि आकाशाच्याहि पलीकडे आहेस. तूं या पृथ्वीचा आदर्श आहेस. ज्याच्या व्यापकत्वाचा अन्त द्युलोक व भूलोक यांना लागला नाहीं, ज्याचा थांग अन्तरिक्षांतील नद्यांनाहि लागला नाहीं, वृत्राशीं युद्ध करीत असतां देखील ज्याचें पूर्णज्ञान कोणासहि झालें नाहीं, अशा तूं एकट्यानें सकल विश्वाला आपलें अंकित करून टाकलें आहेस ( १--५२ ). आकाशरूपी चांदव्याची जी शोभा तिचें कारण तूं. सूर्याला प्रकाश देणारा तूं. दिशा पर्याकुल करणाऱ्या वायूचा रक्षक तूं. हे अपारकर्तृत्वा देवा, तुला कोणी फसवूं शकत नाहीं. तूं मायेच्या पलीकडे आहेस. आणि सनातन सद्धर्मांत तुझेंच नांव सांठविलेलें आहे ( ५--४४ ). यानें सर्व दिव्यलोक आणि भूलोक व्यापून टाकले आहेत. आणि धर्माच्या उत्कर्षाकरितां (भक्ताला) प्रार्थनास्तोत्र रचून दिलें आहे. सर्व भुवनांना उज्ज्वल करणारा नियमांचेंच देवधर्म परिपालन करवितो. तोच भगवन्त श्रेष्ठ अशा धर्ममार्गांचा राजा

ज्योति उच्च सुखाचें धाम आहे, तो विश्वाला सचेतन करतो, आणि विश्रांतिहि देतो. तोच चराचराचा नियामक आहे. हे अतुलप्रभावा देवा, तुझ्यांत सर्वसमर्थीचीं सामर्थ्यें भरलेलीं आहेत. तूं इन्द्र ( ईश्वर ) नसत्याचें असतें आणि असत्याचें नसतें करून टाकतोस; आणि या लोकीं तूं मित्र, वरुण, पूषा होऊन तुझ्या सेवकांचा पुरस्कर्ता होतोस."

वरील उताऱ्यांवरून लक्षांत येईल कीं, देवाच्या सामर्थ्याचें वरील वर्णन खरोखरच अप्रतिम आणि काळजाला हलवून सोडणारें आहे. त्याचप्रमाणें वैदिक धर्ममार्ग अगदी साधा, परंतु स्पष्ट व उन्नतिकारक आहे; आपण होऊन कोणाचाहि द्वेष न करणें परंतु मनानें व शरीरानें रोगरहित आणि शक्तिमान् असणें; पुत्रपौत्र पराक्रमी व्हावेत अशी आकांक्षा वाळगणें; स्वावलंबनाचाच मार्ग चोखाळणें; ईश्वरावर निष्ठा ठेऊन न्यायानुवर्ती राहणें; युद्ध उपस्थित झालें असतां पराक्रमानें विजय संपादन करणें; सत्पात्रीं अन्न किंवा इतर सहाय देऊन यथाशक्ति परोपकार करणें, अशा तऱ्हेचा सद्धर्ममार्ग ऋषींनीं आंखून दिलेला आहे. ऋषि म्हणतात:—

" आमच्यामधील व्याधि दूर होवोत; दुर्बुद्धि नष्ट होवो; द्वेषबुद्धि नाहींशी होवो; वाटेंतील धोंड बाजूस सरावी त्याप्रमाणें देवा, आमच्यांतील पापबुद्धि लयास जावो. "

याप्रमाणें वैदिकमार्ग ऐहिक आणि पारलौकिक अशीं दोन्हीं प्रकारचीं सुखें देणारा आहे. ईश्वरभक्ति, न्यायानुवर्तित्व, पराक्रम, स्वच्छता आणि सत्पात्रीं दान हें या धर्माचें स्वरूप आहे. न्यायानें वागून ईश्वराला न विसरतां स्वपराक्रमानें ऐहिक अभ्युदय करून घेणें हाच आयुष्यक्रम उपदेशिला आहे. **न्याय** हें बाह्यस्वरूप, **ईश्वरभक्ति** हें अन्तःस्वरूप, पराक्रम हें कर्म आणि गांजलेल्याचें दुःखनिवारण हा त्या कर्माचा हेतु आहे. या धर्मांत अहिंसेला स्थान आहे, पण तें न्यायाला सोडून नाहीं. अत्याचार करणाऱ्या अधमांना अहिंसाधर्माचा फायदा वैदिक धर्मांत मिळणें अशक्य आहे.

आतां ज्ञानामध्यें श्रेष्ठ जें आत्मज्ञान त्याचाहि ऊहापोह ऋग्वेदांत आढळतो.

**" अस्यवामीय, " " अहं मनुरभवम् , " " गर्भे नु सन्न्वेषाम्, " " नासदासीत्, " " हिरण्यगर्भः समवर्तताग्रे "**

इत्यादि पुष्कळ सूक्तें अध्यात्मपर आहेत. उपनिषदांचा प्रतिपाद्य विषय हाच हा. याप्रमाणें ऋग्संहितेचें स्वरूप सर्वव्यापी आहे. मानवी उच्च मनोवृत्तींची अशी एकहि गोष्ट नाहीं कीं, जिचा विकास **ऋग्वेद** आणि **यजुर्वेद** यांत झालेला आढळणार नाहीं. श्रेष्ठ ललितवाङ्मयाचा नमुना, वीरश्रीचें काव्य, निश्चित स्वरूपाची धर्माज्ञा, आणि अध्यात्मविद्या या सर्व गोष्टी वेदांमध्यें आहेत. म्हणूनच **वेद** हे हिंदुधर्माला—आर्यधर्माला—आधारभूत होऊन राहिले आहेत, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. आश्चर्य हेंच कीं, वेदांचा अभ्यास न करतां, त्यांचा अर्थ समजून घेण्याचा कांहींच प्रयत्न न करितां, आपण मात्र **वेदां**संबंधानें भलभलतीं विधानें करित असतों. वेदाचें हार्द समजण्यासाठीं त्याचें लक्षपूर्वक परिशीलनच केलें पाहिजे म्हणून प्रस्तुत पुस्तक अशाच वाचकांकरितां केलेलें आहे.

पुणें, ७१५ बुधवार पेठ.<br>पौष शु. १ शके १८४९ } **रामचंद्र विनायक पटवर्धन**

# ऋग्वेद

## मण्डल आठवें

### ( अष्टक ५—अध्याय ७—वर्ग १० )

### सूक्त १

दुसऱ्या कशाचीहि प्रशंसा करूं नका; मित्रानों, व्यर्थ कष्टी होऊं नका; सोमरस पिळतांच मनोरथवर्षक वीर्यवान् इन्द्राचीच स्तुति करा आणि त्याच्या प्रीत्यर्थ वारंवार सामगायन करा १. —उंचवटयावरून मुसंडी मारून खालीं धांवत येणाऱ्या वृषभाप्रमाणें ( ज्याची धडक ), जो जरामृत्युरहित, जो धेनूप्रमाणें ( परोपकारी ), जो चराचरांना धाकांत ठेवणारा, द्वेष आणि राग असे दोन्हीं यथायोग्य रीतीनें दर्शविणारा, आणि ( ऐहिक आणि पारत्रिक अशा ) दोन्हीं प्रकारच्या ऐश्वर्यांनें मण्डित असा अत्युदार जो ( परमेश्वर इन्द्र ) त्याचें स्तवन करा २. —सहायासाठीं सर्व जन तुजला नानाप्रकारांनीं आळवीत आहेत, तर, हे इन्द्रा, आमचेंहि हें प्रार्थनास्तोत्र तुजला प्रत्यहीं संतोषवर्धक होवो ३. —हे भगवंता, भक्तिप्रवण प्रमुख ज्ञाते जनांतील सामान्य मनुष्याच्याहि प्रार्थना परोपरीनें सफल करतात, तर ( देवा ), तूं आमच्या सन्निध ये, आणि जें नानाप्रकारचें सत्वैश्वर्य तूं आपल्या अगदीं जवळ वाळगतोस तेंच आमच्या सहायासाठीं घेऊन ये ४. —पर्वत भंजका, कितीहि मोठी किंमत मिळाली तरी मीं तुजला कोणासहि देणार नाहीं. शेंकडों, हजारोंच काय, पण अयुत ( म्हणजे अगणित ) द्रव्य दिलें तरी, हे अपारदातृत्वा वज्रधरा, मीं तुजला कोणासहि देणार नाहीं ५. —इन्द्रा, तूं मला पित्यापेक्षांहि अधिक

---

### सूक्तम् १

काण्वः प्रगाथः | इन्द्रः | बृहती छंदः

मा चिदन्यत् वि शंसत सखायो मा रिषण्यत। इन्द्रमित् स्तोता वृषणं सचा सुते मुहु–रुक्था च शंसत ॥ १ ॥ अवक्रक्षिणं वृषभं यथाऽजुरं गां न चर्षणीसहम्। विद्वेषणं संवननोभयं–करं मंहिष्ठमुभयाविनम् ॥ २ ॥ यत् चित् हि त्वा जना इमे नाना हवन्त ऊतये। अस्माकं ब्रह्मेदम् इन्द्र भूतु ते अहा विश्वा च वर्धनम् ॥ ३ ॥ वि तर्तूर्यन्ते मघवन् विपश्चितो अर्यो विपो जनानाम्। उप क्रमस्व पुरुरूपम आभर वाजं नेदिष्ठम् ऊतये ॥ ४ ॥ महे चन त्वाम् अद्रिवः परा शुल्काय देयाम्। न सहस्राय नायुताय वज्रिवो न शताय शतामघ ॥ ५ ॥ वस्याँ इन्द्राऽसि मे पितु–रुत

आहेस; स्वतः कोणताहि उपभोग न घेणाऱ्या भावापेक्षांहि अधिक ( कनवाळू ) आहेस; तूंच माझी आई; तुह्मीं माझें पालन करतां, म्हणून हे दिव्यनिधाना, ऐश्वर्योत्कर्ष आणि कृपाप्रसाद यांच्याविषयीं तुम्हीं मला एकसारखेच आहांत ६. —तूं कोठें गेला आहेस? या वेळीं तूं कोठें आहेस? ( जेथें जेथें भक्त आहेत अशा ) अनेक ठिकाणीं तुझें मन ओढतेंच; परंतु हे महायोद्धया, हे झुंझार वीरा, हे शत्रुदुर्गविध्वंसका, इकडे ये पहा, हे गायत्रगान करणारे भक्त ( तुझ्याप्रीत्यर्थ ) गायन करून राहिले आहेत ७. —इन्द्राप्रीत्यर्थ तुम्हीं गायत्रगायन उच्च स्वरानें करा; शत्रुदुर्गभंजक जो इन्द्र तो सेवकाचाच आहे. ज्या ( ऋक्स्तवनां ) च्या योगानें कण्वकुलोत्पन्न भक्तांच्या यज्ञांत कुशासनावर आरूढ होण्यासाठीं वज्राधर इन्द्रानें गमन केलें, आणि अधार्मिकांचे दुर्ग उध्वस्त करून टाकले, त्या गायत्रस्तवनानें त्याला प्रसन्न करा ८. —जे तुझे अश्व दसपट शक्तीचे, शंभरपट शक्तीचे, किंवहुना सहस्रपटशक्तीचे आहेत; जे वीर्यशाली आणि वेगानें धांवणारे आहेत त्या अश्वांच्या योगानें तूं आमच्याकडे सत्वर ये ९. —आज आतां गायत्रगानाची स्फूर्ति देणारा इन्द्र, विपुल दुग्ध आणि ज्याचा प्रवाह अफाट असा कांहीं निराळाच मनोत्साह देणारी कामदोहिनी स्वर्धेनू, आणि पूर्ण समाधान देणारा इन्द्र या उभयतानां मी ( भक्तीनें ) पाचारण करितों १०. —जेव्हां सूर्यतापानें एतशाला क्लेश झाले; तेव्हां वांकडे तिकडे फेरे घेऊन धांवणारे आणि वाऱ्याचे पंख असलेले दोन अश्व, आणि अर्जुनीचा पुत्र कुत्स, यांना अपारकर्तृत्वशाली इन्द्रानें त्या ( एतशा ) कडे पाठवून दिलें आणि अजिंक्य गन्धर्वांवर वर्चस्व स्थापन केलें ११. —मलमपट्ट्या ( लावल्या ) शिवाय, आणि खांद्याच्या हाडांना शस्त्रानें छेद न करितांच ज्या इन्द्रानें हाडाचा सांधा बरोबर बसवून दिला, तो अपारनिधि भगवंत हा दुखावलेला भाग पुनः जशाचा तसा खास नीट करून देईल १२. —परमेश्वरा इन्द्रा, अगदीं नीच स्थितीला पोहोंचल्याप्रमाणें, आणि तुझ्याशीं पारखे झाल्याप्रमाणें, किंवा फेंकून दिलेल्या ओंड्याप्रमाणें आम्हीं आहोंत असें होऊं देऊं नको. हे पर्वतभंजका, कोणाच्या हातून आम्हीं होरपळले

---

भ्रातु–रभुञ्जतः। माता च मे छदयथः समा वसो वसुत्वनाय राधसे ॥ ६ ॥ क्वेयथ क्वेदसि पुरुत्रा चित् धि ते मनः। अलर्षि युध्म खजकृत् पुरंदर प्रगायत्रा अगासिषुः ॥ ७ ॥ प्रास्मै गायत्रम् अर्चत वावातु यः पुरंदरः। याभिः काण्वस्योप बर्हि रासदं यासत् वज्री भिनत् पुरः ॥ ८ ॥ येते सन्ति दशग्विनः शतिनो ये सहस्रिणः। अश्वासो ये ते वृषणो रघुद्रुवस् तेभि र्नस् तूयम् आगहि ॥ ९ ॥ आ त्व १ द्य सबर्दुघां हुवे गायत्रवेपसम्। इन्द्रं धेनुं सुदुघाम् अन्याम् इषम् उरुधारामरंकृतम् ॥ १० ॥ यत् तुदत् सूर एतशं वङ्कू वातस्य पर्णिना। वहत् कुत्सम् आर्जुनेयं शतक्रतुस् त्सरत् गन्धर्वम् अस्तृतम् ॥ ११ ॥ य ऋते चित् अभिश्रिषः पुरा जत्रुभ्य आतृदः। सन्धाता सन्धिम् मघवा पुरूवसु–रिष्कर्ता विह्रुतं पुनः ॥ १२ ॥ मा भूम निष्ट्या

जाणारे नव्हे अशी सर्वांची खात्री व्हावी आणि आम्हीं तुझें मनन करावें असें कर १३. —आम्हीं उगीच घाई करणारे नाहीं, आम्हीं क्रूर नाहीं; तर हे शूरा वृत्रनाशना, आम्हीं स्तवन केल्यानंतर तुझ्या महत् कृपेनें आम्हीं एकवार तरी प्रमुदित होऊं असें कर १४. —जेव्हां जेव्हां माझें स्तवन तो भगवंत ऐकेल, तेव्हां तेव्हां पवित्रातून झरझर पाझरणारे आल्हादकर असे आमचे सोमरस, तुग्रपुत्राला उल्लसित करणारे आमचे सोमबिन्दु, या इन्द्राला तत्काल हर्षनिर्भर करोत १५. —सर्वांनीं एकत्र मिळून केलेल्या तुझ्या स्तुतीकडे तूं आज आगमन कर. तुझ्या या सेवकाच्या, तुझ्या या प्रिय भक्ताच्या स्तुतिकडे आगमन कर; आमच्या दानशूर यजमानांनीं म्हटलेलें पद्य तुजला प्रसन्न करो; मननपूर्वक तुझें स्तवन करणें ही गोष्ट मलाहि फार आवडते १६. —“ग्राव्यांनीं सोमरस पिळा; त्या रसाला (वसतीवरी) उदकांत मिसळून द्या” (असें सांगितलें तेव्हां,) त्या रसाला गोदुग्धरूपवस्त्रांनींच जणों आच्छादित करून ऋत्विजांनीं तो रस नद्यांच्या प्रवाहापासूनच जणों दोहन करून बाहेर आणला १७. —तूं आतां पृथ्वीवर असलास तरी तेथून ये, किंवा आकाशाच्या प्रकाशमय उच्च प्रदेशांत असलास तरी तेथून इकडे ये, ह्या माझ्या अखण्डित स्तवनानें आनंदपूर्ण हो, आणि हे सत्कर्तृत्वशीला देवा, माझ्या संततीलाहि (आनंदानें) पूर्ण कर १८. —अत्यंत हर्षकारी आणि उत्कृष्ट असे सोमरस इन्द्राप्रीत्यर्थ पिळून सिद्ध करा, म्हणजे तो सर्वसमर्थ ईश्वर, रणांगणाकडे उत्सुकतेनें धांवणाऱ्या विजयेच्छु वीराप्रमाणें त्या रसाला ,सर्वांच्या एकाग्र ध्यानानें संतुष्ट होऊन (सामर्थ्यांनें) ओतप्रोत भरून सोडील १९. —गाळण्यानें सोमरस झटपट गाळून स्तुतीनें मी तुझी निरंतर याचना करणारा याचक आहें; तर एखाद्या क्रूर श्वापदाप्रमाणें (सोमसवनप्रसंगीं) तुला क्रोध येईल असें कांहीं माझ्या हातून न घडो; वास्तविक पहातां (तुजजवळ मी याचना करणारच), कारण ईश्वराजवळ कोण याचना करणार नाहीं? २०.

इव इन्द्र त्वदरणा इव। वनानि न प्रजहितानि अद्रिवो दुरोषासो अमन्महि ॥ १३ ॥ अमन्महीत् अनाशसो ऽनुग्रासश्च वृत्रहन्। सकृत् सु ते महता शूर राधसा अनु स्तोमं मुदीमहि ॥ १४ ॥ यदि स्तोमं मम श्रवत् अस्माक–मिन्द्र–मिन्दवः। तिरः पवित्रं ससृवांस आशवो मन्दन्तु तुग्र्यावृधः ॥ १५ ॥ आ त्व १ द्य सधस्तुतिं वावातुः सख्यु–रागहि। उपस्तुतिर् मघोनां प्र त्वावतु अधा ते वश्मि सुष्टुतिम् ॥ १६ ॥ सोता हि सोम मद्रिभिर् एमेनम् अप्सु धावत। गव्या वस्त्रेव वासयन्त इन्नरो निर्धुक्षन् वक्षणाभ्यः ॥ १७ ॥ अधज्मो अध वा दिवो बृहतो रोचनात् अधि। अया वर्धस्व तन्वा गिरा ममआ जाता सुक्रतो पृण ॥ १८ ॥ इन्द्राय सु मन्दितमम् सोम सोत वरण्येम्। शक्र एनं पीपयत् विश्वया धिया हिन्वानं न वाजयुम् ॥ १९ ॥ मा त्वा सोमस्य गल्दया सदा याचन् अहं गिरा। भूर्णीं मृगं न सवनेषु चुक्रुधं क ईशानं न याचिषत् ॥ २० ॥ मदेन इषितं मदं उग्रम् उग्रेण शवसा। विश्वेषां तरुतारं

—(भक्ताच्या) हर्षांनेंच ज्याला प्रोत्साहन मिळतें, आंगच्याच उग्रपणानें जो उग्र वाटतो, जो आपल्या उत्कट बलानें सर्व प्रसंगांतून पार नेतो, जो हर्षांनें ओथंबलेला आहे असा आल्हाद, स्वतः हर्षभरांत (असतांनाच) इन्द्र आम्हांस निश्चयानें देतो २१. —सेवाप्रचुर अशा उपासनेमध्यें, दानशील मानवाला किंवा सोमरस अर्पण करणाऱ्या भक्ताला आणि स्तवन करणाऱ्या उपासकाला, तो परमेश्वर तो जगत्पूज्य तो प्रमुख भक्तांनीं स्तुत्य असा इन्द्र अत्युत्कृष्ट वरदान विपुल पणें देतो २२. —इन्द्रा, इकडे आगमनकर, आणि आपल्या अद्भुत कृपाप्रसादानें, हे देवा, आम्हांस हर्षित कर. ज्यांचा रस तूं मरुतांसह प्राशन करतोस अशा सोमांनीं तुझें जगत्रूप विस्तीर्ण उदर एखाद्या सरावराप्रमाणें तूं भरून टाक २३. —(भक्तांच्या) प्रार्थनेनें तुझ्या सुवर्णरथाला जोडले जाणारे शेंकडोंच काय पण हरिद्वर्ण अयाळाचे सहस्रावधि अश्व, हे इन्द्रा, तुला सोमप्राशनार्थ इकडे घेऊन येवोत २४. —सुवर्णमय (अविनाशी) रथांत आरूढ झालेला जो तूं त्या तुला, शुभ्र पृष्ठाचे आणि मयूरपिच्छाचे तुरे लावलेले दोन हरिद्वर्ण अश्व, मधुर आणि प्रशंसनीय अशा पेयाचें प्राशन करण्यासाठीं घेऊन येवोत २५. —स्तवनप्रिय देवा, पिळून सिद्ध केलेला हा रस तूं सर्वांच्या अगोदर प्राशन करणारा आहेस म्हणूनच तो आधीं प्राशन कर. उत्कृष्ट रीतीनें बनविलेल्या आणि रुचिकर अशा सोमाचें हें पेय आहे; हा सुंदर रस तुला तल्लीन करण्यास खचित् समर्थ आहे २६. —जो एकटाच आपल्या अद्भुत चमत्काराच्या योगानें श्रेष्ठ ठरला, जो आपल्या ब्रीदानीं शत्रूंना भयंकर झाला, तो सुमुकुटधारी इन्द्र येथें येवो; त्याची आमची ताटातूट कधीं न होवे; तो आमच्याकडे येणारच. कारण आमच्या हांकेकडे तो दुर्लक्ष करीत नाहीं २७. —इन्द्रा, तूं आपल्या घातक आयुधांनीं शुष्ण राक्षसाच्या पाहिजे तिकडे हालूं शकणाऱ्या किल्ल्यांचा चक्काचूर करून टाकलास. तूं प्रकाशाला अनुलक्षून नीट गेलास, आणि म्हणूनच हे इन्द्रा, तूं उभय लोकीं वन्द्य झाला आहेस २८. —सूर्याचा उदय होतेवेळीं, तसेंच मध्यान्हकाळीं, त्याच-

मदच्युतं मदे हि ष्मा ददाति नः ॥ २१ ॥ शेवारे वार्या पुरु देवो मर्ताय दाशुषे । स सुन्वते च स्तुवते च रासते विश्वगूर्तो अरिष्टुतः ॥ २२ ॥ आ इन्द्र याहि मत्स्व चित्रेण देव राधसा । सरो न प्रासि उदरं सपीतिभिर् आ सोमेभिर् उरुस्फिरम् ॥ २३ ॥ आ त्वा सहस्रम् आशतं युक्ता रथे हिरण्यये । ब्रह्मयुजो हरय इन्द्र केशिनो वहन्तु सोमपीतये ॥ २४ ॥ आ त्वा रथे हिरण्यये हरी मयूरशेप्या । शितिपृष्ठा वहतां मध्वो अन्धसो विवक्षणस्य पीतये ॥ २५ ॥ पिबा त्व १ स्य गिर्वणः सुतस्य पूर्वपा इव । परिष्कृतस्य रसिन इयमासुति श्चारु र्मदाय पत्यते ॥२६॥ य एको अस्ति दंसना महाँ उग्रो अभि व्रतैः । गमत् स शिप्री न स योषत् आ गमत् हवं न परि वर्जति ॥२७॥ त्वं पुरं चरिष्णवं वधैः शुष्णस्य सं पिणक् । त्वं भा अनुचरो अध द्विता यदिन्द्र हव्यो भुवः ॥ २८ ॥ मम त्वा सूर उदिते मम मध्यन्दिने दिवः । मम प्रपित्वे अपि शर्वरे

प्रमाणें अस्तमानीं आणि रात्रीं देखील, हे दिव्यनिधाना इन्द्रा, माझ्या स्तवनांनीं तुझें मन वळविलें आहे २९. —स्तवन कर, स्तवन करच; हेच ते आमच्या दानशूर यजमानांमध्यें अत्यंत उदार धनदाते होत. हे मेध्यातिथे, 'निन्दिताश्व,' 'प्रपर्थी' आणि 'परमज्या' हे आमचे यजमान आहेत वरें ३०. —मी जेव्हां ते प्रेक्षणीस अश्व आस्थेनें रथास जोडले, तेव्हां यदुराजाचा जो यःकश्चित् पशु आहे तो देखील असे अभिलपणीय अश्व कोटले आहेत तें न्याहाळून पाहूं लागतो ३१. —ज्यानें दोन तरतरीत घोडे त्यांच्या आंगावरील जरतारीच्या आस्तरणासह मला दिले, तो हा 'असंगाचा पुत्र **स्वनद्रथ** सर्व सद्भाग्यें आपलीशीं करो ३२. —आणि हे अग्ने, प्लयोगाचा पुत्र जो असंग त्यानें दहा हजारांची देणगी देऊन दुसऱ्या राजांवर ताण केली; त्यानें मला दिलेले दहा वृषभ, सरोवरांतून कमलाचे देंठ वाहेर निघावे त्याप्रमाणें, मजवरोवर वाहेर निघाले ३३. —त्या (असंगा) चें विशाल शरीर पुढें दृष्टीस पडलेंच; त्याचा (वाहू) गुटगुटीत, सणसणीत, आणि नीट खालीं सुटलेला असा होता, तो पाहून त्याची स्त्री **शश्वती** त्याला म्हणाली कीं, "महाराज, आतां मात्र तुम्हीं यथायोग्य सुखोपभोग मिळविणार हें खास" ३४.

## सूक्त २

दिव्यनिधाना, हें पिळून सिद्ध केलेलें सोमपेय तूं प्राशन कर. तुझें उदर नेहमीं तृप्तच आहे. हे अकुतोभया, आम्हीं तें पेय तुलाच अर्पण करूं १. —ऋत्विजांनीं खळवळून धुतलेला, ग्राव्यांनीं चुरलेला आणि लोंकरीच्या गाळण्यानें गाळलेला असा हा रस,

---

वसवा स्तोमासो अवृत्सत ॥ २९ ॥ स्तुहि स्तुहीत् एते घा ते मंहिष्ठासो मघोनाम्। निन्दिताश्वः प्रपथी परमज्या मघस्य मेध्यातिथे ॥ ३० ॥ आयत् अश्वान् वनन्वतः श्रद्धयाऽहं रथे रुहम्। उत वामस्य वसुन श्चिकेतति यो अस्ति याद्वः पशुः ॥ ३१ ॥ य ऋज्रा मह्यं मामहे सह त्वचा हिरण्यया। एप विश्वानि अभ्यस्तु सौभगा असङ्गस्य स्वनद्रथः ॥ ३२ ॥ अध प्लायोगिर् अति दासत् अन्यानासङ्गो अग्ने दशभिः सहस्रैः। अधोक्षणो दश मह्यं रुशन्तो नळा इव सरसो निरतिष्ठन् ॥ ३३ ॥ अनु अस्य स्थूरं ददृशे पुरस्तात् अनस्थ ऊरुः अवरंबमाणः। शश्वती नारी अभिचक्ष्य आह सुभद्रम् अर्य भोजनं बिभर्षि ३४ ॥

## सूक्तम् २

मेधातिथिः इन्द्रः गायत्री

इदं वसो सुतम् अन्धः पिबा सुपूर्णम् उदरम्। अनाभयिन् ररिमा ते ॥ १ ॥ नृभि धूंतः सुतो अश्नै-रव्यो वारैः परिपूतः। अश्वो न निक्तो नदीपु ॥ २ ॥ तं ते यवं

नदीमध्यें अश्व धुवून स्वच्छ करावा त्याप्रमाणें स्वच्छ झाला आहे २. —ज्याप्रमाणें आम्हीं यव पुरोडाश ( रुचिकर करतों ) त्याप्रमाणें, हे इन्द्रा, सर्वांच्या आनंदाच्या या प्रसंगीं आम्हीं हा रस गोदुग्धाशीं मिश्रित करून फार मधुर बनविला आहे ३. —इन्द्र हाच एकटा सोमप्राशन करणारा आहे. दिव्यविबुध आणि मर्त्य मानव यांच्या अंतर्यामीं वास करणारा तो सर्वात्मा इन्द्रच सोमरस प्राशन करणारा होय. ४. —भक्तांशीं सहृदय होणाऱ्या इन्द्राला, हे सोमरस–मग ते अति तेजस्वी असोत, किंवा वाईट रीतीनें मिसळ-लेले असोत, किंवा तृप्तीचा अतिरेक करणारे असोत,–ते त्या सर्वव्यापी देवाला प्रसन्न करीत नाहींत असें होतच नाहीं ५. —व्याध जसे हरिणाला पकडूं पाहतात, त्याप्रमाणें आमच्याशिवाय दुसरे भक्त, दुग्धमिश्रित सोमांच्या योगानें अथवा धेनूंच्या योगानें, त्याला आम्हांपासून दूर गुंतवूं पाहतात; म्हणून, हे तीन प्रकारचे पिळलेले सोमरस, त्या सोमप्रिय इन्द्राच्या गृहांत,–त्या देवाच्या स्वतःच्या गृहांतच–जाऊन पोंचोत ७. —हे तीन द्रोणकलश रसानें अगदीं भरून चालले आहेत; या तीन झाऱ्या अगदीं तोंडोतोण्ड भरलेल्या आहेत; आणि ही सर्व व्यवस्था एकाच उपासनागृहांत होते ८. —( सोमा, ) तूं शुद्धच आहेस, तूं अनेक पात्रांत अधिष्ठित झाला आहेस, आणि त्यामध्यें दुधाशीं आणि घट्ट दह्याशीं मिश्रित झाला आहेस; म्हणून त्या शूर इन्द्राला तूं अत्यंत हर्षप्रद होणारच ९. —इन्द्रा, तुझ्यासाठीं आम्हीं मिळ्लेले हे शुभ्र तेजस्क आणि तीव्र सोमरस आतां आटीव दुधांत मिसळलले जाण्याची जणों वाट पहात आहेत १०. —तर हे इन्द्रा, त्या रसांत आटीव दूध, पुरोडाश आणि हा सोमरस असें एकत्र मिसळून दे. तूं अक्षयवैभवसंपन्न आहेस हेंच मीं ( जिकडे तिकडे ) ऐकतों ११. —सोमरस प्राशन केले म्हणजे ते हृदयांत युद्धप्रवृत्ति उत्पन्न करतात; पण उन्मत्त झालेले मनुष्य सुरेच्या धुंदींत असतां जसें कांहींच करूं शकत नाहींत त्याप्रमाणें उघडीं वाघडीं दरिद्री माणसेंहि तुझें स्तवन करूं शकत नाहींत १२. —तुजसारख्या परमैश्वर्यवान् देवाचें स्तवन करणारा भक्त ऐश्वर्य-वान् होणारच;हे हरिदश्वा, सर्वविख्यात् भगवंत जो तूं त्याचा सेवक ऐश्वर्यवान् खास होणारच

---

यथा गोभिः स्वादुम् अकर्म श्रीणन्तः । इन्द्रः त्वा स्मिन्त्सधमादे ॥ ३ ॥ इन्द्र इत् सोमपा एक इन्द्रः सुतपा विश्वायुः । अन्तर् देवान् मर्त्यांश्च ॥ ४ ॥ न यं शुक्रो न पुराशी न तृप्रा उरुव्यचसम् । अपस्पृण्वते सुहार्दम् ॥५॥ गोभि र्यद् ईम् अन्ये अस्मत् मृगं न व्रा मृगयन्ते । अभित्सरन्ति धेनुभिः ॥ ६ ॥ त्रय इन्द्रस्य सोमाः सुतासः सन्तु देवस्य । स्वेक्षये सुतपाव्रः ॥ ७ ॥ त्रयः कोशास श्चोतन्ति तिस्त्र श्चम्व १ः सुपूर्णाः । समानेअधि भार्मन् ॥८॥ शुचिः असि पुरुनिष्ठाः क्षीरै र्मध्यत आशीर्तः । दध्ना मन्दिष्ठ शूरस्य ॥ ९ ॥ इमे त इन्द्र सोमास् तीव्रा अस्मे सुतासः । शुक्रा आशिरं याचन्ते ॥ १० ॥ ताँ आशिरं पुरोळाशं इन्द्रेमं सोमं श्रीणिहि । रेवन्तं हि त्वा शृणोमि ॥११॥ हृत्सु पीतासो युध्यन्ते दुर्मदासो न सुरायाम् । ऊध र्न नग्ना जरन्ते ॥ १२ ॥ रेवाँ

यांत संशय कसला? १३. —भक्तिहीनाचा शत्रु इन्द्र आहे. तो त्या भक्तिहीनाच्या सामगायनाकडे किंवा तो गात असलेल्या गायनाकडे मुळींच लक्ष देत नाहीं १४. —हे इन्द्रा, गर्वानें फुगलेल्या घातक्याच्या हातीं किंवा आंगावर खेंकसणाऱ्या दुष्टाच्या हातीं आम्हांस देऊं नको. हे सर्वशक्तिमान् देवा, तूं आपल्या दैवीशक्तीनें आम्हांस सन्मार्गाला लाव १५. —तुझ्याकडेच लक्ष देणारे, आणि तोच एक हेतू मनांत वाळगणारे आम्हीं कण्वकुलोत्पन्न, सर्वांशीं सारखे वागणारे भक्त तुझें स्तवन करीत आहों १६. —सत्कार्यरत भक्ताच्या अभिनव दृष्टीनें हे वज्रधरा, मी दुसऱ्या कोणाचेंहि स्तवन केलेलें नाहीं; तर केवळ तुझ्याच स्तवनाकडे लक्ष ठेवलें. १७. —दिव्यविवुध हे सोम अर्पण करणाराची इच्छा करितात; झोंप घेण्याची त्यांना कधीं आकांक्षाच होत नाहीं; तर सदैव जागरूक राहूनच ते मनुष्याचे दोष सुधारीत असतात १८. —आपल्या सत्वसामर्थ्यासह तूं येथें आगमन कर. नवयुवतीशीं विवाह करणाऱ्या आढयतेच्या मनुष्याप्रमाणें आमच्यावर रुष्ट होऊं नको १९. —सासऱ्यास छळण्याची इच्छा धरणाऱ्या निर्धन जांवयाप्रमाणें आजचा सायंकालचा समय भगवान् इन्द्र हा आमच्यापासून दूर राहून न घालवो २०. —ह्या वीराची ( मानव )हितकर वुद्धि किती अत्युदार आहे तें आम्हीं जाणतों. या त्रिभुवनांमध्यें अवतरलेल्या देवाचें अंतःकरण (किती दयार्द्र आहे तेंहि) आम्हीं जाणतों २१. —कण्वांनीं पिळलेला हा रस पात्रांत ओत. उत्कटवलशाली आणि ( भक्ताला ) शेकडों प्रकारचें सहाय करणाऱ्या देवापेक्षां कोणी अधिक यशस्वी आहे असें खरोखरच आम्हीं मानीत नाहीं २२. —मुख्य ऋत्विजानें पिळलेला सोमरस, सर्वसमर्थ मानवहितकारी वीर जो इन्द्र त्याच्यासाठी घेऊन ये; म्हणजे इन्द्र तो रस प्राशन करील २३. —अश्व आणि धेनू यांनीं युक्त असें सत्वसामर्थ्य जो निर्वेधपणें स्तवन करणाऱ्या भक्ताला अतिशय देतो तोच हा २४. —सोमरस पिळणाऱ्या ऋत्विजानों, हा प्रशंसनीय, हा अतिप्रशंस-

इत् रेवतः स्तोता स्यात् त्वावतो मघोनः। प्रेद् उ हरिवः श्रुतस्य ॥ १३ ॥ उक्थं चन शस्यमानम् अगोः अरिः आचिकेत। न गायत्रं गीयमानम् ॥ १४ ॥ मा न इन्द्र पीयत्नवे मा शर्धते परा दाः। शिक्षा शचीवः शचीभिः ॥१५॥ वयमु त्वा तदिदर्था इन्द्र त्वायन्तः सखायः। कण्वा उक्थेभिर्जरन्ते ॥ १६ ॥ न घ इत् अन्यद् आपपन वज्रिन् अपसो नविष्टौ। तवेदु स्तोमं चिकेत ॥ १७ ॥ इच्छन्ति देवाः सुन्वन्तं न स्वप्नाय स्पृहयन्ति। यान्ति प्रमादम् अतंद्राः ॥ १८ ॥ ओ षु प्र याहि वाजेभि र्मा हृणीथा अभ्य १ स्मान्। महाँ इव युवजानिः॥ १९ ॥ मो षु अद्य दुर्हणावान् सायं करत् आरे अस्मत्। अश्रीर् इव जामाता ॥२०॥ विप्रा हि अस्य वीरस्य भूरि दावरीं सुमतिम्। जातस्य मनांसि ॥ २१ ॥ आतू षिञ्च कण्वमन्तम् न घा विद्म शवसानात्। यशस्तरं शतमूतेः ॥ २२ ॥ ज्येष्ठेन सोतः इन्द्राय सोमं वीराय शक्राय। भर पिबत् आर्याय ॥ २३ ॥ यो वेदिष्ठो अव्यथिषु अश्वावन्तं जरितृभ्यः। वाजं स्तोतृभ्यो गोम-

नीय सोमपल्लव त्या शूरवीर इन्द्राला हर्ष व्हावा म्हणून धुवून स्वच्छ करा २५. —म्हणजे तो वृत्रनाशन इन्द्र सोमरस प्राशन करील. तो आमच्याकडे आगमन करणारच. तो असंख्य सहायें देणारा देव आमच्यापासून कधीं दूर थांबून राहणार नाहीं. २६. —भक्तांच्या प्रार्थनासूक्तांनीं जोडले जाणारे मंगलकारक हरिद्वर्ण अश्व, स्तवनप्रिय आणि सर्वविख्यात भक्तसखा जो देव त्याला आमच्या स्तुतींच्या योगानें येथें घेऊन येतात २७. —हे सोम फार रुचिकर आहेत, तर ये; ते दुग्धमिश्रित आहेत, ह्मणून इकडे ये; हे दर्शनीय मुकुटधरा, हे ऋषिप्रिया, हे सर्व शक्तिमान् देवा, हा ( सोमरस ) तुझ्या सहप्राशन-हर्षाला योग्य नाहीं काय ? २८. —ज्या स्तुति तुझ्या कृपाप्रसादाच्या लाभासाठीं, आणि ज्या स्तुति, तूं पराक्रम गाजवावास यासाठीं हे इन्द्रा, तुझ्या आनंदाचें संवर्धन करतात त्याच स्तुति स्तोत्रकर्त्यांचाही आनंद वृद्धिंगत करतात २९. —हे स्तुतिलालस देवा, ज्या स्तुति तुझ्याप्रीत्यर्थ केल्या, जीं सामगायनें तुझ्या प्रीत्यर्थ गाथिलीं, त्यांनीं ( तुझीं ) सर्व सामर्थ्यें एकदम एकत्र केलीं, ३०. —अशाच रीतीनें, हा अपार कर्तृत्वशाली वज्रधर इन्द्र, जो पुरातन कालापासून अगदीं अप्रतिहत आहे, तोच एक सर्व सत्वसामर्थ्यें भक्तांना देऊं शकतो. ३१. —तो असंख्य ठिकाणीं, असंख्य जनांनीं स्तविलेला परमथोर इन्द्र तशाच थोर शक्तींनीं आपल्या उजव्या हातानें वृत्राला ठार मारील ३२. —ज्याच्या मध्यें चराचर जगत् आणि त्यांतील उलाढाली आणि धुमाकूळ या सर्वांचा समावेश होतो, तो हा परमेश्वर दानशूर यजमानाच्या हर्षानेंच हर्षित होतो ३३. —दानशाली यजमानांना सत्वसामर्थ्यांची देणगी देणारा अशी ज्याची सर्वत्र ख्याति आहे, त्याच इन्द्रानें ( त्या परमेश्वरानें ) या सर्व वस्तु निर्माण केल्या आहेत ३४. —प्रकाशधेनू इच्छि-णाऱ्या ज्या भक्तावर देव कृपा करतो त्याच्याकडे फार लांबून देखील तो आपला रथ घेऊन जातो; आणि तो सर्वेश्वर ( त्या भक्ताकडे ) दिव्यधन वाहून आणतो ३५. —तो ज्ञानरूप ( इन्द्र ) अश्वारूढ सैनिकांसह यश मिळवून देणारा, आणि आपल्या वीरांसह हल्ला

---

न्तम् ॥२४॥ पन्यं पन्यम् इत् सोतार आ धावत मद्याय। सोमं वीराय शूराय ॥२५॥ पाता वृत्रहा सुतम् आ घा गमन् आरे अस्मत्। नियमते शतमूतिः ॥२६॥ एह हरी ब्रह्मयुजा शग्मा वक्षतः सखायम्। गीर्भिः श्रुतम् गीर्वणसम् ॥ २७ ॥ स्वादवः सोमा आ याहि श्रीताः सोमा आ याहि। शिप्रिन् ऋषीवः शचीवो नायमच्छा सधमादम् ॥ २८ ॥ स्तुतश्च यास् त्वा वर्धन्ति महे राधसे नृम्णाय। इन्द्र कारिणम् वृधन्तः ॥ २९ ॥ गिरश्च या स्ते गिर्वाह उक्था च तुभ्यं तानि। सत्रा दधिरे श्रवांसि ॥ ३० ॥ एवेत् एष तुविकूर्मि वाँजाँ एको वज्रहस्तः। सनात् अमृक्तो दयते ॥ ३१ ॥ हन्ता वृत्रं दक्षिणेन इन्द्रः पुरू पुरुहूतः। महान् महीभिः शचीभिः ॥ ३२ ॥ यस्मिन् विश्वा श्चर्षणयः उत च्यौत्ना ज्रयांसि च। अनु घेत् मन्दी मघोनः ॥३३॥ एष एतानि चकार इन्द्रो विश्वा यो ऽतिशृण्वे। वाजदावां मघोनाम् ॥ ३४ ॥ प्रभर्ता रथं गव्यन्तं

करून वृत्राचा नाश करणारा आहे; तो शूर, सत्यस्वरूप आहे आणि उपासनारत भक्तावर कृपा करणाराहि आहे ३६. —भक्ता प्रियमेधा, एकाग्र मनानें इन्द्राचें यजन कर; तो ( इन्द्र ) सोमांच्या योगानें खरोखरच अगदीं तल्लीन होऊन गेला आहे ३७. —ज्याचें गुणानुवाद भक्तजन गातात, जो सज्जनांचा प्रभु आहे, जो ( भक्तांच्या ) प्रख्यातीची इच्छा धरतो आणि जो सर्वात्मा आहे, त्या सत्ववीर इन्द्राचें, हे कण्वानों, तुम्हीं गुण-गायन करा ३८. —ज्यांनीं त्याच्या ठिकाणीं आपला भाव ठेवला, त्यांचा कैवारी होऊन सर्वशक्तिमान् इन्द्रानें कांहीं एक सुगावा नसतांना देखील शूर भक्तांना प्रकाशधेनू प्राप्त करून दिल्या ३९. —याप्रमाणें हे पर्वतभंजका, ध्यानभिमग्न असा जो कण्वकुलोत्पन्न मेधातिथि, त्याच्यासाठीं तूं मेंढयाचें रूप घेऊन त्याच्याकडे गेलास ४०. —विभिन्द राजा, तूं या ऋषिला चार अयुत द्रव्य देऊन सहाय्य केलेंस, आणि त्या शिवाय आणखीं आठ सहस्र द्रव्य दिलेंस ४१. —रणाच्या ( म्हणजे आनंदाच्या ) अमृतजलाची वृष्टि करणाऱ्या ज्या दोघी कन्यका, त्यांनीं ( जगताचें ) मातृपद स्वीकारावें म्हणून आम्हीं त्यांचा सन्मान करतों ४२.

## सूक्त ३

हा रसाळ आणि गोदुग्धमिश्रित सोमरस, हे इन्द्रा, तूं प्राशन कर आणि तल्लीन हो; तूं सर्वांसह हर्षनिर्भर होणारा आहेस; आमचा उत्कर्ष व्हावा म्हणून तूं आमचा आप्त हो; तुझ्या ठिकाणीं जडलेल्या बुद्धि आमचें रक्षण करोत १. —तुज सत्ववीराच्या कनवाळू

अपाकात् चित् यम् अवति । इनो वसु स हि वोळ्हा ॥ ३५ ॥ सनिता विप्रो अर्वद्भि र्हन्ता वृत्रं नृभिः शूरः । सत्योऽविता विधन्तम् ॥ ३६ ॥ यजध्व एनम् प्रिय-मेधा इन्द्रं सत्राचा मनसा । यो भूत् सोमैः सत्यमद्वा ॥ ३७ ॥ गाथश्रवसं सत्पतिं श्रवस्कामं पुरुत्मानम् । कण्वासो गात वाजिनम् ॥ ३८ ॥ य ऋते चित् गाः पदेभ्यो दात् सखा नृभ्यः शचीवान् । ये अस्मिन् कामम् अश्रियन् ॥ ३९ ॥ इत्था धीवन्तम् अद्रिवः काण्वं मेध्यातिथिम् । मेषो भूतो ३ भि यन्नयः ॥ ४० ॥ शिक्षा विभिन्दो अस्मै चत्वारि अयुता ददत् । अष्टा परः सहस्रा ॥ ४१ ॥ उत सु त्ये पयोवृधा माकी रणस्य नप्त्या । जनित्वनाय मामहे ॥ ४२ ॥

## सूक्तम् ३

मेध्यातिथिः इन्द्रः बृहती छन्दः

पिबा सुतस्य रसिनो मत्स्वा न इन्द्र गोमतः । आपि र्नो बोधि सधमाद्यो वृधे ३ ऽस्मान् अवन्तु ते धियः ॥ १ ॥ भूयाम ते सुमतौ वाजिनो वयं मा नः स्तः

अंतःकरणांत आम्ही राहूं ( असें कर ); मगरूर दुष्टाच्या तडाक्यांत आम्हांस सांपडूं देऊ नकोस; तुझ्या अद्भुत आणि इष्ट अशा सहायांनीं आमचें संरक्षण कर आणि तुझ्या कल्याणमय छत्राखालीं आम्हांस वागवून घे २. —हे अपारविभवा, ह्या माझ्या स्तवनवाणी तुझा संतोष वृद्धिंगत करोत; अग्निप्रमाणें तेजस्वी आणि पवित्र असे ज्ञानीभक्त जन सूक्तांनीं तुझें सदैव संकीर्तन करोत ३. —सहस्रावधि ऋषींनीं वेष्टित आणि दर्पदलन सामर्थ्यानें अलंकृत असा इन्द्र समुद्राप्रमाणें विस्तृत झाला. तो सत्यस्वरूप आहे म्हणूनच त्याचा महिमा आणि उत्कट प्रभाव यांची महती ह्या विप्र-राज्यांतील यज्ञांत मी गात असतों ४. —देवाची उपासना यथासांग व्हावी म्हणून इन्द्रालाच आम्हीं पाचारण करतों; प्रारंभ केलेल्या ह्या यागांत आम्हीं इन्द्राचीच करुणा भाकतों; आम्हीं विजयेच्छु होऊन संग्रामामध्यें इन्द्रालाच हांक मारतों, आणि यशोधनाच्या प्राप्तीसाठींहि इन्द्राचाच धांवा करतों ५. —इन्द्रानें आपल्या महिम्यानें द्युलोक आणि भूलोक ह्यांचा विस्तार केला, हाच त्याचा उत्कटप्रभाव होय; सूर्यालाही इन्द्रानेंच प्रकाशित केलें. हीं सर्व भुवनें इन्द्राच्या ठिकाणीं आहेत म्हणूनच सुयंत्र चाललीं आहेत; आणि यज्ञांत पिळले जाणारे सोमरसहि इन्द्राच्याच ठिकाणीं पोहोंचतात ६. —तूं सर्वांच्या आधीं सोमप्राशन करावेंस म्हणून, हे इन्द्रा, ऋत्विज आणि ऋभू ह्या सर्वांनीं तुझ्या सन्मुख होऊन उच्च स्वरांत सूक्तांनीं तुझें स्तवन केलें. रुद्रपुत्र मरुतांनींहि, पुरातन जो तूं त्या तुझें, संकीर्तन केलें ७. —ह्याच सोमाच्या सर्वव्यापी हर्षभरांत इन्द्रानें आपला वीर्यप्रभाव आणि धडाडी वृद्धिंगत केली, म्हणून पूर्वीप्रमाणें आज देखील भक्तजन त्याचा महिमा गात असतात ८. —मी तुजपाशीं तें लोकोत्तर वीर्यशालित्व मागतों, आणि तुझें चिन्तन प्रथम करावें म्हणून तें अपूर्व ज्ञानहि तुझ्याच कडून घेतों, कीं ज्याच्या योगानें, प्रसंग पडला तेव्हां यतीकरितां आणि भृगूंकरितां तूं प्रस्कण्वावर कृपा केलीस ९. —ज्या ( ज्या योगा ) नें तूं समुद्र उत्पन्न

अभिमातये । अस्मान् चित्राभि–रवताद् अभिष्टिभि–रा नः सुम्नेषु यामय ॥ २ ॥ इमा उ त्वा पुरूवसो गिरो वर्धंतु या मम । पावकवर्णाः शुचयो विपश्चितो अभि स्तोमै रनूषत ॥ ३ ॥ अयं सहस्रम् ऋषिभिः सहस्कृतः समुद्र इव पप्रथे । सत्यः सो अस्य महिमा गृणे शवो यज्ञेषु विप्रराज्ये ॥ ४ ॥ इन्द्र–मित् देवतातये इन्द्रं प्रयति अध्वरे । इन्द्रं समीके वनिनो हवामहे इन्द्रं धनस्य सातये ॥ ५ ॥ इन्द्रो महा रोदसी पप्रथत् शवः इन्द्रः सूर्यम् अरोचयत् । इन्द्रे ह विश्वा भुवनानि येमिरे इन्द्रे सुवानास इन्दवः ॥६॥ अभि त्वा पूर्वपीतये इन्द्र स्तोमेभिरायवः । समीचीनास ऋभवः समस्वरन् रुद्रा गृणन्त पूर्व्यम् ॥ ७ ॥ अस्येत् इन्द्रो वावृधे वृष्ण्यं शवो मदे सुतस्य विष्णवि । अद्या तम् अस्य महिमानम् आयवो अनुष्टुवन्ति पूर्वथा ॥८॥ तत्वा यामि सुवीर्यम् तत् ब्रह्म पूर्वचित्तये । येना यतिभ्यो भृगवो धने हिते येन प्रस्कण्वम् आविथ ॥ ९ ॥ येना समुद्रम् असृजो मही–रपः तदिन्द्र वृष्णि ते शवः । सद्यः सो

केलास; प्रचंड नद्या उत्पन्न केल्यास; तें वीर्यशालित्व, ती धडाडी, हे इंद्रा, तुझी होय. तुझा हा महिमा कोणींहि वर्णू शकत नाहीं; द्युलोक आणि भूलोक या उभयतांनींहि त्याचें आपल्या गर्जनेनें (अनेक वेळां) अभिनंदन केलें आहे; १०. —इन्द्रा मीं तुजपाशीं (अक्षय) संपत्तीची आणि वीर्यशालित्वाची याचना करीत आहे, तर मला सामर्थ्य दे. सत्व टपतेची लालसा प्रथम धरणारा जो मी त्या मला समर्थ कर; हे पुरातना, तुझें गुणानुवाद गाण्याला मजला समर्थ कर ११. —ध्यान करण्याची इच्छा धरणारा जो हा भक्त त्याला, हे इन्द्रा, तशी शक्ति दे; कारण पौर नांवाच्या भक्तावर तूं तशी कृपा केली आहेस. ज्याप्रमाणें रुशम, श्यावक, आणि कृप यांच्यावर हे इन्द्रा, तूं अनुग्रह केलास त्याप्रमाणें दिव्य प्रकाशाकडे नेण्यास योग्य अशा या भक्तजनांवर कृपा कर १२. —कोणता उत्कंठित भक्त तुझ्या सर्वगामी स्तुतींतून–अपूर्व स्तुतीच तेवढया ( निवडून काढून त्या ) गात बसेल ? कारण या इंद्राचा महिमा आणि ईश्वरीसामर्थ्य यांची महती गाणारे जे भक्त आहेत, त्यांनीं दिव्य प्रकाशाची प्राप्ति करून घेतली नाहीं असें झालें काय ? खरोखर दिव्य प्रकाशाचें स्तवन करणारे भक्त देखील ह्या इन्द्राचा महिमा आणि ईश्वरीसामर्थ्य यांचा थांग लावूं शकले नाहींत १३. —तुझी स्तुति आणखी कोणकोणते भक्त करीत आहेत ? सद्धर्माचरण करण्यासाठीं कोण तळमळत आहेत ? कोणती देवता, कोणता ऋषि, कोणता ज्ञानीभक्त तुझें चिन्तन करीत आहे ? हे भगवंता इन्द्रा, सोम अर्पण करणारा आणि स्तवन करणारा जो भक्त त्याच्या हांकेसरशी तूं केव्हां येशील ? १४. —पहा अत्यंत मधुर अशीं सूक्तें आणि स्तुति भक्तांच्या मुखांतून निघत आहेत. त्या तात्काल जय देणाऱ्या, यशोधन देणाऱ्या, संरक्षण सामर्थ्य कधींहि क्षीण होऊं न देणाऱ्या आणि रथाप्रमाणें सत्वविजयी आहेत १५. —सूर्याप्रमाणें तेजस्वी भृगूंना, कण्वांप्रमाणेंच ध्यानाचें सर्व फल प्राप्त झालें; आणि म्हणूनच प्रियमेधांनीं इन्द्राचा महिमा गाण्याच्या इच्छेनें सूक्तांनीं त्याचें गुणगायन उच्चस्वरानें केलें १६. —वृत्राचें अगदीं उच्चाटन करून टाकणाऱ्या इन्द्रा, तूं दूरच्या लोकीं असलास तरी तेथून आपले हरिद्वर्ण अश्व जोड, आणि

अस्य महिमा न सन्नशे यं क्षोणी रनुचक्रदे ॥ १० ॥ शग्धी न इन्द्र यत् त्वा रयिं यामि सुवीर्यम्। शग्धि वाजाय प्रथमं सिषासते शग्धि स्तोमाय पूर्व्यं ॥११॥ शग्धी नो अस्य यद्ध पौरम् आविथ धिय इन्द्र सिषासतः। शग्धि यथा रुशमं श्यावकं कृपम् इन्द्र प्रावः स्वर्णरम् ॥१२॥ कत् नव्यो अतसीनां तुरो गृणीत मर्त्यः। न ही नु अस्य महिमानम् इन्द्रियं स्वर्गृणन्त आनशुः ॥१३॥ कदु स्तुवन्त ऋतयन्त देवत ऋषिः को विप्र ओहते। कदा हवं मघवन् इन्द्र सुन्वत, कदु स्तुवत आ गमः ॥१४॥ उदु त्ये मधुमत्तमा गिरः स्तोमास ईरते। सत्राजितो धनसा अक्षितोतयो वाजयन्तो रथा इव ॥ १५ ॥ कण्वा इव भृगवः सूर्या इव विश्वमित् हतिम् आनशुः। इन्द्रं स्तोमेभि र्महयन्त आयवः प्रियमेधासो अस्वरन् ॥ १६ ॥ युक्ष्वा हि वृत्रहन्तम हरी इन्द्र

आमच्याकडे मुख करून, हे भगवंता, शत्रुभयंकर असा तूं आपल्या महापराक्रमी (मरुतां) सह आगमन कर १७. —हेच ते कविजन, हेच ते ज्ञानी भक्त, कीं ज्यांनीं मेधाजनन यज्ञासाठीं अगदीं ध्यान लावून फार मोठ्यानें तुझें स्तवन केलें; म्हणून, हे भगवंता, स्तवनप्रिया इन्द्रा, प्रेमोत्कंठित जनाप्रमाणें तूं आमचा धांवा ऐक १८. —इन्द्रा, तूं आपल्या प्रचंड धनुष्यांपासून (होणाऱ्या टणत्कारानेंच) वृत्राला दूर भिरकावून देऊन ठार केलेंस, आणि मायावी जे अर्बुद आणि मृगय राक्षस त्यांच्या डोंगरी किल्ल्याच्या बाहेर प्रकाशधेनूंना आणून सोडलेंस १९. —(यज्ञांतील) तीन अग्नि अत्यंत तेजानें झळकूं लागले, सूर्यहि बाहेर निघून सुप्रकाशित झाला, आणि इन्द्राचें जणों सामर्थ्यच असा सोमरस निस्तोष झाला, (पण ह्या सर्व गोष्टी) त्या धिप्पाड अहिभुजंगाला तूं आकाशांतून खालीं धाडकन् आपटून मारलेंस, आणि हे इन्द्रा, तें तुझें अपूर्व पौरुष प्रकट केलेंस तेव्हांच (घडून आल्या) २०. —इन्द्र, मरुत् आणि कुरयाणाचा पुत्र पाकस्थामा यानीं सर्व वस्तूंमध्यें अत्यंत शोभिवंत आणि आकाशाकडेच जणों आपण होऊन धांव घेणारा असा वेगवान् अश्व मला दिला २१. —आरक्त वर्ण, वाहन योग्य, भरदारपुच्छाचा, आणि विजय संपत्तीची आकांक्षा उत्पन्न करणारा असा तो अश्व मला पाकस्थामा ह्यानें दिला २२. —आणि त्याच्या जोडीला दुसरे असे दहा अश्व धुरेला जोडून दिले कीं, ते पक्ष्याप्रमाणें तुग्र्याला झट्दिशीं स्वस्थानीं घेऊन जातील २३. —आत्मा (हें) पोषक अन्न, शरीर (हें) वस्त्र आणि ओजोदायक तप हें तैलाभ्यङ्ग ह्या तीन गोष्टीं नंतर चवथी अपूर्व गोष्ट म्हटली म्हणजे, मला आरक्तवर्ण अश्वाची देणगी देणारा उदारधी जो पाकस्थामा तो होय असें (मीं वारंवार) सांगितलें आहे २४.

परावतः । अर्वाचीनो मघवन् सोमपीतये उग्र ऋष्वेभिर् आगहि ॥ १७ इमे हि ते कारवो वावशुर् धिया विप्रासो मेधसातये । स त्वं नो मघवन् इन्द्र गिर्वणो वेनो न शृणुधी हवम् ॥ १८ ॥ निरिन्द्र बृहतीभ्यो वृत्रं धनुभ्यो अस्फुरः । निर् अर्बुदस्य मृगयस्य मायिनो निः पर्वतस्य गा आजः ॥ १९ ॥ निर् अग्नयो रुरुचु निरु सूर्यो निः सोम इन्द्रियो रसः । निर् अन्तरिक्षाद् अधमो महाम् अहिं कृषे तदिन्द्र पौंस्यम् ॥२०॥ यं मे दुर् इन्द्रो मरुतः पाकस्थामा कौरयाणः । विश्वेषां त्मना शोभिष्ठम् उपेव दिवि धावमानम् ॥ २१ ॥ रोहितं मे पाकस्थामा सुधुरं कक्ष्यप्राम् अदात् रायो विबो-धनम् ॥ २२ ॥ यस्मा अन्ये दश प्रति धुरं वहन्ति वह्नयः । अस्तं वयो न तुग्र्यम् ॥ २३ ॥ आत्मा पितुस् तनू वांस ओजोदा अभ्यञ्जनम् । तुरीयमित् रोहि-तस्य पाकस्थामानं भोजं दातारम् अब्रवम् ॥ २४ ॥

## सूक्त ४

इन्द्रा, पूर्वेकडे, पश्चिमेकडे, उत्तरेकडे आणि खालीं ( दक्षिणेकडे ) देखील ऋत्विजांनीं तुझा धांवा चालविलेला असतो; हे सर्वश्रेष्ठा, तुझ्या शूर भक्तांनीं तुला सर्वत्र स्फुरण आणलें तें आनवा करतां आणलें; आणि हे रणधुरंधरा, तसें तें तुर्वशासाठींहि आणलें १. —आणि जरी तूं रुम, रुशम, श्यावक आणि कृप या राजांच्या यज्ञामध्यें सोमरसानें हर्षित होत असलास तरी कण्वकुलोत्पन्न भक्त,–तुला प्रार्थना अर्पण करणारे भक्त, ब्रह्मसूक्तांनीं तुजला आपल्याकडे आकर्ष करीत आहेत, तर इकडे आगमन कर २. —ज्याप्रमाणें रानांतील तान्हेलेला वृषभ तृणरहित प्रदेशांतील उदकपूर्ण तडागाकडे धांवत जातो त्याप्रमाणें प्रातःकालीं आणि सायंकालीं देखील तूं आमच्या सवनाकडे त्वरित ये, आणि आम्हां कण्वांसमक्ष सर्व सोमरस एकदम प्राशन कर ३. —भगवान् इन्द्रा, हे सोमरसबिन्दु सोम पिळणाऱ्या भक्ताला वरदान देण्याकरितां तुला हर्षनिर्भर करोत. यासाठीं चमूपात्रें जवळ ओढून घेऊन त्यांतील पिळलेला रस तूं प्राशन केलास, आणि आपलें तें सर्वोत्कृष्ट सर्वंकष तेज धारण केलेंस ४. —आपल्या वलानें तूं (शत्रूंचें) निर्दलन केलेंस, आपल्या ओजस्वितेनें त्यांच्या आवेशाचा चुराडा केलास, म्हणून हे श्रेष्ठतमा इन्द्रा, जरी त्या सर्वांना युद्धाची खुमखुम होती तरी तुझ्यासमोर ते वृक्षांप्रमाणें उपळून पडले ५. —तुझ्या स्तवनभक्तीचें रहस्य ज्यानें अनुभवानें जाणलें तो जणों काय सहस्रावधि तरुण योद्ध्यांनीं वेष्टित असल्याप्रमाणें वावरतो. उत्कृष्ट वीर्यशाली कृत्यांत तो आपल्या पुत्राला अग्रेसर करतो, आणि परमेश्वराची प्रणामपुरःसर स्तुति करून दानधर्म करतो, ६. —तुजसारख्या शत्रुभयंकराच्या कृपाछत्राखालीं असल्यावर आम्हीं कशालाहि भिणार नाहीं आणि थकूनहि जाणार नाहीं. तुज वीर्यसागराचें जें महत्कृत्य तें सर्वतोमुखीं व्हावें असेंच आहे; तर

---

## सूक्तम् ४

काण्वो देवातिथिः इन्द्रः पूषा, अनुष्टुप्

यद् इन्द्र प्राग् अपाग् उदङ् न्यग्वा हूयसे नृभिः। सिमा पुरू नृषूतो असि आनवे असि प्रशर्ध तुर्वशे॥ १ ॥ यद्वा रुमे रुशमे श्यावके कृप इन्द्र मादयसे सचा। कण्वासस् त्वा ब्रह्मभिः स्तोमवाहसः इन्द्रा यच्छन्ति आगहि ॥ २॥ यथा गौरो अपाकृतं तृष्यन् एत्येव ईरिणम्। आपित्वे नः प्रपित्वे तूयम् आगहि कण्वेषु सु सचा पिब ॥ ३ ॥ मदन्तु त्वा मघवन् इन्द्र इन्द्रवो राधो देयाय सुन्वते। आमुष्या सोमम् अपिबश् चमूसुतम् ज्येष्ठं तद् दधिषे सहः ॥ ४ ॥ प्र चक्रे सहसा सहो बभञ्ज मन्युम् ओजसा। विश्वे त इन्द्र पृतनायवो यह्वो नि वृक्षा इव येमिरे ॥ ५॥ सहस्रेणेव सचते यवीयुधा यस्त आनट् उप स्तुतिम्। पुत्रं प्रावर्गं कृणुते सुवीर्ये दाश्नोति नम उक्तिभिः ॥ ६ ॥ मा भेम मा श्रमिष्म उग्रस्य सख्ये तव। महत् ते वृष्णो अभिचक्ष्यं

आतां तुर्वश आणि यदु यांना ( आनंदांत असलेले ) मी पाहीन असें कर ७. —वीर्य-सागर इन्द्र आपल्या डाव्या बाजूकडे कल देऊन स्वस्थपणें अधिष्ठित झाला आहे. सेवेमध्यें खण्ड पडला तरी तो क्रुद्ध होत नाहीं; हें इन्द्रा, आमच्या धेनू जणों काय मधु-मक्षिकांच्या मधानेंच ओथंबलेल्या आहेत, ( इतकें त्यांचें दुग्ध मिष्ट आहे, ) तर सत्वर ये, धांवत ये, आणि मधुर दुग्ध प्राशन कर ८. —इन्द्रा, तुझा जो प्रियमित्र असेल तो अश्व-संपन्न असतो, तो योद्धा असून गोसंपन्न असतो, आणि त्याचा आंगलोटहि उत्तमच दिसतो. आंगांत भक्कम जोम राहील अशा तारुण्यानें तो नेहमीं मंडित असतो, आणि चन्द्राप्रमाणें आल्हाद तेजस्क होऊन तो लोकसभेमध्यें प्रवेश करतो ९. —तृषाक्रांत मृग पाणवठ्याकडे धांवतो तसा तूंहि आमच्याकडे धांवत ये आणि सोमरस यथेच्छ प्राशन कर. हे भगवन्ता, कृपाळूपणानें खालीं ( भूमिवर ) उदकवृष्टि करणारा तूं प्रतिदिनीं अत्यंत ओजस्वी आणि दुर्दम्य तेज धारण करतोस १०. —अध्वर्यू ! तूं धांवत जा; हा सोमरस प्राशन करण्या-साठीं इन्द्र उत्सुक झाला आहे; आणि म्हणून आपले बलाढ्य अश्व झटपट जोडून तो वृत्रनाशन इन्द्र तडक येथें येऊन पोहोंचला आहे ११. —ज्या भक्तांच्या घरीं तूं सोमरसाच्या प्राशनानें तृप्त होतोस, तो भक्त खरोखरच आपल्या स्वतःला धन्य समजतो; हा तुझा प्रिय नैवेद्य येथें ओतून ठेवला आहे. तर इकडे धांवत ये, आणि तो प्राशन कर १२. —अत्यंत श्रेष्ठ योद्धा जो इन्द्र त्याच्या प्रीत्यर्थ, हे अध्वर्यूनों, तुम्हीं सोमरस पिळूनसिद्ध करा. पहा, सोमरस पिळणारे ग्रावे, जगदाधार इन्द्राचा दानप्रचुर यज्ञ हाच आहे असें (जगाला आपल्या ध्वनीनें ) स्पष्टपणें सांगत आहेत १३. —वीर्यशाली सेवक जे दोन हरिद्वर्ण अश्व ते त्या जगदाधार इन्द्राला यज्ञकर्मसमारंभांत घेऊन जात आहेत; तर ( हे इंद्रा, ) अध्वरयागाची शोभाच असे जे तुझे शीघ्रगामी अश्व ते तुजला आमच्या सोमसवन प्रसंगीं इकडे घेऊन येवोत १४. —अगणितधन जो विश्वपोषक ( पूषा ) त्याच्या सहवासासाठीं आम्हीं त्याची विनवणी करीत आहों. हे सकलजनाहूता सर्वसमर्था

कृतं पश्येम तुर्वशं यदुम् ॥ ७ ॥ सव्याम् अनु स्फिग्यं वावसे वृषा न दानो अस्य रोषति । मध्वा सम्पृक्तो सारघेण धेनवस् तूयमेहि द्रवा पिबा ॥ ८ ॥ अश्वी रथी सुरूप इत् गोमाँ इन्द्र ते सखा । श्वात्रभाजा वयसा सचते सदा चन्द्रो याति सभाम् उप ॥ ९ ॥ ऋश्यो न तृष्यन् अवपानम् आगहि पिबा सोमं वशाँ अनु । निमेघमानो मघवन् इन्दवे दिवः ओजिष्ठं दधिषे सहः ॥ १० ॥ अध्वर्यो द्रावया त्वं सोमम् इन्द्रः पिपासति । उप नूनं युयुजे वृषणा हरी आ च जगाम वृत्रहा ॥ ११ ॥ स्वयं चित् स मन्यते दाशुरिर् जनो यत्रा सोमस्य तृम्पसि । इदं ते अन्नं युज्यं समुक्षितं तस्येहि प्र द्रवा पिबा ॥ १२ ॥ रथेष्ठाय अध्वर्यवः सोममिन्द्राय सोतन । अधि ब्रध्नस्य अद्रयो विचक्षते सुन्वन्तो दाशु अध्वरम् ॥ १३ ॥ उप ब्रध्नं वावाता वृषणा हरी इन्द्रम् अपसु वक्षतः । अर्वाञ्चम् त्वा सप्तयो अध्वरश्रियो वहन्तु सवनेदुप ॥ १४ ॥ प्र पूषणं

पूषा, हे संकटमोचना, वुद्धिवलानें ( संकटांशीं ) झगडण्याचें, आणि ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याचें आम्हांला शिक्षणदे १५. —दोन्ही हातांत सुरी ( क्षुर ) धरून तिला घांसावें त्याप्रमाणें आम्हांला (संकटरूप दगडावर घांसून ) तीक्ष्ण कर. हे दुःखविमोचना, आम्हाला अक्षय संपत्ति अर्पण कर. जें उषःकालच्या कान्ति प्रमाणें तेजस्वी आहे, आणि जें मर्त्य ( मानवां ) कडे तूं सहज विखरून देतोस तें तुजजवळचें ( अक्षय ) धन आम्हांला लाभ होवो, १६. —हे विश्वपोषका तुझें अनुरंजन करण्याची मला उत्कण्ठा आहे, आणि तुझें स्तवन करण्याचीहि उत्कण्ठा असणार; परंतु हे अतुल दीप्तिमान् पूषा, या व्यतिरिक्त जें असेल तें मला नको. तें भलतें सलतेंच असतें; हे दिव्यधना, सामप्रिय पज्राकरितां मीं तुझें गुणसंकीर्तन करीत आहे १७. —आमच्या धेनू दूर कोठेंतरी तृणभक्षणार्थ गेलेल्या आहेत; हे अतुलदीप्तिमन्ता हे मृत्युरहिता, माझें कायमचें धन कायतें हेंच; तर हे पूषा तूं आमचा कल्याणकारी संरक्षक हो, आणि सत्वप्राप्तीच्या झगड्यांत अत्यंत औदार्य प्रकट कर १८. —तेजस्वी आणि भाग्यशाली अशा कुरंग राजाच्या स्वर्गप्रद यज्ञांत तुर्वश राजांच्या देणग्यांमध्यें मला शंभर अश्वांची भरभक्कम देणगी मिळाली १९. —कण्व-कुलोत्पन्नाच्या सत्वाढय वंशजाच्या वुद्धिवलांनीं स्वर्लोकप्रद यज्ञांत प्रियमेधांनीं अनेक देणग्या मिळविल्या; त्यांत अगदीं निर्दोष अशा साठ हजार गाईंचीं खिल्लारें होतीं. तीं सर्व तो ऋषि घेऊन गेला २०. —माझें आगमन होतांच वृक्ष देखील आनंदाच्या कडकडाटानें उद्गारले कीं, पहा हे भक्तजन अपूर्व देणगीनें धेनू मिळवून वसले आणि अश्वहि मिळवून वसले. २१.

---

वृणीमहे युज्याय पुरूवसुम् । स शक्र शिक्ष पुरुहूत नो धिया तुजे राये विमोचन ॥१५॥ सं नः शिशीहि भुरिजोरिव क्षुरं रास्व रायो विमोचन । त्वे तन्नः सुवेदम् उस्रियं वसु यं त्वं हिनोषि मर्त्यम् ॥१६॥ वेमि त्वा पूषन् ऋञ्जसे वेमि स्तोतव आघृणे । न तस्य वेमि अरणं हि तद् वसो स्तुषे पज्राय साम्ने ॥ १७ ॥ परा गावो यवसं कच्चिद् आघृणे नित्यं रेक्णो अमर्त्य । अस्माकम् पूषन् अविता शिवो भव मंहिष्ठो वाज-सातये ॥ १८ ॥ स्थूरं राधः शताश्वं कुरङ्गस्य दिविष्टिषु । राज्ञस् त्वेषस्य सुभगस्य रातिषु तुर्वशेषु अमन्महि ॥ १९ ॥ धीभिः सातानि काण्वस्य वाजिनः प्रियमेधैर् अभिद्युभिः । षष्टिं सहस्राम् अनु निर्मजाम् अजे निर् यूथानि गवाम् ऋषिः ॥ २० ॥ वृक्षा श्चित् मे अभिपित्वे अरारणुः । गां भजन्त मेहना अश्वं भजन्त मेहना ॥ २१ ॥

इति पंचमाष्टके सप्तमोऽध्यायः

## सूक्त ५

अष्टक ५ मण्डल ८ अध्याय ८

सत्चारित्र्य आणि आरक्तवर्ण ( उषा देवीनें ) दूर अन्तरावरून परंतु येथें ( यज्ञमण्डपांत ) च असल्याप्रमाणें आपली प्रभा उत्फुल्ल केली आणि आपले किरण चोहोंकडे पसरून दिले १. —वीरोचितवृत्ति धारण करणारे असे तुम्हीं, आपल्या इच्छामात्रेंकरून जोडल्या जाणाऱ्या ज्वलत्तेजोमय रथांत वसून, हे अद्भुत पराक्रमी अश्वी हो, उषादेवीवरोवरच राहत असतां २. —सत्वसामर्थ्यसंपन्न देवानों, ( भक्तांचीं ) स्तवनें तुम्हां उभयतांना प्रत्यक्ष दिसतात म्हणून मीहि ( तशीच ) स्तुति दूताप्रमाणें तुम्हां ( उभयतां ) कडे अन्तःकरणपूर्वक पोहोंचवली आहे ३. —सर्वांना प्रिय, सकल आनंदांनीं युक्त, अपारनिधींनीं संपन्न अशा अश्वीदेवानों, आम्हीं कण्वकुलोत्पन्न भक्त सहायासाठीं तुमचा धांवा करीत आहों ४. —तुम्हीं अत्यंत दानशील आणि पूज्य आहांत. तुम्हीं सत्वसामर्थ्य उत्तम रीतीनें प्राप्त करून देणारे, मनाला उत्साह आणणारे आणि मंगलाधिपति असूनहि भक्ताच्या गृहीं स्वतः जातां ५. —अशा प्रकारचे तुम्ही आहांत, तर जिला अपाय होण्याचा संभवच नाहीं अशा सद्बुद्धीची देणगी सुदेव भक्ताला द्या; त्याच्या धेनूंचें निवासस्थान घृतवृष्टीनें भिजवून टाका ६. —ससाण्याप्रमाणें द्रुतगतीनें धांवणाऱ्या अश्वांसह, हे अश्वीहो, तुम्ही आमच्या स्तवनांकडे त्वरेनें धांवा ७. —दूर अंतरावरील द्यूलोकाचीं तिन्हीं स्थानें, त्यांतील यच्चावत् तेजोगोल आणि ( पृथ्वीवरील ) तमोमय प्रदेश यांच्या भोंवतीं तुम्ही ज्या अश्वांच्या योगानें भ्रमण करितां ( त्यांच्यासह आमच्याकडे ) या ८. —( प्रकाश ) धेनूंनीं संपन्न करील असा उत्साह आणि अभीष्टप्राप्ति या गोष्टी आम्हांला साध्य करून घेतां याव्या म्हणून, हे दिनप्रकाशाचा लाभ

---

## सूक्तम् ५

काण्वो ब्रह्मातिथिः अश्विनौ गायत्री.

दूरात् इहेव यत् सती अरुणप्सुर् अशिश्वित तत् । वि भानुं विश्वधा तनत् ॥१॥ नृवत् दस्रा मनोयुजा रथेन पृथुपाजसा । सचेथे अश्विनोषसम् ॥२॥ युवाभ्यां वाजिनीवसू प्रति स्तोमा अदृक्षत । वाचं दूतो यथोहिषे ॥ ३ ॥ पुरुप्रिया न ऊतये पुरुमन्द्रा पुरूवसू । स्तुषे कण्वासो अश्विना ॥ ४ ॥ मंहिष्ठा वाजसातमा एषयन्ता शुभस्पती । गन्तरा दाशुषो गृहम् ॥ ५ ॥ ता सुदेवाय दाशुषे सुमेधाम् अवितारिणीम् । घृतैर् गव्यूतिम् उक्षतम् ॥ ६ ॥ आ नः स्तोमम् उप द्रवत् तूयं श्येनेभिर् आशुभिः । यातम् अश्वेभिर् अश्विना ॥ ७ ॥ येभिः तिस्रः परावतो दिवो विश्वानि रोचना । त्रीन् अक्तून् परिदीयथः ॥ ८ ॥ उत नो गोमतीर् इषः उत सातीर् अहर्विदा । वि पथः सातये

करून देणाऱ्या अश्वीदेवानों ! आमचे मार्ग मोकळे करा ९. —अश्वीदेवहो ! गोसंपन्न उत्तम वीर आणि उत्तम रथ यांनीं परिप्लुत असें वैभव, आणि अश्वसंपन्न करणारा उत्साह अशी देणगी तुम्हीं घेऊन या १०. —आनन्दोत्फुल्ल, मंगलाधीश, अद्भुतचारित्र्य, आणि सुवर्णरथारूढ अश्वीदेवहो, तुम्हीं मधुर सोमरस प्राशन करा ११. —सत्वसामर्थ्याच्या ऐश्वर्यानें मंडित असणाऱ्या अश्वीहो, आम्हांला आणि आमच्या दानशाली यजमानांना तुमचें विस्तीर्ण आणि अभंग असें जें निवासस्थान तें प्राप्त करून द्या १२. —आमच्या मंडळीनें म्हटलेलें प्रार्थनासूक्त गोड मानून घेणारे तुम्हीं आमच्याकडे त्वरेनें आगमन करा; दुसऱ्या कोणाकडेहि जाऊं नका १३. —हे अश्वीहो, तल्लीन करणारें आणि तुम्हांला अर्पण केलेलें जें सुंदर मधुर पेय त्याचा, हे बुद्धिगम्य देवानों, तुम्हीं आस्वाद घ्या १४. —शेंकडों, हजारों प्रकारचें जें धन आहे, सकलबलसंपन्न आणि सकल पोषक जें वैभव आहे तें आम्हांला अर्पण करा १५. —खरोखर पुष्कळ ठिकाणीं, हे वीरानों, मननशील भक्त आपल्या स्तोतृजनांसह तुमचा धांवा परोपरीनें करीत असतात. तर हे अश्वीहो, तुम्हीं त्यांच्याकडे आगमन करा १६. —कुशासन सिद्ध करून आणि हवि हातांत घेऊन सर्व तयारीनें सज्ज झालेले भक्तजन, हे अश्वीहो, तुम्हांला हांक मारीत आहेत १७. —तर तुम्हांला अत्यंत त्वरेनें इकडे आणण्याला समर्थ असा आमचा हा धांवा, हे अश्वीहो, तुम्हां उभयतांच्या अंतःकरणांत जाऊन भिडो १८. —तुमच्या साठीं हा जो मधानें भरलेला बुधला तुमच्या रथाच्या मार्गावर ठेवलेला आहे त्यांतील मध, हे अश्वीहो, तुम्हीं प्राशन करा १९. —आणि त्यानें प्रसन्न होऊन, हे सत्वैश्वर्यवान् देवानों, आमच्या पशूंना, आमच्या लेकरांना आणि आमच्या धेनूंना पुष्टि मिळेल असा उत्साह उत्पन्न करा २०. —आणखी हे दिनप्रवर्तकांनों ! आमच्यासाठीं तुम्ही दिव्य उत्साह आणि उदकपूर्ण नद्या यांचा, प्रवाह द्वारानें बाहेर लोटावा त्याप्रमाणें

---

सितम् ॥ ९ ॥ आनो गोमन्तम् अश्विना सुवीरं सुरथं रयिम् । वोळ्हम् अश्वावतीर् इषः ॥ १० ॥ वावृधाना शुभस्पती दस्रा हिरण्यवर्तनी । पिबतं सोम्यं मधु ॥ ११ ॥ अस्मभ्यं वाजिनीवसू मघवद्भ्यश्च सप्रथः ॥ छर्दिर् यन्तम् अदाभ्यम् ॥ १२ ॥ नि षु ब्रह्म जनानां याविष्टं तूयम् आ गतम् । मो षु अन्यां उपारतम् ॥ १३ ॥ अस्य पिबतम् अश्विना युवं मदस्य चारुणः । मध्वो रातस्य धिष्ण्या ॥ १४ ॥ अस्मे आ वहतं रयिं शतवन्तं सहस्रिणम् । पुरुक्षुं विश्वधायसम् ॥ १५ ॥ पुरुत्रा चित् हि वां नरा वि ह्वयन्ते मनीषिणः । वाघद्भिर् अश्विना गतम् ॥ १६ ॥ जनासो वृक्तबर्हिषो हविष्मन्तो अरंकृतः । युवां हवन्ते अश्विना ॥ १७ ॥ अस्माकम् अद्य वाम् अयं स्तोमो वाहिष्ठो अन्तमः । युवाभ्यां भूतु अश्विना ॥ १८ ॥ यो ह वां मधुनो दृतिः आहितो रथचर्षणे । ततः पिबतम् अश्विना ॥ १९ ॥ तेन नो वाजिनीवसू पश्वे तोकाय शं गवे । वहत पीवरीः इषः ॥ २० ॥ उतनो दिव्याः इष उत सिंधूंर् अहर्विदः । अप द्वारेव—

धों धों वर्षाव करितां २१. —तुग्राचा पुत्र समुद्रांत फेंकून दिलेला होता, त्यानें मची अशी कोणती सेवा केली कीं, हे वीरानों, तुमचा रथ पंखांनीं ( उडाल्या-प्रमाणें ) त्याच्याकडे झट्कन् उडून जावा ? २२. —तसेंच ( दुष्टांनीं ) सतावून सोडलेल्या कण्वाला एका मोठ्या वाड्यांत कोण्डलें होतें तेथें त्याला तुम्हीं नाना-प्रकारचें सहाय दिलेंत २३. —तर त्याच अपूर्व आणि प्रशंसनीय सहायांसह तुम्हीं आमच्याकडे या. आणि म्हणूनच, शौर्य-धनाचा वर्षाव करणाऱ्या देवानों, मी तुमचा धांवा करीत आहे २४. —ज्याप्रमाणें तुम्हीं कण्वावर कृपा केलीत, किंवा माननीय जो प्रियमेध, किंवा अत्रि, किंवा शिंजार यांना, हे अश्वीहो, सहाय केलेंत २५. —आणि ज्याप्रमाणें युद्ध हें प्राप्त कर्तव्य झालें असतां अंशूला सहाय दिलेंत, गोधन मिळविण्यांत अगस्त्याला, आणि सत्वरक्षणाच्या झटापटींत सोभरीला ( यशस्वी केलेंत ) २६. —त्याचप्रमाणें, हे वीर्यधन देवानों, किंवा त्याच्याहि पेक्षां अधिक भावनेनें आम्हीं तुमचे गुणानुवाद गाऊन तुमच्याजवळ आमच्या कल्याणाची याचना करीत आहों २७. —ज्याची धुरा सुवर्णाची, घोड्याचा लगामहि सुवर्णाचा, आणि जो आकाशाला जाऊन भिडतो, अशा रथांत तुम्हीं आरोहण करा २८. —तुमच्या रथाची वसण्याची साटी सुवर्णाची, कणा सुवर्णाचा, आणि त्याचप्रमाणें दोन्ही चाकें देखील सुवर्णाचींच आहेत २९. —तर हे सत्वधनाढ्य देवानों, अशा रथांत आरोहण करून, तुम्हीं दूरच्या लोकांत असलां तरी तेथूनहि या माझ्या प्रेमळ स्तवनाकडे आगमन करा ३०. —दूरच्या लोकांतून ( येत असतांना ) अधार्मिक लोकांच्या उत्साहातिरेकाला दडपून टाकून ( त्यांना ) इकडे धरून आणा ३१. —आणि दैदीप्यमान ऐश्वर्यासह, आपल्या विश्रुतयशांसह आणि अक्षयधनासह हे अश्वीनों, हे सकलाल्हादप्रद सत्यस्वरूप देवानों तुम्हीं आमच्याकडे आगमन करा ३२. —तुमचे ठिपकेदार तुळतुळीत आणि

वर्षथः ॥ २१ ॥ कदा वा तौग्र्यो विधत् समुद्रे जहितो नरा । यद्वां रथो विभिष् पतात् ॥ २२ ॥ युवं कण्वाय नासत्याऽपिरिप्ताय हर्म्ये । शश्वद् ऊती दशस्यथः ॥२३॥ ताभिर् आयातम् ऊतिभि र्नव्यसीभिः सुशस्तिभिः । यद्वां वृषण्वसू हुवे ॥ २४ ॥ यथा चित् कण्वम् आवतं प्रियमेधम् उपस्तुतम् । अत्रिम् शिञ्जारम् अश्विना ॥ २५ ॥ यथोत कृत्व्ये धने अंशुं गोषु अगस्त्यम् । यथा वाजेषु सोभरिम् ॥ २६ ॥ एतावत् वां वृषण्वसू अतो वा भूयो अश्विना । गृणन्तः सुम्नम् ईमहे ॥ २७ ॥ रथं हिरण्य-वन्धुरं हिरण्याभीशुम् अश्विना । आ हि स्याथो दिविस्पृशम् ॥ २८ ॥ हिरण्ययीं वां रभिरीषा अक्षो हिरण्ययः । उभा चक्रा हिरण्यया ॥ २९ ॥ तेन नो वाजिनीवसू परावत श्चित् आगतम् । उपेमां सुष्टुतिं मम ॥३०॥ आ वहेथे पराकात् पूर्वी रश्नन्ता-वश्विना । इषो दासी-रमर्त्या ॥ ३१ ॥ आ नो द्युम्नैः आ श्रवोभिः आ राया यातम् अश्विना । पुरुश्चन्द्रा नासत्या ॥३२॥ एह वां प्रुषितप्सवो वयो वहन्तु पर्णिनः । अच्छा

पंख असलेले अश्व, येथें मनोभावानें अध्वरयाग करणाऱ्या भक्ताकडे तुम्हाला घेऊन येवोत ३३. —तुमचा रथ, कीं ज्याच्या मागें भक्तजन गात चाललेले असतात, आणि जो नेहमीं ( भक्ताच्या ) मनोत्साहाबरोबरच राहतो त्या तुमच्या रथाचें चाक कधींहि अडत नाहीं ३४. —अशा त्या सुवर्णमय, आणि शीघ्रगामी अश्व जोडलेल्या रथाच्या योगानें, हे सत्यस्वरूप देवांनों, तुम्हीं मनोवेगी झालां आहांत ३५. —सदैव जागरूक राहणाऱ्या जंगली श्वापदाचेंहि तुम्हीं चोज करतां, तर हे वीर्यधनाढ्य देवानों, आमच्याहि ( शाश्वत ) संपत्तीला उत्साहाची जोड द्या ३६. —हे अश्वीहो ! मला अशा नवीन देणग्यांचा लाभ करून द्या कीं जेणेंकरून **चेदी** देशाचा **कशु** राजा शंभर उंट आणि दहा हजार गाई ( धार्मिक जनांना ) देत जाईल ३७. —ज्यानें सुवर्णा-प्रमाणें अंगकांतीच्या दशदेशच्या राजांकडून माझा सन्मान करविला, त्या **चैद्य** राजाच्या चरणाखालींच सर्व जन आहेत. त्याच्या भोंवतीं ढालाईत सैनिकांची नेहमींच गर्दी असते ३८. —हे चेदीचे राजे ज्या मार्गानें जातात त्या मार्गानें कोणींहि जाऊं शकणार नाहीं; आणि त्यांच्या शिवाय दुसरा एखादा लोकनायक, किंवा ज्यास्त दानशूर असा मनुष्य आहे असें कोणीं समजत नाहीं ३९.

## सूक्त ६

परमथोर इन्द्र जो वर्षाव करणाऱ्या मेघाप्रमाणें (मनोरथांची वृष्टि करणारा) आहे, तो मज वत्साच्या स्तवनांनीं ( आनंदानें ) प्रफुल्ल झाला १. —सनातन सद्धर्मांच्या संततीला संतुष्ट करणारे जे स्तवनज्ञ ऋत्विज्, त्यांनीं सद्धर्मांच्या धाराप्रवाहानें जेव्हां

---

सु अध्वरं जनम् ॥ ३३ ॥ रथं वां अनुगायसं य इषा वर्तते सह । न चक्रम् अभि बाधते ॥ ३४ ॥ हिरण्ययेन रथेन द्रवत्पाणिभि रश्वैः । धीजवना नासत्या ॥ ३५ ॥ युवं मृगं जागृवांसं स्वदथो वा वृषण्वसू । ता नः पृङ्क्तम् इषा रयिम् ॥ ३६ ॥ ता मे अश्विना सनीनां विद्याम नवानाम् । यथा चित् चैद्यः कशुः शतम् उष्ट्रानां ददत् सहस्रा दश गोनाम् ॥ ३७ ॥ यो मे हिरण्यसन्दृशो दश राज्ञो अमंहत । अधस्पदा इत् चैद्यस्य कृष्टयश् चर्मन् आ अभितो जनाः ॥ ३८ ॥ माकिर् एना पथा गात् येनेमे यन्ति चेदयः । अन्यो नेत् सूरिर् ओहते भूरिदावत्तरो जनः ॥ ३९ ॥

## सूक्तम् ६

काण्वः वत्सः इन्द्रः गायत्री.

महाँ इन्द्रो य ओजसा पर्जन्यो वृष्टिमाँ इव । स्तोमै वत्सस्य वावृधे ॥ १ ॥ प्रजाम् ऋतस्य पिप्रतः प्र यत् भरन्त वह्नयः । विप्रा ऋतस्य वाहसा ॥ २ ॥

( आपली सेवा ) अर्पण केली; जेव्हां कण्वांनीं यज्ञाचें साधन म्हणून इन्द्राला स्तवनांनीं प्रसन्न केलें, तेव्हां आयुध हेंच त्यांचें आप्त ठरलें २-३. —ज्याच्या आवेशापुढें सर्व उद्योगरत जन असे नम्र होतात कीं जशा समुद्रापुढें नद्याच ४. —तेव्हांच ह्या इन्द्राची ओजस्विता चमकली कीं जेव्हां ( पृथ्वी आणि आकाश हे ) दोन्ही लोक त्यानें चामड्याप्रमाणें एकत्र शिवून टाकले ५. —आणि ( जगाची ) पांचावर धारण वसविणाऱ्या वृत्राचें मस्तक, आपल्या शेंकडों धारांच्या शौर्यवर्षक वज्राच्या योगानें छिन्नभिन्न केलें ६. —म्हणून आमच्या ह्या ध्यानस्तुति इतर स्तुतींच्या अगोदर आम्हीं मोठ्यानें गातों; त्या स्तुति अशा कीं जणों काय अग्नीच्या तेजस्वी ज्वालाच ७. —ध्यानस्तुति अन्तःकरणांत गूढ होत्या; त्या जेव्हां आपण होऊन ( मुखांतून बाहेर पडून ) चमकल्या, तेव्हां कण्व देखील सद्धर्माच्या धाराप्रवाहानें चमकूं लागले ८. —तर हे इन्द्रा, तें अपूर्व गोयुक्त आणि अश्वयुक्त धन, आणि तुझें चिन्तन प्रथम व्हावें म्हणून तें सूक्तज्ञान, अशा दोहोंचाहि आम्हांस लाभ घडो ९. —मीच एकट्यानें पित्यापासून सत्यधर्माची बुद्धि ग्रहण केली, आणि म्हणूनच मी सूर्याप्रमाणें तेजस्वी असा जन्मलों १०. —मीं पुरातन मननीय स्तोत्रानें, कण्वाप्रमाणें आपल्या स्तवनवाणी अलंकृत करतों, म्हणजे तेणेंकरून इन्द्र आपलें शोषक तेज प्रकट करीलच करील ११. —इन्द्रा, ज्यांनीं तुझें अजून स्तवन केलें नसेल, आणि ज्या ऋषींनीं तुझें स्तवन केलें तूं असेल ( अर्थात् पुढें होणाऱ्या आणि मागें होऊन गेलेल्या भक्तांमध्यें ) माझ्याच स्तवनानें संतुष्ट होऊन प्रफुल्लित हो १२. —वृत्राचे तुकडे तुकडे करीत असतांना त्या ( भगवंता )चा आवेश जेव्हां दणकला, त्याच वेळेस त्यानें नद्या समुद्राकडे धाडून दिल्या १३. —इन्द्रा ( जगताला ) शुष्क करणाऱ्या शुष्ण राक्षसावर जेव्हां तूं सर्वांना आधार देणारें असें आपलें वज्र हाणलेंस, तेव्हांच तूं शत्रुभयंकर म्हणून प्रख्यात ठरलास १४.

---

कण्वा इन्द्रं यत् अक्रत स्तोमैः यज्ञस्य साधनम् । जामि ब्रुवत आयुधं ॥३॥ समस्य मन्यवे विशो विश्वा नमन्त कृष्टयः । समुद्रायेव सिन्धवः ॥ ४ ॥ ओजस् तत् अस्य तित्विषे उभे यत् समवर्तयत् । इन्द्र श्चर्मेव रोदसी ॥ ५ ॥ वि चित् वृत्रस्य दोधतो वज्रेण शतपर्वणा । शिरो बिभेद वृष्णिना ॥ ६ ॥ इमा अभि प्र णोनुमो विपाम् अग्रेषु धीतयः । अग्नेः शोचि र्न दिद्युतः ॥ ७ ॥ गुहा सतीर् उप त्मना प्र यत् शोचन्त धीतयः । कण्वा ऋतस्य धारया ॥ ८ ॥ प्र तम् इन्द्र नशीमहि राय गोमन्तम् अश्विनम् । प्र ब्रह्म पूर्व चित्तये ॥ ९ ॥ अहम् इत् हि पितु ष्परी मेधाम् ऋतस्य जग्रभ । अहं सूर्य इवा-जनि ॥ १० ॥ अहं प्रत्नेन मन्मना गिरः शुम्भामि कण्ववत् । येनेन्द्रः शुष्मम् इद्दधे ॥ ११ ॥ ये त्वाम् इन्द्र न तुष्टुवु ऋषयो ये च तुष्टुवुः । ममेत् वर्धस्व सुष्टुतः ॥ १२ ॥ यदस्य मन्यु रध्वनीत् वि वृत्रं पर्वशो रुजन् । अपः समुद्रम् ऐरयत् ॥ १३ ॥ नि शुष्ण इन्द्र धर्णसिं वज्रं जघन्थ दस्यवि । वृषा हि उग्र

—द्युलोकाचे तेजोगोल, तेजस्वितेंत इन्द्राला मुळींच मागें टाकूं शकले नाहींत, अंतरिक्षलोकहि त्या वज्रधराला व्यापून टाकूं शकले नाहींत, आणि भूप्रदेशहि इन्द्राला व्याप्त करूं शकले नाहींत १५. —इन्द्रा, प्रचंड उदकप्रवाहांत जो ( राक्षस ) त्यांना आडवून धरून आंत दडी देऊन राहिला होता, त्याचा बरोबर माग काढून तूं त्याला तेथच्या तेथेंच ठार केलेंस १६. —ज्या ( राक्षसा ) नें ह्या एकत्र नांदणाऱ्या विस्तीर्ण द्यावापृथिवींना डांबून धरलें होतें त्याला, हे इन्द्रा, तूं निविड अंधःकारांत गाडून टाकलेंस १७. —इन्द्रा, ज्या जितेन्द्रिय साधूंनीं आणि ज्या भृगुकुलोत्पन्न भक्तांनीं तुझी स्तुति केलीं असेल, तरीहि हे शत्रुभयंकरा, तूं माझी हांक ऐकून घेच १८. —इन्द्रा, ह्या ठिपकेदार ( मेघरूप ) धेनू घृताच्या आणि दाट दुधाच्या धारा सोडतात, आणि अशा रीतीनें ती धारा सद्धर्मांची पोषक झाली १९. —इन्द्रा, त्या वहुप्रसव धेनूंनीं तुजला मुख्य गाभा समजून आपल्या मुखानें आपल्यामध्यें ठेवून दिलें. ज्याप्रमाणें ( पृथ्वीला ) धारण करणारा द्युलोक सूर्याला आपल्यामध्यें ठेवतो त्याप्रमाणें ठेवलें २०. —हे उत्कटवलाढया, कण्वांनीं तुला उक्थस्तोत्रांनीं हर्षोत्फुल्ल केलें, तसें या पिळलेल्या सोमबिन्दूंनींहि केलें आहे २१. —इन्द्रा, वज्रधरा, तुझ्या मार्गदर्शकत्वाखालींच तुझें स्तवन करावयाचें असतें आणि यज्ञहि साङ्ग संपादन करावयाचा असतो २२. —हे इन्द्रा, ज्याप्रमाणें तूं शत्रूचा किल्ला ( फोडून मार्ग मोकळा केलास ) त्याप्रमाणें धेनूंनीं समृद्ध अशी उत्साहवृत्ति, पुत्रपौत्र, आणि वीर्य शालित्व यांचें भांडार तूं मोकळें कर २३. —तसेंच हे इन्द्रा, शीघ्रगामी अश्वांनीं परिपूर्ण असें वैभव, जें तूं पूर्वीं नहुषकुलोत्पन्नांना दिलें होतेंस, तसें वैभव आम्हांसहि अर्पण कर २४. —इन्द्रा, जेव्हां तूं आम्हांवर कृपा करतोस, तेव्हां सूर्य ( रूपानें ) आमच्या अगदीं दृष्टीसमोर त्याचा रश्मिसमूहहि धेनूसमूहाप्रमाणें पसरून देतोसच २५. —कारण, हे इन्द्रा, तूं

श्रृण्विषे ॥ १४ ॥ न द्याव इन्द्रम् ओजसा नान्तरिक्षाणि वज्रिणम्। न विव्यचन्त भूमयः ॥ १५ ॥ यस्त इन्द्र महीर् अपः स्तभूयमान आशयत्। नि तं पद्यासु शिश्नथः ॥ १६ ॥ य इमे रोदसी मही समीची समजग्रभीत्। तमोभि रिन्द्र तं गुहः ॥ १७ ॥ य इन्द्र यतय–स्त्वा भृगवो ये च तुष्टुवुः । ममेत् उग्र श्रुधी हवम् ॥ १८ ॥ इमा–स्त इन्द्र पृश्नयो घृतं दुहत आशिरम्। एनाम् ऋतस्य पिप्युषीम् ॥१९॥ या इन्द्र प्रस्वस् त्वासा गर्भम् अचक्रिरन्। परि धर्मेव सूर्यम् ॥२०॥ त्वामित् शवसस्पते कण्वा उक्थेन वावृधुः। त्वां सुतास इन्दवः ॥ २१ ॥ तवेत् इन्द्र प्रणीतिषु उत प्रशस्तिः अद्रिवः। यज्ञो वितन्तसाय्यः ॥ २२ ॥ आन इन्द्र महीम् इषम् पुरं न दर्षि गोमतीम्। उत प्रजां सुवीर्यम् ॥ २३ ॥ उत त्यत् आशु अश्व्यम् यदिन्द्र नाहुषीषु आ। अग्रे विक्षु प्रदीदयत् ॥ २४ ॥ अभि व्रजं न तत्निषे सूरः उपाक चक्षसम्। यदिन्द्र मृळयासि नः ॥ २५ ॥ यदङ्ग तविषीयस इन्द्र

आपली धडाडी व्यक्त करतोस आणि पृथ्वीवरील प्राणिमात्रांवर आपली राजसत्ता चालवितोस; असा तूं परमथोर आणि तेजस्वितेंत अपरंपार आहेस २६. —म्हणूनच भक्तजन हविर्भाग हातीं घेऊन आणि सोमरस पिळून तुला व्यापकसंचारी देवाला रक्षणासाठीं हांक मारीत असतात २७. —पर्वताच्या दरींत आणि नद्यांच्या संगमावर ज्ञानी ( विप्र ) आपल्या ध्यानवलानें ( लोकांत ) प्रकट झाला २८. —स्तवनांत तल्लीन होऊन तो जेथून जाण्यास निघतो तेथूनच समुद्र आणि जलाशय यांच्याकडे तो सूक्ष्मज्ञानी अवलोकन करतो २९. —आणि नंतर ( सृष्टीच्या ) सनातन बीजाचें जें सूर्यरूपी तेज द्युलोकाच्या पलीकडे धगधगत असतें तें तेज ( ज्ञानीजन ) पाहतात ३० —इन्द्रा, सर्व कण्वकुलोत्पन्न जन तुझें वात्सल्य, तुझें पौरुष, आणि हे प्रवलोत्तमा, तुझें वीर्यशालित्व ह्यांचा महिमा वृद्धिंगत करितात ३१. —म्हणूनच इन्द्रा, ही माझी प्रेमळ स्तुति ग्रहण कर, मजवर उत्तमरीतीनें कृपा कर, आणि माझ्या सुबुद्धिचें संवर्धन कर ३२. हे पुराणपुरुषा, वज्रधरा, ( सर्वांच्या ) जीवनासाठीं म्हणूनच आम्हीं स्तवनज्ञ कवींनीं तुझ्या प्रीत्यर्थ सुंदर प्रार्थनासूक्तें रचलीं आहेत ३३. —कण्व कुलोत्पन्नांनीं असें स्तवन केलें कीं इन्द्राविषयीं प्रेमोत्सुक झालेली त्यांची प्रतिभा, नद्या जशा सखल प्रदेशाकडे जोरानें वाहतात त्याप्रमाणें वाहूं लागली ३४. —नद्या जशा समुद्राला ( मिळून त्याला वृद्धिंगत करतात ) त्याप्रमाणें इन्द्राची थोरवी उक्थ स्तोत्रांनीं वृद्धिंगत केली आहे; तो इंद्र असा कीं ज्याचा क्रोधावेश कोणाच्यानेंहि आवरला जात नाहीं. आणि जो कधींहि जराग्रस्त होत नाहीं ३५. —दूरच्या द्युलोकापासून तूं आपल्या हरिद्वर्ण अश्वांसह या ठिकाणीं आमच्याकडे ये, आणि हे इंद्रा, सोमरस प्राशन कर ३६. —वृत्राचा समूळ उच्छेद करणाऱ्या इन्द्रा, कुशासन सिद्ध करून वाट पाहणारे भक्तजन सत्वसामर्थ्यांचा लाभ व्हावा म्हणून तुझाच धांवा करीत आहेत ३७.

---

प्राजसि क्षितीः । महाँ अपार ओजसा ॥ २६ ॥ तं त्वा हविष्मती र्विशः उपब्रुवत ऊतये । उरुज्रय सम् इन्दुभिः ॥ २७ ॥ उपह्वरे गिरीणां संगथे च नदीनाम् । धिया विप्रो अजायत ॥ २८ ॥ अतः समुद्रम् उद्वत–श्चिकित्वाँ अव पश्यति । यतो विपान एजति ॥ २९ ॥ आदित् प्रत्नस्य रेतसो ज्योतिष् पश्यन्ति वासरम् । परो यत् इध्यते दिवा ॥ ३० ॥ कण्वास इन्द्र ते मतिम् विश्वे वर्धन्ति पौंस्यम् । उतो शविष्ठ वृष्ण्यम् ॥ ३१ ॥ इमां म इन्द्र. सुष्टुतिम् जुषस्व प्र सु माम् अव । उत प्रवर्धया मतिम् ॥ ३२ ॥ उत् ब्रह्मण्या वयं तुभ्यं प्रवृद्ध वज्रिवः । विप्रा अतक्ष्म जीवसे ॥ ३३ ॥ अभि कण्वा अनूषत आपो न प्रवता यतीः । इन्द्रं वनन्वती मतिः ॥ ३४ ॥ इन्द्रम् उक्थानि वावृधुः समुद्रमिव सिन्धवः । अनुत्तमन्युम् अजरम् ॥ ३५ ॥ आनो याहि परावतो हरिभ्यां हर्यताभ्याम् । इमां इन्द्र सुतम् पिब ॥ ३६ ॥ त्वाम् इत् वृत्रहन्तम जनासो वृक्त बर्हिषः । हवन्ते वाजसातये ॥३७॥

भूमि आणि आकाश असे दोन्ही लोक, अश्वाच्या पाठीमागून जसें रथाचें चाक फिरतें त्याप्रमाणें तुझ्या अनुरोधानें फिरतात, आणि हे सोमबिन्दु देखील तुझ्याचकडे वाहतात ३८. —दिव्य प्रकाश प्राप्त करून देणाऱ्या ठिकाणीं, आणि शर्यणावतांतहि हे इन्द्रा, तूं हर्षोत्फुल्ल हो. आणि विवस्वानाच्या मननीय स्तवनानें तल्लीन हो ३९. ––प्रचंड स्वरूप धारण करून वीर्यशाली वज्रधर इन्द्रानें द्युलोकाच्या आसमंतात् फार मोठ्यानें सिंहनाद केला. ( कारण ) तोच वृत्राचा नाश करणारा, आणि अत्यंत प्रेमानें सोमरस प्राशन करणारा आहे ४०. —पूर्वकाळचा ऋषि ( कोणता तें पाहूं गेल्यास ) खरोखर हे इन्द्रा, तूंच आहेस. आपल्या तेजस्वितेनें तूंच एकटा सर्वसत्ताधीश आहेस, ( आणि म्हणूनच ) अत्यंत महनीय जें धन तें तूंच जतन करतोस ४१. —तुझे भरदार पुठ्याचे शेंकडों अश्व तुजला आमच्या प्रेमळ स्तवनांकडे आणि पिळलेल्या सोमरसाकडे घेऊन येवोत ४२. —मध आणि घृत यांचीसमृद्धि करून सोडणाऱ्या प्राचीन कवींच्या ध्यानस्तुतीचा विकास कण्वांनीं उक्थ स्तवनानें केला ४३. —सर्व महनीय विभूतींमध्यें यज्ञांत मर्त्यमानवानें इन्द्रालाच शरण जावें; अभीष्ट प्राप्तीची आतुरता असेल त्यानेंहि इन्द्रालाच रक्षणासाठीं शरण जावें ४४. ––सर्वजनस्तुता देवा, प्रियमेधानें प्रशंसा केलेले तुझे हरिद्वर्ण अश्व, तुजला आम्हांकडे वळवून सोमप्राशनार्थ खास घेऊन येतीलच ४५. —तितिन्दिर विद्यमान असतांना शंभर, आणि पर्शु विद्यमान असतांना हजार, अशी देणगी मिळाली. तशाच, यादवाकडूनहि देणग्या मिळाल्या ४६. —त्याचप्रमाणें तीनशें चपळ घोडेस्वार, दहा हजार गाई अशीहि देणगी सामगायनप्रवीण पज्राला मिळाली ४७. —एकांशीं एक याप्रमाणें जोडलेल्या चार चार उंटांच्या चौकड्या याद्वाच्या मनुष्यांना देऊन ककुह राजानें सत्कीर्तीच्या योगानें सर्व द्युलोक व्यापून टाकला ४८.

---

अनु त्वा रोदसी उभे चक्रं न वर्ति एतशम्। अनु सुवानास इन्दवः ॥ ३८ ॥ मन्दस्व सु स्वर्णरे उतेन्द्र शर्यणावति । मत्स्वा विवस्वतो मती ॥ ३९॥ वावृधान उप द्यवि वृषा वज्री अरोरवीत्। वृत्रहा सोमपातमः ॥ ४० ॥ ऋषि हिं पूर्वजा असि एक ईशान ओजसा। इन्द्र चोष्कूयसे वसु ॥ ४१ ॥ अस्माकं त्वा सुताँ उप वीतपृष्ठा अभि प्रयः। शतं वहन्तु हरयः ॥४२॥ इमां सु पूर्व्यां धियं मधो घृतस्य पिप्युषीम् कण्वा उक्थेन वावधुः॥ ४३ ॥ इन्द्रम् इत् हि महीनां मेधे वृणीत मर्त्यः। इन्द्रम् सनिष्युः ऊतये ॥४४॥ अर्वांचम् त्वा पुरुष्टुत प्रियमेध स्तुता हरी। सोमपेयाय वक्षतः ॥ ४५ ॥ शतम् अहं तिरिन्दिरे सहस्रं पर्शवा ददे। राधांसि याद्वानाम् ॥ ४६ ॥ त्रीणि शतानि अर्वतां सहस्रा दश गोनाम् । ददुष् पज्राय साम्ने ॥ ४७ ॥ उदानट् ककुहो दिवम् उष्ट्रान् चतुर्युजो ददत्। श्रवसा याद्वं जनम् ॥ ४८ ॥

# सूक्त ७

हे मरुतानों, जेव्हां ( भक्ताच्या मुखांतून ) त्रिष्टुभ स्तोत्र वदविणारें उत्साही पेय तुमच्याकरितां स्तवनज्ञ कवीनें पात्रांत ओतलें, त्या वेळीं तुम्हीं पर्वतप्राय मेघांत विराजमान झालां होतां १. —आपली धडाडी प्रकट करणाऱ्या शुभ्रतेजस्क देवानों ! तुम्हीं आपला मार्ग आक्रमित असतां तेव्हां पर्वत देखील हलावयास लागतात २. —मोठ्यानें गर्जना करणारे पृश्निपुत्र मरुत् हे वायूच्या सोसाट्यावरोबर आपलाहि आवाज घुमवून देतात आणि पुष्टिदायक उत्साहाचा जणों लोंढाच धों धों वाहवयास लावतात ३. —जेव्हां मरुत् हे वायूबरोबर चालत जातात तेव्हां ते चोहोंकडे धुकें पसरून देतात आणि पर्वतांना चळचळां कांपावयास लावतात ४. —तुमच्या मार्गाला,आणि (जगाचें) धारण करणारें जें तुमचें महत् सामर्थ्य त्याला, पर्वत किंवा नद्या ह्या कोणाऱ्यानेंहि आंवरून धरवत नाहीं ५. —रात्रौ आम्हीं तुम्हालाच सहायार्थ पाचारण करतों, दिवसाहि पाचारण करतों; आणि अध्वरयाग चालू झाला असतां तुम्हांलाच पाचारण करतों ६. —आरक्तवर्ण आणि अद्भुत स्वरूप मरुत् हे गर्जना करीत करीत आपल्या मार्गांनीं द्युलोकाच्या शिखरावरून जातात ७. —सूर्याला जातां येण्यासाठीं, ते आपल्या ओजस्वितेनें त्याचे किरण आणि मार्ग असे दोन्ही उत्पन्न करितात; आणि त्याच्या प्रकाशासह निरनिराळ्या दिशांनीं चालू लागतात ८. —मरुतानों, (ऋभूंना प्रबळ करणाऱ्या मरुतानों), ही माझी स्तुति, हें माझें स्तोत्र, हा माझा हविर्भाग, तुम्हीं प्रेमानें मान्य करून घ्या ९. —या पृश्निपुत्रांनीं तीन मोठमोठीं सरोवरें दोहून तुडुंब भरलीं; वज्रधारी इन्द्राप्रीत्यर्थ मधानें परिपूर्ण असा झरा आणि उदकानें परिपूर्ण असा मेघ यांचेंहि दोहन केलें १०.

# सूक्तम् ७

काण्वः वत्सः मरुतः गायत्री

प्र यत् वः त्रिष्टुभम् इषं मरुतो विप्रो अक्षरत्। वि पर्वतेषु राजथ ॥ १ ॥ यत् अंग तविषीयवो यामं शुभ्रा अचिध्वम्। नि पर्वता अहासत ॥ २ ॥ उदीरयन्त वायुभिर्वाश्रासः पृश्निमातरः। धुक्षन्त पिप्युषीम् इषम् ॥ ३ ॥ वपन्ति मरुतो मिहं प्र वेपयन्ति पर्वतान्। यत् यामं यान्ति वायुभिः ॥ ४ ॥ नि यत् यामाय वो गिरि नि सिन्धवो विधर्मणे। महे शुष्माय येमिरे ॥५॥ युष्माँ उ नक्तम् ऊतये युष्मान् दिवा हवामहे। युष्मान् प्रयति अध्वरे ॥ ६ ॥ उदु त्ये अरुणप्सव श्चित्रा यामेभिरीयते। वाश्रा अधि · ष्णुना दिवः ॥ ७ ॥ सृजन्ति रश्मिम् ओजसा पन्थां सूर्याय यातवे। ते भानुभि र्वि तस्थिरे ॥ ८ ॥ इमां मे मरुतो गिरं इमं स्तोमं ऋभुक्षणः। इमं मे वनता हवम् ॥ ९ ॥ त्रीणि सरांसि पृश्नयो दुदुह्रे वज्रिणे मधु। उत्सं कवंधम्

—मरुतांनों, सुखशांतीची इच्छा धरणारे आम्हीं भक्त तुम्हांला द्युलोकापासून पाचारण करीत आहोंत, तर तुम्हीं आमच्याकडे अवश्य या ११. खरोखरच हे दानशूर रुद्र-पुत्रांनो, हे ऋभुक्षहो, तुम्हीं यज्ञगृहांत वास करितां आणि हर्षभरांतहि उत्कृष्ट ज्ञानीच राहतां १२. —मरुतानों, शत्रूचा मद जिरविणारें, अत्यंत प्रबळ, सर्वांचें पोषण करण्याला समर्थ असें जें धन, तें द्युलोकांतून आमच्याकडे पाठवून द्या १३. —तुम्हीं जेव्हां पर्वतांच्यावरून आपला मार्ग आक्रमण कराल, तेव्हां हे शुभ्रतेजस्क मरुतानों, पिळल्या जाणाऱ्या आमच्याहि सोमरसांनीं हर्षनिर्भर व्हा १४. —याचप्रमाणें अप्रतिहत सामर्थ्यवान् जो ईश्वर त्याच्या स्तवनांच्या योगानें मरुतांजवळ आपल्या कल्याणाची याचना करावी १५. —जे वृष्टिभरानें आकाश आणि पृथ्वी यांना (पाण्याच्या) बुडबुड्यांप्रमाणें फुगवून देतात, आणि उदकाचा अक्षयनिर्झर जो मेघ त्याचें दोहन करितात १६. तें पृश्निपुत्र मरुत् (मेघाच्या) गर्जना, तसेंच रथसमूह, तसेंच वायू आणि भक्तांचा स्तोत्रनिनाद यांच्यावरोबरच आपलाहि ध्वनि उंचावून देतात १७. —ज्याच्या योगानें तुम्हीं तुर्वशाला आणि यदूला सहाय केलेंत, विजयधनाकांक्षी कण्वावर कृपा केलीत, त्याच अक्षयसंपत्तिसाठीं आम्हीं तुमच्या ठिकाणीं ध्यान लावीत आहों १८. —दानशूरानों, घृताप्रमाणें पुष्टिदायक असा जो तुमचा उत्साहप्रसाद, तो कण्वांच्या मननीय स्तोत्रांनीं वृद्धिंगत होवो १९. —हे दानशूरानों, हे कुशासनाधिष्ठित देवानों! तुम्हीं ह्या वेळेस कोणाच्या यज्ञांत हर्षनिर्भर होत आहां? कोणता स्तोता तुमची सेवा करीत आहे? २० —तें येथेंच नव्हे काय, कीं जेथें पूर्वीं तुम्हीं (भक्तांच्या) स्तवनांनीं (प्रसन्न होवून) सद्धर्मांच्या सैन्याला प्रोत्साहन दिलेंत २१. —त्यांनी जलाचे मोठमोठे प्रवाह आणि द्यावापृथिवी आणि तसेंच सूर्य यांनां एकत्र ठेवलें आणि वज्राला त्याच्या सांध्या सांध्यांच्या जागीं चांगलें मजबूत केलें २२. —पण त्यांनीं वृत्राचीं

---

उद्रिणम् ॥ १० ॥ मरुतो यत् ह वो दिवः सुम्नायन्तो हवामहे । आ तू न उप गन्तन ॥ ११ ॥ यूयं हिष्ठा सुदानवो रुद्रा ऋभुक्षणो दमे । उत प्रचेतसो मदे ॥१२॥ आनो रयिं मदच्युतं पुरुक्षुं विश्व धायसम् । इयर्ता मरुतो दिवः ॥ १३ ॥ अधीव यत् गिरीणां यामं शुभ्रा अचिध्वम् । सुवानै मन्दध्वम् इन्दुभिः ॥ १४ ॥ एतावत श्चिदेषां सुम्नं भिक्षेत मर्त्यः । अदाभ्यस्य मन्मभिः ॥ १५ ॥ ये द्रप्सा इव रोदसी धमन्ति अनुवृष्टिभिः । उत्सं दुहन्तो अक्षितम् ॥१६॥ उदु स्वानेभि–रीरत उत् रथैः उदु वायुभिः । उत् स्तोमैः पृश्निमातरः ॥ १७ ॥ येनाव तुर्वशं यदुं येन कण्वं धन-स्पृतम् । राये सु तस्य तस्य धीमहि ॥ १८ ॥ इमा उ वः सुदानवी घृतं न पिप्युषीः इषः । वर्धान् काण्वस्य मन्मभिः ॥ १९ ॥ क्व नूनं सुदानवो मदथा वृक्तबर्हिषः । ब्रह्मा को नः सपर्यति ॥ २ ॥ नहि ष्मा यत् हवः पुरा स्तोमेभि र्वृक्तबर्हिषः । शर्धां ऋतस्य जिन्वथ॥ २१ ॥ समु त्ये महती–रपः सं क्षोणी समु सूर्यम् । सं वज्रं पर्वशो

खांडोळीं उडवून दिलीं, प्रकाशहीन पर्वताचे तुकडे तुकडे केले, आणि वीराला योग्य असें आपलें पौरुष गाजविलें २३. —त्रित हा युद्ध करीत असतां त्याचा जोम आणि कर्तृत्व तुम्हीं जतन केलींत, आणि वृत्राशीं चाललेल्या युद्धांत इन्द्राच्या पाठोपाठ गेलांत २४. —त्यांच्या हातात विजली खेळते, ते स्वतः विलक्षण देदीप्यमान, त्यांच्या मस्तकावर सुवर्णाचें शिरस्त्राण; अशा रीतीनें शुभ्रतेजस्क मरुत् ( जगताच्या ) शोभेसाठीं आविर्भूत झाले २५. —पूर्वी जेव्हां तुम्हीं उशना ( साठीं ) वृषभाच्या गुहेंत प्रवेश केलात, तेव्हां आकाशां ( तील मेघा ) प्रमाणें तोहि भीतीनें मोठ्यानें ओरडला २६. —तर ह्या यज्ञाच्या दानप्रसंगीं पायांत सुवर्णालंकार घातलेल्या अश्वांसह, हे दिव्य विभूतींनों, तुम्हीं आम्हाजवळ या २७. —ह्यांच्या रथाला जोडलेल्या ठिपकेदार हरिणींना त्यांच्यांतील वेगवान् मृग जेव्हां ( आपल्यावरोवर ) ओढून नेतो तेव्हां शुभ्रतेजस्क मरुत् उदकवृष्टि करीत गमन करतात २८. —सुषमानदीच्या काठानें, शर्यणावतांत, आर्जिकी नदीच्या प्रासादमंडित तटाकाच्या बाजूनें, लहान लहान चाकें लावलेल्या गाडींत वसून मरुत् वीरांनीं गमन केलें २९. —मरुतांनों, याप्रमाणें तुमचा धांवा करणाऱ्या, तुमची विनवणी करणाऱ्या स्तवनज्ञ भक्ताकडे तुम्हीं आणि आपल्या सुखमय प्रसादांसह केव्हां जाल वरें? ३०. —आतां तुम्हांला कोण प्रिय वाटतो? इन्द्रालाहि जर तुम्हीं सोडून गेलांत तर तुमचें मित्रत्व असावें अशी कोण इच्छा करील? ३१. —कण्व कुलोत्पन्नानो! सुवर्णाचे भाले आणि वज्र हातांत धारण करणाऱ्या मरुतांच्या वरोवरच आतां मी अग्नि ( रूप भगवंता ) चें स्तवन करितों ३२. —वीर्यशाली, पूज्यतम, आणि अद्भुतसत्वाढय मरुतांना आमच्या अपूर्व कल्याणासाठीं वळवून आणतों ३३. पर्वत देखील हरलों म्हणून त्यांच्यापुढें सामोरे झाले, आणि मेघ तर त्यांच्यापुढें अगदीं नम्र होऊन गेले ३४. —डोळ्याच्या नजरेप्रमाणें झटकन धांवणारे

---

दधुः ॥ २२ ॥ वि वृत्रं पर्वशो ययु र्वि पर्वताँ अराजिनः । चक्राणा वृष्णि पौंस्यम् ॥ २३ ॥ अनु त्रितस्य युध्यतः शुष्मन् आवन् उत क्रतुम् । अन्व् इन्द्रम् वृत्रतूर्ये ॥ २४ ॥ विद्युद्धस्ता अभिद्यवः शिप्राः शीर्षन् हिरण्ययीः । शुभ्रा वि अञ्जत श्रिये ॥ २५ ॥ उशनाः यत् परावतः उक्ष्णो रंध्रम् अयातन । द्यौ र्न चक्रदत् भिया ॥ २६ ॥ आनो मखस्य दावने अश्वै र्हिरण्यपाणिभिः । देवास उप गन्तन ॥ २७ ॥ यदेषां पृषती रथे पृष्टि र्वहति रोहितः । यान्ति शुभ्रा रिणन् अपः ॥ २८ ॥ सुषोमे शर्यणावति आर्जिके पस्त्यावति । ययु र्निचक्रया नरः ॥ २९ ॥ कदा गच्छाथ मरुत इत्था विप्रं हवमानम् । मार्डीकेभि र्नाधमानम् ॥ ३० ॥ कत् ह नूनं कधप्रियो यत् इन्द्रं अजहातन । को वः सखित्वम् ओहते ॥ ३१ ॥ सहो षु णो वज्रहस्तैः कण्वासो अग्निं मरुद्भिः । स्तुषे हिरण्यवाशिभिः ॥ ३२ ॥ ओ षु वृष्णः प्रयज्यून् आ नव्यसे सुविताय । ववृत्या चित्रवाजान् ॥ ३३ ॥ गिरय श्चित् नि जिहते

अश्व अंतरिक्षमार्गानें उड्डाण करणाऱ्या ( मरुतां )ना घेऊन येतात आणि स्तोतृजनाला तारुण्याचा जोम आणतात ३५. —छंदाप्रमाणें, किंवा सूर्य आपल्या प्रभेनें दृग्गोचर होतो त्याप्रमाणें हा पुरातन अग्नि प्रकट झाला. आणि त्याच्या किरणांबरोबरच मरुतांनीं जिकडे तिकडे संचार केला ३६.

## सूक्त ८

हे अश्वीहो, सकल सहायांसह, तुम्हीं उभयतां आमच्याकडे या; आणि हे अद्भुतरूप, सुवर्णरथारूढ देवानों, तुम्हीं आमच्या सोमरसाचें मधुर पेय प्राशन करा १. —हे अश्वीनों, हे भक्तपोषकानों, सुवर्णकान्ति देवानों, प्रतिभासंपन्नानों, गंभीरान्तःकरण देवानों, सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा आपल्या रथांत आरूढ होऊन त्वरेनें या २. —तुम्हीं नहुषाच्या यज्ञमंडपांत अन्तरिक्षांतून मंजुल स्तवनांच्या ध्वनीनें प्रवेश करितां, आणि आम्हां कण्वकुलोत्पन्नांच्या सवनांत पिळून सिद्ध केलेलें सोमपेय प्राशन करितां ३. —तर तुम्हीं आमच्याकडे द्युलोकांतून अंतरिक्षांतून आगमन करा; कारण हे भक्तप्रिय देवानों, कण्वकुलोत्पन्न जो मी त्यानें तुमच्यासाठीं मधुर सोमरस पिळून सिद्ध केला आहे ४. —आमची प्रार्थना ऐकून तरी, हे अश्वीहो, तुम्हीं सोमप्राशनार्थ इकडे या; सूक्ताची अभिवृद्धि करणाऱ्या देवानों, हे कवीनों, हें वीरानों, आमच्या ध्यानस्तुतींनीं तुमचें स्वागत होवो ५. —ज्याप्रमाणें पूर्वीं ऋषींनीं कृपाप्रसादासाठीं स्तुतीनीं करुणा भाकून तुम्हांला आणलें, त्याचप्रमाणें आतांहि हे वीरानों या, आणि हे अश्वीहो, कळवळयानें केलेल्या ह्या माझ्या स्तुतीकडे

पर्शानासो मन्यमानाः । पर्वता श्चित् नि येमिरे ॥३४॥ आक्ष्णयावानो वहन्ति अन्तरिक्षेण पततः । धातारः स्तुवते वयः ॥ ३५ ॥ अग्नि र्हि जानि पूर्व्यः छंदो न सूरो अर्चिषा । ते भानुभि र्वि तस्थिरे ॥ ३६ ॥

## सूक्तम् ८

काण्वः सध्वंसः अश्विनौ अनुष्टुप्

आनो विश्वाभिः ऊतिभिः अश्विना गच्छतं युवम् । दस्रा हिरण्यवर्तनी पिबतं सोम्यं मधु ॥ १ ॥ आ नूनं यातम् अश्विना रथेन सूर्यत्वचा । भुजी हिरण्यपेशसा कवी गंभीरचेतसा ॥ २ ॥ आ यातं नहुषः परि अन्तरिक्षात् सुवृक्तिभिः । पिबाथो अश्विना मधु कण्वानां सवने सुतम् ॥ ३ ॥ आनो यातं दिवस्परि आन्तरिक्षात् अधप्रिया । पुत्रः कण्वस्य वाम् इव सुषाव सोम्यं मधु ॥ ४ ॥ आन्तो यातम् उपश्रुति अश्विना सोमपीतये । स्वाहा स्तोमस्य वर्धना प्र कवी धीतिभि र्नरा ॥ ५ ॥ यत् चित्

आगमन करा ६. —तेजोमय द्युलोकापासून तुम्हीं आमच्याकडे आगमन करा; दिव्य-प्रकाशदायकानों, मज वत्साची सेवा जाणणाऱ्या देवानों, ध्यानस्तुतींनीं ( प्रसन्न होऊन ) आगमन करा. भक्ताचा धांवा ऐकणाऱ्यांनों, स्तवनांनीं इकडे आगमन करा; काय ? आमच्याशिवाय दुसरे भक्त प्रेमळ स्तवनांनीं तुम्हाला विनवीत आहेत ? पण, हे अश्वीहो, कण्वपुत्र जो वत्सऋषि त्यानें तुम्हांला स्तवनांनीं हर्षोत्फुल्ल केलें नाहीं काय ? ८. —तुमच्या ज्ञानी भक्तानें तुमचा कृपाप्रसाद व्हावा म्हणून तुम्हांला येथें स्तवनांनीं पाचारण केलें आहे; तर हे अश्वीदेवानों, हे निष्कलंकानों, ( अज्ञानरूप ) वृत्राचा समूळ उच्छेद करणाऱ्या देवानों, तुम्हीं आम्हाला कल्याणप्रद व्हा ९. —ज्या वेळेस तुमची नववधू रथांत आरूढ झाली; त्या वेळेस, हे सत्वाढ्य अश्वानों, सर्वांच्या ध्येयाकडे तुम्हीं लक्ष पोहोंच-विलेंत १०. —तर असंख्य आकार धारण करणाऱ्या तुमच्या रथांतून, हे अश्वीहो, तुम्हीं आगमन करा. पहा, काव्यमर्मज्ञ आणि कवि जो वत्स त्यानें तुमची मधुर शब्दांनीं प्रशंसा केलीच आहे ११. —हे अलोटहर्षानें प्रसन्न आणि अपारनिधींनीं संपन्न असणाऱ्या देवानों ! दिव्य धनांचे दाते तुम्हीं आहांत; हे अश्वीनों, ( भक्ताचें हृदय ) तुम्हीं आपल्या-कडे खेंचणारे आहां, तर ह्या माझ्या स्तोत्राचें कौतुक करा १२. —अश्विदेवानों, तुम्हीं आम्हांला सर्व प्रकारचीं अशीं कृपाधनें द्या कीं त्यांत कोणताही व्यत्यय नसावा. आम्हीं वेळच्या वेळीं यजन करावें असें करा, निन्दकाच्या तावडींत आम्हांस देऊं नका, आणि निंदेच्या आधीन आम्हांस करूं नका १३. —सत्यस्वरूप अश्वीहो, तुम्हीं अगदीं दूरच्या लोकीं असलां, किंवा आकाशांत जरी असलां, तरी तेथूनहि आपल्या अगणित-रूपें धारण करणाऱ्या रथांतून तुम्हीं आमच्याकडे या १४. —सत्यस्वरूप अश्वीहो, ज्या वत्स ऋषीनें प्रार्थनास्तुतींनीं तुमची महती गाइली त्याला तुम्हीं

---

हि वां पुर ऋषयो जुहूरे रवसे नरा । आ यातम् अश्विना गतं उपेमां सुष्टुतिं मम ॥ ६ ॥ दिव श्चित् रोचनात् अधि आ नो गन्तं स्वर्विदा । धीभि र्वत्स प्रचेतसा स्तोमेभि र्हवनश्रुता ॥ ७ ॥ किमन्ये परि आसते अस्मत् स्तोमेभि रश्विना । पुत्रः कण्वस्य वाम् ऋषि र्गीर्भि र्वत्सो अवीवृधत् ॥ ८ ॥ आवां विप्र इहावसे अह्वत् स्तोमेभिः अश्विना । अरिप्रा वृत्रहन्तमा ता नो भूतं मयोभुवा ॥ ९ ॥ आ यत् वां योषणा रथं अतिष्ठत् वाजिनीवसु । विश्वानि अश्विना युवं प्रधीतानि अगच्छतम् ॥ १० ॥ अतः सहस्र निर्णिजा रथेना यातम् अश्विना । वत्सो मां मधुमत् वचः अशंसीत् काव्यः कविः ॥ ११ ॥ पुरुमन्द्रा पुरुवसू मनोतरा रयीणाम् । स्तोमं मे अश्विनाविमं अभि वन्ही अनूषताम् ॥ १२ ॥ आनो विश्वानि अश्विना धत्तं राधांसि अन्हया । कृतं न ऋत्वियावतो मा नो रीरधतं निदे ॥ १३ ॥ यत् नासत्या परावति यद्वा स्थो अधि अम्बरे । अतः सहस्रनिर्णिजा रथेनायातम् अश्विना ॥ १४ ॥ यो वां नासत्यौ ऋषि र्गीर्भि र्वत्सो अवीवृधत् । तस्मै सहस्रनिर्णिजं इषं धत्तं घृतश्चुतम् ॥ १५ ॥

घृतप्रचुर आणि हजारों स्वच्छ रूपें धारण करणारी उत्साह संपत्ति दिलीत १५. —हे अश्वीहों, तुम्हीं त्याला अशी घृतप्रचुर ऊर्जस्विता द्या, कीं त्यानें कल्याण-प्राप्तिसाठीं तुमचें स्तवन करावें, आणि हे दातृश्रेष्ठहो, दिव्यनिधीची आकांक्षा धरावी १६ —शत्रुमर्दनानों, तुम्ही ह्या प्रार्थनास्तोत्राकडे या. सर्वांचें पोषण करणाऱ्या देवानों, हे वीरानों, आम्हांला उत्तम वैभवासें मंडित करा; आमच्या इच्छितप्राप्तिसाठीं हीं (वरदानें) आम्हांला द्याच १७. —तुम्हीं आपल्या सकल सहायांसह यावें म्हणून प्रियमेधानें तुमचा धांवा केला. कारण प्रत्येक प्रहरांत ( देवाप्रीत्यर्थ ) होणाऱ्या हवनांत, आणि हे अश्वीहो, अध्वरयागांतहि तुम्हीं राजाप्रमाणें मिरवितां १८. —अश्वीहो, कल्याणकारक आणि मंगलप्रद असे तुम्ही आमच्याकडे या. हे स्तवनार्ह देवानों ! पहा, ह्या वत्सानें आपल्या ध्यान स्तोत्रांनीं आणि कवनांनीं तुमची महती प्रसृत केली १९. —ज्या दृष्टींनीं तुम्हीं कण्वावर आणि मेधातिथीवर कृपा केलीत, ज्या दृष्टींनीं तुम्हीं वश आणि दशव्रज यांचें रक्षण केलेंत, ज्या दृष्टींनीं तुम्हीं गोशर्यांचा सांभाळ केलात, त्याच कटाक्षानीं हे वीरानों, आमच्यावरहि कृपा करा २०. —हे वीरनायकानों ! कर्तव्य म्हणून ठरलेल्या युद्धांत ज्या सहायांनीं तुम्हीं त्रसदस्यूचें रक्षण केलेंत त्याच सहायांनीं, हे अश्वीहो, सत्वधनाच्या लाभासाठीं आमचेंहि सहाय करा २१. —स्तोत्रें, प्रेमळ प्रार्थना आणि कवनें हीं, अश्वीदेवानों, तुमचें यश वृद्धिंगत करोत. सर्व ठिकाणच्या दुष्टांचा समूळ नाश करणारे असे तुम्हीं आमच्या मनांत स्पृहणीय आकांक्षा विपुल उत्पन्न करा २२. —पहा, अश्विदेवांचीं तीन पावलें आपल्या गुप्तस्थानांतून वाहेर येऊन दृग्गोचर होत आहेत. तर हे दिव्य कवीनों, सनातन सत्याच्या सोपानानें आम्हां जीवांवर दया करण्यासाठीं आमच्या सन्मुख या २३.

---

प्रा स्मा ऊर्जं घृतश्चुतम् अश्विना यच्छतं युवम् । यो वां सुम्नाय तुष्टवत् वसूयात् दानुनस्पती ॥ १६ ॥ आ नो गन्तं रिशादसा इमं स्तोमं पुरुभुजा । कृतं नः सुश्रियो नरा इमा दातम् अभिष्टये ॥ १७ ॥ आ वां विश्वाभि ऊतिभिः प्रियमेधा अहूषत । राजन्तौ अध्वराणाम् अश्विना यामहूतिषु ॥ १८ ॥ आ नो गन्तं मयो भुवा अश्विना शम्भुवा युवं । यो वां विपन्यू धीतिभि र्गीर्भि र्वत्सो अवीवृधत् ॥ १९ ॥ याभिः कण्वं मेधातिथिं याभि र्वशं दशव्रजम् । याभि र्गोशर्यम् आवतं ताभि र्नो अवतं नरा ॥ २० ॥ याभि र्नरा त्रसदस्युम् आवतं कृत्व्ये धनं । ताभि ष्व १ स्माँ अश्विना प्रावतं वाजसातये ॥ २१ ॥ प्र वां स्तोमाः सुवृक्तयो गिरो वर्धन्तु अश्विना । पुरुत्रा वृत्रहन्तमा ता नो भूतं पुरुस्पृहा ॥ २२ ॥ त्रीणि पदानि अश्विनोः आविः सन्ति गुहा परः । कवी ऋतस्य पत्मभि रर्वाक् जीवेभ्य-स्परि ॥ २३ ॥

## सूक्त ९

हे अश्वीहो, आतांच्या आतां तुम्हीं ह्या वत्सावर कृपा करण्यासाठीं आगमन करा. त्याला तुमचा निर्वेध आणि विस्तीर्ण आश्रय द्या; आणि जे अधार्मिक असतील त्यांना छाटून टाका १. —जें जें अन्तरिक्षांत, जें जें द्युलोकांत, किंवहुना मानवांच्या पांचहि समुदायांत जें पौरुष असतें, तें हे अश्वीहो, तुम्हींच त्या ठिकाणीं ठेवतां २. —तुमच्या अद्भुत चारित्र्याचें ज्या मर्मज्ञ भक्तांनीं सतत चिन्तन चालविलें, त्यांच्याप्रमाणेंच ह्या कण्वाची स्थिति आहे असें समजा ३. —हेंच तें धर्मपात्र तुमच्यासाठीं आहे कीं जें आमच्या स्तवनामुळें ( दुग्धानें ) भरून जातें; आणि हाच तो मधुर सोमरस कीं ज्याचें प्राशन केल्याबरोबर, हे सत्वधनाढ्य देवानों, वृत्र कोठें आहे तें तुम्हांला समजतें ४. —जी करामत उदकांत, जी मोठमोठ्या वृक्षांत, तसेंच जी लतादिकांत तुम्हीं करून ठेवली आहांत, त्या करामतीच्या योगानें हे असंख्य अद्भुत कृत्यें करणाऱ्या देवानों, हे अश्वीहो, तुमचें कृपाछत्र आमच्यावर असूं द्या ५. —सत्य स्वरूपदेवानों, तुम्हीं वेगानें भ्रमण करितां; आणि हे दिव्य विभूतींनों, मानवांना औषधोपचार करितां, पण त्या गोष्टी ह्या वत्साला तुमच्या मननामुळेंच कीं काय मिळतात; कारण तुम्हीं हवि अर्पण करणाराकडेच जातां ६. —आतांच ह्या ऋषीनें आपल्या उत्कृष्ट प्रतिभेनें अश्वीदेवांचें स्तोत्र ध्यानांत आणलें आहे. तर आतां त्यानें अत्यंत मधुर सोमरस आणि हा उष्ण हविर्भाग अथर्वपात्रांत ओतून ठेवावा ७. —तुमच्या शीघ्रगामी रथावर हे अश्वीहो, तुम्हीं आतांच्या आतां आरोहण करा. पहा, मीं केलेल्या प्रार्थनास्तवनांनीं तुम्हांला मेघाप्रमाणें हालवून सोडलें आहे ८. —सत्य स्वरूप देवानों, आम्हीं जसें आज

## सूक्तम् ९

काण्वः शशकर्णः अश्विनौ बृहती.

आ नूनम् अश्विना युवं वत्सस्य गन्तम् अवसे । प्रास्मै यच्छतम् अवृकम् पृथु छर्दि र्युयुतं या अरातयः ॥ १ ॥ यत् अन्तरिक्षे यत् दिवि यत् पञ्च मानुषाँ अनु । नृम्णम् यत् धत्तम् अश्विना ॥ २ ॥ ये वां दंसांसि अश्विना विप्रासः परिमामृशुः । एवेत् काण्वस्य बोधतम् ॥ ३ ॥ अयं वां घर्मो अश्विना स्तोमेन परि षिच्यते । अयं सोमो मधुमान् वाजिनीवसू येन वृत्रं चिकेतथः ॥ ४ ॥ यत् अप्सु यत् वनस्पतौ यत् ओषधीषु पुरुदंससा कृतम् । तेन माविष्टम् अश्विना ॥ ५ ॥ यन्नासत्या भुरण्यथो यद्वा देव भिषज्यथः । अयं वां वत्सो मतिभि र्न विन्धते हविष्मन्तम् हि गच्छथः ॥६॥ आ नूनम् अश्विनो ऋषिः स्तोमं चिकेत वामया । आ सोमं मधुमत्तमं घर्मं सिञ्चात् अथर्वणि ॥ ७ ॥ आ नूनं रघुवर्तनिं रथं तिष्ठाथो अश्विना । आ वां स्तोमा इमे मम नभो न चुच्यवीरत ॥ ८ ॥ यत् अद्य वां नासत्या उक्थैः आ चुच्यवीमहि । यद्वा

उक्थ स्तोत्रांनीं तुमचें अंतःकरण हलवून टाकीत आहों, किंवा हे अश्वीहो, तुम्हांला स्तुतींनीं ( विनवीत आहों ) त्याचप्रमाणें कण्वाकडेहि लक्ष ठेवा ९. —जसा पूर्वी कक्षीवानानें, जसा व्यश्व ऋषिनें, किंवा जसा दीर्घतमानें तुमचा धांवा केला, किंवा जसा वेनपुत्र पृथी यानें यज्ञमंदिरांत धांवा केला, त्याचप्रमाणें हे अश्वीहो, आमचीहि विज्ञप्ति तुमच्या ध्यानांत असूंद्या १०. —आमच्या आश्रयाचे प्रतिपालक म्हणून तुम्ही आगमन करा, आणि आमच्या पाठीवर राहून आमचा सांभाळ करणारे व्हा. तुम्हीं जगत्पालक ( म्हणून ) आमच्या शरीराचे संरक्षक व्हा; आणि आमच्या मुलांलेकरांसाठीं आमच्या यज्ञगृहीं आगमन करा ११. —तुम्हीं इन्द्रासह एकाच रथांत बसून जात असलां; किंवा हे अश्वीहो, वायूसह एकाच गृहांत वास करीत असलां; किंवा आदित्याबरोबर, किंवा ऋभूंबरोबर आनंद करीत असलां अथवा विष्णूच्या मार्गक्रमणांत तुम्हीं त्याच्याबरोबर राहिलां असलां तरी ( हि आमच्याकडे ) या १२. —आज हे अश्वीहो, मीं सत्वधनाच्या प्राप्तीसाठीं तुमची विनवणी करीत आहे; कारण संग्रामामध्यें झुंजारवीराच्या अंगीं जी धडाडी येते तीच तुह्मां अश्वीदेवांची कृपा होय १३. —म्हणून हे अश्वीहो, आतांच आमच्याकडे या; हे तुमचे हविर्भाग येथें ठेवले आहेत. हे सोमरस, तुर्वश आणि यदु यांच्या समक्ष पिळले आहेत; हे तुमच्या कण्वांसमक्ष पिळले आहेत १४. —सत्यस्वरूप देवानों, दूर देशांत किंवा येथें जवळ जें जें औषध असेल त्यानें युक्त असें जें निवासस्थान तें विमदाला आणि वत्साला, हे पूर्णज्ञानी देवानों, तुम्हीं अर्पण करा १५. —अश्वीदेवांच्या शब्दाबरोबर उषादेवीसह मींहि जागृत झालों. तर हे उषा देवि, काव्यस्फूर्ति आणि वरप्रसाद ( यांचा सांठा ) तूं आम्हां मर्त्यजनांसाठीं प्रकट कर १६. —देवी उषे, तूं अश्वीदेवांना ( आमच्या यज्ञाची) जाणीव करून दे. हे सत्यमधुरभाषिणी श्रेष्ठ देवि, तूं सज्ज हो; यज्ञहोत्या तूंहि

---

वाणीभि–रश्विना एवेत्–काण्वस्य बोधतम् ॥ ९ ॥ यत् वाम् कक्षीवाँ उत यत् व्यश्व ऋषि र्यद्वां दीर्घतमा जुहाव । पृथी यद्वां वैन्यः सादनेषु एवेत् अतो अश्विना चेतयेथाम् ॥ १० ॥ यातं छर्दिष्पा उत नः परस्पा भूतं जगत्पा उतनस् तनूपाः वर्ति–स्तोकाय तनयाय यातम् ॥ ११ ॥ यदिन्द्रेण सरथं याथो अश्विना यद्वा वायुना भवथः समोकसा । यत् आदित्येभि ऋभुभिः सजोषसा यद्वा विष्णो र्विक्रमणेषु तिष्ठथः ॥ १२ ॥ यदद्य अश्विनौ अहं हुवेय वाजसातये । यत् पृत्सु तुर्वणे सहस् तत् श्रेष्ठम् अश्विनोर् अवः ॥ १३ ॥ आ नूनं यातम् अश्विना इमा हव्यानि वां हिता । इमे सोमासो अधि तुर्वशे यदौ इमे कण्वेषु वाम् अथ ॥ १४ ॥ यत् नासत्या पराके अर्वाके अस्ति भेषजम् । तेन नूनम् विमदाय प्रचेतसा छर्दि र्वत्साय यच्छतम् ॥१५॥ अभुत्सि उ प्र देव्या साकं वाचहम् अश्विनोः । वि आव र्देव्या मतिम् वि रातिं मर्त्येभ्यः ॥ १६ ॥ प्र बोधयोषो अश्विना प्र देवि सूनृते महि । प्र यज्ञहोतर् आनुषक्

सत्वर सिद्ध हो, आणि ( दिव्यविवुधांच्या ) तल्लीनतेसाठीं त्यांचें महत् यश वर्णन कर १७. —हे उषे, तूं जसजसी गमन करतेस, तसतसी आपल्या उज्ज्वलतेनें सूर्याच्या बरोबरीनें प्रकाशमान होतेस,–( अशा वेळीं ) अश्वीदेवांचा रथहि, वीरांनीं रक्षण करण्यास योग्य अशा यज्ञमण्डपाकडे येतो १८. —जेव्हां किंचित् पिंवळसर अशा सोमवल्ली, धेनू आपल्या कासेंतून पान्हा सोडतात त्याप्रमाणें मधुररसाची धारा सोडतात; किंवा ज्या वेळेस प्रेमळ भक्त प्रार्थना म्हणूं लागतात, तेव्हां अश्विदेवहो, ( आमच्या ) तेजस्वितेसाठीं, उत्कट बलासाठीं, वीरांना योग्य अशा धकाधकीसाठीं, जगत्कल्याणासाठीं आणि कर्तव्यतत्परतेसाठीं, हे पूर्णप्रज्ञ देवानों, तुम्हीं पुढें सरसावा १९. २०. —जेव्हां आमच्या ध्यानानें ( प्रसन्न होऊन ), हे अश्वीहो, तुम्हीं आमच्या पितृसदनांत विराजमान होतां, जेव्हां हे उक्थगायनप्रिय देवानों, उत्तम स्तुतींनीं तुमचें स्तवन होतें (तेव्हांहि तुह्मी प्रकट व्हा) २१.

## सूक्त १०

तुम्हीं कदाचित् दूरच्या प्रवासांत असलां, किंवा त्या द्युलोकाच्या प्रकाशमय स्थानांत असलां, अथवा विस्तीर्ण अशा ( अंतरिक्ष ) समुद्रांत निर्माण केलेल्या मन्दिरांत असलां तरी तेथूनहि, हे अश्वीहो, आमच्याकडे या १. —अथवा मनुराजासाठीं जसा तुम्हीं यज्ञांत भाग घेतलात, तसाच कण्वाच्याहि ( यज्ञांत घेतला पाहिजे ) असें तुम्हीं समजा. म्हणून तुमच्याबरोबरच बृहस्पति, सर्व दिव्यविवुध, तसेंच इन्द्र आणि विष्णु यांना, हे चपलाश्वगामी देवानों, मीं पाचारण करितों २. —त्या अश्वीदेवांचा मी धांवा करितों कीं ज्यांचीं अद्भुत सत्कृत्यें ( मानवांनीं ) ध्यानांत धरण्यासाठीं केलेलीं

प्र मदाय श्रवो बृहत् ॥ १७ ॥ यत् उषो यासि भानुना सं सूर्येण रोचसे । आ हायम् अश्विनो रथो वर्ति याति नृपाय्यम् ॥ १८ ॥ यत् आपीतासो अंशवो गावो न दुव्ह ऊधभिः । यद्वा वाणी–रनूषत प्र देवयन्तो अश्विना ॥ १९ ॥ प्रद्युम्नाय प्रशवसे प्र नृषाह्याय शर्मणे । प्र दक्षाय प्रचेतसा ॥ २० ॥ यन्नूनं धीभि रश्विना पितु र्योना नि षीदथः । यद्वा सुम्नेभिर् उक्थ्या ॥ २१ ॥

## सूक्तम् १०

काण्वः प्रगाथः अश्विनौ स्वराट् बृहतीः

यत् स्थो दीर्घप्रसद्मनि यद्वाऽदो रोचने दिवः । यद्वा समुद्रे अधि आ कृते अत आ यातम् अश्विना ॥ १ ॥ यद्वा यज्ञं मनवे संमिमिक्षथुः एवेत् काण्वस्य बोधतम् । बृहस्पतिं विश्वान् देवाँ अहं हुवे इन्द्राविष्णू अश्विनौ आशुहेषसा ॥ २ ॥ त्या न्व १ श्विना हुवे सुदंससा गृभे कृता । ययो रस्ति प्रणः सख्यं देवेषु अध्याप्यम् ॥ ३ ॥

आहेत; आणि दिव्यविभूतींमध्यें, ज्यांचें आमच्याशीं जिव्हाळ्याचें मित्रत्व आणि (भक्तीचें) नातें जुळलेलें आहे ३. —ज्या तुम्हांमध्यें यज्ञ प्रतिष्ठित होतात, धार्मिक लोकधुरीण जेथें नाहींत तेथेंहि ज्या तुम्हांमुळें धर्माग्रणी उत्पन्न होतात, ते तुम्हीं अध्वरयागाचे स्वाभाविकपणेंच पूर्णपणें ज्ञाते आहांत; आणि म्हणूनच तुम्हीं मधुर सोमरस प्राशन करतां ४. —अश्वीहो, जरी आज तुम्हीं पश्चिमदिग्भागीं असलां, किंवा हे सत्वाढय देवानों, पूर्वदिक्प्रांतीं असलां, अथवा जरी तुम्हीं द्रुह्यु किंवा अनु, अथवा तुर्वश किंवा यदु यांच्यावरोवर असलां तरी तुम्हांला मी भक्तीनें पाचारण करीत आहें, तर तुम्ही मजकडे अवश्य या ५. —जरी तुम्हीं अन्तरिक्षांतून उड्डाण करीत जात असलां, किंवा हे भक्तपोषकांनों, द्युलोक व पृथिवी यांच्या भोंवतीं फिरत असलां, किंवा आपल्या स्वाभाविक परिपाठीप्रमाणें रथांत वसून जात असलां, तरी हे अश्वीहो, तुम्हीं तेथूनहि आगमन करा ६.

## सूक्त ११

हे अग्निदेवा, तूं आमच्या धर्मनियमांचें रक्षण करणारा आहेस. या मर्त्यजनांमध्यें देव तूंच, आणि यज्ञकर्मीतहि स्तवनार्ह तूंच आहेस १. —तूं धर्मसभेमध्यें प्रशंसनीयच आहेस; आणि हे संकर्षणा, अग्ने, अध्वरयागांचाहि तूं धुरीण आहेस २. —तर हे वस्तुजात जाणणाऱ्या देवा, तूं धर्मद्वेष्ट्यांशीं युद्ध करून त्यांना आमच्यापासून दूर पिटाळून लाव; त्याचप्रमाणें देवनिन्दकांना आणि दानधर्म न करणाऱ्यांनाहि हे अग्ने, तूं दूर हांकून दे ३. —तुझ्या कितीही जवळ येऊन तुला चिकटला तरी भक्ताच्या शत्रूच्या यज्ञाचा स्वीकार, हे वस्तुजात जाणणाऱ्या देवा, तूं कधीं करीत नाहींस ४. —म्हणूनच आम्हीं मर्त्यजन, मृत्युरहित जो तूं देव त्या तुझ्या नांवाचें वारंवार चिन्तन करतों; कारण सर्ववस्तुजाणणारा जो तूं अग्नि, त्याचे उपासक आम्हीं आहोंत ५.

---

ययोर् अधि प्र यज्ञा असूरे सन्ति सूरयः । ता यज्ञस्य अध्वरस्य प्रचेतसः स्वधाभि र्या पिबतः सोम्यं मधु ॥ ४ ॥ यदद्या अश्विनौ अपाक् यत् प्राक् स्थो वाजिनीवसू । यत् द्रुह्यवि अनवि तुर्वशे यदौ हुवे वाम् अथ मा गतम् ॥५॥ यदन्तरिक्षे पतथः पुरुभुजा यद्वेमे रोदसी अनु । यद्वा स्वधाभि–रधितिष्ठथो रथम् अत आ यातम् अश्विना ॥६॥

## सूक्तम् ११

कण्वः वत्सः अग्निः गायत्री.

त्वम् अग्ने व्रतपा असि देव आ मर्त्येषु आ । त्वं यज्ञेषु ईड्य ॥ १ ॥ त्वम् असि प्रशस्यो विदथेषु सहन्त्य । अग्ने रथीः अध्वराणाम् ॥ २ ॥ स त्वम् अस्मत् अप द्विषो युयोधि जातवेदः । अदेवीर् अग्ने अरातीः ॥ ३ ॥ अन्ति चित् सन्तम् अह यज्ञं मर्तस्य रिपोः । नोप वेषि जातवेदः ॥ ४ ॥ मर्ता अमर्तस्य ते भूरि नाम मनामहे ।

—तुज ज्ञानशीलाला आम्ही भक्तिशील जन कृपाप्रसादासाठीं विनवीत आहोंत; आम्हीं मर्त्यजन सहायासाठीं तुजला आळवीत आहोंत; आणि तुज अग्नीला स्तुतींनीं पाचारण करीत आहोंत ६. —हे अग्ने, वत्सानें तुझ्या अत्युच्च निवासापासून, तुजविषयीं आतुर होऊन स्तोत्रानें तुझें चित्त आपल्याकडे आकर्षण करून घेतलें ७. —तूं सर्वीठायीं समानदृष्टिच आहेस; अखिल मानवांमध्यें तूं त्यांचा सत्ताधीश प्रभु आहेस; म्हणून संग्रामामध्यें आम्हीं तुलाच पाचारण करितों ८. —संग्रामामध्यें कृपाप्रसादासाठीं, आम्हीं सत्वविजयाकाङ्क्षी भक्त, सत्वपरीक्षेच्या प्रसंगीं अद्भुत वरदानें देणाऱ्या अग्नीचा धांवा करितों ९. —खरोखर तूं पुराणपुरुष देव अध्वरयागांमध्यें स्तवनार्ह आहेस; पुरातनकालापासून तूंच स्तुत्य यज्ञहोता आहेस. तर हे अग्निदेवा, आपल्या स्वतःला संतोषित कर, आणि आम्हांलाहि यज्ञद्वारें महद्भाग्याचा लाभ दे. १०.

अष्टक पांचवें समाप्त

अष्टक सहावें

## सूक्त १२ वें

अष्टक ६ अध्याय १

हे इन्द्रा, तूं सोमरसाचें प्राशन अतिशय करणारा आहेस; त्या ( सोमरसा ) चा आवेश, हे अत्यंत प्रबल इन्द्रा, तुझ्या ठिकाणीं तीव्रपणानें जागृत होतो; आणि त्या आवेशानें तूं नरभक्षक राक्षसाचा सप्पा उडवितोस. म्हणून तसाच आवेश आम्हांमध्येंहि संचरावा अशीच आम्हीं तुजजवळ याचना करतों १. —ज्या सोमरसाच्या हर्षभरांत तूं दशग्व, अध्रिगु, कंपायमान झालेला दिव्यप्रकाशी सूर्य, आणि त्याचप्रमाणें ( अंतरिक्षां-

विप्रासो जातवेदसः ॥ ५ ॥ विप्रं विप्रासोऽवसे देवं मर्तास ऊतये । अग्निं गीर्भिर्हवामहे ॥ ६ ॥ आ ते वत्सो मनो यमत् परमात् चित् सधस्थात् । अग्ने त्वां कामया गिरा ॥ ७ ॥ पुरुत्राहि सदङ् असि विशो विश्वा अनु प्रभुः । समत्सुत्वा हवामहे ॥ ८ ॥ समत्सु अग्निं अवसे वाजयन्तो हवामहे । वाजेषु चित्रराधसम् ॥ ९ ॥ प्रत्नो हि कम् ईड्यो अध्वरेषु सनात् च होता नव्य श्च सत्सि । स्वां चाग्ने तन्वं पिप्रयस्व अस्मभ्यं च सौभगम् आयजस्व ॥ १० ॥

इति अष्टमोऽध्यायः समाप्तः पंचमाष्टकः

अथ षष्ठोऽष्टकः ॥ ( प्रथमोऽध्यायः )

## सूक्तम् १२

पर्वतः काण्वः इन्द्रः उष्णिक्.

य इन्द्र सोमपातमो मदः शविष्ठ चेतति । येना हंसि नि अत्रिणं तमीमहे ॥ १ ॥ येन दशग्व-मध्रिगुं वेपयन्तं स्वर्णरम् । येन समुद्रमाविथा तमीमहे ॥ २ ॥ येन सिन्धुं

तील व पृथ्वीवरील ) सागर यांचें रक्षण केलेंस त्या हर्षाची जोड आम्हांसहि लाभो अशी आम्हीं तुजजवळ याचना करतों २. —ज्या ( हर्षभरा ) च्या योगानें तूं ( पृथ्वीवरील ) मोठमोठ्या नद्यांना, त्यांनीं पुरातन, यथायोग्य आणि सरळ मार्गानें वहात जावें म्हणून, रथाला दौडत न्यावें त्याप्रमाणें समुद्राकडे नेऊन सोडतोस, त्या हर्षाची आम्हीं तुजजवळ याचना करतों ३. —वज्रधरा, हें स्तोत्र, पवित्र घृताप्रमाणें आम्हांला अभीष्टप्रदच होणार; हें स्तोत्र असें आहे कीं त्याच्या योगानें तूं आपल्या स्वाभाविक ओजस्वितेनें तात्काळ पुढें सरसावलास ४. —ह्या स्तोत्राचा, हे स्तवनार्ह इन्द्रा, तूं स्वीकार कर. तें समुद्राप्रमाणें ( हृदयांत ) उचंबळत असतें; आणि हे इन्द्रा, तूं हि सर्व प्रकारच्या भक्तरक्षक सामर्थ्यानिशीं पुढें सरसावतोस ५. —आम्हीं गुण्यागोविन्दानें रहावें म्हणून त्वां देवानें दूरदूरच्या ठिकाणांहूनहि इतक्या इच्छित वस्तु आम्हांस दिल्यास कीं, आकाशांतून पाऊस पडावा त्याप्रमाणें त्या जिकडे तिकडे विखुरल्या आहेत ६. —पहा ह्या ( इन्द्रा ) चे ध्वज सरसरूं लागले; आणि त्यानें आपल्या दोन्हीं हातांनीं धरलेलें वज्र देखील जोरानें ( शत्रूवर ) जाऊन आदळलें. कारण सूर्याप्रमाणें द्यावापृथिवींनांहि इन्द्रानें जपून वाढविलें आहे ७. —हे ऋद्धिमन्ता, हे सज्जनप्रतिपालका, महिषाप्रमाणें काळ्या घोर ढगांचा ( आणि राक्षसांचा ) जेव्हां तूं संहार केलास त्या वेळीं तुझें महान् ईश्वरीसामर्थ्य अधिकच वृद्धिंगत झालें ८. —इन्द्र हा ( जगतास ) गांजणाऱ्या राक्षसांना सूर्याच्या प्रखर किरणांनीं जाळून फस्त करतो आणि दावाग्नि ज्याप्रमाणें वनें होरपळून चोहोंकडे पसरतो त्याप्रमाणें, ( शत्रूंना ) दडपून टाकणारा इन्द्र आवेशानें वृद्धिंगत होतो ९. —योग्य काळीं स्फुरणारी आमची ही अपूर्व ध्यानभक्ति तुझ्याकडे धांव घेत आहे. ती सर्व प्रिय भक्ति तुझें इतकें गौरव करते कीं तुला जणों काय कवटाळूनच धरते १०. —हा यज्ञाचा गाभा, हा देवाचा भक्त, पूर्वपद्धतिप्रमाणें आपल्या यज्ञकर्माला इन्द्राच्या स्तवनांनीं पवित्र करतो, आणि इतका महत्त्वास चढतो कीं तो जणोंकाय ( जगालाच ) मुठींत ठेवतो असें वाटतें ११. —जगन्मित्र जो भक्त त्याला पाहिजे तें देणारा इन्द्र हा सोमरस

महीर् अपो रथाँ इव प्रचोदयः । पन्थाम् ऋतस्य यातवे तमीमहे ॥ ३ ॥ इमं स्तोम मभिष्टये घृतं न पूतमद्रिवः । येना नु सद्य ओजसा ववक्षिथ ॥ ४ ॥ इमं जुषस्व गिर्वणः समुद्र इव पिन्वते । इन्द्र विश्वाभि–रूतिभि र्ववक्षिथ ॥ ५ ॥ यो नो देवः परावतः सखित्वनाय मामहे । दिवो न वृष्टिं प्रथयन् ववक्षिथ ॥ ६ ॥ ववक्षु–रस्य केतवः उत वज्रो गभस्त्योः । यत् सूर्यो न रोदसी अवर्धयत् ॥ ७ ॥ यदि प्रवृद्ध सत्पते सहस्रं महिषाँ अघः । आदित् ते इन्द्रियं महि प्र वावृधे ॥ ८ ॥ इन्द्रः सूर्यस्य रश्मिभि र्नि अर्शसानम् ओषति । अग्नि र्वनेव सासहिः प्र वावृधे ॥ ९ ॥ इयं त ऋत्वियावती धीति–रेति नवीयसी । सपर्यन्ती पुरुप्रिया मिमीत इत् ॥ १० ॥ गर्भो ऋतस्य देवयुः ॥ क्रतुं पुनीत आनुषक् । स्तोमै–रिन्द्रस्य वावृधे मिमीत इत् ॥ ११ ॥

प्राशन करण्याकरितां सर्वविख्यात सर्वव्यापी झाला; त्याची वरदवाणी सोमार्पण करणाऱ्या भक्ताकडे वळली आणि त्याला तिनें घेरून टाकलें १२. —उक्थ स्तोत्रानें स्तवन करणाऱ्या ज्ञानी भक्तांनीं ज्याला हृष्टचित्त केलें, तो इन्द्र, (यज्ञांत) सत्य धर्माच्या मुखामध्यें जेव्हां आपल्या तेजानें घृताप्रमाणें रसरसला; १३. —आणि स्वतःसिद्ध जगत्प्रभु–इन्द्रासाठीं जेव्हां अदितीनें वाखाणण्यायोग्य असें अत्युत्कृष्ट स्तोत्र सत्यधर्माच्या रक्षणाकरितां रचलें; १४. —जेव्हां यज्ञसंपादक भक्तांनीं ( जगाच्या ) रक्षणाकरितां आणि आपल्या सहायासाठी तुझीं स्तोत्रें गाथिलीं तेव्हां, हे देवा, आपल्या कार्यापासून कधीं न ढळणारे तुझे हरिद्वर्ण अश्व भक्तांना कधींहि विन्मुख झाले नाहींत १५. —हे इन्द्रा, तूं विष्णूच्या स्वरूपांत किंवा त्रित अप्त्याच्या स्वरूपांत, किंवा तुझे अनुचर जे मरुत् त्यांच्या समूहांत सोमबिन्दूंनीं जसा हर्षनिर्भर होतोस, १६. —किंवा हे सर्वसमर्था, अत्यंत दूरचा जो ( आकाशरूपी ) समुद्र त्याच्याहि वरच्या लोकांत तूं तल्लीन होतोस, तसा आज आमच्याहि अभिनव सोमबिन्दूंनीं संतुष्ट हो १७. —किंवा सोमार्पण करणाऱ्या दुसऱ्या एखाद्या सद्भक्ताची जशी तूं महती वाढवितोस; किंवा हे सज्जनप्रतिपालका, जसा त्याच्या यज्ञांत सोमबिन्दूंनीं हृष्टचित्त होतोस; तसाच आमच्याहि सोमरसानें तूं संतुष्ट हो १८, —देवाची—त्या देवाचीच मीं संरक्षणाकरितां स्तुति करीन; स्तवनाच्या रंगांत त्याचेंच स्तवन करीन; पहा कीं दुष्कृतनाशक जो यज्ञ त्यासाठींच ( भक्तांना ) यच्चावत् गोष्टी प्राप्त झाल्या आहेत १९. —यज्ञ तडीस नेणाऱ्या इन्द्राला यज्ञांनींच ( संतुष्ट केलें ); सोमाविषयीं अत्यंत लालस अशा इन्द्राला सोमार्पणानेंच प्रसन्न केलें; होत्रस्तवनांनींहि इंद्राचेंच गौरव भक्तांनीं केलें; म्हणूनच त्यांना ( इच्छितवस्तूचा ) लाभ झाला २०. —इन्द्राचीं धोरणें फारच महनीय; त्याची स्तुति करावी तेवढी थोडीच. सर्व प्रकारची संपत्ती भक्ताकरतां असते आणि त्यांनींच ती संपत्ति प्राप्त करून घेतली आहे २१. —वृत्राचा वध करण्यासाठीं विबुधांनीं इन्द्राला अग्रेसर केलें,

---

सनि र्मित्रस्य पप्रथे इन्द्रः सोमस्य पीतये। प्राची वाशीव सुन्वते मिमीत इत् ॥१२॥ यं विप्रा उक्थवाहसो अभिप्रमन्दु–रायवः। घृतं न पिप्य आसनि ऋतस्य यत् ॥ १३ ॥ उत स्वराजे अदितिः स्तोम् इन्द्राय जीजनत्। पुरुप्रशस्तम् ऊतये ऋतस्य यत् ॥ १४ ॥ अभि वह्नय ऊतये अनूषत प्रशस्तये। न देव विव्रता हरी ऋतस्य यत् ॥ १५ ॥ यत् सोममिन्द्र विष्णवि यत् वा घ त्रित आप्त्ये। यत् वा मरुत्सु मन्दसे समिन्दुभिः ॥ १६ ॥ यद्वा शक्र परावति समुद्रे अधि मन्दसे। अस्माक–मित् सुते रणा समिन्दुभि ॥ १७ ॥ यत् वाऽसि सुन्वतो वृधः यजमानस्य सत्पते। उक्थे वा यस्य रण्यसि समिन्दुभिः ॥ १८ ॥ देवंदेवं वो अवसे इन्द्रमिन्द्रम् गृणीषणि। अधा यज्ञाय तुर्वणे वि आनशुः ॥ १९ ॥ यज्ञेभि–र्यज्ञवाहसं सोमेभिः सोमपातमम्। होत्राभि–रिन्द्रं वावृधु र्वि आनशुः ॥२०॥ मही–रस्य प्रणीतयः पूर्वी–रुत प्रशस्तयः।

आणि ओजस्विता प्राप्त करून घेण्याकरितां ( भक्तांच्या ) वाणींनीं इन्द्राचीच स्तुति गाथिली २२. —आपल्या महिम्यानें थोर असलेल्या इन्द्राची सामगायनानीं आम्हीं स्तुति करूं; आणि भक्तांचा धांवा ऐकणाऱ्या इन्द्राप्रीत्यर्थ ओजस्विता प्राप्त करून घेण्या करतां "अर्क" स्तोत्रें म्हणूं २३. —आकाश आणि पृथ्वी हे दोन्हीं लोक देखील वज्रधर इन्द्राला आकलन करूं शकत नाहींत; आणि अंतरिक्ष तर नाहींच नाहीं. उलट, ह्याच्याच प्रभावामुळें, ह्याच्याच ओजस्वितेमुळें मात्र सर्वच ( विश्व ) उज्ज्वल होतें २४. —इन्द्रा, सैन्यें एकमेकांवर हल्ला चढवितात अशा युद्धांत जेव्हां दिव्यविबुधांनीं तुला आपला धुरीण केलें त्या क्षणींच तुझ्या दोन्हीं हरिद्वर्ण अश्वांनीं तुला ( शत्रुसैन्यावर ) वाहून नेलें २५. —वज्रधर इन्द्रा, नदींत लपून बसलेल्या वृत्राला जेव्हां तूं झपाट्या-सरशीं ठार केलेंस, त्या वेळीं देखील तुझ्या हरिद्वर्ण अश्वांनींच तुला ( शत्रूवर ) चढाई करून नेलें २६. —तुझा प्रियमित्र जो विष्णु त्यानें आपल्या पराक्रमानें जेव्हां तीन पावलें टाकलीं, तेव्हांहि तुझ्या हरिद्वर्ण अश्वांनींच त्याला ( रथांतून ) नेलें २७. —तुझे हरिद्वर्ण अश्व प्रतिदिवशीं ज्या ज्या वेळेस ( धडाडीनें ) फारच विशाल दिसूं लागले त्या त्या वेळेस हीं सर्व भुवनें तुझ्यापुढें नम्र झालीं २८. —तुझे अनुचर जे मरुत्गण त्यांनीं, हे इन्द्रा, जेव्हां आपलीं मस्तकें तुझ्या पुढें लवविलीं, त्या वेळेस देखील सर्व भुवनें तुझ्या चरणीं लीन झालीं २९. —ह्या सूर्याला, ह्या शुभ्रवर्ण तेजोगोलाला तूं आकाशांत आधार दिलास, हें पाहतांच सर्व भुवनें तुझ्या पुढें तत्काल विनम्र झालीं ३०. —इन्द्रा, हें तुझें उत्तम आल्हादप्रद कवन प्रतिभाशाली कवि आत्मस्फूर्तीनें तुला समर्पण करतो; यज्ञमंडपांत आपल्या बन्धुवर्गास आपण गोड बोलून उत्तम ठिकाणीं नेऊन बसवितों, त्याप्रमाणें कविजन आपलीं कवनें तुझ्या चरणीं समर्पण करतात ३१. —पहा ह्या ( इन्द्रा ) च्या प्रिय मंदिरांत, मनोरथांचा पान्हा सोडणाऱ्या यज्ञाच्या मध्यभागीं एकत्र

विश्वा वसूनि दाशुषे वि आनशुः ॥ २१ ॥ इन्द्रं वृत्राय हन्तवे देवासो दधिरे पुरः। इन्द्रं वाणी–रनूषत समोजसे ॥ २२ ॥ महान्तं महिना वयं स्तोमेभि–र्हवनश्रुतम्। अर्कै रभि प्र णोनुमः समोजसे ॥ २३ ॥ न यं विविक्तो रोदसी न अन्तरिक्षाणि वज्रिणम्। अमात् इदस्य तित्विषे समोजसः ॥ २४ ॥ यदिन्द्र पृतनाज्ये देवास्त्वा दधिरे पुरः। आदित् ते हर्यता हरी ववक्षतुः ॥ २५ ॥ यदा वृत्रं नदीवृतं शवसा वज्रिन् अवधीः। आदित् ते हर्यता हरी ववक्षतुः ॥ २६ ॥ यदा ते विष्णुरोजसा त्रीणि पदा विचक्रमे। आदित् ते हर्यता हरी ववक्षतुः ॥ २७ ॥ यदा ते हर्यता हरी वावृधाते दिवेदिवे। आदित् ते विश्वा भुवनानि येमिरे ॥ २८ ॥ यदा ते मारुती–र्विशः तुभ्यमिन्द्र नियेमिरे। आदित् ते विश्वा भुवनानि येमिरे ॥२९॥ यदा सूर्य–ममुं दिवि शुक्रं ज्योतिरधारयः। आदित्ते विश्वा भुवनानि येमिरे ॥ ३० ॥ इमाम् त इन्द्र सुष्टुतिं विप्रः इयर्ति धीतिभिः। जामिं पदेव पिप्रतीम् प्र अध्वरे ॥ ३१ ॥ यदस्य

जमणाऱ्या भक्तगणांनीं प्रेमळ अन्तःकरणानें त्याला आळविलें आहे. ३२. —तर वीर्य-शालिपुत्र, जातिवंत अश्व, उत्कृष्ट गोधन यांचा, हे इन्द्रा, ज्यांत समावेश होईल असें ऐश्वर्य आम्हांला दे. यज्ञसंपादकाप्रमाणें आम्हीहि अध्वरयागांत तुझेंच चिंतन प्रथम करण्यासाठीं तुझें स्तवन करतों ३३.

## सूक्त १३

सोमरस पिळून सिद्ध होतांच यज्ञकर्म आणि सामगायन ह्या दोहोंनाहि इन्द्र पवित्र-पणा आणतो. हेतू हा कीं, अभिवृद्धि करणारें जें चातुर्यबल त्याचा लाभ ( भक्ताला ) व्हावा. ( असें करणें त्याला कठिण नाहीं ) कारण तो समर्थच आहे १. —आका-शाच्या अगदीं पहिल्या उच्च स्थानीं, दिव्यविबुधांच्या मंदिरांत इन्द्राचा वास असतो. तो समृद्धिवर्धक, आणि भक्तोद्धारक आहे अशीच त्याची सर्वत्र ख्याति आहे. "अप्सु" म्हणजे ज्ञानप्रवाह बंद करणारा जो राक्षस त्याला जिंकणारा इन्द्रच होय २. —म्हणून सत्वसामर्थ्यांच्या प्राप्तिसाठीं मी त्यालाच हांक मारतों; उत्कर्षासाठीं त्या अतिप्रबल इन्द्रा-चाच धांवा करतों. तर आमचें कल्याण व्हावें, अभ्युदय व्हावा म्हणून (देवा) तूंच आमचा जिवलग मित्र हो ३. —हे इन्द्रा, हे परमस्तुत्या, हा पहा सोमार्पण करणाऱ्या भक्ताचा हविर्भाग तुजला अर्पण होत आहे, त्यानें हृष्टचित्त होऊन ह्या आमच्या यज्ञांत तूं विराज-मान हो ४. —इन्द्रा, सोम अर्पण करून तुजला भजणारे आम्हीं भक्त जें कांहीं तुज-जवळ मागत आहों तें तूं आम्हांस देच. आमचें मागणें हेंच कीं, अत्यद्भुत आणि स्वर्गीय आनंद देणारें जें उत्कृष्ट धन आहे तें तूं आम्हासाठीं घेऊन ये ५. —तुझ्या चाणाक्ष भक्तानें आपल्या स्तुतीची पराकाष्ठा केली; तेव्हां, वृक्षाला पालवी फुटावी त्याप्रमाणें त्यांना

धामनि प्रिये समीचीनासो अस्वरन्। नाभा यज्ञस्य दोहना प्र अध्वरे ॥ ३२ ॥
सुवीर्यं सुअश्व्यम् सुगव्यम् इन्द्र दद्धि नः। होतेव पूर्वचित्तये प्र अध्वरे ॥ ३३ ॥

## सूक्तम् १३

काण्वो नारदः इन्द्रः उष्णिक्

इन्द्रः सुतेषु सोमेषु क्रतुं पुनीत उक्थ्यम्। विदे वृधस्य दक्षसः महान् हि सः ॥ १ ॥ स प्रथमे विओमनि देवानां सदने वृधः। सुपारः सुश्रवस्तमः समप्सु-जित् ॥ २ ॥ तम् अह्वे वाजसातये इन्द्रं भराय शुष्मिणम्। भवा नः सुम्ने अन्तमः सखा वृधे ॥ ३ ॥ इयम् त इन्द्र गिर्वणो रातिः क्षरति सुन्वतः। मन्दानो अस्य बर्हिषो वि राजसि ॥ ४ ॥ नूनम् तत् इन्द्र दद्धि नो यत् त्वा सुन्वन्त ईमहे। रयिम् नः चित्रम् आ भर स्वर्विदम् ॥ ५ ॥ स्तोता यत् ते विचर्षणि–रतिप्रशर्धयत् गिरः

हवें होतें तें प्राप्त झालें ६. —पुरातन कालाप्रमाणेंच आतांहि तूं कवनांची स्फूर्ति दे आणि भक्ताची हांक ऐक. तूं तल्लीन होतोस त्या प्रत्येक वेळीं पुण्यकर्मरत भक्तासाठीं ( वात्सल्यानें, ) उचंबळून जातोस ७. —ह्याच्या सत्यमधुर वरदवाणी ( पर्वतावरुन ) खालीं जोरानें लोटणाऱ्या उदक प्रवाहाप्रमाणें ( भक्ताकडे ) लीलेनें वागडत जातात कीं काय असें वाटतें. ह्या वात्सल्यामुळेंच त्याला दिव्य लोकाचा राजा असें म्हणतात ८. —आणि म्हणूनच तो अखिल मानवांचा एकच सत्ताधारी प्रभु आहे तर ( हे देवा ! ) तुला प्रणिपात करुन आपली उन्नति आणि रक्षण करुन घेऊं इच्छिणाऱ्या भक्तांनीं अर्पण केलेल्या सोमरसानें तूं आनंदमग्न हो ९. —( सद्भक्ता ! ) अतिशय विख्यात आणि ज्ञानस्वरूप जो इन्द्र त्याचें स्तवन कर. त्याचे हरिद्वर्ण अश्व (रथाला) सारखे जोडलेलेच आहेत; ते हविअर्पण करणाऱ्या प्रणिपातशील भक्ताच्या गृहाकडे धांवतच जातात १०. —महाप्रज्ञ देवा, तुळतुळीत रंगाचे आणि भरधांव दौडणारे आपले अश्व जोडून वेगानें जाणारा तूं आमच्या यज्ञाकडे सत्वर ये; आमच्या येथें तुला संतोषच होईल ११. —हे उत्कटबलाढ्या, हे सज्जनप्रतिपालका देवा, तुझें गुणसंकीर्तन करणाऱ्या भक्तांस अक्षयधन दे; आणि आमच्या यजमानांना यश आणि अविनाशी निधींची सत्ता अर्पण कर. १२. —सूर्योदय होतो त्या वेळीं मी तुझा धांवा करतों, दिवसा मध्यान्हकाळींहि तुजला हांक मारतों; तर हे इन्द्रा, तूं प्रसन्न होऊन आपले त्वरितगती अश्व जोडून आमच्याकडे आगमन कर १३. —अनमान करूं नको; ये, अगदीं धांवत ये. आमच्या दुग्धमिश्रित सोमरसाचा आस्वाद घेऊन तल्लीन हो, आणि पुरातन काळापासून चाललेला (यज्ञाचा) धागा पूर्वपद्धतिप्रमाणें पुढेंहि अबाधित ठेव १४. —हे सर्वसमर्था, तूं दूरच्या लोकांत ऐस; किंवा हे वृत्रनाशना, अगदीं आमच्या जवळ ऐस; अथवा (अंतरिक्ष) सागराच्या उदकांत ऐस; कोठेंहि असलास तरी सोमपेयाचा रक्षणकर्ता तूंच आहेस १५. —आमच्या स्तुतींनीं इन्द्राचें यश वृद्धिंगत होवो; आम्हीं पिळलेल्या सोमबिन्दूंनीं इन्द्राला

---

वयाइवाऽनुरोहते जुषन्त यत् ॥ ६ ॥ प्रत्नवत् जनया गिरः शृणुधी जरितु हवम् । मदेमदे ववक्षिथा सुकृत्वने ॥ ७ ॥ क्रीळन्ति अस्य सूनृताः आपो न प्रवता यतीः । अया धिया य उच्यते पति र्दिवः ॥ ८ ॥ उतो पतिर्यं उच्यते कृष्टीनाम् एक इत् वशी । नमोवृधै-रवस्युभिः सुते रण ॥ ९ ॥ स्तुहि श्रुतम् विपश्चितम् हरी यस्य प्रसक्षिणा । गन्तारा दाशुषो गृहं नमस्विनः ॥ १० ॥ तूतुजानो महेमते अश्वेभिः प्रुषितप्सुभिः । आ याहि यज्ञ-माशुभिः शम् इत् हि ते ॥ ११ ॥ इन्द्र शविष्ठ सत्पते रयिम् गृणत्सु धारय । श्रवः सूरिभ्यो अमृतम् वसुत्वनम् ॥ १२ ॥ हवे त्वा सूर उदिते हवे मध्यदिने दिवः । जुषाण इन्द्र सप्तिभि र्न आ गहि ॥ १३ ॥ आ तू गहि प्र तु द्रव मत्स्वा सुतस्य गोमतः । तन्तुम् तनुष्व पूर्व्यं यथा विदे ॥ १४ ॥ यत् शक्रासि परावति यत् अर्वावति वृत्रहन् । यद्वा समुद्रे अन्धसोऽवितेत् असि ॥ १५ ॥ इन्द्रम्

द्वेष्टचित्त केलें, आणि हवि अर्पण करणारे भक्त इन्द्राच्याच ठिकाणीं तल्लीन झाले. १६. —प्रसादेच्छु ज्ञानीजनांनीं अत्यंत आतुरतेनें केलेल्या भक्तरक्षक स्तुतीनीं त्या ( इन्द्रा ) चेंच यश वाढविलें. झाडाला पालवी ( फुटून तें वृद्धिंगत व्हावें ) त्याप्रमाणें सामान्य जनांनीं देखील इन्द्राचीच महती वाढविली १७. —" त्रिकद्रुक " उत्सवामध्यें चैतन्य-रूप ( इन्द्रा ) ची जाणीव करून देणारा यज्ञ दिव्यविबुधानीं केला. याप्रमाणें सदासर्वकाळ ज्याचा महिमा वाढतोच आहे त्या ( इन्द्रा ) चेंच यश आमच्या स्तवनांनीं वृद्धिंगत होवो १८. —तुझ्या धर्मनियमाप्रमाणें चालणारा भक्त तुझ्या प्रीत्यर्थ यथा काळीं सामगायन करतो ( तें योग्यच आहे; कारण ), देव हा पवित्र, पतितपावन आणि अद्भुत कर्मकारी आहे असेंच सर्व म्हणतात १९. —तेंच हें रुद्राचें प्रभावशाली रूप पुरातन तेजोमय स्थानांत स्पष्टपणें दृग्गोचर होत आहे; आणि त्याच ठिकाणीं स्वानुभवी भक्तांनीं आपलें तें मन ( निश्चल ) ठेवलें आहे २० —( देवा ) जर माझ्याविषयीं तुझ्या ठिकाणीं प्रेम-भाव वसत असेल तर ह्या माझ्या सोमपेयाचा स्वीकार कर; म्हणजे द्वेष्ट्यांच्या कचाटींतून आम्हीं सुखरूप पार पडूं २१. —हे स्तवनार्ह इन्द्रा, तुझा भक्त अत्यंत सुखी केव्हां होईल वरें ? ( प्रकाश ) गोधन, आणि ( सर्वगामी ) अश्वधन अशा वैभवांत तूं आम्हांला केव्हां ठेवशील वरें ? २२. —तुझे नामांकित वीर्यशाली अश्व, तुज अजरामर देवाच्या रथाला ( भक्ताकडे ) घेऊन जातात, म्हणून तो अत्यंत हर्ष देणारा रथ देखील आम्हांस हवा हवासा वाटतो २३. —सर्वांनीं स्तविलेला जो प्रभावशालि ( देव ) त्याची आम्हीं प्रार्थना करतों, म्हणजे तो आपल्या पुरातन भक्तरक्षक शक्तींसह त्याला प्रिय अशा यज्ञमंडपांत दोन्ही प्रकारानें विराजमान होईल २४. —हे सर्वस्तुत देवा, ऋषींनीं ज्यांची वाखाणणी केली आहे अशा सामर्थ्यांनीं आमची अभिवृद्धि कर; पुष्टिकारक जोम आम्हांमध्यें स्फुरण पावूं दे; आणि आमचें रक्षण कर २५. —अशा प्रकारानें स्तवन करणाऱ्या भक्ताचा,

वर्धन्तु नो गिरः इन्द्रम् सुतास इन्दवः । इन्द्रं हविष्मती विशः अराणिषु ॥ १६ ॥ तमित् विप्राः अवस्यवः प्रवत्वतीभि रूतिभिः । इन्द्रम् क्षोणी–रवर्धयन् वयाइव ॥ १७ ॥ त्रिकद्रुकेषु चेतनम् देवासो यज्ञम् अत्नत । तमित् वर्धन्तु नो गिरः सदावृधम् ॥ १८ ॥ स्तोता यत् ते अनुव्रतः उक्थानि ऋतुथा दधे । शुचिः पावक उच्यते सो अद्भुतः ॥१९॥ तदित् रुद्रस्य चेतति यह्वम् प्रत्नेषु धामसु । मनो यत्रा वि तत् दधु र्विचेतसः ॥ २० ॥ यदि मे सख्य मावरः इमस्य पाहि अन्धसः । येन विश्वा अतिद्विषो अतारिम ॥ २१ ॥ कदा त इन्द्र गिर्वण स्तोता भवाति शन्तमः । कदा नो गव्ये अश्व्ये वसौ दधः ॥ २२ ॥ उत ते सुष्टुता हरी वृषणा वहतो रथम् । अजुर्यस्य मन्दितमम् यम् ईमहे ॥ २३ ॥ तमीमहे पुरुष्टुतम् यह्वम् प्रत्नाभि रूतिभिः । नि बर्हिषि प्रिये सदत् अध द्विता ॥ २४ ॥ वर्धस्वा सु पुरुष्टुत ऋषिष्टुताभि रूतिभिः । धुक्षस्व पिप्युषीम् इषम् अवा च नः ॥ २५ ॥ इन्द्र त्वम् अवितेत् असि इत्था

हे इन्द्रा, तूं रक्षण करणाराच होतोस, ( म्हणून ) हे वज्रधरा, माझ्या अंतःकरणाशीं तन्मय होणारी जी ध्यानस्तुति तिला सत्यधर्माच्या जोरावरच मी तुझ्याकडे लावतों २६. —तुझ्या वाणीवरच आनंदित होणारे तुझे ते अपार भाग्याचे हरिद्वर्ण अश्व जोडून हे इन्द्रा, " सोमपानार्थ मी निघालों " असें आम्हांस हांक मारून सांग २७. —त्याचप्रमाणे रुद्रपुत्र जे मरुत्गण नेहमीं तुझ्या आश्रयाची शोभा धारण करीत असतात तेहि आमच्या प्रेमळ विनंतीस मान देतों असें आम्हांस हांक मारून मोठ्यानें सांगोत २८. हेच त्या ( देवा ) चे शत्रुसंहारक अनुचर मरुत्, कीं ज्यांनीं दिव्यलोकांत आपल्याला प्रिय असेंच स्थान पटकाविलें, आणि यज्ञाच्या मुख्य स्थानीं देखील ते जाऊन वसले हें सर्वांस माहितच आहे २९. —जो जो अध्वरयाग प्राचीन पद्धतीस अनुरूप होत असतो त्यांत ( भक्ताची ) दृष्टि दूर पोहोंचावी म्हणून प्रत्येक यज्ञाचें सूक्ष्मपणें निरीक्षण करून ( इन्द्र ) तो यज्ञ यथापूर्व व्यवस्थितपणें संपादन करतो ३० —इन्द्रा, हा तुझा रथ वीर्यशाली, त्याचप्रमाणें तुझे अश्वहि वीर्यशाली, आणि हे अपारकर्तृत्वा देवा, तूं स्वतः तर वीर्यशालीच आहेस; परंतु तुझें नामसंकीर्तनहि तसेंच वीर्यशाली आहे ३१. —सोमरस पिळण्याचा ग्रावा ( पाषाण ) वीर्यशाली, सोमाचा आवेश वीर्यशाली, आणि हा स्वतः सोमरस तर वीर्यशाली आहेच. परंतु ज्या यज्ञाला तूं प्राप्त होतोस तोहि वीर्यशाली आणि तुझें आह्वानहि वीर्यशालीच असतें ३२. —वीर्यभरानें प्रबळ झालेला मी तुझा भक्त, हे वज्रधरा, तुज वीर्यशाली वीराला नाना प्रकारच्या सहाय्यक शक्तींसह पाचारण करीत आहे; तूं उत्कृष्ट स्तुतींचा भोक्ता आहेस आणि तुझें संकीर्तनहि वीर्यशालित्व आणतें ३३.

---

स्तुवतो अद्रिवः । ऋतात् इयर्मि ते धियम् मनोयुजम् ॥ २६ ॥ इह त्या सधमाद्या युजानः सोमपीतये । हरी इन्द्र प्रतद्वसू अभिस्वर ॥२७॥ अभि स्वरन्तु ये तव रुद्रासः सक्षतः श्रियम् । उतो मरुत्वती विशो अभि प्रयः ॥ २८ ॥ इमाः अस्य प्रतूर्तयः पदं जुषन्त यत् दिवि । नाभा यज्ञस्य सं दधु र्यथा विदे ॥ २९ ॥ अयं दीर्घाय चक्षसे प्राचि प्रयति अध्वरे । मिमीत यज्ञम् आनुषक् विचक्ष्य ॥ ३० ॥ वृषाऽयम् इन्द्र ते रथः उतो ते वृषणा हरी । वृषा त्वम् शतक्रतो वृषा हवः ॥ ३१ ॥ वृषा ग्रावा वृषा मदो वृषा सोमो अयं सुतः । वृषा यज्ञो यमिन्वसि वृषा हवः ॥ ३२ ॥ वृषा त्वा वृषणं हुवे वज्रिन् चित्राभि रूतिभिः । ववन्थ हि प्रतिष्टुतिम् वृषा हवः ॥ ३३ ॥

---

# सूक्त १४

इन्द्रा जसा तूं तसाच मीहि जर अपूर्वनिधीचा एकटाच सत्ताधीश झालों तर माझा भक्त खात्रीनें गोधनयुक्त होईल १. —जर मी स्वतः (प्रकाश) गोधनाचा अधिपति झालों, तर हे सर्वशक्तिप्रभो, त्या मनोजयी भक्ताला मी ऐश्वर्य देण्याची इच्छा धरीन, इतकेंच काय, पण तें त्याला देऊनही टाकीन २. —इन्द्रा तुझी सत्यमधुर वरदवाणी सोमार्पण करणाऱ्या भक्ताला कामधेनूच होय. तिची कांस तटतटीत भरलेली आहे. ती गोरूप आणि अश्वरूप दुग्ध पाहिजे तितकें पिळूं देते ३. —तुझें स्तवन केलें म्हणजे तूं भक्ताला वरदान देऊं इच्छितोस तेव्हां हे इन्द्रा, त्या तुझ्या वरप्रसादाला अडथळा करणारा असा कोणताहि विबुध नाहीं किंवा मानवहि नाहीं ४. —जेव्हां इन्द्रानें पृथ्वीला भ्रमण करावयास लाविलें आणि आकाशांत पुष्पगुच्छाप्रमाणें (रमणीय अशा) तारा निर्माण केल्या त्याच वेळेस यज्ञकर्मांनें इन्द्राचें यश वृद्धिंगत झालें ५. —याप्रमाणें ज्या तुझें यश अपरंपार आहे आणि ज्या तूं विजयधनें जिंकून आपलीशीं केलीं आहेस त्या तुझ्याच जवळ हे इन्द्रा, आम्ही रक्षणाची याचना करतों. ६ —ज्या वेळीं इन्द्रानें वल राक्षसाला छिन्नभिन्न केलें, त्या वेळीं सोमाच्या आवेशांत तो (इन्द्र) अन्तरिक्ष आणि त्यांतील तेजोगोल ह्यांच्याहि पलीकडे गेला ७. —गुहेमध्यें दडविलेल्या (प्रकाशरूप) धेनू अङ्गिरा ऋषींसाठीं जगाच्या दृष्टीस पाडून इंद्रानेंच त्यांना वर आणलें, आणि वल राक्षसाला त्याचें डोकें खालीं आणि पाय वर करून भिरकावून आपटलें ८. —हीं जीं आकाशांतील तेजस्वी नक्षत्रें ठसठशीत आणि खेंचून भरलेलीं दिसत आहेत तीं आपआपल्या जागीं इंद्रानेंच स्थिर केलीं आहेत; तीं कोणाच्यानेंही हलविलीं जाण्यासारखीं नाहीत ९.

# सूक्तम १४

गोषूक्तिः इन्द्रः गायत्री छन्दः

यदिन्द्राहम् यथा त्वम् ईशीय वस्व एक इन्। स्तोता मे गोषखा स्यात् ॥ १ ॥ शिक्षेयम् अस्मै दित्सेयम् शचीपते मनीषिणे। यदहं गोपतिः स्याम् ॥ २ ॥ धेनुः ते इन्द्र सूनृता यजमानाय सुन्वते। गाम् अश्व्यम् पिप्युषी दुहे ॥ ३ ॥ न ते वर्ताऽस्ति राधसः इन्द्र देवो न मर्त्यः। यत् दित्ससि स्तुतो मघम् ॥ ४ ॥ यज्ञः इन्द्रम् अवर्धयत् यत् भूमिम् वि अवर्तयत्। चक्राणः ओपशम् दिवि ॥ ५ ॥ वावृधानस्य ते वयं विश्वा धनानि जिग्युषः। ऊतिम् इन्द्रा ऽवृणीमहे ॥ ६ ॥ वि अन्तरिक्षम् अतिरत् मदे सोमस्य रोचना। इन्द्रो यत् अभिनत् वलम् ॥ ७ ॥ उत् गाः आजत् अङ्गिरोभ्य आविष्कृण्वन् गुहा सतीः। अर्वाञ्चम् नुनुदे वलम् ॥ ८ ॥ इन्द्रेण रोचना दिवो दृळहानि दृंहितानि च। स्थिराणि न परानुदे ॥ ९ ॥ अपाम् ऊर्मि-र्मदन्

—उदकाच्या लाटेप्रमाणें हर्षानेंच जणों उचंबळणारें तुझें स्तोत्र, ज्या वेळीं हे इन्द्रा; ( ऋषीच्या मुखांतून ) मोठ्या वेगानें चोहोंकडे फैलावतें त्या वेळीं तुझे हर्षाविर्भाव फारच खुलून दिसतात १०. —इन्द्रा, स्तोत्रांचा संवर्धक तूंच, सामगायनांचाहि तूंच, आणि भक्तांचें कल्याण करणाराहि पण तूंच आहेस ११. —अयाळानें सुशोभित असे अश्व देवकृपा संपादन करून देणाऱ्या यज्ञाकडे इंद्रालाच सोमप्राशनार्थ घेऊन येतात १२. —ज्या वेळीं तूं सर्वच शत्रूंना जिंकलेंस त्याच वेळीं नुसत्या पाण्याच्या फेसानेंच, हे इन्द्रा, तूं नमुचि नामक राक्षसाचें मस्तक तोडून वर उडवून दिलेंस १३. —आपल्या कपटी युक्त्यांनीं चोहोंकडे धुडगूस घालणारे आणि आकाशाच्याहि वर चढून बसणारे जे अधार्मिक दुष्ट त्यांना, हे इन्द्रा, तूं खालीं फेंकून आपटून मारलेंस १४. —याप्रमाणें तुजला सोमरस अर्पण न करणाऱ्या, आणि पुनः जिकडे तिकडे वावरणाऱ्या ज्या अधार्मिक जाती होत्या त्यांचा, हे इन्द्रा, तूं नायनाट करून टाकलास आणि ( भक्तांचा ) सोमरस प्राशन करून उत्तम रीतीनें यशस्वी झालास १५.

## सूक्त १६

( भक्तहो ! ) त्याचेंच गुणगायन करा; सर्व जनांनीं आळविलेला, सर्व लोकांनीं स्तविलेला असा जो अविश्रान्त इन्द्र त्याचीच सेवा स्तोत्रांनीं करा १. —ज्याच्या स्वरूपाचे प्रकार दोन आहेत, त्या इन्द्राच्या प्रचंड नेटानेंच आकाश आणि पृथ्वी हीं सांवरलेलीं आहेत; त्याच्या वीर्यशालित्वामुळेंच पर्वत, विस्तीर्ण मेघ, नद्या आणि स्वर्लोक हेहि आप-आपल्या जागीं राहिले आहेत; २. —सर्वजनस्तुत देवा, तूं असा राजाप्रमाणें (विश्वावर)

---

इव स्तोममिन्द्राऽजिरायते । वि ते मदा अराजिषुः ॥ १० ॥ त्वम् हि स्तोमवर्धनः इन्द्राऽसि उक्थवर्धनः । स्तोतॄणाम् उत भद्रकृत् ॥ ११ ॥ इन्द्र मित् केशिना हरी सोमपेयाय वक्षतः । उप यज्ञम् सुराधसम् ॥ १२ ॥ अपाम् फेनेन नमुचेः शिर इन्द्रोत् अवर्तयः । विश्वा यत् अजयः स्पृधः ॥ १३ ॥ मायाभिरुत् सिसृप्सतः इन्द्र द्याम् आरुरुक्षतः । अव दस्यूँ–रधूनुथाः ॥ १४ ॥ असुन्वाम् इन्द्र संसदम् विषूचीम् वि अनाशयः । सोमपाः उत्तरो भवन् ॥ १५ ॥

## सूक्तम् १६

पूर्ववत् इन्द्रः उष्णिह

तम् अभि प्र गायत पुरुहूतम् पुरुष्टुतम् । इन्द्रम् गीर्भिस् तविषम् आ विवासत ॥ १ ॥ यस्य द्वि बर्हसो बृहत् सहो दाधार रोदसी । गिरीँ रज्राँ अपः स्वर्वृष-

एकटाच सत्ता चालवितोस; आणि ज्या ज्या वस्तू जिंकण्याला योग्य आहेत; ज्या ज्या वस्तू विख्यात आहेत त्या (भक्तांच्या) हस्तगत व्हाव्या म्हणून ज्ञानशत्रू जे राक्षस त्यांचा तूं एकटाच संहार करून टाकतोस ३. —तो तुझा हर्षभर–जो वीर्यशाली असतो, जो युद्धांत शत्रूंची रग जिरवितो, हे पर्वतभंजका इन्द्रा, जो लोकहितकारी असतो, आणि जो तुझ्या हरिद्वर्ण अश्वांना शोभा आणतो–त्या तुझ्या हर्षभराचें आम्हीं गुणवर्णन करतों ४. —ज्याच्या योगानें **मनु** नांवाच्या भक्तासाठीं तूं तेजोराशि नक्षत्रें लोकांस माहित करून दिलींस, तो तूं हृष्ट होऊन ह्या यज्ञांत राजाप्रमाणें विराजमान हो ५. —म्हणून सामगायक भक्त पूर्वींच्या पद्धतिप्रमाणें आजहि तुझें गुणगायन करीत आहेत, तर तुज वीराला ज्या पत्नी शोभतात त्या आपोदेवींना जिंकून आणून प्रत्यहिं आपल्या सन्निध ठेव ६. —तुझें तें ईश्वरीसामर्थ्य अफाट आहे, त्याचप्रमाणें तुझा झपाटा, तुझें कर्तृत्व, हीं सारींच लोकोत्तर आहेत. (ह्मणून) भक्तांची एकाग्र बुद्धीच तुझें उत्कृष्ट वज्र पाजळून ठेवते ७. —हे इन्द्रा, तुझा पराक्रम आकाश वृद्धिंगत करतें आणि तुझें यश पृथ्वी वृद्धिंगत करते, आणि नद्या आणि पर्वत यांनीं तर तुझें नांव जिकडे तिकडे गाजविलें आहे ८. —(लोकांचा) महान् आधार जो विष्णु आणि (जगताचा) मित्र जो वरुण (तो तूंच म्हणून भक्त) तुझी प्रशंसा करतो. आणि तुझें मरुतांचें सैन्य तर तुझ्या हर्षानेंच हर्षभरित होतें ९. —हे इन्द्रा, सर्व लोकांचा वीर्यशालि आणि अत्यंत औदार्यशालि अग्रेसर असाच तूं प्रकट होतोस; आणि तुझीं आवडतीं लेंकरें (जे भक्तजन) त्या सर्वांनां तूं एकदम आपल्या जवळ घेतोस. १०. —हे सर्वजनस्तुत देवा, (ज्ञानशत्रू जे) वृत्र त्यांना तूं एकटाच एकदम चेंचून टाकतोस; कारण हें अवघड कार्य हे इन्द्रा, तुझ्या वांचून दुसरा कोणीहि करूं शकत नाहीं ११. —हे इन्द्रा, मननाच्या योगानें भक्तजन सहायासाठीं तुझा परोपरीनें धांवा करतात, तर आज ह्या ठिकाणीं आमच्या शूर सैनिकांच्या हातून आम्हांस दिव्य प्रकाश जिंकून दे १२. —श्रेष्ठ जो

---

त्वना ॥२॥ स राजसि पुरुष्टुत एको वृत्राणि जिघ्नसे । इन्द्र जैत्रा श्रवस्या च यन्तवे ॥३॥ तं ते मदम् गृणीमसि वृषणम् पृत्सु सासहिम् । उलोक–कृत्नुम् अद्रिवो हरि-श्रियम् ॥ ४ ॥ येन ज्योतिंषि आयवे मनवे च विवेदिथ । मन्दानो अस्य बर्हिषो वि राजसि ॥५॥ तद् अद्य चित् त उक्थिनो अनु ष्टुवन्ति पूर्वथा । वृषपत्नी–रपो जय दिवेदिवे ॥ ६ ॥ तव त्यत् इन्द्रियम् बृहत् तव शुष्मम् उत क्रतुम् । वज्रम् शिशाति धिषणा वरेण्यम् ॥ ७ ॥ तव द्यौर् इन्द्र पौंस्यम् पृथिवी वर्धति श्रवः । त्वाम् आपः पर्वतासःच हिन्विरे ॥ ८ ॥ त्वाम् विष्णु र्बृहन् क्षयः मित्रो गृणाति वरुणः । त्वाम् शर्धो मदति अनु मारुतम् ॥ ९ ॥ त्वम् वृषा जनानाम् मंहिष्ठ इन्द्र जज्ञिषे ॥ सत्रा विश्वा सु अपत्यानि दधिषे ॥ १० ॥ सत्रा त्वम् पुरुष्टुत एको वृत्राणि तोशसे । नान्य इन्द्रात् करणम् भूय इन्वति ११ ॥ यद् इन्द्र मन्मशस् त्वा नाना हवन्त ऊतये ।

आश्रय तो आह्मांस मिळण्यासाठीं, सर्व प्रकारच्या कवनांत पूर्णपणें रंगून जाऊन, सर्व-सत्ताधीश जो इन्द्र त्याला विजयप्राप्तिकरितां हर्षित कर १३.

## सूक्त १६

चराचरांचा सम्राट्, स्तवनयोग्य वीराग्रणी, वीराला योग्य अशी ज्याची धडाडी, आणि दात्यांमध्यें श्रेष्ठतम असा जो इन्द्र त्याचें स्तवन स्तुतिकलापांनीं करा १. —नद्यांचे लोट जसे समुद्रांमध्यें विश्रांति पावतात, त्याप्रमाणें श्रवणीय सामगायनें आणि श्रुतिमनोहर कवनें ज्या (इन्द्रा) च्या ठिकाणीं रंगून जातात. २. —त्या राजाधिराजाची, युद्धामध्यें मोठमोठे पराक्रम गाजविणाराची, आणि दानशील भक्तांना उत्साह आणणारा जो (इन्द्र) त्याची मी उत्कृष्ट स्तुतीनें सेवा करितों ३. —ज्याच्या आवेशांत कोणतीही न्यूनता नसते, ज्याचे आनंद सखोल आणि अमर्याद असतात, (भक्ताचा) उद्धार करतात-आणि शूरांना योग्य अशा समरांत अधिकच उल्लसित होतात ४. —त्या इंद्रालाच, युद्धप्रसंग उपस्थित झाला असतां (आम्ही हांक मारतों), आणि आमच्या बाजूनें (लोकांची) समजूत पटावी म्हणून त्यालाच आम्ही हांक मारतों; कारण ज्यांच्या बाजूचा इंद्र असेल तेच विजयी होतात ५. —म्हणून ज्या स्तोत्रांनीं उत्साह वाढतो, त्या स्तोत्रांनीं त्याला आळवून आणि सत्कर्मांनीं त्यालाच प्रसन्न करून सर्वलोक "आर्य" हें नामाभिधान सार्थ करतात. असा हा इन्द्र (मनाला) उत्कृष्ट समाधान देणारा आहे ६. —इंद्र हाच ब्रह्मा, इंद्र हाच ऋषि होय; आणि समृद्धि कोणती तर इंद्र हीच. सर्वांनीं धांवा करण्यास योग्य तोच आहे आणि आपल्या अपार शक्तींनीं समर्थ आहे ७. —तो स्तवन-

अस्माकेभि र्नृभि–रत्रा स्वर् जय ॥ १२ ॥ अरं क्षयाय नो महे विश्वा रूपाणि आविशन् । इन्द्रम् जैत्राय हर्षया शचीपतिम् ॥ १३ ॥

## सूक्तम् १६

इरिम्बिठिः इन्द्रः गायत्री.

प्र सम्राजम् चर्षणीनाम् इन्द्रम् स्तोत नव्यम् गीर्भि । नरम् नृषाहम् मंहिष्ठम् ॥ १ ॥ यस्मिन् उक्थानि रण्यन्ति विश्वानि च श्रवस्या । अपाम् अवो न समुद्रे ॥ २ ॥ तं सुष्टुत्या आ विवासे ज्येष्ठराजम् भरे कृत्नुम् । महो वाजिनम् सनिभ्यः ॥ ३ ॥ यस्याऽनूनाः गभीराः मदाः उरवस् तरुत्राः । हर्षुमन्तः शूरसातौ ॥४॥ तमित् धनेषु हितेषु अधिवाकाय हवन्ते । येषाम् इन्द्रस् ते जयन्ति ॥ ५ ॥ तमित् च्यौत्नैर् आर्यन्ति तम् कृतेभि श्चर्षणयः । एष इन्द्रो वरिवस्कृत् ॥ ६ ॥ इन्द्रः ब्रह्मा इन्द्र ऋषिः इन्द्रः पुरु पुरोहूतः । महान् महीभिः शचीभिः ॥ ७ ॥ स स्तोम्यः

योग्य, तोच हवनयोग्य; तो सत्यस्वरूप, सत्वशील, आणि महत्कर्मकारी आहे. तो एकटा असला तरीहि ( शत्रूंची ) अगदीं दाणादाण उडवून देतो ८. —भक्तजन त्याचें ऋक्स्तोत्रांनीं स्तवन करतात, त्याचें सामगायनांनीं गुणगायन करतात, आणि गायत्र मंत्रांनींहि त्याला आळवितात. सामान्य मनुष्यें देखील त्या इन्द्राचेंच यशोवर्णन करीत असतात ९. —अत्यंत उच्च प्रतीचें जें अभीष्ट त्याकडे तो भक्तांना नेतो, समरांमध्यें दृष्टीपुढें प्रकाश उत्पन्न करतो आणि युद्धाच्या योगानें शत्रूंची दुर्दशा उडवून देतो १० —तो आमचा तारक आहे. सकल जन ज्याचा धांवा करतात तो इन्द्र नावें( तून तरून नेल्या ) प्रमाणें आम्हांस ( जय मिळवून देऊन ) यच्चावत् शत्रूसमूहांतून सुखरूपणें पार नेतो ११. —हे इन्द्रा अशा प्रकारचा तूं आहेस तर सत्वसामर्थ्यांच्या योगानें आम्हांस सन्मार्ग दाखीव, आणि शांतिसुखाकडे आम्हांस घेऊन चल १२.

## सूक्त १७

आमच्याकडे आगमन कर; आम्हीं तुझ्याकरितां सोमरस पिळला आहे, तर हे इन्द्रा, तो तूं प्राशन कर आणि ह्या माझ्या कुशासनावर विराजमान हो १. —प्रार्थनासूक्तें म्हणूं लागतांच जे रथाला जोडले जातात ते तुझे अयाळी घोडे, हे इन्द्रा, तुला आमच्याकडे घेऊन येणारच; तर तूं ( येऊन ) आमच्या प्रार्थना ऐक २. —आम्ही प्रार्थनासूक्तें म्हणणारे भक्त, आम्हीं सोम अर्पण करणारे भक्त तुला सोमप्रिय इन्द्राला सोमरस पिळून हांक मारीत आहोंत ३. —तर सोमरस पिळून सिद्ध करणारें जे आम्ही भक्त त्यांच्या उत्कृष्ट स्तुतींकडे तूं ये आणि हे शोभनमुकुटधरा इन्द्रा, तूं सोमपेय प्राशन कर ४. —हा रस तुझ्या दोन्हीं कुक्षी ( पात्रां )त मी ओततों तो तुझ्या सर्व गात्रांमध्यें जाऊन भिनेल. तर हे इन्द्रा, तूं आपल्या जिव्हेनें ह्या मधुर रसाचा आस्वाद

स हव्यः सत्यः सत्वा तुविकूर्मिः । एक श्चित् सन् अभिभूतिः ॥ ८ ॥ तम् अर्केभिस् तम् सामभिस् तम् गायत्रैः चर्षणयः । इन्द्रम् वर्धन्ति क्षितयः ॥९॥ प्रणेतारं वस्यो अच्छा कर्तारम् ज्योतिः समत्सु । सासह्वांसम् युधा अमित्रा ॥ १० ॥ स नः पप्रिः पारयाति स्वस्ति नावा पुरुहूतः । इन्द्रो विश्वाः अति द्विषः ॥ ११ ॥ स त्वम् नः इन्द्र वाजभिः दशस्य च गातुया च । अच्छा च नः सुम्नं नेषि ॥ १२ ॥

## सूक्तम् १७

इरिम्बिठिः इन्द्रः गायत्री.

आ याहि सुषुमा हि ते इन्द्र सोमं पिबा इमम् । एदम् बर्हिः सदो मम ॥ १ ॥ आ त्वा ब्रह्मयुजा हरी वहताम् इन्द्र केशिना । उप ब्रह्माणि नः शृणु ॥ २ ॥ ब्रह्माणस् त्वा वयं युजा सोमपा–मिन्द्र सोमिनः । सुतावन्तो हवामहे ॥ ३ ॥ आ नो याहि सुतावतो अस्माकं सुष्टुती–रुप । पिबा सुशिप्रिन् अन्धसः ॥ ४ ॥ आ ते सिञ्चामि

घे ५. —तुज औदार्यशील देवाला हा रस फार रुचकर लागो; हा मधुयुक्त रस तुझ्या शरीराला आल्हाददायक होवो. तुझ्या अन्तःकरणालाहि तो प्रमुदित करो ६. —सर्व-साक्षी इन्द्रा, जसा एखादा वीर नवयुवतींनीं वेष्टित असतो, तसा अनेक वस्तूंनीं हा सोम-रस परिपूरित आहे तो तुझ्यांप्रत प्राप्त होवो ७. —ज्याची मान भरदार, छाती विशाळ आणि भुजदंड पिळदार असा इन्द्र सोमपेयाच्या आवेशांत शत्रूंचा पार धुव्वा उडवून देतो ८. —हे इन्द्रा, सत्वर पुढें ये; तूं आपल्या ओजस्वितेनें विश्वाचा अधिपति झाला आहेस, तर हे शत्रुनाशना ज्ञानशत्रूंचा संहार कर. ९ —ज्या अंकुशानें तूं सोमरस अर्पण कर-णाऱ्या यजमानास अभिलषणीय धन मिळवून देतोस तो तुझा अंकुश लांब ( शत्रूपर्यंत ) जाऊन पोहोंचो १० —हा स्वच्छ गाळलेला सोमरस, हे इन्द्रा, तुझ्याकरितां दर्भावर ठेवला आहे; तर त्याच्याकडे ये, धांवत ये आणि हा रस प्राशन कर ११. —इन्द्रा, शक्ति हेंच तुझें गोधन; आणि शक्तीनेंच तुझें पूजन होतें, म्हणून हा सोमरस तुझ्या आनंदाला कारण होवो; शत्रूंची खांडोळीं करून टाकणाऱ्या इन्द्रा, त्याकरितांच आम्हीं तुला पाचारण करीत आहों १२. —शृङ्गवृषाचा जो पुत्र आणि कुण्डपाय्याचा जो पौत्र त्यानें तुझ्यासाठीं ह्या इन्द्राच्या ठिकाणींच आपलें चित्तठेवलें आहे १३. —हे गृहपते (इन्द्रा), तुझा आधार ( आम्हांस ) पक्का आहे, तो सोमार्पण करणाऱ्यांचें एक चिलखतच होय. ( सोमाचा ) एक बिन्दु ( देखील शत्रूंचे ) शेकडों दुर्भेद्य किल्ले जमीनदोस्त करून टाकतो; कारण, जे मुनी आहेत त्यांचा इन्द्र हा प्राणमित्रच होय १४. —(प्रकाश )धेनू हस्तगत करून घेण्याचा प्रयत्न करणारा यजनशील **पृदाकुसानु** हा जरी एकटा होता तरी त्यानें शेकडों शत्रूंचा फडशा उडवून दिला. आणि त्यानें इन्द्राला आपल्या भरधांव अश्वाकडे सोमप्राशनासाठीं निग्रहानें पुढें नेलें. १५.

---

कुक्ष्यो–रनु गात्रा वि धावतु। गृभाय जिह्वया मधु॥ ५॥ स्वादु ष्टे अस्तु संसुदे मधुमान् तन्वे ३ तव। सोमः शमस्तु ते हृदे॥ ६॥ अयम् त्वा विचर्षणे जनी रिवाऽभिसंवृतः। प्र सोम इन्द्र सर्पतु॥ ७॥ तुविग्रीवो वपोदरः सुबाहु–रन्धसो मदे। इन्द्रो वृत्राणि जिघ्नते॥ ८॥ इन्द्र प्रेहि पुरस् त्वम् विश्वस्येशान ओजसा। वृत्राणि वृत्रहन् जहि॥ ९॥ दीर्घस् ते अस्तु अङ्कुशो येना वसु प्रयच्छसि। यजमानाय सुन्वते॥ १०॥ अयम् त इन्द्र सोमो निपूतो अधि बर्हिषि। एहीम् अस्य द्रवा पिब॥ ११॥ शाचिगो शाचिपूजन अयम् रणाय ते सुतः। आखण्डल प्र हूयसे॥ १२॥ यस् ते शृंगवृषो नपात् प्रणपात् कुण्डपाय्यः। नि अस्मिन् दध्र आ मनः॥ १३॥ वास्तोष्पते ध्रुवा स्थूणा अंसत्रम् सोम्यानाम्। द्रप्सो भेत्ता पुराम् शश्वतीनाम् इन्द्रो मुनीनाम् सखा॥ १४॥ पृदाकुसानु यंजतो गवेषणः एकः सन् अभिभूयसः। भूर्णिम् अश्वम् नयत् तुजा पुरो गृभा इन्द्रम् सोमस्य पीतये॥ १५॥

## सूक्त १८

खचित आतां येथें सोमयागांत मर्त्य मानवानें ह्या आदित्यांच्या जवळ ( कांहीं मागावयाचेंच तर ) अपूर्व असें जें सुख आहे तेंच मागावें १. —ह्या आदित्यांचे मार्ग अगदीं निष्कण्टक आणि निर्धारित आहेत. त्यांचा नाश कोणींहि करूं शकत नाहीं, म्हणूनच ते मार्ग आम्हांसहि संरक्षक आणि सुखवर्धक होतात २. —तर आतां, सविता, भग, वरुण, मित्र आणि अर्यमा हे आदित्य, ज्या कल्याणाची आम्हांस लालसा आहे तें अमर्याद कल्याण आम्हांस प्राप्त करून देवोत ३. —अदिते देवि, ज्या तुझ्या वरदानांत कोणींहि व्यत्यय आणूं शकत नाहीं, अशी तूं ( आदित्य ) देवांसह येथें ये. हे सर्वप्रिय देवी, उत्कृष्ट सुखप्रद अशी तूं ( देवांत ) अग्रगण्य जे आदित्य त्यांच्यासह आमच्याकडे आनंदानें आगमन कर ४. —ते अदितीचे पुत्र आदित्य खरोखर असे आहेत कीं द्वेष्ट्यांचे तुकडे कसे उडवावे हें त्यांना चांगलें समजतें; ते ( भक्तांना ) पातकापासून पूर्णपणें मुक्त करणारे आणि ( त्यांचा ) नाश न होऊं देणारे असे आहेत ५. —अदिति दिवसा आमच्या गोधनाचें रक्षण करो; ती निष्कपट देवी रात्रींहि पण त्याचें रक्षण करो. ( जगताची ) नेहमीं अभिवृद्धीच करणारी अशी अदिति आमचें पातकांपासून रक्षण करो ६. —दिवसभर आमचें जें काय चिन्तन चालावयाचें तें अदिति हेंच असो. ती आपल्या भक्तरक्षक शक्तींसह आमच्याकडे येवो. ती आमचें शांतियुक्त असें मंगल करो आणि दुष्टांना दूर हांकून देवो ७. —तसेंच, ते दिव्य वैद्य अश्विदेव आमचें कल्याण करोत; ते आमच्या पासून दोषांना काढून टाकोत आणि घातक्यांना दूर हांकून देवोत ८. —( गार्हपत्यादिक जे पांच ) अग्नि, त्यांच्या यजनानें अग्निदेव आमचें कल्याण करो. सूर्य आमच्या कल्याणासाठींच प्रकाशित होवो; आणि तो निष्कलंक वायु देईल अशा रीतीनें

## सूक्तम् १८

इरिम्बिठिः अश्विदेव उष्णिक्

इदम् ह नूनम् एषां सुम्नं भिक्षेत मर्त्यः। आदित्यानाम् अपूर्व्यं सवीमनि ॥ १ ॥ अनर्वाणो हि एषां पन्था आदित्यानाम्। अदब्धाः सन्ति पायवः सुगेवृधः ॥ २ ॥ तत्सु नो सविता भगो वरुणो मित्रो अर्यमा। शर्म यच्छन्तु सप्रथो यदीमहे ॥ ३ ॥ देवेभि र्देवि अदिते अरिष्टभर्मन् आ गहि। स्मत् सूरिभिः पुरुप्रिये सुशर्मभिः ॥ ४ ॥ ते हि पुत्रासो अदितेर् विदुर् द्वेषांसि योतवे। अंहो श्चित् उरुचक्रयो अनेहसः ॥ ५ ॥ अदिति र्नो दिवा पशुं अदिति र्नक्तम् अद्वयाः। अदितिः पातु अंहसः सदावृधा ॥ ६ ॥ उत स्या नो दिवा मतिर् अदितिर् ऊत्याऽऽगमत्। सा शंताति मयस् करत् अप स्रिधः ॥ ७ ॥ उत त्या दैव्या भिषजा शंनः करतो अश्विना। युयुयाताम् इतो रपो अपस्रिधः ॥ ८ ॥ शम् अग्निर् अग्निभिः करत् शं

वाहो कीं दुष्ट घातकी दूर पळून जातील ९. —आमच्यापासून आधिव्याधी पिटाळून लावा घातकी दुष्टांचें निर्मूलन करा, दुर्बुद्धि पार विलयास न्या. आणि हे आदित्य हो, आम्हांला पातकांपासून दूर ठेवा १०. —अत्याचारी दुष्टाला आम्हांपासून दूर नेऊन ठार करा; तसेंच हे आदित्यांनों आमच्यांतील अविचाराचा निःपात करा; आणि हे सर्वज्ञ आदित्यहो, द्वेषवुद्धि लयास न्या ११. —आम्हांस अशा तऱ्हेचें शांतिसुखाचें स्थान द्या कीं हे आदित्यानों, हे सुवरद देवानों, जें प्राप्त झालें असतां महापातक्याला देखील तें पातकापासून मुक्त करील १२. —जो कोणी मनुष्य राक्षसी दुर्बुद्धीनें आमचा घात करूं पहात असेल तो नीच मानव त्याच्या स्वतःच्याच दुष्कृत्यानें मारला जावो १३. —जो आमच्याविषयीं कांहीं घातकी हेतु मनांत धरतो, जो ( आंत एक बाहेर एक अशा ) दुटप्पीपणानें वागत असतो त्या अधम मनुष्याला, त्या शत्रूला, त्याचेंच पातक पार गडप करून टाको १४. —जेथें शुद्धता असेल तेथें, त्या अन्तःकरणांतच, हे देवांनों तुम्हीं वास करतां; आणि दुटप्पी कोण आणि निष्कपट कोण ह्याची हे दिव्यनिधीनों, तुम्हीं जाणीव ठेवतां १५. —शांत आसरा, मग तो पर्वतांचा आणि नद्यांचा कां असेना, तोच आम्ही हात जोडून मागत आहों. तर हे द्यावापृथिवीहो, आमच्यापासून ( पातकाचें ) किल्मिष दूर करा १६. —आणि तुमच्या कल्याणदायक आश्रयानें, त्या ( आश्रयरूप ) नावेच्या योगानें, हे दिव्यनिधीनों, आम्हांस यच्चावत् अनिष्टांतून पार न्या १७. —आमच्या मुलांलेंकरांना ( तुमच्या ) जीवनाचा लाभ व्हावा म्हणून हे महनीय आदित्यानों, तें उत्कृष्ट दीर्घायुष्य प्राप्त करून द्या १८. —आदित्यानों, तुमच्या मनामध्यें स्तुतियुक्त यज्ञ चांगलाच भरतो, तर आम्हांवर कृपा करा. आम्ही तुमच्यापैकींच आहोंत, तुमच्या कुलांतीलच आहोंत असें समजा १९.

---

नस् तपतु सूर्यः । शम् वातो वातु अरपाः अप स्त्रिधः ॥ ९ ॥ अपामीवाम् अप स्त्रिधम् अप सेधत दुर्मतिम् । आदित्यासो युयोतना नो अंहसः ॥ १० ॥ युयोत शरुम् अस्मत् आ आदित्यास उतामतिम् । ऋधक् द्वेषः कृणुत विश्ववेदसः ॥ ११ ॥ तत् सु नः शर्म यच्छत आदित्याः यत् मुमोचति । एनस्वन्तम् चित् एनसः सुदानवः ॥ १२ ॥ यो नः कश्चित् रिरिक्षति रक्षस्त्वेन मर्त्यः । स्वैः स एवैः रिरिषीष्ट यु र्जनः ॥ १३ ॥ सम् इत् तम् अघम् अश्नवत् दुःशंसम् मर्त्यं रिपुम् । यो अस्मत्रा दुर्हणावान् उपद्वयुः ॥ १४ ॥ पाकत्रा स्थन देवाः हृत्सु जानीथ मर्त्यम् । उप द्वयुम् च अद्वयुं च वसवः ॥ १५ ॥ आ शर्म पर्वतानाम् ओ-त अपां वृणीमहे । द्यावाक्षामा आरे अस्मत् रपस् कृतम् ॥ १६ ॥ ते नो भद्रेण शर्मणा युष्माकं नावा वसवः । अति विश्वानि दुरिता पिपर्तन ॥ १७॥ तुचे तनाय तत् सु नो द्राघीय आयु जीवसे । आदित्यासः सुमहसः कृणोतन ॥ १८ ॥ यज्ञो हीळो वो अन्तरः आदित्या अस्ति मृळत । युष्मे इद्वो अपि स्मसि सजात्ये ॥ १९॥ बृहत् वरुथम् मरुताम् देवम् त्रातारम्

—मरुतांचें तें मोठें भक्कम चिलखत, आम्हीं जगत्तारक देवाजवळ, तसेंच अश्वीदेव, मित्र, वरुण यांच्याजवळ ( सर्वांच्या ) कल्याणासाठीं हात जोडून मागत आहों २०. —हे मित्रा, हे अर्यमन्, हे वरुणा, हे मरुतानो, जें निर्वेध आहे, जें शूर पुरुषांनीं गजबजलेलें, नामांकित, आणि तिपटीनें मजबूत आहे असें आश्रयस्थान आम्हांस द्या २१. —अदिति पुत्रानों, आम्हीं मनुष्यें बोलून चालून मृत्यूच्या आधीन होणारींच आहोंत, तर आमचें आयुष्य आम्हीं उत्तमरीतीनें जगावें म्हणून होईल तितकें दीर्घ करा २२.

## सूक्त १९

ज्या देवाला दिव्य विबुधांनीं देवांमध्यें आपला धुरीण म्हणून ठरविलें, आणि ज्याच्या योगानें ते आपआपले हविर्भाग गृहण करतात त्या स्वर्गीय प्रकाश देणाऱ्या अग्नीची आराधना कर १. —हे स्तवनज्ञ भक्ता, वैभवदाता, विचित्रतेजोमण्डित आणि ह्या पवित्र यज्ञाचा नियन्ता जो सनातन अग्नि त्याचें स्तवन, हे सोभरी, तूं यागनिर्विघ्नतेसाठीं कर २. —अत्यंत पूज्य, दिव्यविबुधांतील अविनाशी यज्ञसंपादक, आणि ह्या ( आमच्या ) यज्ञाचा उत्कृष्ट सिद्धिदाता असा जो तूं देव, त्या तुझ्याच जवळ आम्हीं वरदान मागत आहों ३. —ओजस्वितेचा दाता, भाग्यमंडित, जाज्वल्यदीप्ति, आणि अत्युज्ज्वलकान्ती अशा अग्नीजवळ मित्राचें, वरुणाचें आणि आपोदेवींचें जें स्थान द्युलोकीं आहे तें हा ( भक्त ) यज्ञद्वारा मागत आहे ४. —जो भक्त समिधांनीं, जो हविर्भागानें, जो **वेदानें** ( म्हणजे ज्ञानानें ) आपली सेवा अग्नीला अर्पण करतो, किंवा जो प्रणिपातानें आपला अध्वरयाग उत्तम रीतीनें संपादन करतो—त्याच भक्ताचे

अश्विना । मित्रम् ईमहे वरुणं स्वस्तये ॥ २० ॥ अनेहो मित्र अर्यमन् नृवत् वरुण शंस्यम् । त्रिवरूथम् मरुतो यन्त न श्छर्दिः ॥ २१ ॥ ये चित् हि मृत्युबन्धवः आदित्या मनवः स्मसि । प्र सु न आयुर्जीवसे तिरेतन ॥ २२ ॥

## सूक्तम् १९

काण्वः सोभरिः अग्निः ककुब् बृहती

तम् गूर्धया स्वर्णरं देवासो देवम् अरतिं दधन्विरे । देवत्रा हव्यम् ओहिरे ॥ १ ॥ विभूतरातिं विप्र चित्रशोचिषम् अग्निम् ईळिष्व यन्तुरम् । अस्य मेधस्य सोम्यस्य सोभरे प्रेम् अध्वराय पूर्व्यम् ॥२ ॥ यजिष्ठं त्वा ववृमहे देवं देवत्रा होतारम् अमर्त्यम् । अस्य यज्ञस्य सुक्रतुम् ॥ ३ ॥ ऊर्जो नपातं सुभगं सुदीदितिम् अग्निं श्रेष्ठशोचिषम् । स नो मित्रस्य वरुणस्य सो अपाम् आ सुम्नं यक्षते दिवि ॥ ४ ॥

वेगानें धांवणारे अश्वारूढ सैनिक झपाट्यानें चालून जातात; उज्ज्वल यश त्यालाच लाभतें. आणि देवाविरुद्ध पापकृत्य त्याच्या हातून घडूं शकत नाहीं. मग मनुष्यासंबंधींचें पातक कोठून घडेल ? ५—६.—( आहवनायादि ) अग्नीच्या सेवेनें आम्ही उत्कृष्ट-प्रतीचे अग्नि-उपासक होऊं ( असें घडो ), हे सामर्थ्यप्रभवा, हे ओजस्वितेच्या प्रभो, हे वीरोत्तमा अग्निदेवा, तुला आमचा कळवळा येऊं दे ७. —आपल्या मित्रत्वांतील पाहुणा आला असतां त्याची जशी प्रशंसा चालते त्याप्रमाणें अग्नीची ( जिकडे तिकडे ) स्तुति चालत असते. रथ जसा ( विजयाचें साधन ), तसा अग्नि हा ( कल्याणाचें साधन ) आहे असें समजा; हे देवा, सत्पुरुष तुझ्या ठिकाणींच क्षेम पावतात, कारण, शाश्वत संपत्तीचा राजा तूं आहेस ८. —खरोखर जो मानव आपला अध्वरयाग, हे सद्भाग्या अग्ने, ( तुला ) अर्पण करतो; त्याच मनुष्याची प्रशंसा करणें योग्य; हे देवा, आपल्या ध्यानवृत्तिनीं तोच फलभागी होवो ९. —वीरांचा आश्रय असा तूं स्वतः कंबर कसून ज्याचा अध्वरयाग तडीस नेण्यास सज्ज असतोस, तोच भक्त आपलें अभीष्ट साध्य करून घेतो; अश्वारूढ योध्यांनिशीं तोच विजय मिळवितो, स्तोत्रप्रवीण भक्तांसह आणि शूर सैनिकांसह तोच आपलें कार्य यशस्वी करतो १०. —ज्याच्या गृहीं अग्नि मूर्तिमान् ( प्रकट होऊन ) प्रेमानें स्तोत्र गृहण करतो; आणि विश्ववंद्य अग्नि सर्वसंचारी दिव्य विभूतिमध्यें ज्यांचे त्यांना हविर्भाग पोहोंचवितो ११. —अथवा जो ज्ञानी कवि तुझें स्तवन करतो, किंवा हे सामर्थ्योद्भवा, जो हवि अर्पण करण्यांत अत्यंत तत्पर असतो अशा स्तोत्रज्ञ आणि ज्ञानी भक्ताचें वचन, हे दिव्यनिधाना, देवापेक्षां कमी प्रतीचें पण मनुष्याच्या शब्दापेक्षां ज्यास्त मूल्यवान् कर १२. —जो भक्त हविर्दानानें किंवा नुसत्या प्रणिपातांनीं चातुर्यबलसंपन्न अग्नीची उपासना करतो किंवा त्या चंचलज्वाल अग्नीची नुसत्या स्तवनानें सेवा करतो १३. —( किंवा ) आप-

---

यः समिधा य आहुती यो वेदेन ददाश मर्तो अग्नये। यो नमसा सु अध्वरः ॥ ५ ॥ तस्येत् अर्वन्तो रंहयन्ते आशवस् तस्य द्युम्नितमं यशः। न तमंहो देवकृतं कुतश्चन न मर्त्यकृतं नशत् ॥ ६ ॥ स्वग्नयो वो अग्निभिः स्याम सूनो सहस ऊर्जां पते। सुवीरस् त्वम् अस्मयुः ॥ ७ ॥ प्रशंसमानो अतिथि नं मित्रियो अग्नी रथो न वेद्यः। त्वे क्षेमासो अपि सन्ति साधवस् त्वं राजा रयीणाम् ॥ ८ ॥ सो अद्धा दाशु अध्वरः अग्ने मर्तः सुभग स प्रशंस्यः। स धीभिर् अस्तु सनिता ॥ ९ ॥ यस्य त्वम् ऊर्ध्वो अध्वराय तिष्ठसि क्षयद्वीरः स साधते। सो अर्वद्भिः सनिता सो विपन्युभिः स शूरैः सनिता कृतम् ॥ १० ॥ यस्य अग्नि र्वपु र्गृहे स्तोमम् चनो दधीत विश्ववार्यः। हव्या वा वेविषत् विषः ॥ ११ ॥ विप्रस्य वा स्तुवतः सहसो यहो मक्षूतमस्य रातिषु। अवो देवम् उपरिमर्त्यम् कृधि वसो विविदुषो वचः ॥ १२ ॥ यो अग्निं हव्यदातिभि र्नमोभि र्वा सुदक्षम् आविवासति। गिरा वा ऽ जिरशोचिषम् ॥ १३ ॥ समिधा

त्याच दीप्तिनें अखण्ड धगधगणाऱ्या ह्या अग्नीला जो मानव प्रज्वलित होणाऱ्या समिधेनें आपली सेवा अर्पण करतो, तोच भाग्यशाली भक्त आपल्या ध्यानवृत्तींनीं आणि यशस्वितेच्या तेजांनीं उदक कल्लोळांतून ( पार नेल्या ) प्रमाणें यच्चावत् लोकांना ( संकटांतून ) पार नेतो १४. —हे अग्नि, आम्हांला असें तेजोवैभव दे कीं, आमच्या घरांत घुसून सर्व खाऊन टाकणाऱ्या राक्षसाला तें चिरडून टाकील; मनांत पापबुद्धि वाळगणाऱ्या दुष्टाच्या क्रोधालाहि तें दडपून टाकील १५. —ज्या उत्कटवलाच्या योगानें वरुण निरीक्षण करतो, मित्र पाहतो, अर्यमा अवलोकन करतो; ज्या सामर्थ्यानें अश्वीदेव आणि भग हेहि पाहतात त्या तुझ्या उत्कटवलानें, हे इन्द्रा, तुझ्या रक्षणानें आम्हीं आमच्या अन्तिमध्येयाचें उत्कृष्ट ज्ञान संपादून तुझी सेवा करूं असें घडो १६. —हे अग्ने, हे स्तुत्यभिज्ञा, मनुष्यांवर आपली दृष्टि ठेवणाऱ्या तुज कर्तृत्वशाली देवाला ज्या स्तवनज्ञांनीं आपल्या ( हृदयांत ) ठेवलें; तेच हे देवा, उत्तम ध्यानयोगी होत १७. —ज्यांनीं आपली इच्छा तुझ्या ठिकाणीं अर्पण केली त्यांनींच, हे सद्भाग्या अग्नि, वेदी तयार केली, त्यांनींच आहुति दिली, त्यांनींच दिवसा सोम पिळण्याचा उपक्रम केला आणि महनीय असें धन आपल्या सत्वसामर्थ्याच्या जोरावर जिंकून घेतलें १८. —भाग्यशाली भक्ता, अग्निचें आह्वन केलें म्हणजे तो आपल्याला कल्याण दायक होतो, त्याला आहुति दिली म्हणजे ती कल्याणप्रद होते, त्याचा यज्ञ कल्याणप्रद आणि त्याच्या स्तुति देखील कल्याणप्रदच होतात १९. —( तर हे अग्ने ) तूं आपलें शुभाकांक्षी मन वृत्राचा नाश करण्याकडे लाव. त्यानेंच तूं संग्रामांमध्यें शत्रूंना चिरडून टाक. हल्ला करणाऱ्या सैन्याचे समूह कितीहि असले आणि कसेहि ठाम उभे राहिले तरी त्यांना तूं उलथून खालीं पाड, आणि तुझ्या रक्षणाच्या जोरावर आम्हीं इष्टसिद्धि प्राप्त करून घेऊं असें कर २०. —मनु राजानें ज्याला ( वेदीवर ) स्थापन केलें, त्या अग्निचें मी स्तुतिकलापांनें स्तवन करतों, ज्या धुरीणाला, ज्या हव्य-

---

यो निशिती दाशत् अदितिं धामभिर् अस्य मर्त्यः। विश्वेत् स धीभिः सुभगो जनान् अति द्युम्नैर् उद्न इव तारिषत् ॥ १४ ॥ तत् अग्ने द्युम्नम् आभर यत् सासहत् सदने कं चित् अत्रिणम्। मन्युं जनस्य दूढ्यः ॥ १५ ॥ येन चष्टे वरुणो मित्रो अर्यमा येन नासत्या भगः। वयं तत् ते शवसा गातुवित्तमा इन्द्रत्वोता विधेमहि ॥ १६ ॥ ते घेत् अग्ने सु आध्योः ये त्वा विप्र निदधिरे नृचक्षसम्। विप्रासो देव सुक्रतुम् ॥ १७ ॥ त इत् वेदिं सुभग ते आहुतिं ते सोतुं चक्रिरे दिवि। त इत् वाजेभि र्जिग्यु र्महत् धनं ये त्वे कामं निएरिरे ॥ १८ ॥ भद्रो नो अग्निर् आहुतो भद्रा रातिः सुभग भद्रो अध्वरः। भद्रा उत प्रशस्तयः ॥ १९ ॥ भद्रं मनः कृणुष्व वृत्रतूर्ये येना समत्सु सासहः। अव स्थिरा तनुहि भूरि शर्धतां वनेम ते अभिष्टिभिः ॥ २० ॥ ईळे गिरा मनुर्हितम् यं देवा दूतम्

वाहन आणि परमपूज्य देवाला दिव्यविबुधांनीं आपला प्रतिनिधि म्हणून पाठविलें, त्याचें मीं स्तवन करतों २१. —ज्याच्या ज्वाळा प्रखर, जो सर्वकाळ तरुण आणि देदीप्यमान आहे त्या अग्निप्रीत्यर्थ तूं प्रेमळ गुणगायन करतोस; तोच अग्नि (तुझ्या) सत्यमधुर स्तुतींनीं आणि घृताहुतींनीं प्रसन्न होऊन (भक्तामध्यें) उत्तम वीर्यशालित्व घडवितो २२. जेव्हां घृताहुतीनीं त्याचें हवन होतें तेव्हां दिव्यात्मा सूर्य आपलें रश्मिजाल पसरतो त्याप्रमाणें, अग्नि हा आपली (ज्वालारूप) झगझगीत वरची वर खालीं याप्रमाणें परजतो २३. —मनुराजानें (वेदीवर) स्थापन केलेला अग्नि आपल्या सुगन्धपूर्ण मुखानें देवांना हविर्भाग पोहोंचवील, तेव्हांच तो उत्तम अध्वरसंपादक, तो अमर अग्निदेव, अभिलषणीय वरदान भक्तांना देईल २४. —हे अग्निदेवा, जर तूं मर्त्यमानव असतास, आणि हे प्रसन्नदीप्ति देवा, हे सामर्थ्यप्रभवा, हे आहुतिप्रिया, मीं जर अमर झालों असतों; २५. —तर हे दिव्यनिधाना, मी तुजला दुष्टांच्या शिव्याशापांच्या तडाक्यांत सांपडूं दिलें नसतें; हे सज्जनवंद्या, तुला पापकर्माकडेहि जाऊं दिलें नसतें. मी माझा भक्त कधीं अविवेकी होऊं दिला नसता, संकटांत अडकूं दिला नसता, आणि हे अग्निदेवा, पापबुद्धीनें घेरूं दिला नसता २६. —बापाचा लाडका मुलगा जसा आपल्या घरीं जातो तसा आमचा हा हविर्भाग दिव्य विबुधांकडे (घरीं) जावो २७. —हे अग्ने, (माझ्या) अगदीं निकट असणाऱ्या तुज देवाच्या संरक्षक-शक्तींनीं, हे दिव्यनिधाना, मी मर्त्यमानव आपले मनोरथ निरंतर प्राप्त करून घेईन असें कर २८. —तुझ्या कर्तृत्वानें, तुझ्या वरदानांनीं, हे अग्ने, तुझ्या गुणवर्णनांनीं मला यश मिळेल असें कर. तुलाच धोरणी धुरीण म्हणतात; तर हे दिव्य निधाना, मला वर देण्यासाठीं तूं प्रमुदित हो २९. —हे अग्निदेवा, तूं ज्याचें मित्रत्व पतकरतोस, तो तुझ्या वीरप्रचुर, आणि सकल सामर्थ्यांनीं परिपूर्ण अशा संरक्षक-शक्तींनीं (सर्व संकटांतून)

---

अरतिं निएरिरे । यजिष्ठं हव्यवाहनम् ॥ २१ ॥ तिग्मजंभाय तरुणाय राजते प्रयो गायसि अग्नये । यः पिंशते सूनृताभिः सुवीम् अग्नि र्घृतेभि–राहुतः ॥ २२ ॥ यदी घृतेभि–राहुतो वाशीम् अग्नि र्भरत उत् चा–व च । असुर इव निर्णिजम् ॥ २३ ॥ यो हव्यानि ऐरयता मनुर्हितो देवो आसा सुगन्धिना । विवासते वार्याणि सु अध्वरो होता देवो अमर्त्यः ॥ २४ ॥ यत् अग्ने मर्त्यस् त्वम् स्याम् अहं मित्रमहो अमर्त्यः । सहसः सूनो आहुत ॥२५॥ न त्वा रासीय अभिशस्तये वसो न पापत्वाय सन्त्य । न मे स्तोता अमतीवा न दुर्हितः स्यात् अग्ने न पापया ॥ २६ ॥ पितु र्न पुत्रः सुभृतो दुरोणे आ देवाँ एतु प्रणो हविः ॥२७॥ तवाहम् अग्न ऊतिभि र्नेदिष्ठाभिः सचेय जोषम् आ वसो । सदा देवस्य मर्त्यः ॥ २८ ॥ तव क्रत्वा सनेयं तव रातिभिर् अग्ने तव प्रशस्तिभिः । त्वाम् इत् आहुः प्रमतिं वसो मम अग्ने हर्षस्व दातये ॥ २९ ॥ प्र सो अग्ने तवोतिभिः सुवीराभिः तिरते वाजभर्मभिः । यस्य त्वं

पार पडतो ३०. —हा तुझा मधुरशब्द वदविणारा,-यथाकाळीं केलेला, **नीलवान्** आणि देदीप्यमान सोमरस, हे सोमरससेवी देवा, तुला अर्पण केला आहे; महनीय ज्या उषादेवी त्यांना तूं प्रिय आहेस; ( कारण ) रात्र पडली असतां सर्व वस्तू तूंच प्रकाशित करतोस ३१. —ज्याचे तेजःकिरण असंख्य, जो उत्कृष्ट भक्तरक्षक, जो विश्वाधीश, आणि त्रसदस्युचा कैवारी, त्या अग्नीला आम्ही सोभरीकुलोत्पन्न भक्त शरण आहोंत ३२. —वृक्षाच्या आश्रयानें जशा शाखा तसे आहवनीयादि दुसरे अग्नि, हे अग्निरूप देवा, तुझ्या आश्रयानें राहतात, म्हणून तुझ्या वीरोचित सामर्थ्याचें गौरव करीत असतां ( इतर ) स्तोत्यांप्रमाणें मीहि लोकांचीं तेजोवैभवें ( त्यांना ) प्राप्त करून देईन ३३. —अदितीच्या प्रेमळ पुत्रानों, द्वेषरहित देवानों, यच्चावत् श्रीमान् लोकांना एकीकडे सारून, हे अत्युदार देवानों, दीन मानवाला तुम्हीं पार नेतां ३४. —तसेंच, हे ( जगताच्या ) राजानों, हे चराचरावर प्रभुत्व चालविणाऱ्या देवांनों, सामान्यजनांच्या समूहामध्यें कोठें तरी पडलेल्या ( भक्ता ) ला देखील जर तुम्हीं पार नेतां; तर हे वरुणा, हे मित्रा, हे अर्यमन्, आम्ही तर तुमचे आहों तर आम्ही सद्धर्माचेच प्रचारक होऊं असें करा ३५. —**पुरुकुत्साचा** पुत्र जो **त्रसदस्यु** त्यानें मला पन्नास सुंदर तरुणी अर्पण केल्या; तो तसाच अत्यंत थोर आणि सज्जनप्रतिपालक राजा आहे. ३६. —मी गमनोत्सुक होऊन आणि वस्त्रप्रावरण घेऊन निघालों असतां **सुवास्त्वा** नदीच्या पायउतारावर आह्मांला दोनशें दहा गाईच्या खिल्लाराचा मोहरक्या ह्मणून एक काळा बैल दिला. असा तो राजा उदारांमध्येंहि अग्रेसर आहे ३७.

---

सख्यम् आवरः ॥ ३० ॥ तव द्रप्सो नीलवान् वाश ऋत्वियः इन्धानः सिष्णवा ददे । त्वं महीनाम् उषसाम् असि प्रियः क्षपो वस्तुषु राजसि ॥३१॥ तम् आ अगन्म सोभरयः सहस्रमुष्कं सु अभिष्टिम् अवसे । सम्राजं त्रासदस्यवम् ॥ ३२ ॥ यस्य ते अग्ने अन्ये अग्नय उपक्षितो वया इव । विपो न द्युम्ना नि युवे जनानां तव क्षत्राणि वर्धयन् ॥ ३३ ॥ यम् आदित्यास अद्रुहः पारं नयथ मर्त्यम् । मघोनाम् विश्वेषाम् सुदानवः ॥ ३४ ॥ यूयं राजानः कं चित् चर्षणिसहः क्षयन्तम् मानुषान् अनु । वयं ते वो वरुण मित्र अर्यमन् स्याम इत् ऋतस्य रथ्यः ॥ ३५ ॥ अदात् मे पौरुकुत्स्यः पञ्चाशतं त्रसदस्यु वधूनाम् । मंहिष्ठे अर्यः सत्पतिः ॥ ३६ ॥ उत मे प्रयियोः वयियोः सुवास्त्वाः अधि तुग्वनि । तिसृणां सप्ततीनां श्यावः प्रणेता भुवत् वसु र्दियानां पतिः ॥ ३७ ॥

## सूक्त २०

या, अनमान करूं नका. तुम्हीं तिघालां आहां, आतां मागें फिरूं नका. हे मरुतानों, तुम्हां सर्वांचा आवेश एकसारखा असतो. वृक्ष, पर्वत हे ( जमीनींमध्यें ) पक्के गढलेले असले तरी, हे देवानों, तुम्हीं त्यांना खालीं वांकवितांच १. —श्रेष्ठ मरुतानों, हे रुद्रपुत्रानों, ज्याच्या चाकांच्या धांवा वळकट आणि अतिशय झगझगीत आहेत अशा रथांत बसून, सर्वांना हवे हवेसे वाटणाऱ्या मरुतानों, हे सोभरीवर कृपा करणाऱ्या देवानों, तुम्हीं आज उत्साहपूरित होऊन आमच्या यज्ञाकडे आगमन करा २. —तुम्हां रुद्र-पुत्रांचा, तुम्हां मरुतांचा, तुम्हां सर्वव्यापी विष्णूच्या कर्तृत्वशाली वीरांचा, तुम्हां जलवर्धक विभूतींचा उग्र आणि उफाड्याचा जोर आम्हांस माहीत आहे ३. —नवीं द्वीपें एकदम उसळून बाहेर आलीं; आकाश आणि पृथ्वी हे दोन्ही एकमेकाशीं भिडून गेले; पाण्याचे लोंढे जिकडे तिकडे धांवूं लागले; हे शुभ्रायुधधारी स्वयंप्रकाश देवानों, असा प्रकार तुम्हीं आपली हालचाल चालू केल्यावरोबर घडून आला ४. —तुम्हीं मार्ग क्रमूं लागला कीं तुमच्या वाटेवर कोणतीहि अढळ वस्तु असो ती दणदणून जाते; पर्वत, मोठमोठे वृक्ष, आणि जमीन देखील हादरूं लागते ५. —तुम्हांला वाट देण्यासाठीं, तुमच्या धुमश्चक्री सरशीं, हें एवढें मोठें आकाश पण वरवर हटतच जातें; मग तेथून प्रबल भुजदंडाचे मरुत्वीर आपल्या आंगांतील झगझगीत तेज जगाच्या निदर्शनास आणतात ६. —वीराग्रणी, भीषणपराक्रमी, मेघाप्रमाणें नानारूपधारी परंतु सरळ स्वभावाचे मरुत् आपल्या स्वभावानुरूप कांहीं अपूर्वच शोभा धारण करतात ७. —सोभरींच्या सुवर्णरथांतील वैठकीवरील आसन त्यांच्या कान्तींनीं

## सूक्तम् २०

काण्वः सोभरिः मरुतः ककुब् बृहती.

आ गन्ता मा रिषण्यत प्रस्थावानो माऽपस्थाता समन्यवः । स्थिरा चित् नमयिष्णवः ॥ १ ॥ वीळु पविभि र्मरुतः ऋभुक्षणः आ रुद्रासः सुदीतिभिः । इषा नो अद्य आगत पुरुस्पृहो यज्ञम् आ सोभरीयवः ॥ २ ॥ विद्माहि रुद्रियाणां शुष्मम् उग्रं मरुतां शिमीवताम् । विष्णोर् एषस्य मीळ्हुषाम् ॥ ३ ॥ वि द्वीपानि पापतम् तिष्ठत् दुच्छुना उभे युजन्त रोदसी । प्र धन्वानि ऐरत शुभ्रखादयो यत् एजथ स्वभानवः ॥४॥ अच्युता चित् वो अज्मन् आ नानदति पर्वतासो वनस्पतिः । भूमि र्यामेषु रेजते ॥ ५॥ अमाय वो मरुतो यातवे द्यौ र्जिहीते उत्तरा बृहत् । यत्रा नरो देदिशते तनूषु आ त्वक्षांसि बाह्वोजसः ॥ ६ ॥ स्वधाम् अनु श्रियं नरो महि त्वेषा अमवन्तो वृषप्सवः । वहन्ते अह्रुतप्सवः ॥ ७ ॥ गोभि र्वाणो अज्यते सोभरीणाम् रथे कोशे हिरण्यये । गोबन्धवः सुजातासः इषे भुजे महान्तो नः स्परसे

स्पष्ट नजरेस पडतें; तर हे ( प्रकाश )धेनुप्रिय मरुतानो, हे अभिजात विभूतीनों, परम थोर असे तुम्हीं आम्हीं ईर्षा, उपभोग, आणि स्फूर्ति यांना सत्वर पात्र होऊं असें करा ८. —सोमरस पात्रांत ओतणाऱ्या अध्वर्यूनों, वीर्यशाली आणि ( मनोरथांची ) वृष्टि करणाऱ्या मरुत्समूहाला तुम्हीं हविर्भाग अर्पण करा ९. —हे मरुतांनो, ज्याला जोडलेले अश्व फार वीर्यवान् असतात, जलवर्षक मेघ हें ज्याचें स्वरूप असतें, ज्याच्या चाकांचा तुंबा ही उदकवृष्टि करणारा असतो, अशा रथांत आरोहण करून आमचे हविर्भाग ग्रहण करण्याकरितां, हे वीराग्रणींनो, श्येनपक्षाप्रमाणें सहज भरारी मारीत या १०. —ह्या ( मरुतां )चा अलंकार अगदीं एकसारखा असतो, त्यांच्या गळ्यांतील सोन्याच्या फुलांचे हार अगदीं एकजात चकचकणारे असतात, आणि भुजदण्डावर पेलून धरलेले त्यांचे भाले डोळे अगदीं दिपवून सोडतात ११. —ते उग्र, वीर्यशाली, आणि भरदार बाहूंचे मरुत् आपल्या आंगावर कोणतेंहि चिलखत घालण्याचा खटाटोप करीत नाहींत. मरुतानों, तुमच्या रथांत ठेवलेलीं भक्कम धनुष्यें हींच तुमचीं आयुधें असतात, ( मग काय ? ) विजयश्री ही तर तुमच्या सैन्याच्या अगदीं अघाडीलाच चालते १२. —जें समुद्राप्रमाणें सर्वविश्रुत आहे, तें त्यांचें झणझणीत नांव, वाडवडिलांकडून प्राप्त होणाऱ्या तारुण्याच्या जोमाप्रमाणें एकच आहे, परंतु तें अगणित लोकांच्या उपभोगाला येतें १३. —म्हणून त्या मरुतांना प्रणाम कर, त्यांची स्तुति कर; दणदणत जाणाऱ्या चाकांच्या अरांमध्यें मागचा पुढचा ( हा प्रकार ) नसतो त्याप्रमाणें त्यांच्या देणग्याहि महत्वाच्या दृष्टीनें कमी ज्यास्त नसतात १४. —तुमच्या रक्षणाच्या छत्राखालीं, हे मरुतांनों, जो कोणी प्राचीन काळीं होता; किंवा आतांहि जो कोणी असेल तो खरोखरीच भाग्यवान् होय १५. —किंवा ज्या सत्वशाली भक्ताचे हविर्भाग ग्रहणकरण्याकरितां, हे शूरानों, तुम्हीं येतां; तो भक्त, ( शत्रूला ) धुतकारून टाकणाऱ्या हे मरुतांनों, आपल्या तेजोबलांनीं आणि सत्वप्रचुर उद्योगांनीं तुमच्या शांतिसौख्याला

---

नु ॥ ८ ॥ प्रति वो वृषदञ्जयः वृष्णे शर्धाय मारुताय भरध्वम् । हव्या वृषप्रयाव्णे ॥ ९ ॥ वृषणश्वेन मरुतो वृषप्सुना रथेन वृषनाभिना । आ श्येनासो न पक्षिणो वृथा नरो हव्या नो वीतये गत ॥ १० ॥ समानम् अञ्जि एषां विभ्राजन्ते रुक्मासो अधि बाहुषु । दविद्युतति ऋष्टयः ॥ ११ ॥ ते उग्रासो वृषणः उग्रबाहवो नकिस् तनूषु येतिरे । स्थिरा धन्वानि आयुधा रथेषु वो अनीकेषु अधि श्रियः ॥ १२ ॥ येषाम् अर्णो न सप्रथो नाम त्वेषम् शश्वताम् एक इत् भुजे । वयो न पित्र्यं सहः ॥ १३ ॥ तान् वन्दस्व मरुतस् तान् उपस्तुहि तेषां हि धुनीनाम् । अराणां न चरमस् तत् एषाम् दाना मह्ना तत् एषाम् ॥ १४ ॥ सुभगः स व ऊतिषु आस पूर्वासु मरुतो विउष्टिषु । यो वा नूनम् उता–सति ॥ १५ ॥ यस्य वा यूयं प्रति वाजिनो नरः आ हव्या वीतये गथ । अभि स द्युम्नैर् उत वाजसा-

प्राप्त होतो १६. —रुद्राचे ( पुत्र ), द्युलोकाचे ( रहिवासी ) आणि विश्वात्मा ( जगत् )निर्माता ईश्वर त्याचे अनुचर जे मरुत् ते जशी इच्छा करतात तसेंच घडून येतें १७. —जे दानशील भक्त तुम्हां मरुतांचा सन्मान करतात, जे तुम्हां मनोरथ-वर्धक विभूतींची यथायोग्य सेवा करतात, त्यांच्याकरितां तरी, हे तारुण्याढय मरुतांनों, तुम्हीं आपल्या वात्सल्यपूर्ण हृदयानें आमच्या जवळ येऊन आमची अभिवृद्धि करा १८. —यौवनाढय, वीर्यशाली आणि पतितपावन अशा मरुतांप्रीत्यर्थ, हे सोभरिभक्ता, तूं अभिनव काव्यवाणीनें सुंदर गायन कर. ज्याप्रमाणें शेतकरी शेत नांगरीत असतांना रंगांत येऊन गातो त्याप्रमाणें गायन कर १९. —आव्हान करण्याला योग्य अशा वज्रमुष्टी मल्ला-प्रमाणें जे (शत्रूला) रगडून टाकतात, सैन्यांत असो किंवा यज्ञांत असो ( प्रत्येक ठिकाणीं ) जे आपलें वर्चस्वच राखतात अशा त्या वीर्यशाली, आल्हादप्रद, आणि सुकीर्तीनें अत्यंत मण्डित अशा मरुतांचें तूं आज स्तुतिपूर्वक वन्दन कर २०.—एकसारखा आवेश प्रकट करणाऱ्या मरुतांनों, तुमच्या ( प्रकाशरूप ) धेनू एकाच जातीच्या आहेत, म्हणून बन्धु-भावानें त्या एकमेकींजवळ येऊन दिङ्मुखांचें चुंबन घेतात २१. —हे रणभैरवानों, वक्षस्थलावर देदीप्यमान पदक धारण करणाऱ्या देवांनों, कोणीहि मर्त्य मानव ( भक्त ) जर भ्रातृभावानें तुमच्या जवळ येऊं शकतो, तर हे मरुतांनों, आमच्याकडेहि आगमन करा; आमच्या निश्चयपूर्ण स्तोत्रानें तुमचा आमचा आप्तपणा कायमचाच झाला आहे २२. —हे मरुतांनो, वायूपासून प्राप्त होणारें जें औषध आहे, तें ( औषध ), हे औदार्यशाली देवानों, हे भक्तसख्यांनो, हें त्वरितगतिविभूतींनों, तें आमच्या करितां घेऊन या २३. —ज्यांच्या योगानें तुम्हीं सिन्धूचें रक्षण करितां, ज्यांच्या योगानें तुम्हीं शत्रूंचा नाश करितां, ज्यांच्या योगानें तुम्हीं क्रिविला वरदान देतां, त्या मंगल-मय संरक्षक शक्तींनीं, हे कल्याणकारी देवानों, सेवाविमुखाचा आणि अभक्ताचा तिटकारा करणाऱ्या देवांनों, तुम्हीं आम्हांस कल्याणकारक व्हा २४. —जें सिन्धु नदींत, जें

---

तिभिः सुम्ना वो धूतयो नशत् ॥ १६ ॥ यथा रुद्रस्य सूनवो दिवो वशन्ति असुरस्य वेधसः । युवानस् तथा इत् असत् ॥ १७ ॥ ये च अर्हन्ति मरुतः सुदानवः स्मत् मीळ्हुष श्चरन्ति ये । अत श्चित् आ नः उप वस्यसा हृदा युवानः आ ववृध्वम् ॥१८॥ यूनः ऊ षु नविष्ठया वृष्णः पावकान् अभि सोभरे गिरा । गाय गाइव चर्कृषत् ॥१९॥ सहाः ये सन्ति मुष्टिहेव हव्यः विश्वासु पृत्सु होतृषु । वृष्ण श्चन्द्रान् न सुश्रवस्तमान् गिरा वन्दस्व मरुतो अह ॥ २० ॥ गाव श्चित् घा समन्यवः सजात्येन मरुतः सब-न्धवः । रिहते ककुभो मिथः ॥ २१ ॥ मर्त श्चित् वो नृतवः रुक्मवक्षसः उप भ्रातृ-त्वम् आयति । अधि नो गात मरुतः सदा हि वः आपित्वम् अस्ति नि ध्रुवि ॥ २२ ॥ मरुतो मारुतस्य नः आ भेषजस्य वहतः सुदानवः । यूयं सखायः सप्तयः ॥ २३ ॥ याभिः सिन्धुम् अवथ याभिस्तूर्वथ याभि र्दशस्यथ क्रिविम् । मयो नो भूत

असिक्नि नदींत, जें समुद्रांत, किंवा जें औषध, हे सुयज्ञ मरुतांनो, पर्वतांत असेल, ( तें आम्हांकरितां घेऊन या ) २५. —तुमच्या दृष्टीच्या टप्प्यांत सर्व विश्व येतें म्हणून तें औषध आमच्या शरीरासाठीं घेऊन या; आणि आम्हांस त्याच्याविषयीं सर्व प्रकारचें ज्ञान करून द्या. आमच्या पातकांची क्षमा करा, आणि हे मरुतांनो, रोगग्रस्त जे आम्हीं, त्या आमचें विकल शरीर पुनः पूर्ववत् ( निरोगी ) करा २६.

अध्याय पहिला समाप्त.

---

## अध्याय दुसरा

## सूक्त २१

हे अपूर्व ( स्वरूपा ) देवा, एखाद्या धिप्पाड किंवा गुणसंपन्न पुरुषाचा आश्रय लोक करतात, त्याप्रमाणें आम्हीं रक्षणेच्छु जन सत्वयुद्धांत अद्भुतदर्शन जो तूं त्या तुझीच विनवणी करीत आहों १. —ह्या ( युद्ध ) कार्यांत रक्षणासाठीं तो आमचा झुंजार तरुण वीर तुझ्याचकडे प्राप्त झाला; त्यानें ( शत्रूवर ) चढाई केलीच. परंतु आम्हीं तुलाच आमचा त्राता म्हणून मानतों, हे इन्द्रा, आम्हीं तुझे प्रियभक्त तुलाच आमचा विजयदाता असें समजतों २. —ये, हे पहा सोमविन्दू; हे अश्वधनाधिपा, हे गोधनाधिपा, हे समृद्ध-भूमिपा, हे सोमप्रिय देवा, तूं सोमरस प्राशन कर ३. —खरोखर, विश्वबन्धू जो तूं त्या तुलाच, हे इन्द्रा, आम्ही स्तोतृजन शरण आलों आहोंत. आम्हांला ( तुझ्यावांचून ) आप्त-

---

ऊतिभि र्मयोभुवः शिवाभिर् असचद्विषः ॥२४॥ यत् सिन्धौ यत् असिक्न्याम् यत् समुद्रेषु मरुतः सुबर्हिषः । यत् पर्वतेषु भेषजम् ॥२५॥ विश्वं पश्यन्त विभृथ स्तनूषु आ तेन नो अधिवोचत । क्षमा रपो मरुत आतुरस्य नः इष्कर्ता विन्हुतं पुनः ॥२६॥

इति षष्ठोष्टक प्रथमोऽध्यायः ।

---

अथ द्वितीयोऽध्यायः ॥

## सूक्तम् २१

काण्वः सौभरिः इन्द्रः बृहती

वयम् उ त्वाम् अपूर्व्य स्थूरं न कत् चित् भरन्तोः अवस्यवः । वाजे चित्रं हवामहे ॥ १ ॥ उप त्वा कर्मन् ऊतये स नो युवा उग्र श्चक्राम यत् धृषत् । त्वाम् इत् हि अवितारं ववृमहे सखाय इन्द्र सानसिम् ॥ २ ॥ आ याहीमे इन्दवो ऽश्वपते गोपते उर्वरापते । सोमं सोमपते पिब ॥ ३ ॥ वयं हि त्वा बन्धुमन्तम् अबन्धवो

बान्धव कोणी नाहींत, तर तुझीं जीं तेजःपुंज स्वरूपें आहेत त्यांसह, हे मनोरथवर्षका वीरा, तूं सोमरसाचा आस्वाद घेण्याकरितां ये ४. —पक्षी जसे ( वृक्षाचा ) आश्रय करतात त्याप्रमाणें, ह्या दुग्धमिश्रित, मधुर, चित्तहर्षकर आणि इच्छितफलदायी सोमरसाच्या ठिकाणीं आम्हीं आश्रित होऊन, हे इन्द्रा, तुझे गुणानुवाद गातों ५. —हें पहा आम्हीं तुजला प्रणिपात करून तुझी प्रार्थना करीत आहोंत; तर आतां वारंवार विचार कसला करीत आहेस बरें ? हरिदश्व इन्द्रा, आमचे मनोरथ कोणते ते तुला माहित आहेत. तूं उदार—आहेस, आम्हीं तुझे आहोंतच. पण आमचें चित्तहि तुझ्याच ठिकाणीं आहे ६. —हे इन्द्रा, तुझ्या संरक्षणाखालीं आम्हीं आज नव्यानेंच आलों आहोंत असें नव्हे. हे वज्रधरा, तुझें सर्वव्यापि सामर्थ्य आम्हांस अगदीं पूर्वीपासून ठाऊक आहे ७. —तुझें सख्य किती प्रेमळ असतें तें आम्हीं जाणतो, हे शूरा तुझें दातृत्वहि आम्हीं जाणतों; म्हणूनच, हे वज्रधरा, त्या दोन्ही गोष्टींची आम्हीं तुझ्याजवळ याचना करीत आहों. तर सर्व प्रकारें आमचा उत्कर्षकर. हे दिव्यनिधाना, हे शोभन मुकुटधरा, ( प्रकाश ) गोधनाच्या प्राप्तीकरतां चाललेल्या युद्धांत ( आमचा उत्कर्ष कर ) ८. —ज्यानें पूर्वी आमच्यासाठीं हेंच तेंच काय, पण सर्व उत्कृष्ट वस्तू आणल्या, त्या इन्द्राचीच हे मित्रानों, मी तुमच्या संरक्षणासाठीं स्तुति करीत आहे ९. —( त्याची स्तुति करीत आहे कीं ) जो हरिदश्व, सज्जनप्रतिपालक आणि प्राणिमात्रांवर सत्ता चालविणारा आहे. तोच तो सोमरसानें हृष्टचित्त झाला; आणि म्हणून शेंकडों गोसमूह आणि अश्वसमूह तो औदार्यशालि देव आम्हां स्तोतृजनांना अर्पण करितो १०. —तूं आमचा पाठिराखा असलास म्हणजे तुझ्या ( सहाया ) नें आम्हीं गोधनसंपन्न लोकांच्या प्रदेशांत, हे वीर पुङ्गवा, आमच्यावर फूं फूं करीत धांवून येणाऱ्या शत्रूचा खरपूस समाचार घेऊं ११. —हे सर्वजनस्तुत देवा, आम्हीं युद्धांत योद्धयावर जयच मिळवूं, पापबुद्धि बाळगणाऱ्या दुष्टाला पुरून उरूं, शूरसैनिकांसह ( ज्ञानाच्या ) शत्रूला ठार करूं

---

विप्रास इन्द्र येमिम। या ते धामानि वृषभ तेभिर् आ गहि विश्वेभिः सोमपीतये ॥ ४ ॥ सीदन्तस् ते वयो यथा गोश्रीते मधौ मदिरे विवक्षणे। अभि त्वाम् इन्द्र नोनुमः ॥ ५ ॥ अच्छा च त्वा एना नमसा वदामसि किं मुहुश् चित् वि दीधयः। सन्ति कामासो हरिवो ददिष्ट्वं स्मो वयं सन्ति नो धियः ॥ ६ ॥ नूत्ना इत् इन्द्र ते वयम् ऊती अभूम न हि नु ते अद्रिवः। विद्मा पुरा परीणसः ॥ ७ ॥ विद्मा सखित्वम् उत शूर भोज्यम् आ ते ता वज्रिन् ईमहे। उतो समस्मिन् आ शिशीहि नो वसो वाजे सुशिप्र गोमति ॥ ८ ॥ यो नः इदमिदं पुरा प्र वस्यः आनिनाय तम् उप स्तुषे। सखाय इन्द्रम् ऊतये ॥ ९ ॥ हर्यश्वं सत्पतिं चर्षणिसहं स हि स्म यो अमन्दत। आ तु नः स वयति गव्यम् अश्व्यं स्तोतृभ्यो मघवा शतम् ॥ १० ॥ त्वया ह स्वित् युजा वयं प्रति श्वसन्तं वृषभ ब्रुवीमही। संस्थे जनस्य गोमतः ॥ ११ ॥ जयेम कारे

आणि स्वत; उत्कर्ष पावूं ; म्हणून हे इन्द्रा, आमच्या सद्बुद्धीचें तूं संरक्षण कर १२. —तुला कोणीं भाऊ नाहीं वन्द नाहीं; तुझा दुसरा कोणीं नियन्ता नाहीं, किंवा हे इन्द्रा, कोणीं आप्तेष्टहि नाहीं. तूं प्रादुर्भूत झालास तेव्हांपासून म्हणजे पुरातन काळापासून तूं आहेस तसा ( स्वतन्त्र ) आहेस. आणि युद्धाच्या योगानेंच तुझें आप्तपण ( भक्तांनीं ) मिळवावें अशी तुझी इच्छा आहे १३. —कोणत्याहि धनाढ्य मनुष्याला तूं मित्र म्हणत नाहींस. कारण ( धनरूपी ) मद्यानें धुंद झाल्यानें ते तुझा कंटाळाच करतात; पण जेव्हां तूं सिंहनाद करतोस तेव्हां ( त्यांचा ) निकाल लावतोस; आणि पित्याला हांक मारावी त्याप्रमाणें ( भक्तजन ) तुलाच हांक मारतात १४. —इन्द्रा, तूं आमचा सखा असतां, आमचें रक्षण तूं करीत असतां, आणि हे इन्द्रा, सोमरस पिळून तुझे भक्त तुला तो अर्पण करीत असतां, आम्हीं मात्र घरांत वसून खितपणाऱ्या एखाद्या मूर्खाप्रमाणें उगीच स्वस्थ पडून राहूं असें कदापि होऊं देऊं नको १५. —गोधनदात्या ( इन्द्रा ), तुझ्या कृपाप्रसादास आम्हीं मुकूं असें करूं नकोस. जें तुझें आहे, ( जें तुला अर्पण झालें आहे ) तें घेण्याची बुद्धि आम्हांस होऊं देऊं नकोस. तूं आमचा प्रभु आहेस तर ज्या वस्तू स्थिर आहेत त्यांनाच हात लाव आणि त्याच घेऊन ये. तुझ्या दातृत्वाला प्रतिबन्ध करण्याची ताकद कोणालाही नाहीं १६. —असली श्रेष्ठ देणगी एक इन्द्रच देऊं शकेल, सुमङ्गल जीं सरस्वती तीहि वरदान देईल. किंवा धनच द्यावयाचें तर, हे चित्रराजा, तूंहि तें हविर्दात्या भक्ताला देऊं शकशील १७. —राजा असा एक चित्र हाच होऊन गेला. इतर दुसरे राजे नुसते नांवाचेच राजे, दुसरें काय ? पर्जन्यानें वृष्टी करावी त्याप्रमाणें सरस्वती नदीच्या तीरावर त्यानें पैसा ओतला. हजारोंनींच काय पण लाखांनीं त्यानें द्रव्य दिलें १८.

---

पुरुहूत कारिणः अभि तिष्ठेम दूढ्यः । नृभि वृत्रं हन्याम शूशुयाम च अवेर् इन्द्र प्रणो धियः ॥ १२ ॥ अभ्रातृव्यो अना त्वम् अनापिर् इन्द्र जनुषा सनात् असि । युधेत् आपित्वम् इच्छसे ॥ १३ ॥ नकी रेवन्तं सख्याय विन्दसे पीयन्ति ते सुराश्वः । यदा कृणोषि नदनुं समूहसि आदित् पितेव हूयसे ॥ १४ ॥ मा ते अमाजुरो यथा मूरास इन्द्र सख्ये त्वावतः । निषदाम सचा सुते ॥ १५ ॥ मा ते गोदत्र निर् अराम राधसः इन्द्र मा ते गृहामहि । दृळ्हा चित् अर्यः प्र मृशाभिर् आ भर न ते दामान आदभे ॥ १६ ॥ इन्द्रो वा घेत् इयत् मघं सरस्वती वा सुभगा ददिर्वसुः । त्वं वा चित्र दाशुषे ॥१७॥ चित्र इत् राजा राजकाः इत् अन्यके यके सरस्वतीम् अनु । पर्जन्य इव ततनत् हि वृष्ट्या सहस्रम् अयुता ददत् ॥ १८ ॥

---

# सूक्त २२

अहो, तुमचा जो अतिशय मनोहर रथ त्याला आज मी पाचारण करितों; ज्या रथावर हे मंगलआह्वान अश्वीहो, हे रुद्रमार्गनुसारी विभूति हो, "सूर्या" नांवाच्या लावण्यलतिकेसाठीं तुम्हीं आरोरण केलें १. —( तो रथ असा कीं ) ज्यानें पूर्वींच्या भक्तांचें पोषणच केलें, जो हांकेसरशीं येतो, जो सर्वांना हवा हवासा वाटतो, ( भक्तांना ) समृद्ध करितो, हातघाईच्या युद्धांत सर्वांच्या पुढें राहतो, आणि हे सोभरे, सत्प्रेरणांनीं जो सर्वांना आपल्याला अनुसरण्यास लावतो, असा तो ( रथ ) स्वतः द्वेषापासून अलिप्त आहेच; परंतु दुसऱ्या कोणाकडूनहि त्याला उपसर्ग पोहोंचू शकत नाहीं २. —सर्वत्र वास्तव्यकरणाऱ्या त्या अश्विदेवांना प्रणिपात करून आमच्या रक्षणासाठीं त्यांना आमच्याकडे आणतों, कारण ते भक्ताच्या घरीं जाणारच ३. —तुमच्या रथाचें चक्र (आकाशा) भोंवतीं गरगर फिरत असतें, आणि हे बुद्धिप्रेरकांनों, दुसरें जें ( चक्र ) आहे तें तुमच्याकडेच उत्सुकतेनें राहतें, तर हे मङ्गलाधीश अश्वीहो, धेनू जशी ( वत्साकडे ) त्याप्रमाणें तुमची वत्सलता आमच्याकडे धांवतच येवो ४. —तुमच्या रथांतील सारथ्याची वसण्याची जागा त्रिकोणाकृति आहे. आणि घोड्यांचे लगाम सुवर्णरज्जूंचे आहेत. तो रथ सर्व आकाशाला आणि पृथ्वीलाहि प्रदक्षिणा करतो हें प्रसिद्धच आहे, तर हे सत्यस्वरूप देवानों, आमच्याकडे या ५. —मनु नामक भक्तासाठीं अगदीं पुरातन काळीं तुम्हीं लाण्डग्याकडून ( जमीन ) नांगरून घेऊन धान्याचें पीक काढलेंत. हे मङ्गलाधीश अश्वीहो, असे जे तुम्हीं ( पराक्रमी आहांत ), त्या तुमचें स्तवन आम्हीं प्रेमळ अन्तःकरणानें करूं ६. —सत्वसामर्थ्यसंपन्न अश्वीहो, तुम्हीं सनातन धर्माला अनुसरून आमच्याकडे या. हे वीर हो, ज्याच्या योगानें **त्रसदस्यूचा पुत्र तृक्षि** त्याचें

# सूक्तम् २२

काण्वः सोभरिः अश्विनौ बृहती.

ओ त्यम् अह्व आ रथम् अद्य दंसिष्ठम् ऊतये । यम् अश्विना सुहवा रुद्रवर्तनी आ सूर्यायै तस्थथुः ॥ १ ॥ पूर्वापुषं सुहवं पुरुस्पृहं भुज्युं वाजेषु पूर्व्यम् । सचनावन्तं सुमतिभिः सोभरे विद्वेषसम् अनेहसम् ॥ २ ॥ इह त्या पुरुभूतमा देवा नमोभिर् अश्विना । अर्वाचीना सु अवसे करामहे गन्तारा दाशुषो गृहम् ॥ ३ ॥ युवो रथस्य परि चक्रम् ईयते ईर्मा ऽन्यत् वाम् इषण्यति । अस्माँ अच्छ सुमति वाम् शुभस्पती आ धेनुर् इव धावतु ॥ ४ ॥ रथो यो वां त्रिवन्धुरः हिरण्याभीशुर् अश्विना । परि द्यावापृथिवी भूषति श्रुतः तेन नासत्याऽऽगतम् ॥ ५ ॥ दशस्यन्ता मनवे पूर्व्यं दिवि यवं वृकेण कर्षथः । ता वाम् अद्य सुमतिभिः शुभस्पती अश्विना प्र स्तुवीमहि ॥६॥

मन उत्कृष्ट अशा क्षात्रसामर्थ्याच्या ठिकाणीं तुम्हीं जडवून दिलेंत ७. —तुम्हांकरितां हा ग्राव्यांनीं पिळलेला सोमरस सिद्ध केला आहे. तर हे शूरानों, हे वीर्यधनसंपन्नानों, तुम्हीं सोमप्राशनार्थ या आणि भक्ताच्या घरीं तो रस प्राशन करा ८. —ज्या रथांतील बैठक देखील सोन्याची आहे अशा रथावर तुम्हीं आरोहण करा. हे वृष्टिसामर्थ्यसंपन्नानों, (प्राणिमात्राला) पुष्टि देणारी जी उत्साहसमृद्धि तिची जोड (भक्तांना) द्या ९. —ज्या शक्तिनीं तुम्हीं **पक्था**चें रक्षण केलेंत, ज्यांनीं **अध्रिगू**चें रक्षण केलेंत, विरक्त झालेल्या **बभ्रू**चेंहि ज्या योगांनीं रक्षण केलेंत, त्या शक्तिनीं हे अश्वीहो, तुम्हीं सत्वर, अगदीं त्वरित आमच्याकडे या आणि आधिव्याधींनीं जे पछाडले असतील त्यांना तुमचें औषध द्या १०. —संचारांत अप्रतिहत असणाऱ्या अश्वीहो, कर्तव्यांत अप्रतिहत असे आम्हीं भक्त दिवसाच्या ह्या घटकेला तुमचें गुणसंकीर्तन करून तुम्हां अश्विदेवांना स्तवनवाणींनीं हांक मारीत आहों ११. —तर वीर्यशालि विभूतींनों, त्या पूर्वींच्याच सामर्थ्यानिशीं (येऊन) माझ्या हांकेला ओ द्या. माझी हांक नानास्वरूपाची आहे; सर्व तऱ्हेच्या लोकांना देखील ती प्रिय वाटते, तर त्या हांकेसरशीं या. हे सर्वश्रेष्ठानों, हे सर्वगामी वीरांनों, ज्या उत्साहवृत्तिनीं तुम्ही **क्रिवि**चा उत्कर्ष केलात त्याच उत्साहवृत्तिनीं तुम्हीं (आमच्याकडेहि) या १२. —आजच्या दिवसाच्या ह्या घटकेला मी त्या अश्विदेवांना प्रणिपात करून त्यांची करुणा भाकतों, आणि हात जोडून त्यांची प्रार्थना करितों १३. —त्यांनाच सायंकाळीं, त्यांनाच प्रभातकाळीं, इतकेंच काय, पण येतां जातां देखील त्या मङ्गलाधीश अश्वींची, त्या रुद्रमार्गानुसारी देवांची (मी प्रार्थना करितों); हे सत्वसामर्थ्यसंपन्नानो, हे रुद्रस्वरूप अश्वीनों, जो मनुष्य आमचें शत्रुत्व करतो त्याच्या स्वाधीन करून आम्हांला तुम्हीं आपल्यापासून दूर लोटूं नका १४. —सुखशांति प्राप्त व्हावी म्हणून, शांत चित्तानें आपल्या रथांतून प्रातःकालीं (भक्ताकडे)

उप नो वाजिनीवसू यातं ऋतस्य पथिभिः। येभिस् तृक्षिं वृषणा त्रासदस्यवं महे क्षत्राय जिन्वथः॥ ७॥ अयं वाम् अद्रिभिः सुतः सोमो नरा वृषण्वसू। आ यातं सोम पीतये पिबतं दाशुषो गृहे॥ ८॥ आ हि रुहतम् अश्विना रथे कोशे हिरण्यये वृषण्वसू। युञ्जाथां पीवरीर् इषः॥ ९॥ याभिः पक्थम् अवथो याभिर् अध्रिगुं याभि र्बभ्रुं विजोषसम्। ताभि र्नो मक्षू तूयम् अश्विनाऽऽगतम् भिषज्यतं यत् आतुरम्॥ १०॥ यत् अध्रिगावो अध्रिगू इदा चित् अह्नो अश्विना हवामहे। वयं गीर्भि र्विपन्यवः॥ ११॥ ताभिर् आयातं वृषणोप मे हवं विश्वप्सुं विश्ववार्यम्। इषा मंहिष्ठा पुरुभूतमा नरा याभिः क्रिविं वावृधुस् ताभिर् आ गतम्॥ १२॥ तौ इदा चित् अहानां तौ अश्विना वन्दमानः उपब्रुवे। तौ ऊ नमोभिर् ईमहे॥ १३॥ तौ इत् दोषा तौ उषसि शुभस्पती ता यामन् रुद्रवर्तनी। मा नो मर्ताय रिपवे वाजिनीवसू परो रुद्रौ अति ख्यतम्॥ १४॥ आ सुग्म्याय सुग्म्यं प्राता रथेन अश्विना वा सक्षणी।

झटकन येणारे जे अश्वीदेव त्यांची प्रार्थना मी **सोभरी,** पित्याची प्रार्थना करावी त्याप्रमाणें करतों १५. —हे मनाप्रमाणें वेगवान् अश्वीहो, हे वीर्यशालि मदरहित अश्वीहो, त्वरित येऊन पोहोंचणाऱ्या सहायक शक्तिसह आमच्याकडे या; हे विश्वपोषक देवानों, अशा शेंकडों शक्तिनिशीं ( सज्ज होऊन ) आमच्या संरक्षणाकरितां आमच्या जवळ असा १६. —हे अश्वीहो ! आमचें यज्ञगृह अश्वांनीं संपन्न आहे, हे मधुररसलालस देवानों, गोधनांनीं परिप्लुत आहे, हे दर्शनीय विभूतींनों, तें संपत्तिनेंहि परिपूर्ण आहे; तर अशा आमच्या यज्ञगृहांत तुम्हीं आगमन कराच १७. —उत्कृष्ट औदार्य, उत्तम वीर्य, आणि दुष्ट राक्षसांनाहि दाद न देणारें असें अभिलषणीय सामर्थ्य तुमच्या आगमनांतच साठविलेलें आहे, तर हे सत्वसामर्थ्यसंपन्नानों, आम्हींहि ( त्या आगमनांतच ) यच्चावत् उत्कृष्ट वस्तूंचा लाभ ध्यानबलानें करून घेऊं १८.

## सूक्त २३

ज्याचा प्रतिकार करणें अशक्य अशा त्या सर्वज्ञ अग्नीची स्तुति कर. ज्याचा धूम सर्वसंचारी, ज्याचें तेज दुर्दम्य त्या अग्नीचें यजन कर १. —हे सर्वदर्शी, सर्वान्तर्यामी देवा, मत्सररहित भक्ताला रथादिक देणारा जो तूं त्या अग्निचें मी विश्वमना भक्त स्तवन करीत आहे २. —शत्रुनाशक आणि ऋक्स्तोत्रप्रिय अग्नि ज्यांच्या उत्साहाचा आणि बलाचा निग्रह करतो त्यांचें ( हें ) वर्म कळल्याच्या योगानें हवि अर्पण करणारा भक्त आपलें अभीष्ट ( सहज ) प्राप्त करून घेतो ३. —पहा, या देदीप्यमान अग्निचें, ह्या तीव्रज्वाल, सुप्रकाश आणि सकलगुणांचे शोभाधिष्ठान अशा अग्निचें अक्षय तेज प्रकट

हुवे पितेव सोभरी ॥ १५ ॥ मनोजवसा वृषणा मदच्युता मक्षुंगमाभिर् ऊतिभिः । आरात्तात् चित् भूतम् अस्मे अवसे पूर्वीभिः पुरुभोजसा ॥ १६ ॥ आ नो अश्वावत् अश्विना वर्ति यासिष्टं मधुपातमा नरा । गोमत् दस्रा हिरण्यवत् ॥ १७ ॥ सु प्रावर्गं सुवीर्यं सुष्ठु वार्यम् अनाधृष्टं रक्षस्विना । अस्मिन् आ वाम् आयाने वाजिनीवसू विश्वा वामानि धीमहि ॥ १८ ॥

## सूक्तम् २३

विश्वमनाः अग्निः उष्णिक्

इळीष्वा हि प्रतीव्यं यजस्व जातवेदसम् । चरिष्णुधूमम् अगृभीतशोचिषम् ॥ १ ॥ दामानं विश्वचर्षणे अग्निं विश्वमनो गिरा । उत स्तुषे विष्पर्धसो रथानाम् ॥ २ ॥ येषाम् आबाध ऋग्मियः इषः पृक्ष श्च निगृभे । उपविदा वह्निं विन्दते वसु ॥ ३ ॥ उत् अस्य शोचिर् अस्थात् दीदियुषो वि अजरम् । तपुर्जम्भस्य सुद्युतो

झालें आहे ४. —ज्या तुझा अध्वरयाग उत्तम रीतीनें शेवटास जातो अशा अग्निदेवा, (तुझ्या) दिव्य कृपेमुळें, प्रख्यातीमुळें, आणि महत्तेजामुळें तुझें स्तवन होत असतें; तर तीव्रप्रकाश असा तूं (आमच्या दृष्टि) पुढें असाच रहा ५. —अग्निदेवा, आमच्या उत्कृष्ट स्तवनांसह दिव्यलोकीं गमन कर. तूं आमच्या हविर्भागांचें तत्काळ हवन करून ते हविर्भाग देवांस पोहोंचविणारा दूत झाला आहेस ६. —मानवांचा पुरातन होता जो अग्नि त्याला मीं तुमच्यासाठीं पाचारण करतों. ह्या सूक्तांनीं मीं त्याचीच स्तुति करीतों, तुम्हांकरितां त्यालाच आळवीतों ७. —अद्भुतपराक्रमी अग्निला त्याच्याच कृपेच्या योगानें (• भक्तजन) यज्ञांनीं संतुष्ट करतात. तो सद्धर्मरत भक्तांमध्यें प्रेमळपणानें राहणाऱ्या मित्रा प्रमाणें आहे ८. —सद्धर्मरत भक्तानों, सद्धर्मप्रतिपालक आणि यज्ञाचा संपादक जो अग्नि त्याची उपासना, त्याला प्रणिपात करण्याला योग्य जें (यज्ञ) स्थान त्या स्थानीं भक्तजनानीं केली आहे ९. —अंगिरा ऋषिला अत्यंत पूज्य जो अग्नि त्या अग्नीकडे आमचे यथासाङ्ग यज्ञ जाऊन पोहोंचोत. अग्नि हा सर्व मानवजातीचा अत्यंत यशस्वी असा पुरोहित आहे १० —हे अग्ने, हे अजरामर देवा, धगधगीत पेटलेल्या त्या तुझ्या प्रचंड ज्वाला वीर्यवान् अश्वाप्रमाणें आपला धूमधडाका चालवूं पहात आहेत ११. —हे ऊर्जस्वितेच्या प्रभो, तूं असा आहेस तर उत्कृष्ट शौर्य उत्पन्न करणारें जें श्रेष्ठधन आहे तें आम्हांस दे, आणि संग्रामांमध्यें आमच्या मुलाबाळांचें संरक्षण कर १२. —पहा, जेव्हां लोकपालक, परंतु प्रखरतेजाचा अग्नि संतुष्ट होतो, तेव्हां मानवजातींमध्यें वावरणारे जितके राक्षस असतील त्या सर्वांचा तो पार नायनाट करतो १३. —हे अग्ने, माझ्या अभिनव स्तोत्रांचा खरा श्रोता तूंच; तर हे वीरा, हे लोकपालका, फसवेगिरी करणाऱ्या दुष्ट राक्षसांची तूं आपल्या ज्वालेनें राखरांगोळी कर १४. —जो भक्त हविर्दानानें अग्नीला आपली सेवा अर्पण करतो

---

गणश्रियः ॥ ४ ॥ उत् उ तिष्ठ सु अध्वर स्तवानो देव्या कृपा । अभिख्या भासा बृहता शुशुक्वनिः ॥ ५ ॥ अग्ने याहि सुशस्तिभि र्हव्या जुह्वान आनुषक् । यथा दूतो बभूथ हव्यवाहनः ॥ ६ ॥ अग्निं वः पूर्व्यं हुवे होतारं चर्षणीनाम् । तम् अया वाचा गृणे तम् ऊ वः स्तुषे ॥ ७ ॥ यज्ञेभिर् अद्भुतक्रतुं यं कृपा सूदयन्त इत् । मित्रं न जने सुधितं ऋतावनि ॥ ८ ॥ ऋतावानम् ऋतायवः यज्ञस्य साधनं गिरा । उपो एनं जुजुषु र्नमसस् पदे ॥ ९ ॥ अच्छा नो अङ्गिरस्तमं यज्ञासो यन्तु संयतः । होता यो अस्ति विक्षु आ यशस्तमः ॥ १० ॥ अग्ने तव त्ये अजर इन्धानासो बृहत् भाः । अश्वा इव वृषणस् तविषीयवः ॥ ११ ॥ स त्वं न ऊर्जां पते रयिं रास्व सुवीर्यम् । प्रावः नस् तोके तनये समत्सु आ ॥ १२ ॥ यत् वा उ विश्पतिः शितः सुप्रीतो मनुषो विशि । विश्वा इत् अग्निः प्रति रक्षांसि सेधति ॥ १३ ॥ श्रुष्टी अग्ने नवस्य मे स्तोमस्य वीर विश्पते । नि मायिनस् तपुषा रक्षसो दह ॥ १४ ॥ न तस्य

त्या भक्तावर कोणीहि मर्त्यशत्रु आपल्या मायाजालानें यत्किंचित् देखील मात्रा चालवूं शकत नाहीं १५. —दिव्यधनदायक अशा तुला, शौर्य गाजविण्याची इच्छा धरणारा जो व्यश्व त्यानें संतुष्ट केलें; तसेंच आम्हींहि श्रेष्ठधनाच्या प्राप्तीसाठीं तुला, प्रज्वलित (करून संतुष्ट) करीत आहोंत १६. —काव्य उशना यानें सकलवस्तुज्ञाता यज्ञपुरुष जो तूं त्या तुझी स्थापना मनुराजासाठीं पुरोहित म्हणून केली १७. —सर्व भक्तवत्सल दिव्यविभूतींनीं तुला आपला प्रतिनिधि केलें, तेव्हां हे देवा, तूंच पहिला यज्ञभोक्ता म्हणून विश्रुत झालास १८. —वीर्यशाली भक्त मर्त्य आहे म्हणून त्यानें अमर अग्नीला, ह्या पतित पावनाला, आणि भूमिमार्ग कृष्णवर्ण करणाऱ्या गगनगामी अग्नीलाच हव्यवाहक केलें पाहिजे १९. —म्हणून आम्हींहि स्रुचा घेऊन सज्ज होतों, आणि परमदीप्तिमान् ज्वलत्तेजस्क, अजरामर, पुरातन आणि स्तवनयोग्य असा मानवांचा (देव) जो अग्नि त्याची करुणा भाकतों २०. —जो मर्त्य मानव, हविर्दानप्रवण ऋत्विजांकडून ह्या अग्निला आहुति अर्पण करून त्याची सेवा करतो, तो (सर्वांचें) पोषण करणारें आणि वीरांना योग्य असें यश प्राप्त करून घेतो २१. —सर्वज्ञ आणि आद्य असा जो अग्नि त्याच्याचकडे (भक्ताची) घृताहुतिपूर्ण स्रुचा यज्ञामध्यें त्याला नमस्कार करून प्रथम वळते २२. —व्यश्व ऋषिप्रमाणें आम्हींहि आमच्या ह्या अत्युत्कृष्ट आणि अत्यंत प्रशस्त अशा मननीयस्तुतिंनीं ज्वलत्तेजस्क अग्नीची सेवा करूं २३. —आणि हे व्यश्वा, तूं देखील अत्युदात्त गृहपति जो अग्नि त्याचें स्थूरयूप ऋषिप्रमाणें ऋक्स्तोत्रांनीं अर्चन कर २४. —मानवांचा अतिथि आणि वनस्पतीं-पासून प्रकट होणारा जो सनातन अग्नि त्याची कृपा संपादन करण्यासाठीं स्तवनज्ञ भक्त त्याचें संकीर्तन करीत असतात २५. —सर्व मोठमोठ्या संतजनांकरितां, आणि

---

मायया चन रिपुर् ईशीत मर्त्यः । यो अग्नये ददाश हव्यदातिभिः ॥ १५ ॥ वि अश्वस् त्वा वसुविदम् उक्षण्युर् अप्रीणात् ऋषिः । महो राये तम् उ त्वा समिधी-महि ॥ १६ ॥ उशना काव्यस् त्वा नि होतारम् असादयत् । आ यजिं त्वा मनवे जातवेदसम् ॥ १७ ॥ विश्वे हि त्वा सजोषसो देवासो दूतम् अक्रत । श्रुष्टी देव प्रथमो यज्ञियो भुवः ॥ १८ ॥ इमं घा वीरो अमृतं दूतं कृण्वीत मर्त्यः । पावकं कृष्णवर्तनिं विहायसम् ॥ १९ ॥ तं हुवेम यतस्रुचः सुभासं शुक्रशोचिषम् । विशाम् अग्निम् अजरं प्रत्नम् ईड्यम् ॥ २० ॥ यो अस्मै हव्यदातिभिर् आहुतिं मर्तोऽविधत् । भूरिपोषं सो धत्ते वीरवत् यशः ॥ २१ ॥ प्रथमं जातवेदसम् अग्निं यज्ञेषु पूर्व्यम् । प्रति स्रुक् एति नमसा हविष्मती ॥ २२ ॥ आभि विधेम अग्नये ज्येष्ठाभि व्यश्ववत् । मंहिष्ठाभि र्मतिभिः शुक्रशोचिषे ॥ २३ ॥ नूनम् अर्च विहायसे स्तोमेभिः स्थूरयूप-वत् । ऋषे वैयश्व दम्याय अग्नये ॥ २४ ॥ अतिथिं मानुषाणां सूनुं वनस्पतीनाम् । विप्रा अग्निम् अवसे प्रत्नम् ईळते ॥ २५ ॥ महो विश्वाँ अभि षतो अभि हव्यानि

आम्हां दीनमानवांच्या हविर्भागांचा स्वीकार करण्याकरितां, हे अग्निदेवा, तूं ह्या कुशासनावर विराजमान हो २६. —आणि आम्हांस सर्वोत्कृष्ट वस्तु विपुल अर्पण कर; सर्वांना हवें हवेंसें वाटणारें, वीरयुक्त, प्रजायुक्त आणि यशस्कर असें जें श्रेष्ठ धन तेंहि अर्पणकर २७. —हे वरेण्या अग्ने, (तुझ्या प्रीत्यर्थ) सुंदर सामगीतें गाणाऱ्या सर्व भक्तजनाला तू स्फूर्ति दे; हे दिव्यनिधे, हे यौवनाढ्य देवा, सर्वांनाच तूं उत्कृष्ट वरदान दे २८. —अभीष्टवस्तू उत्तम रीतीनें प्राप्त करून देणारा खरोखर तूंच आहेस; तर हे अग्निदेवा, गोधनसंपन्नतेस साजेल असा उत्साह आणि श्रेष्ठ वैभव यांचा लाभ मन मोकळेपणानें होईल असें कर २९. —अग्निदेवा, तूं यशोरूप आहेस, तर सद्धर्मांचे प्रवर्तक, विश्वाचे अधिपति, आणि पवित्रबलानें संपन्न असे जे मित्रावरुण त्यांना आमचेकडे घेऊन ये ३०.

## सूक्त २४

मित्रानों, वज्रधर इन्द्राप्रीत्यर्थ सुंदर स्तोत्राची स्फूर्ति व्हावी असा आपण आशीर्वाद मागूं; आणि (शत्रूंना) धडकी भरविणाऱ्या त्या वीरोत्तमाचें स्तवन करूं १. —तूं आपल्या उफाड धडाडीनें सर्वप्रसिद्ध आहेसच; तूं वृत्राचा वध केल्या कारणानें तुला वृत्रनाशन हें नांव प्राप्त झालें; आणि हे वीरा, मोठमोठ्या दानशूरांना देखील तूं आपल्या दातृत्वानें मागें टाकिलेंस २. —ज्या तुझें स्तवन (भक्तांकडून) नित्य होतें असा तूं, अत्यंत अद्भुत म्हणून जें प्रसिद्ध असेल तें ऐश्वर्य आम्हांस दे. (कारण) जेथें कांहींच नसतें अशा ठिकाणीं देखील, हे हरिदश्व इन्द्रा, तूं दिव्यनिधान देव वैभवदाता होतोस ३. —सर्व लोकांना प्रिय आणि निरुपम अशी जी वस्तु (आहे) ती तूं प्रकट कर. हे धैर्यसागरा, तुझें स्तवन सर्वत्र मोठ्या घोशानें चाललें असतें, तर ती वस्तु तूं

ऋानुषा। अग्ने नि पत्सि नमसाऽधि बर्हिषि ॥ २६ ॥ वंस्वा नो वार्या पुरु वंस्व रायः पुरुस्पृहः। सुवीर्यस्य प्रजावतो यशस्वतः ॥ २७ ॥ त्वं वरो सुषाम्णे अग्ने जनाय चोदय। सदा वसो रातिं यविष्ठ शश्वते ॥ २८ ॥ त्वं हि सुप्रतूर् असि त्वं नो गोमतीर् इषः। महो रायः सातिम् अग्ने अपा वृधि ॥ २९ ॥ अग्ने त्वं यशा असि आ मित्रावरुणा वह। ऋतावाना सम्राजा पूतदक्षसा ॥ ३० ॥

## सूक्तम् २४

वैयश्वः इन्द्रः उष्णिक्

सखायः आ शिषामहि ब्रह्म इन्द्राय वज्रिणे। स्तुषे ऊ षु वो नृतमाय धृष्णवे ॥ १ ॥ शवसा हि असि श्रुतो वृत्रहत्येन वृत्रहा। मघैः मघोनो अति शूर दाशसि ॥ २ ॥ स नः स्तवान आ भर रयिं चित्रश्रवस्तमम्। निरेके चित् यः हरिवः वसु ददिः ॥ ३ ॥ आ निरेकम् उत प्रियं वाजं दर्षि जनानाम्। धृषता धृष्णो

( भक्तांसाठीं ) घेऊन ये ४. —डावा हात असो किंवा उजवा असो, तुझा कोणताहि हात घातकी दुष्ट धरूं शकत नाहींत; आणि हे हरिदश्वा इन्द्रा, तूं प्रकाशगोधन आणण्याला प्रवृत्त होतोस–तेव्हां तुला अडथळा करतील इतके कोणीच ( शक्तिमान ) नाहींत ५. —धेनूंसह आपल्या निवासस्थानीं जावें त्याप्रमाणें, स्तुतिगोधनासह, हे वज्रधरा, मी तुजकडे येत आहें; तर मज भक्ताचा हेतु, मज भक्ताचा मनोरथ तूं परिपूर्ण कर ६.—वृत्र राक्षसाला अगदीं ठार मारून टाकणाऱ्या शत्रुभयंकरा देवा, हे सन्मार्गदर्शका, हे दिव्यनिधे, विश्वमना नामक ऋषीच्या ध्यानानें तूं ( संतुष्ट हो आणि ) त्याच्या सर्व ( अडचणीं )ची चिन्ता वहा ७. —हे वृत्रनाशना वीरा, ह्या तुझ्या अपूर्व, स्पृहणीय दिव्यनिधीचा आणि कृपाप्रसादाचा आम्हीं लाभ घेऊं असें, हे सर्व जनस्तुत देवा, तूं कर ८. —हे रणभैरवा इन्द्रा, तुझी धडाडी जशी अनिवार, तसेंच, हे सर्वजनस्तुत देवा, तुझें वरदानहि अमोघच असतें ९. —तर, हे अत्यंत पूज्या, हे सर्वोत्तमा वीरा, तुझ्या श्रेष्ठ कृपेचा वर्षाव तूं आम्हांवर कर. हे भगवंता, अगदीं अभेद्य अशीं जीं स्थानें असतील तीं आम्हांस ऐश्वर्यसंपन्न करण्यासाठीं फोडून मोकळीं कर. १०. —आमच्या आशा तुझ्यावांचून दुसरीकडे कोठेंहि गंतलेल्या नाहींत; तर हे भगवंता, आपल्या संरक्षण शक्तींच्या योगानें आम्हांस सामर्थ्यवान् कर ११. —हे रणभैरवा, कृपाप्रसादासाठीं म्हणा, ( अक्षय्य ) धनासाठीं म्हणा, तेजोवैभवासाठीं म्हणा, किंवा उत्कटबलासाठीं म्हणा, पण हे स्तवनप्रिया देवा, तुझ्यावांचून दुसरें ठिकाणच मला आढळत नाहीं १२. —इन्द्राप्रीत्यर्थ ( पात्रांत ) सोमरस ओता. त्यांतील मधुररस तो प्राशन करो, आणि आपल्या महिम्यानें आणि कृपाप्रसादानें ( स्तोतृजनाला ) प्रेरणा करो १३. —हरिद्वर्ण अश्वांचा स्वामी, आणि ( भक्तांशीं ) चातुर्यबलाचा संयोग करून देणारा जो इन्द्र त्याची मीं आतांच प्रार्थना केली कीं, देवा,

---

स्तवमान आ भर ॥ ४ ॥ न ते सव्यं न दक्षिणं हस्तं वरन्त आमुरः । न परिबाधो हरिवो गविष्टिषु ॥ ५ ॥ आ त्वा गोभि रिव व्रजं गीर्भि ऋणोमि अद्रिवः । आ स्म कामं जरितुर् आ मनः पृण ॥ ६ ॥ विश्वानि विश्व मनसो धिया नो वृत्रहन्तम । उग्र प्रणेतर् अधि षू वसो गहि ॥ ७ ॥ वयं ते अस्य वृत्रहन् विद्याम शूर नव्यसः । वसोः स्पार्हस्य पुरुहूत राधसः ॥ ८ ॥ इन्द्र यथा हि अस्ति ते अपरीतम् नृतो शवः । अमृक्ता रातिः पुरुहूत दाशुषे ॥ ९ ॥ आ वृषस्व महामह महे नृतम राधसे । दृळह श्चित् दृह्य मघवन् मघत्तये ॥ १० ॥ नू अन्यत्रा चित् अद्रिवस् त्वं नो जग्मुर् आशसः । मघवन् शग्धि तव तत् न ऊतिभिः ॥ ११ ॥ न हि अङ्ग नृतो त्वत् अन्यं विन्दामि राधसे । राये द्युम्नाय शवसे च गिर्वणः ॥ १२ ॥ एन्दुम् इन्द्राय सिञ्चत पिबाति सोम्यं मधु । प्र राधसा चोदयाते महित्वना ॥ १३ ॥ उपो हरीणां पतिं दक्षं पृञ्चंतम् अब्रवम् । नूनं श्रुधि स्तुवतो

तुझें स्तवन करणाऱ्या ह्या अश्व्यऋषीचा धांवा तूं ऐक १४ —" नाहीं, खचित अत्यंत शूर असा तुझ्या व्यतिरिक्त पूर्वीं कोणीहि झाला नाहीं. दिव्यैश्वर्याच्या दृष्टीनें, पद्धतीच्या दृष्टीनें, किंवा महत्वाच्या दृष्टीनेंहि झाला नाहीं १५. —मधुर पदार्थांमध्यें अत्यंत आवेशप्रद असा हा सोमरस ( पात्रांत ) ओत; किंवा हे अध्वर्यु, तें सर्व पेयांमध्यें उत्कृष्ट असें पेय पात्रांत ओत. निरंतर अभिवृद्धि करणाऱ्या वीराचें स्तवन अशाच पद्धतीनें होतें १६. —हरिद्वर्ण अश्वांवर आरोहण करणाऱ्या इन्द्रा, पूर्वीच्या ऋषींनीं तुझी जी स्तुति केली आहे तिची बरोबरी उत्कटतेनें किंवा महत्वानें कोणाच्यानेंहि होणें नाहीं १७. —अशा सत्वसामर्थ्यांचा तूं प्रभु, म्हणून आम्हीं रक्षणेच्छु भक्तजन, आमची सर्वतोपरी अभिवृद्धि करणारा जो तूं त्या तुझ्याप्रीत्यर्थ दक्षतेनें चालविलेल्या यज्ञकर्मांनीं हवन करीत असतों १८. —हें पहा, मित्रानों, स्तवनयोग्य वीर जो इन्द्र, त्याचेंच स्तवन आम्हीं करणार. तो केवळ एकटा असूनहि अखिल मानवांना आपल्या कह्यांत ठेवतो १९. —( ज्ञान ) गोधनाला जो कोण्डून ठेवीत नाहीं, ( इतकेंच नव्हे ) तर तें गोधन ( भक्तांसाठीं ) जपून ठेवतो असा आकाशनिवासी देव इन्द्र त्याच्या प्रीत्यर्थ अशी स्तुति करा कीं ती घृतापेक्षां मृदु आणि मधापेक्षांही मधुर असेल २०. —ज्या इन्द्राचीं शौर्यकृत्यें अगणित आहेत, ज्याच्या कृपाप्रसादाच्या अपरिमितत्वाचें आकलनहि करतां येत नाहीं, त्याची देणगी, प्रकाश जसा जगाला व्यापून राहतो त्याप्रमाणें विश्वाला व्यापून राहते २१. —उदकांच्या लाटांप्रमाणें ज्याचें मन चंचल नाहीं, जो सत्वाढ्य आणि जगन्नियन्ता आहे, त्या इन्द्राचें स्तवन जसें व्यश्वानें केलें त्याप्रमाणें, तूं कर. तो प्रभु, आपल्या भक्ताला महनीय असें स्थान देईलच देईल २२. म्हणून हे वैयश्वा, तूं देखील इन्द्राचें स्तवन कर. ( सर्व बहुमोल वस्तूंत जो ) दहावा ( अर्थात् ) अमोलिक, आहे, जो अत्यंत ज्ञानी, आहे, ज्याचें अखंड भजन प्राणिमात्रांनीं करावें अशा त्या इन्द्राचें तूं स्तवन कर २३. —हे वज्रधरा, पापवासनांचा परिहार

---

अश्व्यस्य ॥ १४ ॥ नहि अङ्ग पुरा चन जज्ञे वीरतरस् त्वत् । नकी राया न एवथा न भन्दना ॥ १५ ॥ एत् उ मध्वो मन्दितरम् सिञ्च वाऽध्वर्यो अन्धसः । एवा हि वीरः स्तवते सदावृधः ॥ १६ ॥ इन्द्र स्थातो हरीणां नकिस् ते पूर्व्यस्तुतिम् । उत आनंश शवसा न भन्दना ॥ १७ ॥ तं वो वाजानां पतिम् अहूमहि श्रवस्यवः । अप्रायुभि र्यज्ञेभि र्वावृधेन्यम् ॥ १८ ॥ एतो नु इन्द्र स्तवाम सखायस् स्तोम्यं नरम् । कृष्टी र्यो विश्वा अभि अस्ति एक इत् ॥ १९ ॥ अगोरुधाय गविषे द्युक्षाय दस्म्यम् वचः । घृतात् स्वादीयो मधुन श्च वोचत ॥ २० ॥ यस्या—मितानि वीर्या न राधः परि एतवे । ज्योति र्न विश्वम् अभि अस्ति दक्षिणा ॥ २१ ॥ स्तुहि इन्द्रम् व्यश्ववत् अनूर्मिम् वाजिनं यमम् । अर्यो गयं मंहमानं वि दाशुषे ॥ २२ ॥ एवा नूनम् उप स्तुहि वैयश्व दशमं नवम् । सु विद्वांसम् चर्कृत्यं चरणीनाम् ॥ २३ ॥

( कसा करावा तें ) खरोखर तूंच जाणतोस. परिभ्रमण करणाऱ्यांमध्यें दररोज आंग स्वच्छ ठेवणारा शुन्ध्यु ( जो सूर्य ) त्याप्रमाणें तूं आहेस २४. —अत्यद्भुत दर्शना इन्द्रा, तें तुझें रक्षण आम्हांकडे येऊं दे कीं ज्याच्या योगानें तूं कर्तव्यतत्पर कुत्सा करितां (शत्रूला) दुखण्ड केलेंस. तर अशा कर्तव्याची स्फूर्ति तूं आम्हांलाहि दे २५. —अत्यंतअद्भुत रूपा इन्द्रा, स्तवनयोग्य जो तूं त्या तुझी विनवणी, ( स्वार्थबुद्धीचा ) त्याग करतां यावा म्हणून आम्हीं आतांच्या आतांच करीत आहोंत; कारण, तूं असा आहेस कीं, आमच्या सर्व प्रतिस्पर्ध्यांवर चाल करून जाऊन त्यांचा पार मोड करून टाकलास २६. —तूं असा आहेस कीं, घोर पातकापासून भक्ताची मुक्तता केलीस; किंवा हे अपार शौर्यसंपन्ना इन्द्रा, तूं सप्तसिन्धूंच्या प्रदेशांत आर्यभक्ताच्या हातून, धर्मभ्रष्ट शत्रूंचीं घातक शस्त्रें वांकवून तीं मोडून टाकलींस २७. —हे अनुत्तमे, हे सुलक्षणे, सत्वसामर्थ्यसंपन्ने देवि, ज्याप्रमाणें सामगायकाला त्याचप्रमाणें यच्चावत् दानशील भक्तांनाहि तूं वैभव दिलेलें आहेस २८. —(म्हणून) सोमयाजी **नार्याचें** दान व्यश्वांना मिळो; तशीच देणगी स्थूराला शेंकड्यांनींच काय, पण हजारांनींही प्राप्त होवो २९. —अशा प्रकारचा यज्ञनिरतभक्त " कोठें तरी आहे काय, कोठें तरी आहे काय ? " असें तुम्हांला विचारतील; तेव्हां त्यांना हेंच सांगा कीं, असा भक्त वल हा आहे; आणि गोमती नदीच्या कांठींच त्याचा वास आहे ३०.

## सूक्त २५

ते तुमचे विश्वपालक दिव्यविभूति; ते सर्वदिव्यविबुधांत पूज्य, सत्यधर्मस्थापक, आणि पवित्र सामर्थ्यांनें मण्डित असे जे मित्र आणि वरुण, त्यांचें यजन तूं करतोस ना ? १.

---

वेत्था हि निर्ऋतीनाम् वज्रहस्त परिव्रजम् । अहरहः शुन्ध्युः परिपदामिव ॥ २४ ॥ तत् इन्द्र अव आ भर येन दंसिष्ठ कृत्वने । द्विता कुत्साय शिश्नथो निचोदय ॥२५॥ तम् उ त्वा नूनम् ईमहे नव्यं दंसिष्ठ सन्यसे । स त्वं नो विश्वा अभिमातीः सक्षणिः ॥ २६ ॥ य ऋक्षात् अंहसो मुचत् यो वाऽऽ र्यात् सप्तसिन्धुषु । वधो दासस्य तुविनृम्ण नीनमः ॥ २७ ॥ यथा वरो सुषाम्णे सनिभ्यआऽवहो रयिम् । वि अश्वेभ्यः सुभगे वाजिनीवति ॥ २८ ॥ आ नार्यस्य दक्षिणा वि अश्वान् एतु सोमिनः । स्थूरं च राधः शतवत् सहस्रवत् ॥ २९ ॥ यत् त्वा पृच्छात् ईजानः कुहया कुहया कृते । एषो अपश्रितो वलो गोमतीम् अव तिष्ठति ॥ ३० ॥

## सूक्तम् २५

वैयश्वः मित्रावरुणौ उष्णिक्

ता वाम् विश्वस्य गोपा देवा देवषु यज्ञिया । ऋतावाना यजसे पूतदक्षसा ॥ १ ॥ मित्रा तना च रथ्या वरुणो यश्च सुक्रतुः । सनात् सुजाता तनया

—मित्रावरुण हे पूर्वींपासूनच ( जगाला ) मार्गदर्शकाप्रमाणें झाले आहेत. अणि वरुण आहे तो तर पुण्यकृतीच होय. असे हे अदितीचे सत्पुत्र अनादिकालापासून भक्तांकडून न्यायनीतिनें पालन करवीत आले आहेत २. —ती परमथोर माता, सत्यधर्माला अनुसरणारी अदिति, तिनें सर्वज्ञ आणि अत्यंत ओजस्वी अशा ( मित्रावरुणां )ना, दैवीजीवनातें साम्राज्य व्हावें म्हणून, जन्म दिला ३. —मित्रावरुण देव हे परमथोर, जगत्सम्राट्, दैवीसामर्थ्यांनें युक्त आहेत; तेच धर्मरूप देव सद्धर्माची घोषणा मोठ्यानें करीत असतात ४, —ते महान् उत्कटबलाचे संवर्धक, चातुर्याचें उद्गमस्थान, उत्कृष्ट कर्तृत्वशील, आणि अत्यंत दानशूर आहेत. उत्साहाच्या गृहांतच ते सदैव वास्तव्य करतात ५. —तुम्हीं असे आहांत कीं सर्व देणग्या तुह्मीं आपल्या हातांत ठेवल्या आहेत व दिव्य आणि ऐहिक उत्कर्ष हेहि तुमच्या हातांत आहेत. तर तुमचीं अन्तरिक्षांतील मेघोदकें जगतावर वृष्टि करोत ६. —( गोपालक ) जसा आपल्या कळपावर दृष्टि ठेवतो तसे तुम्हीं महान् द्युलोकावर आरोहण करून या जगताकडे पहात असतां. तुम्हीं न्यायनीतिप्रिय, विश्वसम्राट् अहांत, आणि प्रणिपात करणाऱ्या भक्तासाठींच ( स्वर्लोकीं ) राहिले अहांत ७. —सत्यधर्मरूप, महत्कृत्यरत असे ( मित्रावरुण ) जगावर साम्राज्य चालविण्याकरितां ( स्वर्लोकीं ) राहिले आहेत. धर्मसंस्थापन करणाऱ्या त्या शूर सत्ताधीशांनीं आपली सत्ता सर्व ठिकाणीं प्रस्थापित केली आहे ८. —प्रत्यक्ष डोळे असल्यापेक्षां देखील त्यांच्या गुप्त नेत्रानें त्यांना मार्ग फारच उत्तम दिसतो. आणि जरी त्यांनीं आपले नेत्र मिटून धरले तरी सुद्धां त्यांना अतिशय उत्कृष्ट दिसतें ९. —म्हणून अदिति देवी, आणि सत्यस्वरूप अश्वीदेव हे आम्हांस मुक्त करोत. आणि महा बलाढ्य मरुत् हेहि मुक्त करोत १०. —दिवसा आणि रात्रीं सुद्धां आमच्या नौकेला मोकळी सोडा. म्हणजे हे दानशूर मरूतांनों, आम्हीं उपद्रवरहित होऊन तुमच्या संरक्षणांच्या योगानें ( इच्छित ) प्राप्त करून घेऊं ११. —( भक्तांचा ) घात होऊं न देणारा जो औदार्यशील विष्णु त्याची आम्हीं उपद्रवरहित होण्यासाठीं उपासना करीत आहों. हें दया-

धृतव्रता ॥ २ ॥ ता माता विश्ववेदसा असुर्याय प्रमहसा । मही जजान अदितिर् ऋतावरी ॥ ३ ॥ महान्ता मित्रावरुणा सम्राजा देवौ असुरा । ऋतावानौ ऋतम् आ घोषतो बृहत् ॥ ४ ॥ नपाता शवसो महः सूनू दक्षस्य सुक्रतू । सृप्रदानू इषो वास्तु अधि क्षितः ॥ ५ ॥ सं या दानूनि येमथुर् दिव्याः पार्थिवीर् इषः । नभस्वतीर् आ वां चरन्तु वृष्टयः ॥ ६ ॥ अधि या बृहतो दिवः अभि यूथेव पश्यतः । ऋतावाना सम्राजा नमसे हिता ॥ ७ ॥ ऋतावाना नि षेदतुः साम्राज्याय सुक्रतू । धृतव्रता क्षत्रिया क्षत्रम् आशतुः ॥ ८ ॥ अक्ष्ण श्चित् गातुवित्तरा अनुल्बणेन चक्षसा । नि चित् मिषन्ता निचिरा नि चिक्यतुः ॥ ९ ॥ उत नो देवी अदितिर् उरुष्यताम् नासत्या । उरुष्यन्तु मरुतो वृद्धशवसः ॥ १० ॥ ते नो नावम् उरुष्यत दिवा नक्तं

सागरा, स्वयंप्रेरिता, तुझें चिन्तन प्रथम करावें ( असा हेतु आहे ) तर आमची प्रार्थना ऐक १२. —उत्कृष्ट परंतु गोपनीय अशी जी अभिलषणीय वस्तु ( स्वतः ) मित्र वरुण आणि अर्यमा हे जतन करतात; त्या वस्तूची आम्हीं आकांक्षा धरली आहे १३. —म्हणून उदकांचा उदधि, मरुत्, अश्विदेव, इन्द्र, विष्णू हे कामनावर्षक भक्तवत्सल देव तीच वस्तु आम्हांला देवोत १४. —अशा वस्तूचा उपभोग घेणारे ते वीराग्रणी, पाण्याच्या प्रचंड लोंढ्याप्रमाणें धडाक्यानें—धांवणारे ते ( दिव्यविबुध ), कोणाच्याहि हल्ल्याची पार धूळधाण उडवून देतात १५. —हा मानवजातीचा एकच प्रभु खरोखरच यथास्थितपणानें आणि व्यापक दृष्टीनें सर्व कांहीं पहात असतो. त्याच्याच अनुशासनाप्रमाणें आम्हीं वागतों १६. —पूर्वापार चालत आलेले विधि, आणि मित्रावरुणाच्या साम्राज्याचे दीर्घकालापासून प्रसिद्ध असलेले नियम आम्हीं यथापूर्व पाळीत आलों आहोंत १७. —ज्यानें आपल्या प्रकाशकिरणानें पृथिवीच्या आणि द्युलोकाच्या सर्व मर्यादा आक्रमण केल्या, आणि आपल्या महिम्यानें ते दोन्ही लोक ओतप्रोत भरून सोडले १८. —( त्याच्याच ) आकाशरूप आश्रयछत्राखालीं त्या सूर्यानें आपला प्रकाश विस्तारून दिला. आहुति अर्पण केल्यानें प्रदीप्त झालेल्या तेजःपुंज अग्निप्रमाणें प्रकाश पसरून दिला १९. —ह्या अति विस्तृत ( जगत्‌रूप ) गृहांत सत्वसामर्थ्य आणि ज्ञानगोधन यांच्यावर केवळ ( ईश्वराचा ) शब्दच सत्ता चालवितो. आरामदायक जें अन्न त्या अन्नावरहि त्याचीच सत्ता असते, आणि ( आपल्या प्रसादाची ) देणगी देण्यालाहि तोच समर्थ असतो २०. —तर आतां सूर्य–आणि द्यावापृथिवी यांच्यासमक्ष मीं सायंकाळीं, आणि प्रातःकाळींहि असें विनवितों कीं, आम्हीं उपभोगांत ( मग्न झालों ) असलों तरी ( हे देवा तूं ) आम्हाला नेहमीं हलवून पुढें चालवीत ने २१. —उक्षाच्या वंशांतील **हरयाण सुषामन्** याच्या कृपेनें मला एक चपल आणि एक शुभ्र असे दोन अश्व, आणि एक शृंगारलेला

---

सुदानवः । अरिष्यन्तो नि पायुभिः सचेमहि ॥ ११ ॥ अघ्नते विष्णवे वयम् अरिष्यन्तः सुदानवे । श्रुधि स्वयावन् सिन्धो पूर्वचित्तये ॥ १२ ॥ तत वार्यं वृणीमहे वरिष्ठम् गोपयत्यम् । मित्रो यत् पान्ति वरुणो यत् अर्यमा ॥ १३ ॥ उत नः सिन्धुर् अपां तत् मरुतस् तत् अश्विना । इन्द्रो विष्णु र्मीढ्वांसः सजोषसः ॥ १४ ॥ ते हि ष्मा वनुषो नरः अभिमातिं कयस्य चित् । तिग्मं न क्षोदः प्रतिघ्नन्ति भूर्णयः ॥ १५ ॥ अयम् एक इत्था पुरु उरु चष्टे वि विश्पतिः । तस्य व्रतानि अनु व श्चरामसि ॥ १६ ॥ अनु पूर्वाणि ओक्या साम्राज्यस्य सश्चिम । मित्रस्य व्रता वरुणस्य दीर्घश्रुत् ॥ १७ ॥ परि यो रश्मिना दिवः अन्तान् ममे पृथिव्याः । उभे आ पप्रौ रोदसी महित्वा ॥ १८ ॥ उदु ष्य: शरणे दिवो ज्योतिर् अयंस्त सूर्यः । अग्नि र्न शुक्रः समिधान आहुतः ॥ १९ ॥ वचो दीर्घप्रसद्मनि ईशे वाजस्य गोमतः । ईशे हि पित्वः अविषस्य दावने ॥ २० ॥ तत् सूर्यं रोदसी उभे दोषा वस्तोर् उपब्रुवे । भोजेषु

रथ अशा वस्तु मिळाल्या २२. —सर्व अवलक्ष घोड्यांमध्यें माझेच दोन अश्व शत्रूंवर तुटून पडणारे आहेत. आणि जातिवंत अश्वांमध्येंहि शूरांना बसण्याला तेच योग्य आहेत २३. —उत्तम लगाम, व जीन असलेले दोन तडफदार उत्कृष्ट घोडे आणि दोन स्तवनज्ञ विद्वान् ह्यांचा लाभ मला एका अपूर्व मननीय स्तुतिमुळें एकाच वेळीं झाला २४.

## सूक्त २६

सर्वांचें एकत्र स्तवन करावें म्हणून अग्रेसर अशा दिव्यविभूतिंमध्यें तुम्हांला तुमच्या उत्तम रथासह मी पाचारण करतों. वीर्यशाली आणि वीर्यधनसंपन्न अश्वीहो, तुम्हीं असे आहांत कीं, चातुर्यात तुमची गति अगदीं अप्रतिहत चालते १. —वरो सुषामन् राजासाठीं, हे सत्यस्वरूपानों, हे वीर्यशाली, वीर्यधनाढ्य अश्वीहो,तुम्हीं फार पूर्वीं-पासून आपल्या रक्षणांसहित येत आहांत २. —आम्हीं भक्तजन आज हवि अर्पण करून, हे सत्वसामर्थ्य संपन्न वीरानों, तुम्हांला पाचारण करीत आहोंत. उदंड उत्साहाची लालसा धरणारे आम्हीं रात्र संपतांच ( तुम्हांला हांक मारीत आहोंत ) ३. —अश्वीहो अतिशय जलद चालणारा तो तुमचा विख्यात रथ इकडे आगमन करो. हे शूरानों (तुम्हां करितां) आतुर झालेल्या भक्ताच्या स्तोत्रांकडे तुम्हीं त्याच्या कल्याणासाठीं—दयार्द्र बुद्धी-नेंच पाहतां ४. —तुम्हीं जरी आमच्यावर क्रुद्ध झालां असलां तरी हे वीर्यधनाढ्य अश्वीहो, थोडा तरी विचार करा. हे रुद्रस्वरूप अश्वीनो, ( तुम्हीं असें पहा कीं ) आमच्या द्वेष करणाऱ्या शत्रू ( च्यातडाक्यां ) तून आम्हांला तुम्हींच पार नेणार आहांत ५. —हे अद्भुतदर्शन अश्वीहो, झटपट धांवणाऱ्या रथांतून तुम्हीं सर्व जग-

---

अस्माँ अभि उत् चरा सदा ॥ २१ ॥ ऋज्रम् उक्षण्यायने रजतं हरयाणे । रथं युक्तम् असनाम सुषामणि ॥ २२ ॥ ता मे अश्व्यानाम् हरीणां नितोशना । उतो नु कृत्व्यानाम् नृवाहसा ॥ २३ ॥ स्मदभीशू कशावन्ता विप्रा नविष्ठया मती । महो वाजिनौ अर्वन्ता सचाऽसनम् ॥ २४ ॥

## सूक्तम् २६

विश्वमनः अश्विनौ उष्णिक्

युवोर् उ षू रथं हुवे सधस्तुत्याय सूरिषु । अतूर्तदक्षा वृषणा वृषण्वसू ॥१॥ युवं वरो सुषाम्णे महे तने नासत्या । अवोभि र्याथो वृषणा वृषण्वसू ॥२॥ ता वाम् अद्य हवामहे हव्येभि र्वाजिनीवसू । पूर्वीर् इष इषयन्तौ अति क्षपः ॥३॥ आ वां वाहिष्ठो अश्विना रथो यातु श्रुतो नरा । उप स्तोमान् तुरस्य दर्शथः श्रिये ॥ ४ ॥ जुहुराणा चित् अश्विना आ मन्येथां वृषण्वसू । युवं हि रुद्रा पर्षथो अति द्विषः ॥ ५ ॥ दस्रा हि

ताला वळसा घालतां; ( भक्ताला ) स्तवनाची स्फूर्ति तुम्हीं देतां; तुमची अंगकान्ति मधाप्रमाणें स्निग्ध आहे, आणि तुम्हीं मंगलाधीश आहांत ६. —हे अश्वीनों, तुम्हीं आपल्या जगत्पोषक ऐश्वर्यासह आमच्याकडे या. तुम्ही अत्युदार आणि उत्कृष्ट शौर्यानें मण्डित असूनहि कधीं बेसावध नसतां ७. —माझ्या ह्या यज्ञमण्डपाकडे, हे इन्द्रा, हे सत्य स्वरूप अश्वीदेव हो, तुम्ही आज दिव्यविभूतींसह आगमन करा. ( भक्तांनीं ) तुमची सेवा अगदीं मनापासून करावी असेच तुम्हीं आहांत ८. —( शत्रूला ) झुंदाडून मारील अशा सामर्थ्याची इच्छा धरणारे आम्हीं, व्यश्वऋषिप्रमाणें उत्तम मननीय स्तुतिनीं तुम्हांला पाचारण करीत आहोंत. तर हे ज्ञानशाली अश्वीहो, तुम्ही इकडेच आगमन करा ९. सद्भक्ता, तूं अश्वीदेवांचें स्तवन कर. तुझें स्तवन ते ऐकणार नाहींत काय ? खात्रीनें ऐकतील. आणि ( तुझ्या ) आजूबाजूस जे कवडीचुंवक दुरात्मे आहेत त्यांचा निःपात करतील १० —हे वीरनायकानों, वैयश्व्याचें ऐका; आणि तशीच माझी पण प्रार्थना ऐका. तुम्हीं आणि तसेंच वरुण, मित्र आणि अर्यमा हे सर्व प्रेमळच आहांत ११. —प्रज्ञावीर अश्वीहो, तुम्ही दिलेलें किंवा देण्यासाठीं आणलेलें जें ऐश्वर्य आहे तें, हे वीर्यशाली देवानों, आमच्या यज्ञमानांकडून आम्हांला प्रतिदिनी देत जा १२. —जो (तुमचा यज्ञ) यज्ञांनींच अलंकृत होतो, त्याला वस्त्रावगुण्ठित नववधू ( ला भूषवावें त्या ) प्रमाणें भूषितकरून, हे अश्वीहो, तुम्हीं मंगलमय करतां १३. —तुमचा मार्ग अतिशय निर्मर्याद आहे, शूरांनींच रक्षण करण्यास तो योग्य आहे हें जो जाणतो त्याच्या वसतिस्थानांकडे हे भक्तवत्सल अश्वीनों, तुम्हीं वळसा घेऊनहि जा १४. —शूरांनीं रक्षण करण्याला योग्य असें जें यज्ञगृह त्याच्याकडे हे वीर्यधनाढ्य अश्वीहो, तुम्हीं आम्हांकरितां या. वाणाच्या धोरणानें ( जाऊन ) शिकार हुडकून काढावी त्याप्रमाणें यज्ञ ( कोठें आहे तें ) आमच्या स्तवनाच्या योगानें तुम्हीं जाणलेंच आहे १५. —आमचें स्तवन तुम्हांला झटपट घेऊन घेऊन येण्यांत फारच दक्ष आहे. तें स्तवनच, हे शूरानों, आमचा दूत होऊन तुम्हांला

---

विश्वम् आनुषक् मक्षूभिः परिहीयथः । धियंजिन्वा मधुवर्णा शुभस्पती ॥ ६ ॥ उप नो यातम् अश्विना राया विश्वपुषा सह । मघवाना सुवीरौ अनपच्युता ॥ ७ ॥ आ मे अस्य प्रतीव्यम् इन्द्रनासत्या गतम् । देवा देवेभिर् अद्य सचनस्तमा ॥ ८ ॥ वयं हि वाम् हवामहे उक्षण्यन्तो व्यश्ववत् । सुमतिभिर् उप विप्रौ इहा ऽऽ गतम् ॥ ९ ॥ अश्विना सु ऋषे स्तुहि कुवित् ते श्रवतो हवम् । नेदीयसः कूळयातः पणीन् उत ॥१०॥ वैयश्वस्य श्रुतं नरा उतो मे अस्य वेदथः । सजोषसा वरुणो मित्रो अर्यमा ॥ ११ ॥ युवादत्तस्य धिष्ण्या युवानीतस्य सूरिभिः । अहरह वृषणा मह्यं शिक्षतम् ॥ १२ ॥ यो वां यज्ञेभिर् आवृतः अधिवस्त्रा वधूर् इव । सपर्यन्ता शुभे चक्राते अश्विना ॥१३॥ यो वाम् उरुव्यचस्तमं चिकेतति नृपाय्यम् । वर्तिर् अश्विना परि यातम् अस्मयू ॥१४॥ अस्मभ्यं सु वृषण्वसू यातं वर्ति र्नृपाय्यम् । विषुद्रुहेव यज्ञम् ऊहथु र्गिरा ॥ १५ ॥

पाचारण करो. हे अश्वीनों, तें स्तवन तुम्हां उभयतां प्रीत्यर्थच असो १६. —तुम्हीं त्या द्युलोकाच्या समुद्रांत, किंवा काव्यस्फूर्तिच्या सदनांत उल्लसित होतां तर हे अमर देवानों, माझी प्रार्थना तरी ऐकून घ्या १७. —तसेंच नद्यांमध्यें ती शुभ्रजला **श्वेतयावरी** नदी, आणि सुवर्णप्रवाहाची **सिन्धु** नदी ही देखील तुम्हांला फारच त्वरित घेऊन येणारी आहे १८. —जिच्यामुळें ( तुमचें ) कीर्तन उत्तम होतें आणि हे अश्वीहो, जी निर्मल अंतःकरणानें केली जाते अशा ह्या मनोहर स्तुतींच्या योगानें, हे उज्जलमार्गगामी अश्वीहो, तुम्हांला ( भक्त ) घेऊन येतात १९. —जे रथाला सहज ओढूं शकतात असे अश्व रथाला जोड, आणि त्या पुष्ट अश्वांच्या पाठीवर थाप मारून, हे दिव्यनिधे, वायु, त्यांना भरधांव सोड, आमचा मधुर सोमरस प्राशन कर आणि आमच्या सोमसवनांच्या वेळीं तूं प्राप्त हो २०. —हे वायु, हे सत्धर्मांच्या पालका, हे त्वष्ट्याच्या जामाता, हे आश्चर्यरूपा, तुझ्या कृपालोभाची आकाङ्क्षा आम्हीं धरीत आहों २१. —त्वष्ट्याचा जामात, आणि ( अविनाशी ) संपत्तीचा प्रभु जो वायु त्याच्याजवळ आम्हीं सोमार्पण करणारे भक्त तेजोमय संपत्तीचें मागणें मागत आहों २२. —मंगलरूपा वायुदेवा, द्युलोकांतून येथें ये, तुझा तेजोरूप उत्कृष्ट अश्वसमुदाय घेऊन ये; तुझे विस्तीर्ण पंखांचे अश्व रथाला जोडून इकडे ये २३. —अत्यंत शोभनस्वरूप अशा तुजला शूर भक्तांच्या यज्ञमंडपांत आम्हीं पाचारण करीत आहों. अश्वांच्या पाठीप्रमाणें तुळतुळीत अशा ( सोमरस पिळण्याच्या ) ग्राव्याला घेऊन हविर्दानानें तुजला पाचारण करीत आहोंत २४. —हे वायुदेवा, सर्वांत अग्रेसर असा तूं याप्रमाणें मनानें संतुष्ट होऊन, सत्वसामर्थ्य, सत्कर्म, आणि सद्‌बुद्धि हांचा आम्हांला लाभ घडीव २५.

---

वाहिष्ठो वाम् हवानां स्तोमो दूतो हुवत् नरा । युवाभ्यां भूतु अश्विना ॥ १६ ॥ यत् अदो दिवो अर्णवे इषो वा मदथो गृहे । श्रुतम् इत् मे अमर्त्या ॥ १७ ॥ उत स्या श्वेतयावरी वाहिष्ठा वां नदीनाम् । सिन्धुर्हिरण्यवर्तनिः ॥१८॥ स्मत् एतया सुकीर्त्या अश्विना श्वेतया धिया । वहेथे शुभ्रयावाना ॥ १९ ॥ यक्ष्वा हि त्वं रथासहा युवस्व पोष्या वसो । आत् नो वायो मधु पिबा अस्माकं सवना ऽऽ गहि ॥२०॥ तव वायो ऋतस्पते त्वष्टुर्जामातर् अद्भुत । अवांसि आ वृणीमहे ॥ २१ ॥ त्वष्टुर्जामातरं वयम् ईशानं राय ईमहे । सुतावन्तो वायुं द्युम्ना जनासः ॥ २२ ॥ वायो याहि शिवा दिवो वहस्वा सु स्वश्व्यम् । वहस्व महः पृथुपक्षसा रथे ॥ २३ ॥ त्वां हि सुप्सरस्तमं नृषदनेषु हूमहे । ग्रावाणं न अश्वपृष्ठं मंहना ॥ २४ ॥ स त्वं नो देव मनसा वायो मन्दान अग्रियः । कृधि वाजाँ अपो धियः ॥ २५ ॥

---

## सूक्त २७

स्तोत्रसंकीर्तन चालू असतांना, ह्या निर्विघ्न अध्वरयागामध्यें अग्नीची स्थापना (वेदीवर) झाली आहे, आणि ग्रावे, कुशासन हीं आपआपल्या जागीं ठेवलीं आहेत; तर आतां मीं ऋक्स्तोत्रानें मरुत् ब्रह्मणस्पति, या देवांजवळ त्यांच्या उत्तमोत्तम कृपाप्रसादांची याचना करतों १. —(हे अग्निदेवा,) तूं उषःकालीं आणि तसाच रात्रींहि, यज्ञपशू, पृथिवी, वनस्पति, आणि ओषधि ह्यांच्याकडे आगमन करतोस, तर हे दिव्यनिधींहो, हे अखिल ज्ञानसंपन्न विभूति हो, आमच्या सद्बुद्धींचे तुम्हीं संरक्षक व्हा २. —हा आमचा पुरातन अध्वरयाग, अग्नि आदित्य सद्धर्मप्रतिपालक वरुण आणि अखिल तेजांचे निधि मरुत् या सर्वांना उत्तम रीतीनें जाऊन पोहोंचो ३. —सर्व संपत्तींचे प्रभु आणि शत्रुसंहारक जे सकल दिव्यविवुध, ते मानव वंशाचा उत्कर्ष घडवून आणोत. हे सकल संपत्तींच्या प्रभूंनों, तुम्हीं आपल्या अनिर्बाध संरक्षणांच्या योगानें, ज्यामध्यें घातपात मुळींच नाहीं असें (शांत) आश्रयस्थान आम्हांस अर्पण करा ४. —आज तुम्हीं सकल एकविचाराचे भक्तवत्सल दिव्यविवुध आमच्याकडे आगमन करा. हे मरुतानों, हे अदितिदेवी, आमच्या ऋक्स्तुतींनें (संतुष्ट होऊन) ह्या आपल्या गृहांत, आपल्या श्रेष्ठ निवासस्थानांत (आगमन करा) ५. —हे मरुतानों, हे मित्रा, तुम्हांला प्रिय असे जे अश्व, आणि जीं हविरन्नें येथें आहेत त्या प्रिय पदार्थांकडे तुम्हीं आगमन करा; तसेंच इन्द्र, वरुण, आणि त्वरित गमन करणारे वीराग्रणी आदित्य तेहि ह्या आमच्या कुशासनावर आरोहण करोत ६. —आम्हीं तुम्हांकरितां कुशासन ठाकठिकीनें मांडून, उत्तम हविरन्न सिद्ध करितों; आणि लागलाच सोमरस पिळून ठेऊन, हे वरुणा, मनुराजाप्रमाणें अग्नि प्रज्वलित करून तुजला नम्रपणानें पाचारण करितों ७. —हे मरुतानों, हे

## सूक्तम् २७

वैवस्वतो मनुः विश्वेदेवाः बृहती

अग्निर् उक्थे पुरोहितो ग्रावाणो बर्हिर् अध्वरे । ऋचा यामि मरुतो ब्रह्मणस्पतिं देवाँ अवो वरेण्यम् ॥ १ ॥ आ पशुं गासि पृथिवीं वनस्पतीन् उषसा नक्तम् ओषधीः । विश्वे च नो वसवो विश्ववेदसो धीनां भूत प्रावितारः ॥ २ ॥ प्र सू नः एतु अध्वरः अग्ना देवेषु पूर्व्यः । आदित्येषु प्र वरुणे धृतव्रते मरुत्सु विश्वभानुषु ॥३॥ विश्वे हि ष्मा मनवे विश्ववेदसो भुवन् वृधे रिशादसः । अरिष्टेभिः पायुभि विश्ववेदसो यन्ता नः अवृकं छर्दिः ॥ ४ ॥ आ नो अद्य समनसो गन्ता विश्वे सजोषसः । ऋचा गिरा मरुतो देवि अदिते सदने पस्त्ये महि ॥ ५ ॥ अभि प्रिया मरुतो या वो अश्व्या हव्या मित्र प्रयाथन । आ बर्हिर् इन्द्रो वरुणस् तुरा नरः आदित्यासः सदन्तु नः ॥ ६ ॥ वयं वो वृक्तबर्हिषो हितप्रयस आनुषक् । सुतसोमासो वरुण

विष्णो, हे अश्वीहो, हे पूषा, अंतःकरणपूर्वक केलेल्या माझ्या प्रार्थनेनें तुम्हीं दयार्द्र होऊन या. इन्द्र हा सर्वांत अग्रेसर आहे तोहि आगमन करो. इच्छित प्राप्त करून घेणाऱ्या आम्हांकडूनच वीर्यशाली आणि वृत्रनाशन इन्द्राचें स्तवन होत असतें ८. —द्वेषरहित विबुधानों, अभंग असें जें आश्रयस्थान तें आम्हांस द्या. म्हणजे हे दिव्यनिधीनों, त्या संरक्षक चिलखताला कोणीहि दुरून किंवा जवळून देखील धक्का लावूं शकणार नाहीं ९. —तुम्हीं सर्व जण अगदीं एकाच स्वरूपाचे आहांत; शत्रुसंहारक देवांनों, तुम्हीं एकमेकांचे आप्तच आहांत. तर अगदीं पहिल्यानें आमचें कल्याण होवो, असा आम्हांस आशीर्वाद द्या. अत्यंत अपूर्व अशा सुखाला आम्हीं त्वरित पावूं असें म्हणा १०. —ही पहा तुमची स्तुति, अभिलषणीय वस्तूचा लाभ घडावा म्हणून आम्हीं आतांच केली. सकलज्ञानसंपन्न देवानों, तुम्हांला सदैव प्रणिपात करणारा जो मी त्यानें, सामान्य नव्हे तर अगदीं अपूर्व अशी स्तुति तुम्हांला अर्पण केली ११. —पहा तो तुमचा सूर्य,—हे सन्मार्गबोधक देवांनों, तो सर्वोत्कृष्ट जगत्प्रेरक ( सूर्य ) सज्ज होऊन उदय पावला आहे; आणि त्याबरोबर, नेहमींच आतुर असलेले द्विपाद चतुष्पाद, आणि पक्षिजात हे आपआपल्या कार्यांत कसे अगदीं गढून गेले आहेत १२. —संरक्षणासाठीं, देवांना—तुम्हां देवांनाच आम्हीं हांक मारतों; इच्छित प्राप्त व्हावें म्हणून देवांची—तुम्हां देवांचीच विनवणी करतों, आणि सत्वसामर्थ्य मिळविण्याकरितां एकाग्रबुद्धीनें स्तवन करून देवांची—तुम्हां देवांचीच करुणा भाकतों १३. —हे देवांनों, मनुऋषीकरितां तुम्हीं सर्व एकाच विचारानें प्रेरित झालां; त्याच्यासाठीं तुम्हीं सर्वांनीं एकच वरदान दिलेंत; तर आज आणि पुढें देखील आमच्या मुलांबाळांना तुम्ही उत्तम रीतीनें लाभदायक व्हा १४. —कोणाचाहि द्वेष न करणाऱ्या तुम्हां दिव्यविबुधांचें स्तुतिकीर्तनांच्या प्रसंगीं मी गुणवर्णन करतों; ( कारण ) हे जगन्मित्रा वरुणा, ज्यानें

हवामहे मनुष्वत् इद्धअग्नयः ॥७॥ आ प्र यात मरुतो विष्णो अश्विना पूषन् माकी-
नया धिया । इन्द्र आ यातु प्रथमः सनिष्युभि र्वृषा यो वृत्रहा वृणे ॥ ८ ॥ वि नो
देवासो अद्रुहो अच्छिद्रं शर्म यच्छत । न यत् दूरात् वसवो नू चित् अन्तितो वरूथं
आदधर्षति ॥९॥ अस्ति हि वः सजात्यं रिशादसो देवासो अस्ति आप्यम् । प्रणः
पूर्वस्मै सुविताय वोचत मक्षू सुम्नाय नव्यसे ॥ १० ॥ इदा हि वः उपस्तुतिम् इदा
वामस्य भक्तये । उप वो विश्ववेदसो नमस्यु राँ असृक्षि अन्याम् इव ॥ ११ ॥ उदु
स्य वः सविता सुप्रणीतयो अस्थात् ऊर्ध्वो वरेण्यः ॥ नि द्विपाद श्चतुष्पादो अर्थिनः
अविश्रन् पतयिष्णवः ॥ १२ ॥ देवंदेवं वः अवसे देवंदेवम् अभिष्टये । देवंदेवं
हुवेम वाजसातये गृणन्तो देव्या धिया ॥ १३ ॥ देवासो हि ष्मा मनवे समन्यवो
विश्वे साकं सरातयः । ते नो अद्य ते अपरं तुचे तु नो भवन्तु वरिवोविदः ॥ १४ ॥
प्र वः शंसामि अद्रुहः संस्थे उपस्तुतीनाम् न तं धूर्ति र्वरुण मित्र मर्त्यं यो वो

तुमचें तेजोमय स्थान मिळण्यासाठीं उपासना केली, त्याला कोणताहि अपाय होत, नाहीं १५. —तुमचा वरप्रसाद मिळावा म्हणून जो भक्त तुम्हांला आपला भक्तिभाव अर्पण करतो, तो अचलस्थानाला आणि श्रेष्ठ अशा मनोत्साहाला निश्चितपणें पोहोंचतो; तो आपल्या प्रजेसहवर्तमान ( जगांत ) धर्माचरणानें वर्तन करतो; ( आणि त्याचे ) सर्व लोक उपद्रवरहित राहून उत्कर्ष पावतात १६. —अर्यमा, मित्र आणि वरुण असे भक्तवत्सल आणि सारखेंच वरदान देणारे देव ज्याचें रक्षण करतात त्याला युद्ध केल्यावांचूनच लाभ होतो, आणि सुगम मार्गानींच तो नेहमीं इच्छित स्थलीं जातो १७. —चढणीच्या मैदानांतहि अशा भक्ताकरितां तुम्हीं उतार करतां, दुर्गम प्रदेशांतूनहि सहज जातां येईल अशी वाट करतां; म्हणून (शत्रूनें ) फेंकलेलें अस्त्रसुद्धां दूर जाऊन (पडो आणि) कोणालाहि इजा न करितां नष्ट होऊन जावो १८, —आज सूर्य उदय पावतांच जर, हे क्षात्रतेजप्रिय विबुधानों, तुम्हीं आम्हांला सद्धर्माचा उपदेश केला आहे; आणि सूर्यास्ताच्या वेळीं, उषःकालीं, किंवा हे सकलज्ञानसंपन्न देवानों, माध्यन्हकालीं देखील (जर तोच उपदेश केला आहे) १९. —किंवा प्रत्यक्ष आगमन करून, हे आत्मबलसंपन्न विभूतींनों, सद्धर्माचरणानें करून हवि अर्पण करणाऱ्या भक्ताला जर तुम्हीं उत्कृष्ट निवासस्थान देतां; तर हे दिव्यनिर्धानों, हे सर्वधनाढ्य विबुधांनों; आम्हीं सुद्धां त्या निवासस्थानीं राहूं असें करा २०. —जर आज सूर्य उदय पावतांच, किंवा माध्यान्हकालीं, किंवा अस्तमानीं ती अभिलषणीय वस्तु हे सकलधनसंपन्न देवानों, तुम्हीं हवि अर्पण करणाऱ्या आणि ज्ञानसंपन्न मनुराजाला दिलीत २१. —तर आम्हींहि तीच वस्तु हे सर्वाधीशविभूतींनों, तीच विलोभनीय वस्तु लडिवाळ पुत्राप्रमाणें तुम्हांजवळ मागत आहों ती प्राप्त होवो; हे आदित्यानों, आम्हींहि हवि अर्पण करीत असतों, तर त्या योगानें आम्हांलाहि तिचा लाभ घडो २२.

---

धामभ्यो ऽ विधत् ॥ १५ ॥ प्र स क्षयं तिरते वि महीर् इषः यो वो वराय दाशति । प्र प्रजाभि र्जायते धर्मणस् परि अरिष्टः सर्व एधते ॥ १६ ॥ ऋते स विन्दते युधः सुगेभि र्याति अध्वनः । अर्यमा मित्रो वरुणः सरातयो यं त्रायन्ते सजोषसः ॥ १७ ॥ अज्रे चित् अस्मै कृणुथा नि अञ्चनम् दुर्गे चित् आ सुसरणम् । एषा चित् अस्मात् अशनिः परो नु सा अस्रेधन्ती विनश्यतु ॥ १८ ॥ यत् अद्य सूर्ये उद्यति प्रिय क्षत्राः ऋतं दध । यत् निम्रुचि प्रबुधि विश्ववेदसो यत् वा मध्यंदिने दिवः ॥ १९ ॥ यत् वा ऽ भिपित्वे असुरा ऋतं यते छर्दि र्येम वि दाशुषे । वयं तत् वो वसवो विश्ववेदसः उप स्थेयाम मध्य आ ॥ २० ॥ यत् अद्य सूरे उदिते यत् मध्यन्दिन आतुचि । वामं धत्थ मनवे विश्ववेदसो जुह्वानाय प्रचेतसे ॥ २१ ॥ वयं तत् वः सम्राज आ वृणीमहे पुत्रो न बहुपाय्यम् । अश्याम तत् आदित्या जुह्वतो हवि र्येन वस्योऽनशामहै ॥ २२ ॥

## सूक्त २८

जे तीस आणि अधिक तीन इतके दिव्यविभूति कुशासनावर विराजमान झाले आहेत त्यांनीं सर्व जाणलें, आणि पहा, दोन्हीं प्रकारांनीं वरदान दिलें १. —सुवरद वरुण, तसेंच अर्यमा आणि उत्तम आहुतींचा स्वीकार करणारे आहवनीयादि अग्नि, हे आपल्या शक्तिसह प्राप्त झाले आणि त्यांना वषट् शब्दोच्चारानें हविर्भाग मिळाला २. ते पाठीमागून, वरून, येथें, खालीं आणि समोर अशा सर्व बाजूंनीं आमचें रक्षण करणारे आहेत ३. —देव जशी इच्छा करतात तसेंच होतें. आणि कोणीहि दुष्ट अधार्मिक मनुष्य त्यांच्या त्या इच्छेला मोडून काढूं शकत नाहीं ४. —( त्यांच्यापैकीं ) सातांजवळ सात भाले असतात, त्यांचीं तेजस्वी वलयें सात आहेत आणि त्यांनीं शोभा धारण केल्या आहेत त्याहि सातच आहेत ५.

## सूक्त २९

त्यांतील एक किंचित् पिंवळसर, सर्वसंचारी, शूर आणि तरुण आहे त्याच्या अंगावरील सुवर्णभूषण स्पष्टपणें दृग्गोचर होतें १. —दुसरा एक आपल्या स्थानीं विराजमान झाला आहे, तो देदीप्यमान आणि देवांमध्यें अत्यंत प्रज्ञावान् आहे २. —एक आपल्या हातांत पोलादाची वरची धारण करतो, आणि देवांमध्यें ( संग्रामांत ) अगदीं अचल राहतो ३. —एक आपल्या हातीं व्यवस्थित असें वज्र धारण करतो,

## सूक्तम् २८

मनुः विश्वेदेवाः उष्णिक्

ये त्रिंशति त्रयस् परो देवासो बर्हिर् आऽसदन् । विदन् अह द्विता ऽ सनन् ॥१॥ वरुणो मित्रो अर्यमा स्मत् रातिषाचो अग्नयः । पत्नीवन्तो वषट् कृताः ॥२॥ ते नो गोपा अपाच्यास् ते उदक् त इत्था न्यक् । पुरस्तात् सर्वया विशा ॥ ३ ॥ यथा वशन्ति देवास् तथेत् असत् । तदेषां नकिर् आ मिनत् ॥ अरावा चन मर्त्यः ॥ ४ ॥ सप्तानां सप्त ऋष्टयः सप्त द्युम्नानि एषाम् । सप्तो अधि श्रियो धिरे ॥ ५ ॥

## सूक्तम् २९

मारीचः कश्यपः विश्वेदेवाः विराट्

बभ्रुर् एको विषुणः सूनरो युवा अञ्जि अङ्क्ते हिरण्ययम् ॥ १ ॥ योनिम् एकः आ ससाद द्योतनः अन्त र्देवेषु मेधिरः ॥ २ ॥ वाशीम् एको बिभर्ति हस्त आयसीम्

आणि त्या योगानें वृत्रराक्षसांचा निःपात करतो ४. —एक आपल्या हातांत फारच तीव्र असें शस्त्र धारण करतो; तो उग्र खरा, परंतु पवित्र आणि आरोग्यकारक औषधें प्राप्त करून देणाराहि आहे ५. —एक ( पुढें जाणाऱ्या ) वाटाड्याप्रमाणें मार्गांना प्रशस्त करतो, आणि भूमीगत निधान कोठें आहे तेंहि त्याला कळतें ६. —एक जो सर्वगामी विभूति तीन पावलें चालून गेला आहे, त्यांच्या ठिकाणीं प्रत्यक्ष देवसुद्धां तल्लीन होतात ७. —पक्षी जोडलेल्या ( वाहनाच्या )योगानें दोघेजण आपल्या बरोबर एक स्त्री घेऊन प्रवाशाप्रमाणें मार्गक्रमण करतात ८. —परस्परांचीच ज्यांना उपमा साजते असे दुसरे दोघेजण जगताचे सम्राट् असून द्युलोकीं वास करतात; त्यांच्या प्रीत्यर्थ घृताहुति अर्पण होत असतात ९. —आणि कांहींजण उच्च स्वरांत ऋक्स्तोत्र म्हणणारे असतात, ते "बृहत्" सामाचें मनन करतात ( आणि आपल्या तेजानें ) सूर्याला देखील प्रकाशित करतात १०.

## सूक्त ३०

तुमच्यामध्यें कोणीहि अगदीं लहान बालक नाहीं, किंवा हे देवांनों, कोणी कुमारहि नाहीं. तुम्ही सर्व सारखेच थोर आहांत १. —याप्रमाणें तुमचें स्तवन झालें, ( पण ) हे शत्रुनाशकानों, तुम्हीं जे तीन आणि तीस आहांत, ते हे यजनीय देवांनों, तुम्हीं मनूचे आहांत २. —असे ते तुम्हीं आमचें रक्षण करा, आम्हांवर कृपा करा, आम्हांला आशीर्वाद द्या; आणि आमचा पूर्वज जो पिता मनु त्याच्या पुरातन मार्गापासून

---

अन्त देवेषु निध्रुवि ॥ ३ ॥ वज्रम् एको बिभर्ति हस्त आहितं तेन वृत्राणि जिघ्नते ॥ ४ ॥ तिग्मम् एको बिभर्ति हस्त आयुधं शुचिर् उग्रो जलाषभेषजः ॥ ५ ॥ पथ एकः पीपाय तस्करो यथा एषः वेद निधीनाम् ॥ ६ ॥ त्रीणि एकः उरुगायो विचक्रमे यत्र देवासो मदन्ति ॥ ७ ॥ विभि द्वा चरतः एकया सह प्र प्रवासेव वसतः ॥ ८ ॥ सदो द्वा चक्राते उपमा दिवि सम्राजा सर्पिरासुती ॥ ९ ॥ अर्चन्त एके महि साम मन्वत तेन सूर्यम् अरोचयन् ॥ १० ॥

## सूक्तम् ३०

### ऋषि पूर्ववत्

न हि वो अस्ति अर्भको देवासो न कुमारकः । विश्वे सतोमहान्त इत् ॥ १ ॥ इति स्तुतासो असथा रिशादसो ये स्थ त्रयश्च त्रिंशत् च । मनो देवा यज्ञियासः ॥ २ ॥ ते नस् त्राध्वं तेऽवत ते उ नो अधिवोचत । मा नः पथः पित्र्यात्

आम्हांस भलतीकडे दूर जाऊं देऊं नका ३. —हे सकलविभूतीनों, तुम्हीं जे येथेंच (यज्ञमंदिरांत) आहांत ते तुम्हीं (ज्ञान) गोधन आणि अश्वसंपत्ति यांच्यासाठीं आम्हांला प्रशस्त आणि कल्याणप्रद असें स्थान द्या ४.

## सूक्त ३१

जो यज्ञ करतो, किंवा नुसती उपासनाच करतो; जो सोमरस अर्पण करतो आणि पुरोडाश पक्व करतो तो ब्रह्मसूक्तांनीं स्तवनकरणारा भक्तच इन्द्राला प्रिय होतो १. —जो ह्या इन्द्राला पुरोडाश, सोमरस आणि दुग्धयुक्त हवि अर्पण करतो त्याचेंच पातकापासून रक्षण तो सर्वसमर्थ देव करतो २. —त्याचा रथ यशानें तेजस्वी होईल, त्याला देवाकडून प्रेरणा मिळून तो सर्व शत्रूंना पादाक्रांत करून उत्कर्षाला पावेल ३. —त्याच्याच गृहांत संततियुक्त, धेनुयुक्त, आणि सतत टिकणारी उत्साहसमृद्धि राहून त्याला प्रतिदिनीं इच्छितदुग्ध देईल ४. —जे पतिपत्नी अगदीं मनःपूर्वक सोमरस पिळून सिद्ध करतात, आणि हे देवांनों, तो रस निर्मळ दुग्धहविशीं (मिश्र करून) गाळून स्वच्छ करतात ५. —त्या उभयतांना उत्तम अन्न प्राप्त होतें; त्यांचा एक विचार निश्चल राहतो आणि यज्ञ शेवटास जातो..सत्वसामर्थ्यांत त्यांना कधींच उणीव पडत नाहीं. ६. —ते देवांशीं प्रतारणा करीत नाहींत किंवा त्यांचा प्रेमळपणा झांकूनहि ठेवीत नाहींत, (त्यामुळें) ते फारच प्रख्यातीस पावतात ७. —ते उभयतां पुत्रयुक्त आणि कन्या-

मानवात् अधि दूरं नैष्ट परावतः ॥ ३ ॥ ये देवास इह स्थन विश्वे वैश्वानरा उत । अस्मभ्यं शर्म सप्रथो गवे अश्वाय यच्छत ॥ ४ ॥

## सूक्तम् ३१

वैवस्वतो मनुः दम्पती विषयकं अनुष्टप्

यो यजाति यजात इत् सुनवत् च पचाति च । ब्रह्मेत् इन्द्रस्य चाकनम् ॥१॥ पुरोळाशं यो अस्मै सोमं ररत आशिरम् । पात् इत् तं शक्रो अंहसः ॥ २ ॥ तस्य द्युमान् असत् रथो देवजूतः स शूशुवत् । विश्वा वन्वन् अमित्रिया ॥ ३ ॥ अस्य प्रजावती गृहे असश्चन्ती दिवेदिवे । इळा धेनुमती दुहे ॥ ४ ॥ या दम्पती समनसा सुनुतः आ च धावतः । देवासो नित्ययाऽऽशिरा ॥ ५ ॥ इति प्राशव्यान् इतः सम्यञ्चा बर्हिर् आशाते । न ता वाजेषु वायतः ॥ ६ ॥ न देवानाम् अपि ह्नुतः सुमतिं न जुगुक्षतः । श्रवो बृहत् विवासतः ॥ ७ ॥ पुत्रिणा ता कुमारिणा विश्वम् आयु र्वि

युक्त होऊन आणि सुवर्णाप्रमाणें अंगकान्ति राखून आपलें सर्व आयुष्य उत्तम रीतीनें उपभोगतात ८. —यज्ञ आणि देवाची स्तुति हेंच त्यांना प्रिय. ते आपल्या संपत्तीचा सदुपयोग करून अमर होण्यासाठीं (प्रार्थना) अर्पण करतात. आणि मृदु केशांनीं (म्हणजे पल्लवांनीं) युक्त अशी (सोमवल्लीची) कांस पिळतात आणि देवांच्या ठिकाणीं निष्ठा ठेवतात ९. —पर्वतांचा आणि तसाच नद्यांचा सुखाश्रय आम्हीं भक्तांजवळ नेहमीं राहणारा जो विष्णू त्याच्यापाशीं मागत आहों १०. —(आम्हांकडे) पूषा आगमन करो; तोच (आमचें) अविनाशी धन, तोच आमचें भाग्य, तोच मंगल आहे. तो आमचे सर्व मनोरथ अगदीं भरपूर पुरविणारा आहे. त्याचा मार्ग आमच्या कल्याणासाठीं विस्तृतच आहे ११. —ज्याच्यावर कोणींहि हात उगारूं शकत नाहीं असा **अरमति विश्व,** हा देवाला उचित अशा (थोर) मनानें आदित्यामध्यें निष्कलंक आहे १२. —आणि त्यामुळें मित्र, वरुण आणि अर्यमा हे आमचे रक्षण करणारे होतात; आणि सद्धर्मांचा मार्ग सुगम होतो १३. —तुमचा जो सनातन अग्नि, जो उत्कृष्ट निधींचा देव, त्याचें आम्हीं स्तुतींनीं संकीर्तन करतों. सर्व लोकांना प्रिय आणि (भक्ताच्या सत्तेचें) क्षेत्र वाढविण्यांत मित्राप्रमाणें सहाय करणारा (जो अग्नि) त्याचें स्तवन करतों १४. —देवभक्ताचा रथ कितींतरी जलद धांवतो. कितीही युद्धें होवोत, त्यांत तो भक्त शूरच ठरतो; (कारण) जो यज्ञकर्ता यजमान देवांचें मन प्रसन्न करण्यासाठीं यजन करतो, तोच अधार्मिक दुष्टांवर जय मिळवितो १५. —हे यजमाना, हे सोमार्पण करणाऱ्या देवोपासका, तुझी कधींहि हानि होणार नाहीं. (कारण) जो यज्ञकर्ता यजमान देवांचें मन प्रसन्न करण्यासाठीं यज्ञ करतो, तोच अधार्मिक दुष्टांवर जय मिळवितो १६. —कर्तृत्वानें त्याच्या बरोबरीला कोणी येऊं शकत नाहीं; त्याला कोणी दूर लोटून देत नाहीं; आणि तोहि कोणाला दूर लोटीत नाहीं १७. —उत्कृष्ट

---

अश्नुतः। उभा हिरण्यपेशसा ॥ ८ ॥ वीतिहोत्रा कृतद्वसू दशस्यन्ताऽमृताय कम्। सम् ऊधो रोमशं हतो देवेषु कृणुतो दुवः ॥ ९ ॥ आ शर्म पर्वतानां वृणीमहे नदीनाम्। आ विष्णोः सचा भुवः ॥ १० ॥ ऐतु पूषा रयिर् भगः स्वस्ति सर्वधातमः। उरुर् अध्वा स्वस्तये ॥ ११ ॥ अरमतिर् अनर्वणो विश्वो देवस्य मनसा। आदित्यानाम् अनेह इत् ॥ १२ ॥ यथा नो मित्रो अर्यमा वरुणः सन्ति गोपाः। सुगा ऋतस्य पन्थाः ॥ १३ ॥ अग्निं वः पूर्व्यं गिरा देवम् ईळे वसूनाम्। सपर्यन्तः पुरुप्रियम् मित्रं न क्षेत्रसाधसम् ॥ १४ ॥ मक्षू देववतो रथः शूरो वा पृत्सु कासु चित्। देवानां य इत् मनो यजमान इयक्षति। अभीत् अयज्वनो भुवत् ॥ १५ ॥ न यजमान रिष्यसि न सुन्वान न देवयो। देवानां यः इत् मनो यजमान इयक्षति। अभीत् अयज्वनो भुवत् ॥ १६ ॥ नकिष्टं कर्मणा नशत् न प्र योषत् न योषति। देवानां य इत् मनो यजमान इयक्षति। अभीत् अयज्वनो भुवत् ॥ १७ ॥ असत्

वीर्यशालित्व त्याच्या ठिकाणीं राहो आणि वेगवान् अश्वांचा समुदायहि त्याच्याच जवळ असो १८.

दुसरा अध्याय समाप्त

## अध्याय तिसरा

## सूक्त ३२

( युद्धांत ) धुमश्चक्री उडवून देणारा जो इन्द्र त्यानें सोमरसाच्या आवेशांत केलेले पराक्रम, हे कण्वकुलोत्पन्नानों, तुम्हीं वर्णन करा १. —तो इन्द्र कसा तर ज्या भीषण वीरानें **सृबिन्द, अनर्शनि, पिप्रु**, आणि **अहीशु** ह्या दुरात्म्यांचा वध करून ज्ञानोदकें खुलीं करून दिलीं २. —अवाढव्य देहाचा जो अर्बुद त्याचें धूड शरीर आणि त्याची गढी ह्यांचा एकदमच पार धुव्वा उडवून दिला, तोहि पराक्रम, हे इन्द्रा, तूंच केलास ३. —पर्वतावरून खालीं कोसळणाऱ्या पाण्याच्या लोंढयाप्रमाणें ज्याचा धडाका, त्या सुंदर मुकुटधारी इन्द्राला, स्तुतिश्रवणासाठीं, आणि तुमच्या रक्षणासाठीं, आम्हीं पाचारण करतों ४. —( प्रकाशरूप ) गोधनें आणि ( उत्साहरूप ) अश्व ह्यांच्या आवाराचीं वंद कवाडें, हे वीरा, शत्रूचें नगर हस्तगत करावें त्याप्रमाणें, तूं सोमरसानें हर्षनिर्भर होऊन खुलीं करतोस ५. —जर मी अर्पण केलेल्या सोमरसाकडे तुझें मन ओढत असेल, जर माझ्या सामगायनाची तुला आवड असेल, तर तुझ्या दैवी सुस्वभावास अनुसरून तूं आमच्याकडे ये ६. —पहा, आम्हीं स्तोतृजन तुझे आहोंत; तर हे स्तुतिप्रिया देवा, हे सोमरसप्राशका इन्द्रा, आम्हांला प्रोत्साहन दे ७. —तूं प्रसन्न होऊन आम्हांला पुष्टि दे. ( तुला काय कमी ? ) हे भगवंता, तुझें धन अपरिमित आहे ८. —आम्हांला गोधनवान्

---

अत्र सुवीर्यम् उत त्यत् आशु अश्व्यम् । देवानां य इत् मनो यजमान इयक्षति । अभीत् अयज्वनो भुवत् ॥ १८ ॥

इति षष्ठे द्वितीयोऽध्यायः

## अथ षष्ठे तृतीयोऽध्यायः

## सूक्तम् ३२

काण्वो मेधातिथिः इन्द्रः गायत्री.

प्र कृतानि ऋजीषिणः कण्वा इन्द्रस्य गाथया । मदे सोमस्य वोचत ॥ १ ॥ यः सृबिन्दम् अनर्शनिं पिप्रुं दासम् अहीशुवम् । वधीत् उग्रो रिणन् अपः ॥ २ ॥ नि अर्बुदस्य विष्टपं वर्ष्माणं बृहतस् तिर । कृषे तत् इन्द्र पौंस्यम् ॥ ३ ॥ प्रति श्रुताय वो धृषत् तूर्णाशं न गिरेर् अधि । हुवे सुशिप्रम् ऊतये ॥ ४ ॥ स गोर् अश्वस्य वि व्रजं मन्दानः सोम्येभ्यः । पुरं न शूर दर्षसि ॥ ५ ॥ यदि मे रारणः सुते उक्थे वा दधसे चनः । आरात् उप स्वधा ऽऽ गहि ॥ ६ ॥ वयं घा ते अपि स्मसि स्तोतार इन्द्र गिर्वणः । त्वं नो जिन्व सोमपाः ॥ ७ ॥ उत नः पितुम् आ भर संरराणः

संपत्तिमान् आणि अश्ववान् कर; म्हणजे सहजच आम्हीं हविर्भागांनीं ( यज्ञांची ) एकच गर्दी उडवून देऊं ९. —"वृवत्" साम हें नामांकित स्तोत्र ज्याच्याप्रीत्यर्थ म्हणतात, ज्याचे हस्त भक्तसहायार्थ नेहमीं पुढें सरसावलेलेच असतात त्या इन्द्राचा धांवा आम्हीं संरक्षणाकरितां करीत आहों; आम्हांवर कृपा करावी म्हणून त्या जगत्‌हितकारी देवाला हांक मारीत आहों १०. —एकदां ठाण मांडलें म्हणजे "शतक्रतु" ( अथवा असंख्य पराक्रम ) म्हणून जो आपलें कर्तृत्व गाजवितो, त्या वृत्रनाशन इन्द्राजवळ अपार ऐश्वर्य भक्तासाठीं ( सांठविलेलें ) आहे ११. —तो सर्वसमर्थ दातृश्रेष्ठ देव आम्हांलाहि समर्थ करील. कारण, तो इन्द्रच आमच्यामध्यें जी जी उणीव असते ती भरून काढतो १२. तो अक्षय संपत्तिचा महासागर, भक्ततारक, सोमरस अर्पण करणाऱ्याचा मित्र आहे, म्हणूनच इन्द्राचें गुणगायन करा १३. —जो जगन्नियामक, युद्धांमध्यें अगदीं ठाम उभा, जो यशाचा विजयीवीर आणि ओजस्वितेनें सकलांचा प्रभु आहे त्याचें संकीर्तन करा १४. ह्याच्या शक्तींचें किंवा सौजन्याचें नियमन करण्याची कोणाचीहि प्राज्ञा नाहीं; आणि भक्तांना तो कांहीं देत नाहीं असेंहि कोणास म्हणतां येणार नाहीं १५. —म्हणूनच ब्रह्मस्तुति करणारे, सोमरसाचा प्रसाद गृहण करणारे, आणि सोमरस पिळून सिद्ध करणारे जे भक्त आहेत त्यांचें ( देवाकडे ) कांहींच ऋण उरलें नाहीं, किंवा त्यांनीं सोमरस निरर्थक प्राशन केला असेंहि कधीं झालेलें नाहीं १६. —स्तवनयोग्य जो इन्द्र त्याच्याचप्रीत्यर्थ कीर्तन करा, त्याच्याच गुणवर्णनपर सामगायनें म्हणा त्याच स्तवनीय इन्द्राप्रीत्यर्थ ब्रह्म ( स्तवन ) म्हणा १७. —ज्या स्तवनयोग्य इन्द्रानें, ज्या सत्वसामर्थ्याढ्य आणि दुर्निवार देवानें शेंकडोंच काय पण, सहस्रावधि शत्रूंच्या चिंधड्या उडवून दिल्या, तोच इन्द्र भक्तांचा उत्कर्ष करणारा आहे १८, —आपल्या दैवी स्वभावास अनुसरून आणि भक्तांच्या हांकेला धांवून चोहोंकडे संचार कर, आणि, हे इन्द्रा,

---

अविक्षितम् । मघवन् भूरि ते वसू ॥ ८ ॥ उत नो गोमतस् कृधि हिरण्यवतो अश्विनः । इळाभिः संरभेमहि ॥ ९ ॥ बृबत्उक्थं हवामहे सृप्रकरस्नम् ऊतये । साधु कृण्वन्तम् अवसे ॥ १० ॥ यः संस्थे चित् शतक्रतुर् आत् ईं कृणोति वृत्रहा । जरितृभ्यः पुरूवसुः ॥ ११ ॥ स नः शक्र श्चित् आ शकत् दानवान् अन्तराभरः । इन्द्रो विश्वाभिर् ऊतिभिः ॥ १२ ॥ यो रायो ३ वनि र्महा न्त्सुपारः सुन्वतः सखा । तम् इन्द्रम् अभि गायत ॥ १३ ॥ आयन्तारम् महि स्थिरं पृतनासु श्रवोजितम् । भूरेर् ईशानम् ओजसा ॥ १४ ॥ नकिर् अस्य शचीनां नियन्ता सूनृतानाम् । नकि र्वक्ता न दात् इति ॥ १५ ॥ न नूनम् ब्रह्मणाम् ऋणं प्राशूनाम् अस्ति सृन्वताम् । न सोमो अप्रता पपे ॥ १६ ॥ पन्ये इत् उप गायत पन्ये उक्थानि शंसत । ब्रह्मा कृणोत पन्य इत् ॥ १७ ॥ पन्यः आ दर्दिरत् शतां सहस्रा वाजी अवृतः । इन्द्रो यो यज्वनो वधः ॥ १८ ॥ वि षू चर स्वधाः अनु कृष्टीनाम् अनु आ हुवः । इन्द्र पिब सुता-

सोमरस प्राशन कर १९. —तो ( रस ) तुझ्या स्वर्गीय धेनूंच्याच दुधाचा आहे. तो प्राशन कर. जो 'तुम्य' भक्ताजवळ नेहमींच असतो, आणि जो केवळ तुझाच आहे असा हा सोमरस तूं प्राशन कर २०. —जो मनुष्य रागांत असतांना सोमरस पिळतो, किंवा पातकांनीं चिडमिडलेल्या ठिकाणीं सोमाचें सवन करतो, त्याच्या सोमरसाचा त्याग कर, आणि आम्हीं हा जो रस अर्पण केला आहे तो प्राशन कर २१. —दूरच्या तिन्हीं लोकांतून ये, पंचजनांपासून निघून इकडे ये. हे इन्द्रा, आम्हीं मोठ्यानें गर्जून मारलेल्या हांकांकडे लक्ष देऊन एकदम निघून ये २२. —सूर्य जसा किरणजाल फेंकतो, त्याप्रमाणें ( आपल्या देणग्या आम्हांकडे ) फेंक; खोल जागेकडे जशीं उदकें ( लोटतात ) त्याप्रमाणें आमच्या स्तुति तुजला चोहोंकडून घेरून इकडे घेऊन येवोत २३. —हे अध्वर्यू, तूं सोमरस पात्रांत ओत; त्या मुकुटधारी शूर इन्द्राकरितां, त्यानें सोमरस प्राशन करावा म्हणून तो घेऊन ये २४. —उदकानें टचटचीत फुगलेला मेघ ज्यानें फोडून टाकला; नद्यांना नीट खालीं सोडून दिलें, आणि धेनूंमध्यें पक्व आणि रुचकर दूध निर्माण केलें २५. —त्या झुंजार इन्द्रानें **वृत्र, और्णवाभ, अहीशु** ह्या राक्षसांना ठार केलें, आणि वर्फाच्या ( अणकुचीदार ) तुकड्यानें अर्बुदाला भोसकून मारलें २६. —तो शत्रूंना भयंकर वाटतो, तो झपाट्यानें हल्ला चढविणारा आहे; तर अप्रतिहत, परंतु भक्तांच्या अगदीं जवळ उभा असा जो इन्द्र त्याच्याप्रीत्यर्थ त्या देवाच्याच कृपेनें सुचलेलें स्तोत्र म्हणा २७. —तो इन्द्र काय करतो म्हणाल तर सोमपेयाच्या हर्षावेगांत देवांच्या ठिकाणीं सर्व धमनियमांची जाणीव स्पष्टपणें उत्पन्न करतो २८. —सोनेरी अयाळाचे, आणि त्याच्या बरोबरच हर्षोत्फुल्ल होणारे हरिद्वर्ण अश्व, त्याला ह्या हव्य अशा हविरन्नाकडे घेऊन येवोत २९. —हे सर्वविश्रुता इन्द्रा, प्रियमेधानें ज्यांचें वर्णन केलें आहे असे तुझे ते हरिद्वर्ण अश्व तुजला सोमप्राशनार्थ येथें घेऊन येवोत ३०.

---

नाम् ॥१९॥ पिब स्वधैनवानाम् उत यस् तुग्र्ये सचा । उतायम् इन्द्र यस् तव ॥२०॥ अतीहि मन्युसाविनं सुषुवांसम् उपारणे । इमं रातं सुतं पिब ॥ २१ ॥ इहि तिस्रः परावतः इहि पंच जनान् अति । धेनाः इन्द्रा-वचाकशत् ॥ २२ ॥ सूर्यो रश्मिम् यथा सृजा त्वा यच्छन्तुमे गिरः । निम्नम् आपो न सध्र्यक् ॥ २३ ॥ अध्वर्यो आ तु हिं पिञ्च सोमं वीराय शिप्रिणे । भरा सुतस्य पीतये ॥२४॥ य उन्दूनः फलिगम् भिनत् न्यक् सिन्धूंर् अवा सृजत् । यो गोषु पक्वं धारयत् ॥ २५ ॥ अहन् वृत्रं ऋचीषमः और्णवाभम् अहीशुवम् । हिमेना-विध्यत् अर्बुदम् ॥ २६ ॥ प्रवः उग्राय निष्टुरे अषाळ्हाय प्रसक्षिणे । देवत्तं ब्रह्म गायत ॥ २७ ॥ यो विश्वानि अभि व्रता सोमस्य मदे अन्धसः । इन्द्रो देवेषु चेतति ॥ २८ ॥ इह त्या सधमाद्या हरी हिरण्यकेश्या । वोळ्हाम् अभि प्रयो हितम् ॥ २९ ॥ अर्वाञ्चम् त्वा पुरुष्टुत प्रियमेधस्तुता हरी । सोमपेयाय वक्षतः ॥ ३० ॥

# सूक्त ३३

सोमरस पिळून कुशासन व्यवस्थित ठेऊन, उदकप्रवाहाजवळ राहिल्याप्रमाणें, गाळण्यांतून वाहणाऱ्या सोमरसाच्या प्रवाहाजवळ, हे वृत्रनाशना, आम्हीं भक्तजन तुझी उपासना करीत आहोंत १. —सोमरस पिळून सिद्ध होतांच शूर भक्तजन तुझा जयघोष करतात; हे कल्याणनिधे देवा, सामगायकहि निर्गमनप्रसंगीं तसेंच करतात; तर मोठा आवेशी वृषभ जसा घराकडे धांवतो त्याप्रमाणें हे इन्द्रा, सोमरसाकरितां तृषित होऊन तूं आमच्या गृहाकडे केव्हां बरें येशील? २. —हे धैर्यसागरा, कण्वकुलोत्पन्नांसह तूं मोठ्या धडाक्यानें जें सत्वसामर्थ्य प्रकट केलेंस, तें हजारों प्रकारचें, सुवर्णप्रभावी आणि गोधनयुक्त सामर्थ्य आम्हांला त्वरित मिळावें असें आम्हीं हात जोडून तुजला विनीत आहों ३. —तूं सोमरस प्राशन कर; आणि हे मेधातिथे, मधुरपेयाच्या हर्षांत तूं इन्द्राप्रीत्यर्थ गायन कर. तो इन्द्र असा आहे कीं, सोमरस पिळून सिद्ध होतांच, आपल्या हरिद्वर्ण अश्वांशीं तो वज्रधारी इन्द्र आपला सुवर्णरथ जोडून देतो ४. —ज्याचा डावा हात उत्तम, आणि तसा उजवाहि उत्कृष्टच आहे, जो महत्कार्यकर्ता ईश्वर ( आहे ) त्याचें मी गुणानुवाद गातों; जो असंख्य गुणांची खाण, ज्याचें दातृत्व अपरिमित, जो शत्रुनगरें छिन्नभिन्न करतो, तोच सर्वांनीं स्तविलेला आहे ५. —जो एकदम युद्धाची धुमाळी उडवितो, जो दुर्निवार आहे, जो दाढीमिशावाल्या शत्रुसमूहांत विनदिक्कत घुसतो, ज्याचें तेजोवैभव अफाट; जो शत्रूंना उलथून पाडतो, आणि आपल्या कर्तृत्वानें जो सर्वथैव स्तुत्य आहे तो इन्द्र, कसून प्रयत्न करणाऱ्या भक्तांना कामधेनूप्रमाणें होतो ६. —सोमरस पिळून सिद्ध झाला म्हणजे ( इन्द्र ) तो रस केव्हां प्राशन करतो, आणि त्या वेळेस उत्साहपूर्ण असें तारुण्य कसें देतो हें कोणीं तरी जाणतो काय? तथापि सोमपेयाच्या हर्षानें तो मुकुटधारी इन्द्र आपल्या ओजस्वितेनें शत्रूंच्या नगरांचा विध्वंस

# सूक्तम् ३३

काण्वो मेधातिथिः इन्द्रः बृहती.

वयं घ त्वा सुतावन्तः आपो न वृक्तबर्हिषः। पवित्रस्य प्रस्रवणेषु वृत्रहन् परि स्तोतार आसते ॥ १ ॥ स्वरन्ति त्वा सुते नरो वसो निरेके उक्थिनः। कदा सुतं तृषाणः ओक आ गमः इन्द्र स्वब्दीव वंसगः ॥ २ ॥ कण्वेभि धृष्णवा-धृषत् वाजं दर्षि सहस्रिणम्। पिशङ्गरूपं मघवन् विचर्षणे मक्षू गोमन्तम् ईमहे ॥ ३ ॥ पाहि गाय अन्धसो मदे इन्द्राय मेध्यातिथे। यः संमिश्लो हर्यो यः सुते सचा वज्री रथो हिरण्ययः ॥ ४ ॥ यः सुसव्यो सुदक्षिणः इनो यः सुक्रतु गृणे। य आकरः सहस्रा यः शतामघः इन्द्रो यः पूर्भित् आरितः ॥५॥ यो धृषितो यो अवृतो यो अस्ति श्मश्रुषु स्थितः। विभूतद्युम्न श्रवनः पुरुष्टुतः क्रत्वा गौरिव शाकिनः ॥ ६ ॥ क ईं वेद सुते सचा पिबन्तं कत् वयो दधे। अयं यः पुरो विभिनत्ति ओजसा मन्दानः शिप्री

करतो तोच हा आहे येवढें खास ७. —मदानें अनिवारझालेल्या हत्तीप्रमाणें इन्द्र हा सर्वत्र संचार करतो. ( हे इन्द्रा ) तुजला कोणीहि आवरून धरूं शकत नाहीं, तरी आम्हीं सोमरस सिद्ध केला आहे तिकडे आगमन कर; तूं परमथोर आहेस. आपल्या ओजस्वितेच्या योगानें पाहिजे तिकडे जाशील ८. —जो शत्रुभयंकर आहे असा हा इन्द्र एकदां युद्धाला उद्युक्त झाला म्हणजे त्याला कोणीहि मागें परतवूं शकत नाहीं; पण भक्तांचा धांवा जर तो ऐकेल तर त्याला टाकून मात्र तो जाणार नाहीं; खास येईलच ९. —अगदीं खरोखर तूंच वीर्यशाली आहेस; म्हणून आमचाहि वीरोत्साह अनिवार होतो. हे शत्रुभयंकरा, तूं वीर दूरच्या लोकीं जसा प्रख्यात तसाच ह्या भूलोकींहि तूं वीर म्हणूनच विख्यात आहेस १०. —तुझ्या अश्वांचा लगाम वीराला शोभण्यासारखा भक्कम आहे, तुझा सोन्याचा चाबूकहि वीरोचितच आहे; हे भगवंता, तुझा रथ देखील वीराला साजेल असा आहे, तुझे अश्व वीर्यशाली आहेत, आणि हे अनंत-प्रज्ञा, तूं तर वीर्यशाली आहेसच ११. —तुझा वीर्यशाली भक्तच तुझ्याप्रीत्यर्थ सोमरस सिद्ध करो; तीव्र आवेगी वीरा, तो तूं इकडे आण. हरिद्वर्ण अश्वांवर आरूढ होणाऱ्या इन्द्रा, जो वीर्यशाली असेल तोच तुझ्याप्रीत्यर्थ सोमाला नदीमध्यें (धुण्यासाठीं) धारण करूं शकेल १२. —हे इन्द्रा, हे अत्युत्कटबलाढ्या, हा मधुर सोमरस प्राशन करण्याकरितां आगमन कर. भगवान् इन्द्र, सत्पराक्रमी इन्द्र हा, भक्तांच्या स्तुति, त्यांचीं स्तोत्रें, आणि सामगायनें अगदींच ऐकून घेणार नाहीं काय? १३. —तुज रथारूढ प्रभूला तुझे रथाला जोडलेले हरिद्वर्ण अश्व येथें आणोत. हे वृत्रनाशना, अनंतप्रज्ञा देवा, इतर लोकांच्या सोमसवनांच्या समारंभांतूनहि तुजला ते इकडे आणोत १४. —आज आमच्या स्तवनाला तूं आपल्या अगदीं अन्तःकरणांत सांठवून ठेव; हे परमपूज्य देवा, आमचीं सोमसवनें तुजला अत्यानंदप्रद होवोत, हे आकाशस्थ देवा, हे सोमप्रिया, तीं तुजला तल्लीन करोत १५. —ज्या वीरानें, ( ज्या देवानें, ) आम्हांला ( जगांत )

---

अन्धसः ॥ ७ ॥ दाना मृगो न वारणः पुरुत्रा चरथं दधे । नकि ष्ट्वा नि यमत् आ सुते गमो महाँ श्चरसि ओजसा ॥ ८ ॥ य उग्रः सन् अनिष्टृतः स्थिरो रणाय संस्कृतः । यदि स्तोतु र्मघवा शृणवत् हवम् नेन्द्रो योषति आ गमत् ॥ ९ ॥ सत्यम् इत्था वृषेत् असि वृषजूति र्नं आवृतः । वृषा हि उग्र शृण्विषे परावति वृषो अर्वावति श्रुतः ॥१०॥ वृषण स्ते अभीशवो वृषा कशा हिरण्ययी । वृषा रथो मघवन् वृषणा हरी वृषा त्वम् शतक्रतो ॥ ११ ॥ वृषा सोता सुनोतु ते वृषन् ऋजीपिन् आभर । वृषा दधन्वे वृषणं नदीषु आ तुभ्यं स्थातो हरीणाम् ॥ १२ ॥ आ इन्द्र याहि पीतये मधु शविष्ठ सोम्यम् । नायम् अच्छा मघवा शृणवत् गिरो ब्रह्म उक्था च सुक्रतुः ॥ १३ ॥ वहन्तु त्वा रथेष्ठाम् आ हरयो रथयुजः । तिर श्चित् अर्यं सवनानि वृत्रहन् अन्येषां या शतक्रतो ॥ १४ ॥ अस्माकम् अद्य अन्तमं स्तोमं धिष्व महामह । अस्माकं ते सवना

आणलें तो ना तुझ्या धोरणानें चालणार, ना माझ्या चालणार, ना दुसऱ्या कोणाच्या आज्ञेंत चालणार. ( तो स्वतःच्याच मनाप्रमाणें वागणार ) १६. —हेंहि पण इन्द्रानें सांगितलें आहे कीं स्त्रियांचें मन कोणाच्याहि ताब्यांत राहणारें नाहीं. पण त्यांचें सामर्थ्य म्हणाल तर तें मात्र अल्प आहे १७. —ही पहा दोन मदमस्त अश्वांची जोडी इन्द्राचा रथ इकडेच आणित आहे. आणि म्हणूनच त्या वीराच्या रथाची धुरा सर्वांपेक्षां उत्कृष्ट ठरली १८. —खालीं पहा, वर दृष्टि करूं नको; आपले दोन्ही पाय चांगले नीट जुळवून घे. आपले नितंब भाग दिसूं देऊं नको. ( लक्षांत ठेव कीं ) तूं स्त्री आहेस, पण या यज्ञांत मात्र ब्रह्मा झाली आहेस १९.

## सूक्त ३४

इन्द्रा, आपल्या हरिद्वर्ण अश्वांसह कण्वकुलोत्पन्नांच्या उत्तम स्तुतींकडे आगमन कर ( आणि ) ज्या ह्या दिव्य आकाशलोकावर तूं अधिकार चालवितोस त्या दिव्यलोकीं, हे दिव्यवैभवा, तूं ( नंतर ) गमन कर १. —हा सोमग्रावा मधुर शब्द करून आपल्या ध्वनीनेंच तुजला येथें घेऊन येवो ( आणि त्यानंतर )...हे दिव्यवैभवा, तूं गमन कर २. —लांडग्यापुढें मेंढीचा थरकांप व्हावा त्याप्रमाणें येथें यज्ञमण्डपांत ह्या ग्राव्यांचा टणक कंगोरा ( सोमवल्लीला ) चळचळ कांपावयास लावीत आहे, ( तर येथें ये, आणि नंतर ) ...हे दिव्यवैभवा तूं गमन कर ३. —कण्वकुलोत्पन्न भक्त, त्यांच्यावर तूं कृपा करावीस म्हणून आणि त्यांना सत्वसामर्थ्य प्राप्त व्हावें म्हणून, तुजला येथें पाचारण करीत आहेत; ( तर तूं ये, आणि नंतर ),...हे दिव्यवैभवा तूं गमन कर ४. —पेय हें

सन्तु शन्तमा मदाय द्युक्ष सोमपाः ॥ १५ ॥ नहि षस् तव नो मम शास्त्रे अन्यस्य रण्यति । यो अस्मान् वीर आ ऽ नयत् ॥ १६ ॥ इन्द्र श्चित् घा तत् अब्रवीत् स्त्रियाः अशास्यम् मनः । उतो अह क्रतुं रघुम् ॥ १७ ॥ सप्ती चित् घा मदच्युता मिथुना वहतो रथम् । एवेत् धूः वृष्ण उत्तरा ॥ १८ ॥ अध पश्यस्व मोपरि सन्तरां पादकौ हर । मा ते कशप्लकौ दृशन् स्त्री हि ब्रह्मा बभूविथ ॥ १९ ॥

## सूक्तम् ३४

नीपातिथिः इन्द्रः अनुष्टुप्

आ इन्द्र याहि हरिभिर् उप कण्वस्य सुष्टुतिम् । दिवो अमुष्य शासतो दिवं यय दिवावसो ॥ १ ॥ आ त्वा ग्रावा वदन् इह सोमी घोषेण यच्छतु । दिवो अमुष्य शासतो दिवं यय दिवावसो ॥ २ ॥ अत्रा वि नेमिर् एषाम् उरां न धूनुते वृकः । दिवो अमुष्य शासतो दिवं यय दिवावसो ॥ ३ ॥ आ त्वा कण्वा: इहावसे हवन्ते वाजसातये । दिवो अमुष्य शासतो० ॥ ४ ॥ दधामि ते सुतानां वृष्णे न पूर्वपा-

वीराला प्रथम अर्पण करावें त्याप्रमाणें मीं हे सोमरस तुझ्या पुढें ठेवीत आहे; ( तर ये, आणि नंतर )...हे दिव्यवैभवा, तूं गमन कर ५. —हे महाप्राज्ञा, आमच्याकडे आगमन कर; तूं विश्वबुद्धि आहेस, तर आमच्या सहायास्तव ये, ( आणि नंतर )...हे दिव्यवैभवा, तूं गमन कर ६. —हे महामननीया, हे असंख्यसहाया, हे अगणितदातृत्वा, आमच्याकडे आगमन कर, ( आणि नंतर )...हे दिव्यवैभवा, तूं गमन कर ७. —मनुराजानें दिव्यविभूतींमध्यें ज्याला यज्ञसंपादक केलें तो स्तवनीय होता ( अग्नि ) तुजला येथें आणील, ( आणि नंतर )...हे दिव्यवैभवा तूं गमन कर ८ —हे तुझें शत्रूंचा मद जिरविणारे आणि मदानें थैमान घालणारे हरिद्वर्ण अश्व, ससाणा आपल्या पंखांनीं भरारी मारतो, त्याप्रमाणें झपाट्यानें तुजला घेऊन येत आहेत; ( आणि येथें आल्यावर)...हे दिव्यवैभवा तूं गमन कर ९. —हे प्रभो येथें ये; "स्वाहा" शब्दोच्चारावरोवर सोमरस प्राशनार्थ आगमन कर, ( आणि नंतर )......हे दिव्यवैभवा तूं गमन कर १०. —आमच्या हांकेसरशीं ये, आमच्या सामगायनानें उल्लसित हो ( आणि नंतर )...दिव्यलोकीं गमन कर ११. —ज्या तुजजवळ भरदार पुठ्याचे अश्व भरपूर आहेत असा तूं अगदीं एकसारख्या पुष्ट अश्वांसहित येथें ये, ( आणि नंतर ) ...दिव्यलोकीं...गमन कर १२. —पर्वतांपासून, ( अन्तरिक्ष )समुद्राच्या वसतिस्थानांतून, ( जेथें असशील तेथून ) निघून इकडे ये आणि मग...दिव्यलोकीं गमन कर १३. —इकडे ये, हजारों गोधनें, हजारों अश्व अशा प्रकारचें ऐश्वर्य आमच्या स्वाधीन कर ( आणि नंतर )...दिव्यलोकीं गमन कर १४. —शेंकडों, हजारोंच काय, पण असंख्य वरदानें आमच्यासाठीं आण ( आणि नंतर )...दिव्यलोकीं गमन कर १५. —जेव्हां ओजस्वी अश्वांनीं युक्त, पशूंनीं युक्त, अशा देणग्या आम्हांला इन्द्रानें, ऐश्वर्यानें उज्वल अशा "वसुरोचि" राजाकडून दिल्या १६. —तेव्हां त्यांतील जलद चाल-

---

स्यम् । दिवो अमुष्य शासतो० ॥ ५ ॥ स्मत् पुरन्धि नं आगहि विश्वतोधी नं ऊतये । दिवो अमुष्य शासतो० ॥ ६ ॥ आ नो याहि महेमते सहस्त्रोते शतामघ । दिवो अमुष्य शासतो ॥ ७ ॥ आ त्वा होता मनुर्हितो देवत्रा वक्षत् ईड्यः । दिवो अमुष्य शासतो० ॥ ८ ॥ आ त्वा मदच्युतो हरी श्येनं पक्षेव वक्षतः । दिवो अमुष्य० ॥९॥ आ याहि अर्य आ परि स्वाहा सोमस्य पीतये । दिवो अमुष्य ॥ १०॥ आ नो याहि उपश्रुति उक्थेषु रणया इह । दिवो अमुष्य शासतो० ॥ ११ ॥ सरूपैर् आसु नो गहि सम्भृतैः सम्भृताश्वः । दिवो अमुष्य शासतो० ॥ १२ ॥ आयाहि पर्वतेभ्यः समुद्रस्याधि विष्टपः । दिवो अमुष्य शासतो० ॥ १३ ॥ आ नो गव्यानि अश्व्या सहस्रा शूर दर्दृहि । दिवो अमुष्य० ॥ १४ ॥ आ नः सहस्रशो भर अयुतानि शतानि च । दिवो अमुष्य० ॥ १५ ॥ आ यत् इन्द्रश्च दद्वहे सहस्रं वसुरोचिषः । ओजिष्ठम् अश्व्यं पशुम् ॥ १६ ॥ ये ऋज्राः वातरंहसः अरुषासो रघुष्यदः । भ्राजन्ते



णारे, वाऱ्याप्रमाणें धांवणारे आणि लाल वर्णाचे अवलक घोडे सूर्याप्रमाणें तळपत आहेत ( असें वाटलें ) १७. —पारावत राजाच्या जलद आणि जोरानें फिरणाऱ्या चाकांच्या रथांत मीं वसलों तेव्हां ( रथांच्या ) वनामध्यें आहे कीं काय असें वाटलें १८.

---

## सूक्त ३५

अग्नि, इन्द्र, वरुण, विष्णु, आदित्य, रुद्र, वसु यांच्या सदैव बरोबर राहणारे, भक्तवत्सल असे हे अश्वीहो, तुम्हीं, उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह, सोमरस प्राशन करा १. —आपल्या विश्वव्यापक बुद्धींनीं, सर्व भुवनें, द्युलोक पृथ्वी, आणि पर्वत ह्यांच्याहि बरोबर राहणारे, असे भक्तवत्सल तुम्ही, उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह, हे अश्वीहो, सोमरस प्राशन करा २. —संख्येनें अकरांच्या तिप्पट म्हणजे तेहतीस जे विश्वेदेव, तसेंच येथें संचार करणारे जे मरुत् आणि भृगु ह्यांच्या नेहमीं बरोबर राहणारे भक्तवत्सल असे तुम्हीं......सोमरस प्राशन करा ३. —माझ्या यज्ञांचा संतोषानें स्वीकार करा, माझ्या हांकेकडे लक्ष द्या. हे दिव्यविभूतींनों, येथें माझ्या सर्व सवनांकडे आगमन करा आणि भक्तवत्सल असे तुम्हीं, उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह, हे अश्वीहो, आम्हांला उत्साह आणून द्या ४. —तरुण बालिकेचा तरुणानें स्वीकार करावा त्याप्रमाणें तुम्हीं स्तुतींचा स्वीकार करा; आणि हे दिव्यविभूतींनों, आम्हांकडे उत्साह घेऊन या ५. —स्तुतिवाणीनें प्रसन्न व्हा; ह्या यागाचा स्वीकार करून संतुष्ट व्हा; दिव्यविभूतींनों, येथल्या सर्व सवनांकडे आगमन करा, आणि भक्तवत्सल असे तुम्हीं उषादेवी आणि सूर्य ह्यांच्या-

---

सूर्याः इव ॥ १७ ॥ पारावतस्य रातिषु द्रवत्चक्रेषु आशुषु । तिष्ठम् वनस्य मध्य आ ॥ १८ ॥

---

## सूक्तम् ३५

श्यावाश्वः अश्विनौ पङ्क्तिः

अग्निनेन्द्रेण वरुणेन विष्णुना आदित्यै रुद्रै र्वसुभिः सचाभुवा । सजोषसौ उषसा सूर्येण च सोमं पिबतम् अश्विना ॥ १ ॥ विश्वाभि र्धीभि र्भुवनेन वाजिना दिवा पृथिव्या अद्रिभिः सचाभुवा । सजोषसौ उषसा सूर्येण च सोमं पिबतम् अश्विना ॥ २ ॥ विश्वै र्देवैस् त्रिभिर् एकादशैर् इह अद्भि र्मरुद्भि र्भृगुभिः सचाभुवा । सजोषसौ उषसा सूर्येण च सोमं पिबतम् अश्विना ॥ ३ ॥ जुषेथां यज्ञं बोधतं हवस्य मे विश्वेह देवौ सवनाऽव गच्छतम् । सजोषसौ उषसा सूर्येण च सोमं पिबतम् अश्विना ॥ ३ ॥ स्तोमं जुषेथां युवशेव कन्यनाम् विश्वेह देवौ सवनाऽ व गच्छतम् । सजोषसौ उषसा सूर्येण चा इषं नो वोळहम् अश्विना ॥ ५ ॥ गिरो जुषेथाम् अध्वरम्

सह आम्हांला, हे अश्वीहो, उत्साह आणून द्या ६. —हारिद्रव पक्षी जसे वनाकडे, किंवा दांडगे महिष जसे उदकाकडे धांवत जातात, त्याप्रमाणें भक्तांनीं पिळून सिद्ध केलेल्या सोमरसाकडे तुम्ही त्वरेनें उडत जातां; तर भक्तवत्सल तुम्ही, उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह आमच्या यज्ञगृहाकडे, हे अश्वीहो, तीन वेळ आगमन करा ७. —दोन हंस पक्षी, दोन प्रवासी, किंवा दोन बलाढ्य महिष ह्यानीं धांवत सुटावें, त्या प्रमाणें भक्तांनीं पिळून सिद्ध केलेल्या सोमरसाकडे तुम्हीं उडत जातां; तर भक्तवत्सल असे तुम्हीं येथें...तीन वेळ आगमन करा ८. —हवि अर्पण करणाऱ्या भक्तासाठीं श्येन पक्ष्याप्रमाणें, किंवा पिळून सिद्ध केलेल्या सोमरसाकडे बलिष्ठ महिषांप्रमाणें तुम्ही धांवत जातां; तर भक्तवत्सल असे तुम्हीं...हे अश्वीहो, तीन वेळ आगमन करा ९. —सोमरस प्राशन करा, आणि तृप्त व्हा; त्याकरितां इकडे या; आणि ( भक्तांना ) पुत्रपौत्रांचा लाभ आणि अढळ संपत्ति द्या, आणि भक्तवत्सल असे तुम्ही उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह येऊन हे अश्वीहो, आमच्या ठिकाणीं ऊर्जस्विता ठेवा १०. —विजयी व्हा; भक्तांना शाबासकी द्या, त्यांचें रक्षण करा, त्यांना पुत्रपौत्राचा लाभ द्या आणि आमच्या ठिकाणीं ऊर्जस्विता ठेवा ११. —शत्रूंना ठार करा, आणि मित्रांना प्रयत्नशील करा. भक्तांना पुत्रपौत्रांचा लाभ द्या, अढळ संपत्ति द्या, आणि भक्तांमध्यें ऊर्जस्विता ठेवा १२. —तुम्हीं मित्रावरुणांचे जोडीदार आहांत; तुम्हीं सद्धर्मशील आहांत. तुम्हीं मरुतांना बरोबर वागवितां, आणि स्तोतृजनाच्या हांकेसरशीं धांवत जातां; तर हे अश्वीहो, भक्तवत्सल असे तुम्हीं, आदित्यांसह आगमन करा १३. —तुम्हीं अंगिरांसहित, विष्णुसहित, मरुतांसहित स्तोतृजनाच्या हांकेसरशीं धांवत जातां तर...आदित्यांसह आगमन करा १४. —तुम्हीं ऋभूंसहित, आणि हे वीर्यशाली देवांनो, सत्वाढ्य असे तुम्हीं मरुतांसहित स्तोतृजनाच्या हांकेसरशीं धांवत येतां; तर हे अश्वीहो, भक्तवत्सल असे तुम्हीं उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह आणि आदित्यांसह आगमन करा १५.

जुषेथाम् विश्वेह देवौ सवनाऽव गच्छतम्। सजोषसौ उषसा सूर्येण चा इषं नो वोळहम् अश्विना ॥६॥ हारिद्रवेव पतथो वनेत् उप सोमं सुतं महिषेवाऽव गच्छथः। सजोषसौ उषसा सूर्येण च त्रि वर्तिं यातम् अश्विना ॥ ७ ॥ हंसेव पतथो अध्वगाविव सोमं सुतं महिषेवाऽव गच्छथः। सजोषसौ उषसा सूर्येण च त्रि वर्तिं यातम् अश्विना ॥ ८ ॥ श्येनाविव पतथो हव्यदातये सोमं सुतं महिषेवाऽव गच्छथः। सजोषसौ० ॥ ९॥ पिबतं च तृप्णुतं चा च गच्छतं प्रजांच धत्तं द्रविणं च धत्तम्। सजोषसौ उषसा सूर्येण च ऊर्ज नो धत्तम् अश्विना ॥ १० ॥ जयतं च प्रस्तुतंच प्र चाऽवतं प्रजां च धत्तं०। सजोषसौ० ॥ ११ ॥ हतं च शत्रून् यततं च मित्रिणः प्रजां च धत्तं द्रविणं च धत्तम्। सजोषसौ० ॥ १२ ॥ मित्रा वरुणवन्तौ उत धर्मवन्ता मरुत्वन्ता जरितु गच्छथो हवम्। सजोषसौ उषसा सूर्येण चा आदित्यै यातम् अश्विना ॥ १३ ॥ अङ्गिरस्वन्तौ उत विष्णवन्ता मरुत्वन्ता०। सजोषसौ० ॥ १४॥

—ब्रह्मस्तोत्राची स्फूर्ति द्या, सद्बुद्धीला प्रेरणा करा, राक्षसांचा नाश करा, रोगाचें निवारण करा आणि हे अश्वीहो, भक्तवत्सल असे तुम्हीं उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह येऊन भक्ताचा सोमरस प्राशन करा १६. —क्षात्रवृत्ति उसळून द्या, वीरांना उत्तेजन द्या, राक्षसांचा नायनाट करा, रोगांचा परिहार करा आणि...भक्ताचा सोम प्राशन करा १७. —धेनूंची अभिवृद्धि करा, वैश्यवृत्तीच्या लोकांना समृद्ध करा, राक्षसांना ठार करा, रोगांचा उच्छेद करा आणि...भक्ताचा सोमरस प्राशन करा १८. —अत्रिऋषींनीं पूर्वीं स्तुति केलेली जशी तुम्हीं ऐकलीत तशीच हे उन्मादोच्छेदक देवांनों, सोम अर्पण करणाऱ्या मज श्यावाश्वाचीहि ऐका आणि (हे अश्वीहो,) भक्तवत्सल असे तुम्ही उषादेवी आणि सूर्य ह्यांच्यासह तीन दिवस मुरलेला हा सोमरस प्राशन करा १९. —नदीच्या ओघाप्रमाणें उत्तम काव्याचे प्रवाह वाहण्यास लावा. सोम अर्पण करणारा मी श्यावाश्व त्याच्याकडे या. आणि हे मदहारक देवानों,...मुरलेला सोमरस प्राशन करा २० —सोमार्पण करणाऱ्या मज श्यावाश्व्याचे यज्ञ, लगाम नीट धरावे त्याप्रमाणें नीट तडीस लावा, आणि हे उन्मादहारक देवानों,...हा मुरलेला सोमरस प्राशन करा २१. —आपला रथ इकडे वळवा, मधुर सोम प्राशन करा; या, हे अश्वीहो, इकडे आगमन करा; मीं तुमचा कृपाभिलाषी होऊन येण्याविषयीं तुम्हांला विनवीत आहें, तर हविर्दात्या भक्ताला अमूल्य रत्नें द्या २२. —प्रणिपात करून अध्वराला प्रारंभ झाला असतां, हें वीरांनों, प्रार्थनोत्सुक भक्ताचा सोमरस प्राशन करण्यासाठीं या, हे अश्वीहो, आगमन करा; मीं कृपाभिलाषी होऊन...विनवीत आहें तर...भक्ताला अमूल्य रत्नें द्या २३. —"स्वाहा"शब्दोच्चारपूर्वक तुम्हांला अर्पण केलेल्या सोमपेयानें, हे देवांनों, तुम्हीं संतुष्ट व्हा, अश्वीहो या, इकडे आगमन करा आणि...भक्ताला अमूल्य रत्नें द्या २४.

---

ऋभुमन्ता वृषणा वाजवन्ता मरुत्वन्ता० । सजोषसौ० ॥ १५ ॥ ब्रह्म जिन्वतम् उत जिन्वतं धियो हतं रक्षांसि सेधतं अमीवाः । सजोषसौ उषसा सूर्येण च सोमं सुन्वतो अश्विना ॥ १६ ॥ क्षत्रम् जिन्वतम् उत जिन्वतं नॄन् हतं रक्षंसि सेधतं० । सजोषसौ० ॥ १७ ॥ धेनूः जिन्वतम् उत जिन्वतं विशः हतं० । सजोषसौ ॥ १८ ॥ अत्रेरिव शृणुतं पूर्व्यस्तुतिम् श्यावाश्वस्य सुन्वतो मदच्युता । सजोषसौ० अश्विना तिरो अह्न्यम् ॥ १९ ॥ सर्गान् इव सृजतं सुष्टुतीर् उप श्यावाश्वस्य सुन्वतो मदच्युता । सजोषसौ उषसा सूर्येण च अश्विना तिरो अह्न्यम् ॥ २० ॥ रश्मीँरिव यच्छतम् अध्वरान् उप श्यावाश्वस्य० । सजोषसौ ॥ २१ ॥ अर्वाक् रथं नियच्छतं पिबतं सोम्यं मधु । आ यातम् अश्विनाऽऽगतम् अवस्यु वाम् अहं हुवे । धत्तम् रत्नानि दाशुषे ॥२२॥ नमोवाके प्रस्थिते अध्वरे नरा विवक्षणस्य पीतये । आ यातम् अश्विना ऽऽ गतम्०॥२३॥ स्वाहाकृतस्य तृम्पतं सुतस्य देवौ अन्धसः । आयातम् अश्विना ऽऽ गतम्० ॥ २४ ॥

## सूक्त ३६

सोमरस पिळणारा आणि कुशासन व्यवस्थितपणें मांडणारा जो भक्त त्याचें तूं रक्षण करतोस. तर हे असंख्यपराक्रमा, तल्लीन होण्यासाठीं तूं संतोषानें हा सोमरस प्राशन कर. भक्तांनीं तुझा भाग म्हणून जो तुजला अर्पण केला आहे ( तो प्राशन कर ); यच्चावत् शत्रुसेना आणि त्यांचा अफाट जोर ह्यांना तूं चिरडून टाकणारा आहेस; हे सज्जनाधिपा इन्द्रा; तूं ज्ञानोदकें जिंकणारा आणि मरुतांचा स्वामी आहेस १. —भक्ताचा प्रतिपाळ कर; हे दातृश्रेष्ठा, तूंच प्रतिपाळ कर. हे अनंतकर्तृत्वा इन्द्रा, तल्लीन होण्यासाठीं तूं सोमरस प्राशन कर......तूं ज्ञानोदकें जिंकणारा आणि मरुतांचा स्वामी आहेस २. —आपल्या ऊर्जस्वितेनें देवांचें, आणि आपल्याच ओजस्वितेनें तूं स्वतःचें रक्षण करतोस; तर हे अनंतकर्तृत्वा इन्द्रा, तल्लीनतेसाठीं तूं संतोषानें हा सोमरस प्राशन कर...तूं ज्ञानोदकें जिंकणारा आणि मरुतांचा स्वामी आहेस ३. —तूं आकाशाचा उत्पन्नकर्ता आहेस, तूं पृथिवीचाहि उत्पन्नकर्ता आहेस, तर हे अनंतकर्तृत्वा...हा सोमरस प्राशन कर...४. —तूं चलाख अश्व निर्माण केलेस, धेनूहि निर्माण केल्यास...तर हे अनंतकर्तृत्वा...हा सोमरस प्राशन कर. ५ —अत्रिऋषींनीं केलेल्या स्तुतींची तूं वाहवा कर; हे वज्रधरा, आणि अनंतकर्तृत्वा इन्द्रा, आल्हादासाठीं तूं सोमरस प्राशन कर...६. —ज्याप्रामाणें, सत्कर्में आचरणाऱ्या अत्रिंनीं केलेली स्तुति तूं पूर्वीं ऐकलीस त्याप्रमाणें सोम अर्पण करणाऱ्या मज श्यावाश्व्याचीहि ऐक; शूरांच्या धकाधकींत त्रसदस्युचें रक्षण, हे इन्द्रा, ब्रह्मस्तोत्रांची अभिवृद्धि करून तूं एकट्यानेंच केलेंस ७.

## सूक्तम् ३६

श्यावाश्वः इन्द्रः शक्वरी

अवितासि सुन्वतो वृक्तबर्हिषः पिबा सोमं मदाय कं शतक्रतो । यं ते भागम् अधारयन् विश्वाः सेहानः पृतनः उरु ज्रयः सम् अप्सुजित् मरुत्वान् इन्द्र सत्पते ॥ १ ॥ प्राव: स्तोतारं मघवन् अव त्वां पिबा सोमं मदाय कं शतक्रतो । यं ते भागम् अधारयन् । विश्वाः सेहानः पृतनाः उरु ज्रयः । सम् अप्सुजित् मरुत्वान् इन्द्र सत्पते ॥ २ ॥ ऊर्जा देवान् अवसि ओजसा त्वाम् पिबा सोमम् ० । यं ते भागम्० ॥ ३ ॥ जनिता दिवो जनिता पृथिव्याः पिबा सोमम्० । यं ते भागम् अधारयन्० ॥ ४ ॥ जनिता अश्वानां जनिता गवाम् असि पिबा सोमम्० । यं ते भागम् अधारयन् । विश्वाः सेहानः पृतनाः उरु ज्रयः ॥५॥ अत्रीणाम् स्तोमम् अद्रिवो महस् कृधि पिबा सोमम्० । यं ते भागम् अधारयन् ॥ ६ ॥ श्यावश्वस्य सुन्वतस् तथा शृणु यथा ऽशृणोर् अत्रेः कर्माणि कृण्वतः । प्र त्रसदस्युम् आविथ त्वम् एक इत् नृषाह्यः । इन्द्र ब्रह्माणि वर्धयन् ॥ ७ ॥

## सूक्त ३७

सोम अर्पण करणाऱ्याच्या ह्या कवनाचें रक्षण वृत्राच्या तडाक्यांतून, हे सर्वशक्तिमान् इन्द्रा, तूं आपल्या सकलसहायक शक्तींनीं केलेंस; तर मध्यंदिन सवनाच्या प्रसंगीं, हे वृत्रनाशना, हे निष्कलंका वज्रधरा, हा पिळलेला सोमरस तूं प्राशन कर १. —हे शत्रुभयंकरा, सज्जनद्रोही दुष्टांचें सैन्य, हे सर्वशक्तिमन्ता इन्द्रा, तूं आपल्या सकल आयुधांनीं रगडून टाकणारा आहेस; तर मध्यंदिन सवनांच्या प्रसंगीं, हे वृत्रनाशना, हे निष्कलंका, वज्रधरा, हा पिळलेला सोमरस तूं प्राशन कर २. —हे सर्वशक्तिमन्ता इन्द्रा, आपल्या अखिल शक्तींनीं विभूषित असा तूं ह्या भूलोकाचा एकच अधिपति आहेस; तर...हे निष्कलंका वज्रधरा, हा सोमरस तूं प्राशन कर ३. —ह्या एकत्र राहिलेल्या द्यावापृथिवींना हे सर्वशक्तिमन्ता इन्द्रा, तूंच एकट्यानें आपल्या अखिल शक्तींनीं निरनिराळे फिरावयास लाविलेंस, तर...हे निष्कलंका, हा सोमरस तूं प्राशन कर ४. —जगताचें क्षेम आणि योग ह्यांच्यावर, हे सर्वशक्तिमन्ता इन्द्रा, आपल्या सर्व शक्तींनीं तूं अधिकार चालवितोस, तर हे निष्कलंका, हा सोमरस तूं प्राशन कर ५. —क्षात्रवृत्तीच्या अभिवृद्धिकरितां तूं (भक्तांचें) रक्षण करतोस; नाहीं तर केलेंच नसतेंस. तर हे सर्वशक्तिमन्ता इन्द्रा, आपल्या सर्वसहायक शक्तींनीं (येऊन).....हे निष्कलंका वज्रधरा, हा पिळलेला सोमरस प्राशन कर.६. —ज्याप्रमाणें सत्कर्माचरण करणाऱ्या अत्रिनीं केलेली स्तुति तूं पूर्वीं ऐकलीस, त्याप्रमाणें आतांहि मनःपूर्वक तुला आळविणारा मी श्यावाश्व त्याचें स्तवन ऐक. पहा, कीं शूरांच्या धकाधकींत त्रसदस्यूचें रक्षण, हे इन्द्रा, ब्रह्मस्तोत्रांची अभिवृद्धि करून तूं एकट्यानेंच केलेंस ७.

---

## सूक्तम् ३७

श्यावाश्वः इन्द्रः अतिजगती

प्र इदम् ब्रह्म वृत्रतूर्येषु आविथ । प्र सुन्वतः शचीपते इन्द्र विश्वाभिर् ऊतिभि ॥ माध्यंदिनस्य सवनस्य वृत्रहन् अनेद्य । पिबा सोमस्य वज्रिवः ॥ १ ॥ सेहानः उग्र पृतनाः अभि द्रुहः शचीपते इन्द्र विश्वाभिर् ऊतिभिः । माध्यंदिनस्य सवनस्य वृत्रहन् अनेद्य । पिबा सोमस्य वज्रिवः ॥ २ ॥ एकराळ् अस्य भुवनस्य राजसि शचीपते । इन्द्र विश्वाभिर् ऊतिभिः ॥ माध्यंदिनस्य सवनस्य वृत्रहन् अनेद्य । पिबा सोमस्य वज्रिवः ॥ ३ ॥ सस्थावाना यवसि त्वम् एक इत् शचीपते० ॥ माध्यंदिनस्य सवनस्य० ॥ ४ ॥ क्षेमस्य च प्रयुज श्च त्वम् ईशिषे शचीपते० । माध्यंदिनस्य सवनस्य० ॥ ५ ॥ क्षत्राय त्वम् अवसि न त्वम् आविथ शचीपते । माध्यंदिनस्य० ॥ ६ ॥ श्यावाश्वस्य रेभतस् तथा शृणु यथाऽशृणोर् अत्रेः कर्माणि कृण्वतः । माध्यंदिनस्य सवनस्य वृत्रहन् अनेद्य । पिबा सोमस्य वज्रिवः ॥ ७ ॥

## सूक्त ३८

आमच्या यज्ञाचे जे तुम्हीं ऋत्विज ते सत्वसामर्थ्याच्या झगड्यांत आणि सत्कर्माचरणांत सारखेच दक्ष आहांत ही गोष्ट, इन्द्राग्नी हो, तुम्हीं ध्यानांत आणा १. —तुम्हीं दुर्जनांचे उच्छेदक, रथारूढ, वृत्रनाशक, परंतु स्वतः कधींहि पराजय न पावणारे असे आहांत, हेंहि, इन्द्राग्नी हो, तुमच्या लक्षांत असूं द्या २. —तुमच्यासाठीं शूर भक्तांनां हें हर्षकर मधुर पेय ग्राव्यांनीं घुसळून तयार केलें आहे, त्याकडे हे इन्द्राग्नीहो, तुम्हीं लक्ष पोहोंचवा ३. —इष्टसिद्धिसाठीं, ( आमचा ) यज्ञ आणि पिळलेला सोमरस ह्यांचा तुम्हीं संतोषानें स्वीकार करतां; तर हे इन्द्राग्नीहो, इकडे आगमन करा ४. —ज्याच्या योगानें तुम्हीं ( देवांना ) हविर्भाग पोहोंचवितां, त्या सामसवनांनीं संतुष्ट व्हा आणि ( त्यासाठीं ) हे शूर इन्द्राग्नीहो, येथें आगमन करा ५. —मी गायत्रपद्धतीनें केलेल्या ह्या उत्तम स्तुतीचा तुम्हीं संतोषानें स्वीकार करा आणि हे शूर इन्द्राग्नी हो येथें आगमन करा. ६ —प्रातःकाळीं येणाऱ्या देवांसह सोमरस प्राशन करण्यासाठीं, हे विजयवैभव इन्द्राग्नी हो, येथें आगमन करा. ७. —अत्रीची आणि सोमरस पिळून ठेवणाऱ्या श्यावाश्व्याची हांक, हे इन्द्राग्नी हो, सोमरसप्राशनार्थ तरी ऐका ८. —याप्रमाणें जसा पूर्वींच्या प्रज्ञाशाली भक्तांनीं तुमचा धांवा केला, तसाच धांवा सहाय्यासाठीं, आणि तुम्हीं सोमरस प्राशन करावा म्हणून, हे इन्द्राग्नीहो, मीहि करीत आहे ९. —सरस्वतीच्या बरोबर राहणारे जे इन्द्राग्नी, त्यांच्या कृपाछत्राची मी याचना करतों. जें गायत्रगीत ऋचांनीं म्हटलें जातें तें ह्यांच्याच प्रीत्यर्थ होय १०.

---

## सूक्तम् ३८

श्यावाश्वः इन्द्राग्नी गायत्री.

यज्ञस्य हि स्थः ऋत्विजा सस्नी वाजेषु कर्मसु । इन्द्राग्नी तस्य बोधतम् ॥१॥ तोशासा रथयावाना वृत्रहणा ऽ पराजिता । इन्द्राग्नी तस्य बोधतम् ॥ २ ॥ इदं वाम् मदिरं मधु अधुक्षन् अद्रिभि र्नरः । इन्द्राग्नी तस्य बोधतम् ॥ ३ ॥ जुषेथां यज्ञम् इष्टये सुतं सोमं सधस्तुती । इन्द्राग्नी तस्य बोधतम् ॥ ४ ॥ इमा जुषेथां सवना येभि र्हव्यानि ऊहथुः । इन्द्राग्नी आगतं नरा ॥ ५ ॥ इमां गायत्रवर्तनिं जुषेथां सुष्टुतिं मम । इन्द्राग्नी आगतं नरा ॥६॥ प्रातर्यावभिर् आगतं देवेभि र्जेन्यावसू । इन्द्राग्नी सोमपीतये ॥ ७ ॥ श्यावाश्वस्य सुन्वतः अत्रीणाम् शृणुतं हवम् । इन्द्राग्नी सोमपीतये ॥ ८ ॥ एव वाम् अह्व ऊतये यथाऽहुवन्त मेधिराः । इन्द्राग्नी सोमपीतये ॥ ९ ॥ आऽहं सरस्वतीवतोर् इन्द्राग्न्योर् अवो वृणे । याभ्यां गायत्रम् ऋच्यते ॥ १० ॥

# सूक्त ३९

ऋक्स्तवनयोग्य अशा अग्नीचें मीं स्तवन करतों. उत्साहवर्धक हविंनीं अग्नीचें यजन करण्याकरितां मीं उद्युक्त होतों ( म्हणून ) अग्नि हा दिव्यविबुधांना आम्हांपुढें प्रकट करो. ( दिव्य आणि मानवी अशा ) दोन्हीं यज्ञसभेंमध्यें तो क्रान्तदर्शी अग्नि आमचें मार्गदर्शित्व स्वीकारून संचार करतो म्हणून इतर सर्व दुर्जन पार नष्ट होवोत १. अग्निदेवा, आमच्या अपूर्व प्रार्थनेनें ह्या ( दुष्टां)चे शिव्याशाप त्यांच्या अंगातल्या अंगांत जाळून टाक. तसेंच, दानशील भक्तांचे शत्रु आणि आर्यांचे सर्व शत्रु मूढ होऊन येथून पार निघून जावोत आणि बाकीचे सर्व दुष्ट नाश पावोत २. —अग्निदेवा, ज्याप्रमाणें घृताहुति तुझ्या मुखांत अर्पण करितात, त्याप्रमाणें माझीं मननीय स्तोत्रें संतोषानें मी अर्पण करीत आहें. तर तूं दिव्यविभूतींमध्यें आमच्या सेवेची आठवण ठेव. खरोखरच तूं विवस्वताचा पुरातन आणि मंगलदायक असा मार्गदर्शक झाला आहेस. तर इतर सर्व दुष्ट पार नष्ट होऊन जावोत ३. —जितका जितका ( भक्त ) काकुळतीनें विनवणी करतो, तितका–तितका अग्निदेव त्याच्यामध्यें तारुण्याचा जोम जास्त ठेवतो. ऊर्जस्वितेसाठीं ज्याला आहुति देतात असा तो दिव्यनिधीचा पालक अग्नि, अखिल देवांच्या इष्टि साठीं सुख शांति आणि कल्याण यांचा लाभ ( भक्तांना ) देतो ४. —दुष्टांना चिरडून टाकणाऱ्या आपल्या अद्भुत कृत्यांनीं अग्नि हा सर्वांना विश्रुत झाला आहे. तो सर्व मनुष्यजातीचा यज्ञसंपादक आहे ( भक्तांनीं अर्पण केलेल्या ) दक्षिणांनीं तो अगदीं वेढून गेला आहे. स्वीकरणीय वस्तूंचा स्वीकार करण्याला तोच प्रवृत्त करतो ५. —दिव्यविभूतींचे अवतार अग्नीच जाणतो आणि मनुष्यांचीं अगदीं गुप्त कृत्येंहि अग्नीच जाणतो. अग्नि हाच ( अक्षय ) संपत्ति देणारा आहे, म्हणून अपूर्व स्तोत्रासह, त्याला उत्तम आहुति अर्पण केली म्हणजे ( उन्नतीचीं ) द्वारें तो सताड उघडून

# सूक्तम् ३९

काण्वो नाभाकः अग्निः महापंक्तिः

अग्निम् अस्तोषि ऋग्मियम् अग्निम् ईळा यजध्यै ॥ अग्निर् देवान् अनक्तु नः । उभे हि विदथे कविः । अन्त श्चरति दूत्यम् । नभन्ताम् अन्यके समे ॥ १ ॥ नि अग्ने नव्यसा वचः । तनूषु शंसम् एषाम् ॥ नि अरातीः रराव्णाम् । विश्वाः अर्यो अरातीः । दूतो युच्छन्तु आमुरः । नभन्ताम् अन्यके समे ॥ २ ॥ अग्ने मन्मानि तुभ्यं कम् । घृतं न जुह्वे आसनि ॥ स देवेषु प्र चिकिद्धि । त्वं हि असि पूर्व्यः । शिवो दूतो विवस्वतः । नभन्ताम्० ॥ ३ ॥ तत्तत् अग्नि र्वयो दधे । यथायथा कृपण्यति ॥ ऊर्जाहुति र्वसूनाम् । शंच यो श्च मयो दधे । विश्वस्यै देवहूत्यै ॥ नभन्ताम्० ॥ ४ ॥ स चिकेत सहीयसा । अग्नि श्चित्रेण कर्मणा ॥ स होता शश्वतीनाम् । दक्षिणाभिर् अभीवृतः । इनोति च प्रतीव्यम् ॥ नभन्ताम् ॥ ५ ॥ अग्नि

देतो ६. —अग्नि देवांमध्यें वास करतोच, पण यज्ञप्रवण भक्तांमध्यें देखील तो आनंदानें वास्तव्य करतो. भूमि जशी सर्व प्राण्यांचें पोषण करते त्याप्रमाणें काव्यस्फूर्तीची जोपासना, तो देवांमध्यें पूज्य असा अग्नि परम संतोषानें करतो ७. —सात ऋषिकुलांचा अग्रणी असा हा अग्नि सर्व नद्यांच्या उदकामध्यें देखील वास करतो; म्हणून ज्याचीं धामें तीन आहेत, ज्यानें मन्धाताच्या धर्मविहीन शत्रूंचा पार नायनाट करून टाकला आहे, आणि यज्ञामध्यें ज्याचें स्तवन प्रथम करतात त्या अग्नीला आम्हीं शरण आहोंत ८. —हा प्राज्ञ अग्नि तीन प्रकारच्या त्रिपुटींत आणि यज्ञसभेमध्यें वास करतो; तो तेहतीस दिव्यविभूतीचें येथें यजन करो, त्यांना संतुष्ट करो. तोच ज्ञानरूप भक्तिभूषणयुक्त अग्नि आमचा मार्गदर्शक ( दूत ) झाला आहे ९. —मनुष्यांमध्यें काय, आणि देवांमध्यें काय, हे सनातन अग्निदेवा, अक्षय निधींचा प्रेरक तूंच एकटा आहेत; ( म्हणून ) चोहोंकडे वाहणाऱ्या नद्या आपल्याच प्रवाहांचा तुला सेतु समजून करून तुझ्या भोवतीं भ्रमण करतात १०.

---

## सूक्त ४०

इन्द्राग्नीहो, दुर्जनांना असह्य होणारे तुम्हीं भक्तांना असें ( अढळ ) ऐश्वर्य द्या कीं तेणेंकरून शत्रू कितीहि बळकट असोत, झंझावात सुटला असतां दावाग्नि जशीं अरण्यें फस्त करतो त्याप्रमाणें त्यांना आम्हीं युद्धांत चिरडून टाकूं १. —आम्हीं तुम्हां

---

जाता देवानाम् अग्निर्वेद मर्तानाम् अपीच्यम् ॥ अग्निः स द्रविणोदाः अग्नि द्वारा वि ऊर्णुते सु आहुतः । नभन्ताम् अन्यके समे ॥ ६ ॥ अग्नि देवेषु संवसुः । स विक्षु यज्ञियासु आ ॥ स मुदा काव्या पुरु विश्वं भूमेव पुष्यति । देवो देवेषु यज्ञियः ॥ नभन्ताम् ॥ ७ ॥ यो अग्निः सप्तमानुषः श्रितो विश्वेषु सिन्धुषु ॥ तम् आ अगन्म त्रिपस्त्यं मन्धातु र्दस्यु हन्तमम् अग्निं यज्ञेषु पूर्व्यम् ॥ नभन्ताम् ॥ ८ ॥ अग्निस् त्रीणि त्रिधातूनि । आ क्षेति विदथा कविः ॥ स त्रीन् एकादशान् इह । यक्षत् च पिप्रयत् च नः । विप्रो दूतः परिष्कृतः ॥ नभन्ताम् ॥ ९ ॥ त्वं नो अग्न आयुषु । त्वम् देवेषु पूर्व्य । वस्वः एकः इरज्यसि ॥ त्वाम् आपः परिस्रुतः । परि यन्ति स्व सेतवः । नभन्ताम् ॥ १० ॥

---

## सूक्तम् ४०

नाभाकः इन्द्राग्नि महापंक्तिः

इन्द्राग्नी युवं सु नः । सहन्ता दासथो रयिम् ॥ येन दृळहा समत्सु आ । वीळु चित् साहिषीमहि । अग्नि वंनेव वात इत् । नभन्ताम् अन्यके समे ॥ १ ॥

उभक्तांना अडवीत नाहीं; तर अत्युत्कट बलाढ्य आणि वीरांचाहि वीर, जो इन्द्र त्याचेंच प्रथम आम्हीं यजन करतों. तो अश्वारूढ सैनिकासह एकवार तरी येवो; सत्वसामर्थ्याचा आम्हांला लाभ व्हावा म्हणून येवो; आम्हांला बुद्धिलाभ व्हावा म्हणून तरी येवो २. —इन्द्राग्नी हे युद्धाच्या ऐन गर्दींत खुशाल वावरतात; त्यांना कोणीं जरी प्रश्न केला तरी त्यांचें मित्रत्व इच्छिणाऱ्या ( भक्ता )ला ते काव्यमर्मज्ञ देव आपल्या प्रतिभाशक्तीनें ( त्याच्या ) उत्तराची सहज जुळणी घालून देतात. अगदीं उलगडा करून देतात ३. —**नाभाकानें** पूर्वीं केल्या प्रमाणें यज्ञार्ह स्तुतींनीं इन्द्राग्नींचें अर्चन कर; ते असे आहेत कीं हें जगत्, हें आकाश, ही विस्तीर्ण पृथिवी आणि हे सर्व लोक, उत्कृष्टधनाचा ठेवा आपल्याजवळ ठेवणाऱ्या त्या ( इन्द्राग्नी )चेच आहेत ४. —इन्द्राग्नीप्रीत्यर्थ नाभाका प्रमाणें तुम्हींहि ब्रह्मसूक्तांनीं प्रार्थना करा; ज्या महासागराचीं मूलस्थानें सात आहेत; त्याचें वाकडें तिकडें असलेलें द्वार पूर्वीं वन्द होतें तें ह्या ( इन्द्राग्नी )नीं सताड खुलें केलें. आणि इन्द्र हा तर आपल्या ओजस्वितेनें सर्वांचा प्रभुच आहे ५. —एकाद्या वेलाचें जुनें वाळलेलें जाळें छाटून टाकावें त्याप्रमाणें दुष्टनीचांचें जाळें तूं पूर्वींप्रमाणेंच छाटून टाक; त्यांचें तेज तूं फिक्कें पाड, म्हणजे त्यांनीं सांठविलेलें धन, इन्द्राच्या महायानें आम्हीं सर्वांना वांटून देऊं ६. —हे भक्तजन पुरातन स्तोत्रांनीं इन्द्राग्नींचा नानाप्रकारांनीं धांवा करीत आहेत; तेव्हां आम्हीं आमच्या शूर सैनिकांसह शत्रुसैन्याला चिरडून टाकूं, आणि आमच्याशीं सख्य करणाराशीं सख्य करूं हें खास ७. —हे जे उभयतां श्वेतवर्ण ( इन्द्राग्नी ) आपल्या दीप्तिनें मंडित होऊन आकाशाच्या खालीं, जवळ, किंवा वर संचार करीत असतात, त्या इन्द्राग्नींच्या आज्ञेनें ह्या अनेक नद्या ( समुद्राकडे ) वहात जातात. त्या सर्वांना ( इन्द्राग्नीनींच ) वन्धमुक्त केलें. ८. —इन्द्रा, ( भक्तांनीं ) तुला

---

नहि वां वि व्रयामहे । अथेन्द्रम् इत् यजामहे शविष्ठं नृणां नरम् ॥ स नः कदा चित् अर्वता गमत् । आ वाजसातये गमत् । आ मेधसातये । नभन्ताम्० ॥ २ ॥ ता हि मध्यं भराणाम् इन्द्राग्नी अधिक्षितः ॥ ता उ कवित्वना कवी । पृच्छयमाना सखीयते । संधीतम् अश्नुतं नरा । नभन्ताम्० ॥ ३ ॥ अभि अर्च नभाकवत् । इन्द्राग्नी यजसा गिरा ॥ ययो विश्वम् इदं जगत् । इयम् द्यौः पृथिवी मही । उपस्थे बिभृतो वसु । नभन्ताम्० ॥ ४ ॥ प्र ब्रह्माणि नभाकवत् । इन्द्राग्निभ्याम् इरज्यत ॥ या सप्तबुध्नम् अर्णवम् । जिह्मबारम् अपोर्णतः । इन्द्र ईशान ओजसा । नभन्ताम्० ॥ ५ ॥ अपि वृश्च पुराणवत् । व्रततेरिव गुष्पितम् । ओजो दासस्य दम्भय ॥ वयं तत् अस्य संभृतम् वसु । इन्द्रेण विभजेमहि । नभन्ताम् ० ॥ ६ ॥ यदिन्द्राग्नी जना इमे वि ह्वयन्ते तना गिरा ॥ अस्माकेभि र्नृभि र्वयं । सासह्याम पृतन्यतो । वनुयाम वनुष्यतः । नभन्ताम्० ॥ ७ ॥ या नु श्वेतौ अवो दिवः उच्चरातः उप द्युभिः । इन्द्राग्न्योर् अनुव्रतम् उहानाः यन्ति सिन्धवो । यान् सीम् बन्धाद् अमुञ्च-

दिलेल्या उपमा पुष्कळ; आणि तुझ्या स्तुतिहि पण पुष्कळच आहेत. हे सत्प्रेरणेच्या प्रभवा, हे हरिदश्वा, आमच्या ज्या ध्यानबुद्धि फलद्रूप झाल्या त्या (तुज) वीराच्या अलभ्यनिधी-पर्यंत जाऊन पोहोंचल्या आहेत ९. —जो झगझगीत, सत्वपूर्ण, आणि ऋक्स्तोत्रप्रिय आहे त्या (इन्द्राला) उत्तम स्तुतींनीं तीव्र करा. (अवर्षण पाडणाऱ्या) शुष्ण राक्षसाच्या संततीचा तो आपल्या ओजस्वितेनें संहार करतो आणि स्वर्गीय उदकें जिंकून आणतो १०. —ज्याच्या प्रीत्यर्थ (भक्त) अध्वरयाग करतात; जो सत्यस्वरूप, सत्वपूर्ण आहे, जो ऋतु आणि काल जाणतो (इतकेंच काय पण) ज्याला सर्व कांहीं समजतें त्या (इन्द्रा) ला जाज्वल्य करा; तो शुष्ण **राक्षसा**च्या संततीचा संहार करतो आणि स्वर्गीय उदकें जिंकून आणतो. ११. —याप्रमाणें, इन्द्राग्नीप्रीत्यर्थ मीं वाडवडिलांनीं केलें त्याप्रमाणें, (किंवा) **मन्धाता** आणि **आंगिरस्** यांचेप्रमाणें, अपूर्व स्तोत्र केलें आहे, तर हे दिव्यविभूतींनों, तुमच्या हितकर आश्रयानें आमचें रक्षण करा म्हणजे आम्हीं इच्छित ऐश्वर्यांचे अधिपति होऊं १२.

## सूक्त ४१

ह्या अपारैश्वर्यमण्डित वरुणप्रीत्यर्थ, आणि महाज्ञानी मरुतांप्रीत्यर्थ ऋक्स्तोत्र मोठ्यानें म्हण. धेनू, पशू ह्यांचें सहज रक्षण करावें त्याप्रमाणें जो वरुण मनुष्यांच्या सद्बुद्धींचें सहज रक्षण करतो (त्याचें स्तवन कर) १. —मनःपूर्वक केलेल्या स्तुतीनें, वाडवडिलांच्या मननीय स्तवनांनीं, **नाभाका**च्या संकीर्तनांनीं मी त्या

---

ताम्। नभन्ताम्० ॥ ८ ॥ पूर्वीष्ट इन्द्रोपमातयः पूर्वी-रुत प्रशस्तयः। सूनो हिन्वस्य हरिवः। वस्वो वीरस्य आपृचः। या नु साधन्त नो धियः। नभन्ताम्० ॥ ९ ॥ तं शिशीत सुवृक्तिभिस् त्वेषं सत्वानम् ऋग्मियम् ॥ उतो नु चित् य ओजसा शुष्णस्याण्डानि भेदति। नभन्ताम्० ॥ १० ॥ तं शिशीत सु अध्वरं सत्यं सत्वानम् ऋत्वियम्। उतो नु चित् य ओहते आण्डा शुष्णस्य भेदति। नभन्ताम्० ॥ ११ ॥ एवेन्द्राग्निभ्याम् पितृवत् नवीयो मन्धातृवत् अङ्गिरस्वत् अवाचि। त्रिधातुना शर्मणा पातम् अस्मान्। वयं स्याम पतयो रयीणाम् ॥ १२ ॥

## सूक्तम् ४१

नाभाकः वरुणः महापंक्तिः

अस्मै ऊ षु प्रभूतये वरुणाय मरुद्भ्यः अर्च विदुष्टरेभ्यः। यो धीता मानुषाणां पश्वो गा इव रक्षति। नभन्ताम् अन्यके समे ॥ १ ॥ तम् ऊ षु समना गिरा पितृणां च मन्मभि र्नाभाकस्य प्रशस्तिभिः। यःसिन्धूनाम् उपोदये। ससस्वसा स

वरुणाचें सर्वभावानें स्तवन करतों. जो वरुण महानद्यांच्या उद्गमस्थानाजवळ असतो, त्याच्या ज्या (उदकरूप) सात वहिणी त्यांच्या (उदका)मध्यें तो वास करतो २. —त्यानें रात्रींना कवटाळलें, आणि आपल्या अतर्क्य मायेनें प्रभातकालाला त्याच्या योग्यस्थानीं ठेऊन दिलें; त्या दर्शनीय वरुणानें विश्वाला देखील ( आपल्या शक्तीनें ) चोहोंकडून आंवरून धरलें, आणि त्याच्या आवडत्या ज्या तिन्ही उषा त्या त्याच्याच आज्ञेस अनुसरून अभिवृद्धीला पावल्या ३. —ज्यानें पृथ्वीवर दिशा उत्पन्न केल्या तो दर्शनीय वरुण पुरातन स्थान ( जें आकाश ) त्याचाहि उत्पन्नकर्ता होय. सर्वांना वन्दनीय असें जें स्थान, तें त्या वरुणाचेंच. गोपालकाप्रमाणें सर्वांचा प्रेरक तोच आहे ४. जो भुवनांचा धारणकर्ता आहे; जो तेजस्वी उषांचाहि धारक आहे, त्यांचीं अज्ञात आणि गूढ नांवेंहि जो जाणतो; आणि आकाशांतील तेजःपुंज गोल निरनिराळ्या रूपांचा परिपोष करतात त्याप्रमाणें तो काव्यस्फूर्ति देणारा वरुण प्रतिभेचाहि परिपोष करतो ५. चाकांचे अरे जसे तुंब्यांत राहतात त्याप्रमाणें कवींची सर्व काव्यस्फूर्ति ज्याच्यामध्यें वास करते, त्या त्रित( वरुणा )ला उत्कंठेनें भजा; धेनू ज्याप्रमाणें गोठ्यांत एकत्र रहाण्याकरितां जातात, किंवा (रथाच्या) धुरेला ज्याप्रमाणें अश्व जोडतात त्याप्रमाणें तुम्हीं ( भक्ति करा ) ६. —जो तेजोरूप वरुण सर्वांच्या आंत विलीन असतो; जो सर्वभूतें आणि त्यांचीं स्थानें ह्यांना व्यापून टाकतो, त्या वरुणाच्या निवासांत, त्याच्या समोर, सर्व दिव्यविभूति त्याच्या नियमानुसार वागतात. ७. —तो अपार समुद्रच ( कीं काय) असा वरुण त्वरितगति सूर्याप्रमाणें आकाश आक्रमण करतो; आणि ह्या (मानवी प्रजाजनां) मध्यें यज्ञक्रियेची स्थापना करतो; त्यानें आपल्या जाज्वल्य चरणानें मायेचा नाश करून टाकला आणि अत्युच्च–आकाशांत आरोहण केलें ८. —ज्या जगन्निवास ( वरुणा)च्या शुभ्र, चकचकीत रश्मींनीं तीन भुवनें आणि त्यांच्यावरचे तिन्ही लोक ह्या सर्वांना

---

मध्यमः । नभन्ताम्० ॥ २ ॥ स क्षपः परि षस्वजे नि उस्रो मायया दधे । स विश्वं परि दर्शतः । तस्य वेनीर् अनु व्रतम् । उषस् तिस्रो अवर्धयन् । नभन्ताम्० ॥ ३ ॥ यः ककुभो नि धारयः पृथिव्याम् अधि दर्शतः । स माता पूर्व्यम् पदं । तत् वरुणस्य सप्त्यम् । स हि गोपा इवेर्यः । नभन्ताम्० ॥ ४ ॥ यो धर्ता भुवनानां य उस्राणाम् अपीच्या वेद नामानि गुह्या । स कविः काव्या पुरु रूपं द्यौर् इव पुष्यति । नभन्ताम्० ॥ ५ ॥ यस्मिन् विश्वानि काव्या चक्रे नाभिर् इव श्रिता । त्रितं जूती सपर्यत । व्रजे गावो न संयुजे । युजे अश्वाँ अयुक्षत । नभन्ताम्० ॥ ६ ॥ य आसु अत्क आशये विश्वा जातानि एषाम् । परि धामानि मर्मृशत् वरुणस्य पुरो गये । विश्वे देवो अनु व्रतम् । नभन्ताम्० ॥७॥ स समुद्रो अपीच्यस् तुरो द्याम् इव रोहति । नि यत् आसु यजु र्दधे ॥ स माया अर्चिना 'पदा अस्तृणात् नाकम् आऽरुहत् । नभन्ताम्० ॥ ८ ॥ यस्य श्वेता विचक्षणा तिस्रो भूमीर् अधिक्षितः । त्रिर् उत्तराणि

व्यापून टाकलें, त्या वरुणाचें स्थान **अढळ** आहे. सप्तलोकांवरहि तो अधिपत्य चालवितो ९. —ज्यानें कृष्णवर्ण आच्छादनांना आपल्या नियमानुसार शुभ्रवर्ण केलें; ज्यानें सनातन स्थान उत्पन्न केलें, तो जन्मरहित आहे ह्मणून द्यावापृथिवींना आणि नक्षत्रपुंजांना खांबानें ( उचलून धरल्याप्रमाणें )वर सांवरून धरलें आहे १०.

## सूक्त ४२

सर्वसाक्षी परमात्म्यानें नक्षत्रें अचल केलीं; पृथिवीच्या विस्तीर्णपणाला मर्यादा घातली; आणि सम्राट् होऊन यच्चावत् भुवनांमध्यें राहिला; ही सर्व त्या वरुणाची अतर्क्य घटना होय १. —म्हणून हे स्तोत्या (भक्ता), त्या श्रेष्ठ वरुणाला प्रणिपात कर. प्राज्ञ आणि अमरत्वाचा प्रतिपालक अशा त्या वरुणापुढें नम्र हो. ज्यामध्यें तीन प्रकारचीं संरक्षणें आहेत असें धाम तो आम्हांला देवो; आणि आमच्या सन्निध राहणाऱ्या द्यावापृथिवीहि आमचें रक्षण करोत २.—अशा प्रकारची एकाग्रबुद्धि शिकणारा जो मी भक्त, त्याचें सत्कर्म आणि चातुर्य ह्यांना, हे देवा वरुणा, तूं तेजस्वी कर; म्हणजे त्यायोगानें सर्व संकटांतून आम्हीं पार पडूं, आणि उत्तम तऱ्हेनें तरून नेणाऱ्या नावेवर आरूढ होऊं ३. —हे अश्वीहो, तुम्हीं सोम प्राशन करावा म्हणून तुमच्याप्रीत्यर्थ सोमाभिषवाचे ग्रावे, हे सत्यस्वरूप देवानों, ज्ञानीभक्त ध्यानस्तोत्रें म्हणतांना फिरवून राहिले आहेत ४. —ज्याप्रमाणें हे अश्वीहो, पूर्वीं ज्ञानवान् अत्रींनीं तुम्हांला स्तुतींनीं पाचारण

---

पप्रतु र्वरुणस्य ध्रुवं सदः । स सप्तानाम् इरज्यति । नभन्ताम्० ॥ ९ ॥ यः श्वेतान् अधिनिर्णिजश् चक्रे कृष्णान् अनु व्रता । स धाम पूर्व्यं ममे । यः स्कम्भेन वि रोदसी अजो न द्याम् अधारयत् । नभन्ताम् अन्यके समे ॥ १० ॥

## सूक्तम् ४२

काण्वो नाभाकः वरुणोऽश्विनौ त्रिष्टुप्

अस्तभ्नात् द्याम् असुरो विश्ववेदा अमिमीत वरिमाणम् पृथिव्याः । आऽसीदत् विश्वा भुवनानि सम्राट् विश्वेत् तानि वरुणस्य व्रतानि ॥ १ ॥ एवा वन्दस्व वरुणं बृहन्तं नमस्य धीरम् अमृतस्य गोपाम् । स नः शर्म त्रिवरूथं वि यंसत् पातं नो द्यावा पृथिवी उपस्थे ॥ २ ॥ इमां धियं शिक्षमाणस्य देव क्रतुं दक्षं वरुण सं शिशाधि । ययाऽति विश्वा दुरिता तरेम सुतर्माणम् अधि नावं रुहेम ॥ ३ ॥ आ वां ग्रावाणो अश्विना धीभि र्विप्रा अचुच्युवुः । नासत्या सोम पीतये नभन्ताम् अन्यके समे ॥ ४ ॥ यथा वाम् अत्रिर् अश्विना गीर्भि र्विप्रो अजोहवीत् । नासत्या सोम-

केलें; हे सत्यस्वरूप देवहो, सोमप्राशनार्थ पाचारण केलें ५. —ज्याप्रमाणें पूर्वीच्या बुद्धिमान् भक्तांनीं, हे नासत्यहो, तुमचा धांवा केला; त्याप्रमाणें मीहि सहायासाठीं आणि तुम्हीं सोम प्राशन करावा म्हणून तुमची विनवणी करीत आहे. ६

## सूक्त ४३

ज्ञानरूप, सत्कर्मांचा विधाता, आणि भक्तांच्या यज्ञयागांचा कधींहि उच्छेद होऊं न देणारा.जो अग्नि त्याचीं स्तोत्रें माझी वाणी उच्चारीत असते. १ —हे सकलवस्तुजात जाणणाऱ्या, सूक्ष्मदर्शी अग्निदेवा, ह्या तुझ्या भक्ताला इच्छित देणारा जो तूं त्या तुझी उत्कृष्ट स्तुति रचून ती मीं म्हणत आहे २. —हे अग्नि, पहा, रश्मीप्रमाणें ह्या तुझ्या तीव्र ज्वाला आपल्या दाढांनीं वनेच्या वनें खाऊन फस्त करतात. ३. —जेव्हां, सोन्याप्रमाणें पिवळ्या जर्द अशा दावाग्नीच्या ज्वाला, धुराचे लोट वर सोडीत, वाऱ्यानें उफाळ होऊन आकाशापर्यंत जाऊन भिडतात ४. —अशा वेळीं निरनिराळे प्रज्वलित अग्नि प्रभातकाळच्या प्रकाशमान ध्वजांप्रमाणें सुंदर दिसतात ५. —जेव्हां जेव्हां अग्नि हा पृथ्वीवर ठिकठिकाणीं रोखून राहतो, तेव्हां तेव्हां त्या सर्वज्ञ अग्नीच्या मार्गांत त्याच्या पायाखालचे धूलिकण कृष्णवर्ण होतात ६. —औषधींना आपलें अन्न समजून अग्नि त्यांना भक्षण करतो, परंतु तृप्त न होतां, तो पोसलेल्या टवटवीत लतांकडेहि पुनः जातोच ७. —आपल्या ज्वालारूप जिव्हांनीं सर्वांला वांकविण्यास लावणारा आणि दीप्तिनें धगधगणारा अग्नि पहा, वनांमध्यें आपला प्रकाश पसरीत आहे ८. —अग्नि-

पीतये नभन्ताम्० ॥ ५ ॥ एवा वाम् अह्व ऊतये यथाऽहुवन्त मेधिराः । नासत्या सोमपीतये नभन्ताम् ॥ ६ ॥

## सूक्तम् ४३

आंगिरसो विरूपः अग्निः गायत्री.

इमे विप्रस्य वेधसः अग्नेर् अस्तृतयज्वनः । गिरः स्तोमास ईरते ॥ १ ॥ अस्मै ते प्रतिहर्यते जातवेदो विचर्षणे । अग्ने जनामि सुष्टुतिम् ॥ २ ॥ आरोका इव घेद् अह तिग्मा अग्ने तव त्विषः । दद्भि र्वनानि बप्सति ॥ ३ ॥ हरयो धूमकेतवो वातजूता उप द्यवि । यतन्ते वृथग् अग्नयः ॥ ४ ॥ एते त्ये वृथग् अग्नय इद्धासः सम् अदृक्षत । उषसाम् इव केतवः ॥ ५ ॥ कृष्णा रजांसि पत्सुतः प्रयाणे जातवेदसः । अग्नि र्यत् रोधति क्षमि ॥ ६ ॥ धासिं कृण्वान ओषधी र्बप्सद् अग्नि न वायति ।

देवा, उदकांमध्यें तुझा वास असून वनस्पतींमध्येंहि तूं आहेसच; त्यांच्या उदरांत राहून तूं पुनः प्रकट होतोस ९. —अग्निदेवा, ती तुझी ज्वाला स्रुचेच्या मुखांतील घृताहुतिचें चुंबन घेऊन सुप्रकाशित होते १०. —वृषभांचें अन्न, तसेंच धेनूंचें अन्न जो उत्पन्न करतो, सोमाप्रमाणें ज्याचा पृष्ठभाग विचित्रवर्ण असतो असा जो विधाता अग्नि त्याची सेवा आम्हीं स्तुतींनीं करीत आहों ११. —आणखी, आम्हीं प्रणिपात करून, हे यज्ञसंपादका, हे सर्वोत्कृष्ट कृत्यें करणाऱ्या अग्निदेवा, तुजला समिधांनीं प्रदीप्त करीत आहोंत १२. तसेंच हे निष्कलंका, भृगूप्रमाणें, मनूप्रमाणें, आणि हे आहुतिपूजिता अग्ने, अंगिराप्रमाणेंही आम्हीं तुजला पाचारण करीत आहोंत १३. —अग्निदेवा, तूं अग्नीनेंच, तूं स्तुतिज्ञानरूप देव ज्ञानीभक्ताच्या योगानेंच, तूं सद्रूप, सज्जनाच्या योगानेंच, तूं सन्मित्र, मित्रत्वानेंच प्रज्वलित होतोस १४. —तर हे अग्नें स्तवनज्ञ हविर्दात्याला हजारों प्रकारचें ऐश्वर्य आणि वीरोचित उत्साह दे. १५ —दीनबन्धो अग्निदेवा, हे दर्पदलना, हे अरुणाश्वा, हे शुद्धकर्मप्रवर्तका, माझ्या ह्या स्तवनाचा स्वीकार कर १६. आणखी, हे अग्निदेवा, पहा माझ्या स्तुति, हंबरणाऱ्या वासराकरितां गाई जशा गोठ्याकडे धांवतात त्याप्रमाणें, तुझ्या आश्रयाला धावल्या आहेत १७. —अंगिरसांना अत्यंत पूज्य अशा देवा, जगांतील सर्व समंजस लोक आपआपल्या मनोरथांसाठीं, हे अग्निदेवा, तुझ्याकडेच लक्ष लावून बसले आहेत १८. —मनोजयी, बुद्धिमान् आणि ज्ञानी अशा भक्तांनीं, अग्नीनें हवींचा स्वीकार करावा म्हणून आपल्या एकाग्रतेनें त्याला हलविलें आहे १९. —हे अग्ने, रणमैदानावर आपलें सत्वबल गाजविणारा, हव्यवाहक आणि यज्ञसंपादक जो तूं, त्या तुझी स्तुति अध्वरयाग करूं इच्छिणारे भक्तजन करीत असतात २०. —सर्व ठिकाणीं सर्वांना तूं सारखाच दर्शनीय वाटतोस; तूं सर्व मानव जातींचा अगदीं योग्य

---

पुन यंत् तरुणीर् अपि ॥ ७ ॥ जिह्वाभिर् अह नंनमत् अर्चिषा जञ्जणाभवन् । अग्नि र्वनेषु रोचते ॥ ८ ॥ अप्सु अग्ने सधिष्टव सौषधीर् अनु रुध्यसे । गर्भे सन् जायसे पुनः ॥ ९ ॥ उत् अग्ने तव तद् घृताद् अर्ची रोचत आहुतम् । निंसानं जुह्वो मुखे ॥ १० ॥ उक्षान्नाय वशान्नाय सोमपृष्ठाय वेधसे । स्तोमैः विधेम अग्नये ॥ ११ ॥ उत त्वा नमसा वयं होत र्वरेण्यक्रतो । अग्ने समिद्भिर् ईमहे ॥ १२ ॥ उत त्वा भृगुवत् शुचे मनुष्वत् अग्न आहुत । अङ्गिरस्वत् हवामहे ॥ १३ ॥ त्वं हि अग्ने अग्निना विप्रः विप्रेण सन् सता । सखा सख्या समिध्यसे ॥ १४ ॥ स त्वं विप्राय दाशुषे रयिं देहि सहस्रिणम् । अग्ने वीरवतीम् इषम् ॥ १५ ॥ अग्ने भ्रातः सहस्कृत रोहिदश्व शुचिव्रत । इमं स्तोमं जुषस्व मे ॥ १६ ॥ उत त्वा ऽग्ने मम स्तुतो वाश्राय प्रतिहर्यते । गोष्ठं गाव इवाऽऽशत ॥ १७ ॥ तुभ्यं ता अङ्गिरस्तम विश्वा सुक्षितयः पृथक् । अग्ने कामाय येमिरे ॥ १८ ॥ अग्निं धीभि र्मनीषिणः मेधिरासो विपश्चितः । अग्रसद्याय हिन्विरे ॥ १९ ॥ तं त्वाम् अज्मेषु वाजिनं तन्वाना अग्ने अध्वरम् ।

असा प्रभु आहेस, म्हणून संग्राममध्यें आम्हीं तुझाच धांवा करीत असतों २१. —घृतयुक्त आहुति अर्पण केली असतां जो अग्निदेव सुप्रकाशित होतो त्याचें स्तवन कर; तोच तुझी हांक ऐकेल २२. —म्हणून आम्हींहि, हे अग्ने, भक्तांची हांक ऐकणारा, सकलवस्तुमात्र जाणणारा, द्वेष्ट्यांना ठार करणारा अशा तुजला पाचारण करीत आहों २३. —मनुष्यमात्राचा लोकोत्तर राजा, सर्व सद्धर्मांचा अधिपति, अशा ह्या अग्नीचें मीं स्तवन करतों; तोच माझा धांवा ऐकेल २४. —सकलवस्तुजाताचें आयुष्य तेंच ज्याचें बल असा जनहितकारी, सत्वबलाढ्य जो अग्नि त्याला (आम्हीं उद्दीपित करतों), शूराला किंवा तेजस्वी अश्वाला उत्तेजन द्यावें त्याप्रमाणें आम्हीं उद्दीपित करतों २५. —क्रूर द्वेष्ट्यांच्या समुदायांचा निःपात करून आणि यच्चावत् राक्षसांना जाळून भस्म करून, हे अग्निदेवा, तूं आपल्या तीव्र तेजानें प्रकाशित हो २६. —आंगिरसांना अत्यंत पूज्य अशा अग्ने, सामान्यजनहि मनुभक्ताप्रमाणें तुला समिधांनीं प्रदीप्त करतात, तर हे अग्निदेवा, तूं माझी प्रार्थना ऐक २७. —हे अग्ने, तूं आकशांत प्रकट होतोस, किंवा उदकांमध्येंहि प्रकट होतोस, तर हे दर्पदलना ( बलप्रभवा ), स्तुतींच्या योगानें आम्हीं तुजला हांक मारीत आहोंत. २८. —ते भक्तजन, तसेच हे सुखवस्तु लोक देखील तुझ्या सेवनार्थ निरनिराळ्या आहुति तुजला अर्पण करतात २९. —तर हे अग्नि, आम्हीं उत्तम ध्यानप्रवण, आणि शूरांना उचित अशी दृष्टि निरंतर ठेवणारे भक्त, दुर्धर संकटांतून सहज पार होऊं असें कर ३०. —सुप्रसन्न, सर्वप्रिय, वेदीवर अधिष्ठित, आणि प्रकाशानें पावन करणाऱ्या अग्नीची आम्हींहि प्रसन्नचित्तानेंच प्रार्थना करतों ३१. —तर हे अग्नि, असा तूं प्रकाशवैभवशालीदेव सूर्याप्रमाणें आपल्या किरणानीं पुढें सरसावून आणि आपला प्रभाव गाजवून अंधकाराचा नायनाट कर ३२. —म्हणून हे दर्पदलना,

---

वह्निम् होतारम् ईळते ॥२०॥ पुरुत्रा हि सदृङ् असि विशो विश्वा अनु प्रभुः। समत्सु त्वा हवामहे ॥ २१ ॥ तम् ईळिष्व य आहुतः अग्नि र्विभ्राजते घृतैः। इमं नः शृणवत् हवम् ॥ २२ ॥ तं त्वा वयं हवामहे शृण्वन्तं जातवेदसम्। अग्ने घ्नन्तम् अप द्विषः ॥ २३ ॥ विशां राजानम् अद्भुतम् अध्यक्षं धर्मणाम् इमम्। अग्निम् ईळे स उ श्रवत् ॥ २४ ॥ अग्निं विश्वायुवेपसं मर्यं न वाजिनं हितम्। सप्तिं न वाजयामसि ॥ २५ ॥ घ्नन् मृध्राणि अप द्विषो दहन् रक्षांसि विश्वहा। अग्ने तिग्मेन दीदिहि ॥ २६ ॥ यं त्वा जनास इन्धते मनुष्वत् अङ्गिरस्तम। अग्ने स बोधि मे वचः ॥ २७ ॥ यद् अग्ने दिविजा असि अप्सुजा वा सहस्कृत। तं त्वा गीर्भि र्हवामहे ॥ २८ ॥ तुभ्यं घेत् ते जना इमे विश्वा सुक्षितयः पृथक्। धासिं हिन्वन्ति अत्तवे ॥ २९॥ ते घेद् अग्ने सुआध्यः अहा विश्वा नृचक्षसः। तरन्तः स्याम दुर्गहा ॥ ३० ॥ अग्निं मन्द्रं पुरुप्रियं शीरं पावकशोचिषम्। हृद्भि र्मन्द्रेभिर् ईमहे ॥ ३१ ॥ स त्वं अग्ने विभावसुः सृजन् सूर्यो न रश्मिभिः। शर्धन् तमांसि

ज्याचा क्षय होणार नाहीं आणि जें अभिलाषयोग्य आहे असें धन आम्हीं तुजपाशीं मागतों ३३.

## सूक्त ४४

समिधा अर्पण करून अग्नीची सेवा करा; घृताहुतींनीं त्याला प्रदीप्त करा, आणि त्याच्या ठिकाणीं हवींचें हवन करा १. —हे अग्नि, माझ्या स्तोत्राचा स्वीकार कर, ह्या मननीय मनोल्हादि स्तवनानें वृद्धिंगत हो आणि आमच्या उत्कृष्ट स्तवनांची आवड धर २. —ह्या अग्नीला आम्हीं आमचा प्रतिनिधि म्हणून आमच्यापुढें स्थापन करतों. हवि पोहोंचविणाऱ्या त्या विभूतीची आम्हीं प्रार्थना करतों, म्हणजे तो दिव्यविबुधांना येथें घेऊन येईल ३. —तूं प्रज्वलित झालास म्हणजे हे दीप्तिमन्ता अग्ने, तुझी विस्तीर्ण आणि शुभ्रतेजस्क प्रभा चोंकिडे फांकते ४. —ह्या माझ्या घृतपूर्ण स्रुचा तुझ्या जवळ प्राप्त होवोत, हे प्रेमळ अग्निदेवा, आमच्या हविर्भागांचा स्वीकार कर ५. —हृष्टचित्त, यज्ञसंपादक, (देवांचा) ऋत्विज, अद्भुत दीप्तिमान् आणि प्रकाशनिधि अशा अग्नीचें मी स्तवन करतों; तो माझी हांक ऐकेल ६. —तो पुरातन यज्ञसंपादक अग्नि स्तवनयोग्य आहे, तो सर्वसेव्य, काव्यस्फूर्ति देणारा, आणि अध्वरांना अपूर्व शोभा देणारा आहे ७. —हे अंगिरसांना अत्यंत पूज्य देवा, आमच्या ह्या हविर्द्रव्यांचा तूं वारंवार स्वीकार करून, आमचा यज्ञ हे अग्निदेवा, तूं योग्य काळीं तडीस ने ८. —हे सज्जनपालका, शुभ्रप्रकाशा, तूं प्रज्वलित होऊन आणि सर्व लक्षांत घेऊन दिव्य विभूतींना येथें आण ९.

जिघ्नसे ॥ ३२ ॥ तत् ते सहस्व ईमहे दात्रं यत् नोपदस्यति । त्वद् अग्ने वार्यं वसु ॥ ३३ ॥

## सूक्तम् ४४

आङ्गिरसो विरूपः अग्निः गायत्री

समिधाऽग्निं दुवस्यत घृतै बोधयतातिथिम् । आऽस्मिन् हव्या जुहोतन ॥१॥ अग्ने स्तोमं जुषस्व मे वर्धस्वा–नेन मन्मना । प्रति सूक्तानि हर्य नः ॥ २ ॥ अग्निं दूतं पुरो दधे हव्यवाहम् उपब्रुवे । देवान् आ सादयात् इह ॥ ३ ॥ उत् ते बृहन्तो अर्चयः समिधानस्य दीदिवः । अग्ने शुक्रास ईरते ॥ ४ ॥ उप त्वा जुह्वो मम घृताची र्यन्तु हर्यत । अग्ने हव्या जुषस्व नः ॥ ५ ॥ मन्द्रं होतारम् ऋत्विजं चित्रभानुं विभावसुम । अग्निम् ईळे स उ श्रवत् ॥ ६ ॥ प्रत्नं होतारम् इड्यं जुष्टम् अग्निं कविक्रतुम् । अध्वराणाम् अभिश्रियम् ॥ ७ ॥ जुषाणो अङ्गिरस्तम इमा हव्यानि आनुषक् । अग्ने यज्ञं नय ऋतुथा ॥ ८ ॥ समिधान उ सन्त्य शुक्र शोचे

—तूं ज्ञानशील, यज्ञसंपादक, द्रोहरहित, धूम्रध्वज, दीप्तिवैभव आणि यज्ञांचा कीर्तिध्वज आहेस त्या तुझी विनवणी आम्हीं करीत आहों १०. —अग्निदेवा, आमचें सर्वतोपरी रक्षण कर; हे देवा आमचा बचाव कर; हे दर्पदमना, क्रूर दुष्टांच्या द्वेषाचा तुगडा करून टाक ११. —पुरातन मननीय स्तोत्रानेंच आपल्या स्वतःच्या शरीरास सुशोभित करणारा प्रतिभाशालि अग्नि हा ज्ञानशील भक्ताच्या हातून वृद्धिंगत होतो १२. —ऊर्जस्वितेचा उद्गम असा जो पवित्रप्रकाश अग्नि, त्याला आम्हीं आमच्या उत्तम अध्वर-यागाच्या प्रसंगीं येण्याविषयीं हात जोडून विनवीत आहोंत १३. —हे प्रसन्नदीप्ते अग्नि-देवा, आपल्या शुभ्रकान्तीनें मंडित होऊन दिव्य विभूतींसह येथें येऊन कुशासनावर आरोहण कर १४. —जो मानव स्वतःच्या गृहांत अग्नीची सेवा करितो त्यालाच तो अग्नि वारं-वार ऐश्वर्य देतो १५. —अग्नि हा द्युलोकाचें मस्तक किंवा शिखर, आणि पृथिवीचा अधिपति होय. तो उदकांच्या बीजशक्तीला विकसित करतो १६. —आणखी हे अग्निदेवा तुझ्या निर्मळ, प्रखर, देदीप्यमान ज्वाला, आणि तुझ्या दीप्ति सर्वएकदमच वर लोटत जातात १७. —अभिलषणीय आणि उत्कृष्ट अशा देणगीवर सत्ता तुझीच चालते; हे अग्निदेवा तूं स्वर्लोकाचा अधिपति आहेस म्हणून मीं तुझा स्तोतृजन तुझ्या आश्रयाखालीं राहीन १८. —हे अग्ने, मनोजयी भक्त आपल्या चिन्तनांनीं तुजला हेलावतात. म्हणून आमच्याहि स्तुति तुझा महिमा वृद्धिंगत करोत १९. —दुर्दम्य, स्वतंत्र, देवाचा प्रतिनिधि, आणि निरंतर घोष करणारा जो अग्नि त्याच्या सख्यत्वाची आम्हीं आकांक्षा धरतों २०. —अग्नि हा अत्यंत शुद्धचारित्र्य, निष्कलंक, ज्ञानी, आणि निर्मल कवि आहे, तो शुद्ध सत्वदेव, आहुति अर्पण केली असतां सुप्रकाशित होतो २१. —तसेंच माझ्या ध्यानक्रिया, माझ्या

इहा वह । चिकित्वान् दैव्यं जनम् ॥९॥ विप्रं होतारम् अद्रुहं धूमकेतुं विभावसुम् । यज्ञानां केतुम् ईमहे ॥ १० ॥ अग्ने नि पाहि नस् त्वं प्रति ष्म देव रीषतः । भिन्धि द्वेषः सहस्कृत ॥ ११ ॥ अग्निः प्रत्नेन मन्मना शुम्भानस् तन्वं स्वाम् । कवि र्विप्रेण वावृधे ॥ १२ ॥ ऊर्जो नपातम् आ हुवे अग्निम् पावक शोचिषम् । अस्मिन् यज्ञे सु अध्वरे ॥ १३ ॥ स नो मित्रमहस् त्वम् अग्ने शुक्रेण शोचिषा । देवैर् आ सत्सि बर्हिषि ॥ १४ ॥ यो अग्निं तन्वो दमे देवं मर्तः सपर्यति । तस्मा इत् दीदयत् वसु ॥ १५ ॥ अग्नि र्मूर्धा दिवः ककुत् पतिः पृथिव्या अयम् । अपां रेतांसि जिन्वति ॥ १६ ॥ उत् अग्ने शुचयस् तव शुक्रा भ्राजन्त ईरते । तव ज्योतींषि अर्चयः ॥ १७ ॥ ईशिषे वार्यस्य हि दात्रस्याग्ने स्वर्पतिः । स्तोता स्याम् तव शर्मणि ॥ १८ ॥ त्वाम् अग्ने मनीषिणस् त्वां हिन्वन्ति चित्तिभिः । त्वां वर्धन्तु नो गिरः ॥ १९ ॥ अदब्धस्य स्वधावतो दूतस्य रेभतः सदा । अग्नेः सख्यं वृणी-महे ॥ २० ॥ अग्निः शुचिव्रततमः शुचि र्विप्रः शुचिः कविः । शुची रोचत आहुतः ॥ २१ ॥ उत त्वा धीतयो मम गिरो वर्धन्तु विश्वहा । अग्ने सख्यस्य

स्तुति ह्या सर्व तुझेंच महात्म्य वृद्धिंगत करोत; हे अग्नी आमच्या मित्रत्वाचें—स्मरण ठेव २२. —हे अग्निदेवा, जर मी तुझ्या ठिकाणीं असतों, आणि तूं जर माझ्या ठिकाणीं असतास तर तुझ्या प्रार्थना येथल्या येथेंच सत्य आणि सफल झाल्या असत्या २३. —ऐश्वर्यांचा-निधि असा तूं स्वतः ऐश्वर्यरूपच आहेस; हे अग्नि, प्रकाश हें तुझेंच वैभव होय. म्हणून तुझ्या वात्सल्यबुद्धींत आम्हांला जागा मिळेल असें कर २४. —अग्निदेवा, तुज सद्धर्म-नियामकाकडे माझ्या स्तुति, नद्या समुद्राकडे लोटतात त्याप्रमाणें, गर्जना करीत जोरानें धांवत आहेत. २५. —तारुण्याढय, मनुष्यांचा प्रभु, स्फूर्तिदाता सर्वभक्षक, नाना-रूपधर अशा अग्नीला मी आपल्या मननयोग्य स्तोत्रांनींच सुशोभित करतों. २६. —यज्ञाचा अग्रेसर, तीक्ष्णदंष्ट्र आणि महाबलाढय अशा अग्नीला आम्हीं स्तोत्रांच्या योगा-नेंच त्वरित कळवळा उत्पन्न करूं २७. —हे अग्नि, हे सत्प्रतिपालका, हा स्तोता तुझ्याच सन्निध राहो; हे पावना, त्याच्यावर कृपाकर २८. —तूं प्राज्ञ आहेस; आमच्या हविर्भागांमध्यें तूं वास करतोस; ज्ञानरूप म्हणूनच जागरूक राहतोस, आणि हे अग्नि, द्युलोकांत निरंतर प्रकाशतोस २९. —संकटें पुढें वाढून आलीं आहेत, क्रूरांनीं पुढें चाल केली आहे, तर अशा प्रसंगीं हे स्फूर्तिदात्या, हे दिव्यनिधे, आमच्या आयुष्याची दोरी लांब आणि बळकट कर ३०.

## सूक्त ४५

जे अग्नीला समिधांनीं प्रज्वलित करतात; त्याच्यासाठीं कुशासन सदासर्वदा व्यव-स्थित ठेवतात, अशांचा तारुण्याढय इन्द्र मित्र होतो १. —त्यांच्या समिधा उत्कृष्ट,

बोधि नः ॥ २२ ॥ यद् अग्ने स्याम् अहं त्वं त्वं वा घा स्याः अहम् । स्यु स्ते सत्या इहाशिषः ॥ २३ ॥ वसु वॅसुपति हिं कम् असि अग्ने विभावसुः । स्याम ते सुमतौ अपि ॥ २४ ॥ अग्ने धृतव्रताय ते समुद्रायेव सिन्धवः । गिरो वाश्रास ईरते ॥ २५ ॥ युवानं विश्पतिं कविं विश्वादं पुरुवेपसं । अग्निं शुंभामि मन्मभिः ॥ २६ ॥ यज्ञानां रथ्ये वय तिग्मजम्भाय वीळवे स्तोमैर् इषेम अग्नये ॥ २७ ॥ अयम् अग्ने त्वे अपि जरिता भूतु सन्त्य । तस्मै पावक मृळय ॥ २८ ॥ धीरो हि असि अद्मसत् विप्रो न जागृविः सदा । अग्ने दीदयसि द्यवि ॥ २९ ॥ पुरा अग्ने दुरितेभ्यः पुरा मृध्रेभ्यः कवे । प्रण आयु वॅसो तिर ॥ ३० ॥

## सूक्तम् ४५

काण्वस् त्रिशोकः इन्द्रः गायत्री

आ घा ये अग्निम् इन्धते स्तृणन्ति बर्हिर् आनुषक् । येषाम् इन्द्रो युवा सखा ॥१॥ बृहन् इत् इध्म एषां भूरि शस्तं पृथुः स्वरुः । येषाम् इन्द्रो युवा सखा ॥२॥

त्यांचें स्तोत्र प्रशंसनीय, त्यांचा स्वरु देखील भक्कम असतो कीं ज्यांचा मित्र तारुण्याढ्य इन्द्र हा असतो २. —प्रतिस्पर्धी जरी त्याच्या स्वतःच्या सैनिकांनीं वेष्टित असला तरी युद्ध सुरू होण्यापूर्वीच जो शूर सेतानायक त्या शत्रूवर आपल्या सतेज अनुपायांसह चाल करून जातो, तारुणाढ्य इन्द्र हा अशांचाच मित्र होतो ३. —प्रकट होतांच वाण हातीं घेऊन त्या वृत्रनाशनानें अदितिमातेला विचारलें कीं, "भयंकर शत्रु ( म्हणतेस ) ते कोठें आहेत ? ते आहेत असें तरी कोणीं ऐकलें आहे काय ?" ४. —तेव्हां त्याहि उत्कटवल शालिनी ( अदिति )नें म्हटलें कीं ज्याला तुझें शत्रुत्वच करणें आवडतें तो ( दुष्टवृत्र ) मत्त हत्तीप्रमाणें गिरिकंदरांत (दडून) तुझ्याशीं युद्ध करूं पहात आहे ५. —हे दातृश्रेष्ठा, हें ऐक कीं, ज्याला तूं मनापासून प्रिय असतोस, त्याला पाहिजे असेल तें तूं नेऊन देतोस. आणि जें बळकट व्हावें असें तूं मनांत आणतोस ती वस्तु तत्काळ बळकट होते ६. —उत्कृष्ट अश्व वाळगणारा युद्धकांक्षी इन्द्र जेव्हां युद्धाला निघतो तेव्हां तो सर्व रथांवाहि महारथी होतो ७. —हे वज्रधरा, आमच्यावर हल्ला चढविणाऱ्या यच्चावत् शत्रूंची चोहो-कडे दाणादाण उडेल असें कर. अत्यंत सत्कीर्तियुक्त असा तूंच आमचा ( धुरीण ) हो ८. —ज्याला कोणीहि दुष्ट अपाय करूं शकत नाहीं असा इन्द्र, आम्ही विजय संपादन करावा म्हणून आमच्यां उत्तम रथाला सर्वांच्या पुढें नेवो ९. —तुझा द्वेष करणाऱ्याच्या वाऱ्यासहि आम्हीं उभे राहणार नाहीं—हे समर्था इन्द्रा, (ज्ञान) गोधनप्रचुर अशीं जीं तुझीं औदार्य कृत्यें त्यांतच आम्हीं तन्मय होऊं असें कर. १०. —हे वज्रधरा (आम्हीं) अश्व संपन्न, शेंकडों प्रकारच्या संपत्तीनें मंडित, युद्धास सिद्ध आणि अपराजित आहोंत; ते हळू हळू ( ऐटीनें) मार्गक्रमण करूं असें कर ११. —तुझी वात्सल्यवृत्ति सदैव सज्जच आहे, ती शेंकडोंच काय, पण सहस्रावधि प्रसाद स्तोतृजनाला अर्पण करते १२. —हे इन्द्रा, शत्रूंचें धन जिंकून ( भक्तांना ) देणारा तूं आहेस हें आम्हीं जाणतों. त्यांचे किल्ले कितीहि कठीण असले तरी पूर्वी तूं "**गय**" हा किल्ला फोडून टाकलास त्याप्रमाणें तेहि फोडून

---

अयुद्ध इत् युधा वृतं शूर आऽजति सत्वभिः । येषाम् इन्द्रो युवा सखा ॥ ३ ॥ आ बुन्दं वृत्रहा ददे जातः पृच्छत् वि मातरम् । के उग्राः के ह शृण्विरे ॥ ४ ॥ प्रति त्वा शवसी वदत् गिरौ अप्सो न योधिषत् । यस् ते शत्रुत्वम् आ चके ॥ ५ ॥ उत त्वं मघवन् शृणु यस् ते वष्टि ववक्षि तत् । यत् वीळयासि वीळु तत् ॥ ६ ॥ यत् आजिं याति आजिकृत् इन्द्रः स्वश्वयुर् उप । रथीतमो रथीनाम् ॥ ७ ॥ वि षु विश्वा अभियुजो वज्रिन् विष्वक् यथा वृह । भवा नः सुश्रवस्तमः ॥ ८ ॥ अस्माकं सु रथं पुरः इन्द्रः कृणोतु सातये । न यं धूर्वन्ति धूर्तयः ॥ ९ ॥ वृज्याम ते परि द्विषः अरं ते शक्र दावने । गमेमेत् इन्द्र गोमतः ॥ १० ॥ शनै श्चित् यन्तो अद्रिवः अश्वावन्तः शतग्विनः । विवक्षणा अनेहसः ॥ ११ ॥ ऊर्ध्वा हि ते दिवेदिवे सहस्रा सूनृता शता । जरितृभ्यो वि मंहते ॥ १२ ॥ विद्माहि त्वा धनंजयम् इन्द्र दृळहा

टाकतोस हेंहि आम्ही जाणतों १३. —हे सर्वोन्नता, हे स्फूर्तिदात्या, हे धडाडीनें हल्ला चढविणाऱ्या देवा, तुजला हे सोमबिन्दु हृष्टचित्त करोत. तुझा असा पणच आहे, म्हणूनच आम्हीं तुझी विनवणी करीत आहों १४. —जो कोणी पैसेवाला अधिक द्रव्यसंचय व्हावा ह्यासाठीं तुझ्या प्रीत्यर्थ कांहीं दानधर्म तर करीत नाहींच, पण उलट तुझा द्वेष करतो त्याची दौलत तूं आम्हांला दे १५. —हे इन्द्रा, सोमार्पण करणारे आमचे मित्र, घरधनी चारा हातीं घेऊन धेनूची वाट पाहतात त्याप्रमाणें तुझ्याकडे दृष्टि लावून राहिले आहेत. १६ —तूं कांहीं बहिरा नाहींस, उलट सुहृदय आहेस, आणि तुझे कर्णहि तीव्र आहेत, म्हणून तुझ्यापासून दूर असतां तुला येथून आम्हीं हांक मारीत आहों १७. —कारण, तूं आमचा हा धांवा ऐकावास, आमचें बळ अनिवार करावेंस, आणि आमचा अगदीं जवळचा आप्त व्हावेंस अशीच आमची तुजला विनवणी आहे १८. —जेव्हां जेव्हां आम्हीं अगदीं कावून गेलों तेव्हां तेव्हां आम्हीं तुझेंच चिन्तन केलें; तर हे इन्द्रा, तूं ( ज्ञान ) गोधनदाता आमची दुःस्थिति लक्षांत घे १९. —म्हातारे जसे काठीवर भार टाकतात त्याप्रमाणें हे उत्कटबलाच्या प्रभो, आंम्हीं तुझ्याचवर अवलंबून राहिलों आहों; आमच्या ह्या यज्ञसंमेलनांत तूं आम्हांस मनःपूर्वक हवा आहेस २०. —ज्याचें पौरुष अमर्याद आहे, जो सत्वपूर्ण आहे अशा इन्द्राप्रीत्यर्थ स्तोत्रगायन करा; युद्धांत त्याचें निवारण कोणीहि करूं शकत नाहीं. २१. —हे वीरपुंगवा, आम्हीं सोमरस पिळला म्हणजे तूं तो प्राशन करावास म्हणून आणखीहि रस पात्रांत ओतीत आहों, तर तृप्त हो आणि हर्ष पाव २२. —स्वहितमूढ परंतु रक्षणासाठीं हापापलेले, किंवा तुझा उपहास करणारे असले नीच लोक तुला फसवितील हें शक्यच नाहीं. परंतु ब्रह्मद्वेष्ट्यांची म्हणजे सत्यज्ञानाचा द्वेष करणारांची आवड तूंहि ठेऊं नको २३. —येथें यज्ञांत तुझा महाप्रसाद मिळावा म्हणून हे गोदुग्धमिश्रित रस तुजला हर्षनिर्भर करोत;

चित् आरुजम् । आदारिणं यथा गयम् ॥ १३ ॥ ककुहं चित् त्वा कवे मन्दन्तु धृष्णो इन्दवः । आ त्वा पणिं यत् ईमहे ॥ १४ ॥ यस् ते रेवान् अदाशुरिः प्रममर्ष मघत्तये । तस्य नो वेद आभर ॥ १५ ॥ इमे उ त्वा वि चक्षते सखायः इन्द्र सोमिनः । पुष्टावन्तो यथा पशुम् ॥ १६ ॥ उत त्वाऽबधिरं वयं श्रुत्कर्णं सन्तम् ऊतये । दूरात् इह हवामहे ॥१७॥ यत् शुश्रुयाः इमं हवं दुर्मर्षं चक्रियः उत । भवेर् आपि नो अन्तमः ॥ १८ ॥ यत् चित् हि ते अपि व्यथि जगन्वांसो अमन्महि । गोदाः इत् इन्द्र बोधिनः ॥ १९ ॥ आ त्वा रम्भं न जिव्रयो ररम्भा शवसस्पते । उश्मसि त्वा सधस्थ आ ॥ २० ॥ स्तोत्रम् इन्द्राय गायत पुरुनृम्णाय सत्वने नकिर्यं वृण्वते युधि ॥ २१ ॥ अभि त्वा वृषभा सुते सुतं सृजामि पीतये । तृम्पा वि अश्नुही मदम् ॥ २२ ॥ मा त्वा मूराः अविष्यवो मोपहस्वान आ दभन् । माकीं ब्रह्मद्विषो वनः ॥ २३ ॥ इह त्वा गोपरीणसा महे मन्दन्तु राधसे । सरो गौरो यथा

ह्या रस गौरमृग जसा सरोवराचें उदक पितो त्याप्रमाणें प्राशन कर २४. —दूरलोकीं ( वास करणाऱ्या ) वृत्रनाशन इन्द्रानें ज्या पुरातन किंवा नवीन कवनांची प्रेरणा केली तींच कवनें ह्या धर्मसभेंत म्हणा २५. --कद्रूनें अर्पण केलेला सोमरस इन्द्रानें प्राशन केला, तेव्हां तेथेंच हजारों सैनिकांनीं धुमाळी उडविलेल्या युद्धांत त्याचें पौरुष चमकलें २६. —(जें सत्य आहे) तें **तुर्वशा**मध्यें, आणि **यदु**मध्यें त्याला आढळलें; तसेंच युद्धांत आणि यज्ञकर्मीतहि तें उपलब्ध झालें २७. —तुमच्या लोकांचा तारक, गोधनार्थ चाललेल्या सत्वयुद्धाचा पुरस्कर्ता आणि सर्वांशीं समत्वानें वागणारा जो ( इन्द्र ) त्याचीच मीं महती गायिली २८. —सोम पिळून सिद्ध झाला आणि सामगायन सुरू झालें म्हणजे तुम्हांनीं ज्याचें महात्म्य वृद्धिंगत केलें त्या ऋभुप्रतिपालक इन्द्राला ( यज्ञमंडपांतून ) कोणीहि माघारें वळवूं शकत नाहीं २९. —( पुष्कळ नद्यांचा ) उगम ज्याच्या ठिकाणीं असतो अशा एका विशाल पर्वताचा ज्यानें **त्रिशोक**ाकरितां भेद केला, आणि (उदकरूप) धेनूंना जाण्याकरितां वाट करून दिली ३०. —असा तूं (इन्द्र) जें जें मनांत आणशील, आणि हर्षोल्लसित होऊन जे जें योजलें असशील तें तें तूं पार पाडणार नाहींस काय ? म्हणूनच ( हे इन्द्रा, ) आम्हांवर कृपाकर ३१. —तुझ्यासारख्यानें यत्किंचित् जरी केलें तरी तें जगांत लागलीच चोहोंकडे माहित होतें, तर हे इन्द्रा, तुझें लक्ष आमच्याकडे लागो ३२. —इन्द्रा, तूं आम्हांवर कृपा करशील तरच त्या सत्कीर्ति, आणि तीं उत्कृष्ट वर्गनें तुझींच होतीं असें लोक समजतील ३३. —आमच्याकडून एक अपराध होवो, दोन होवोत, तीन होवोत, किंवा पुष्कळ होवोत, परंतु हे वीरा, तूं आमचा नाश करूं नको ३४. —तुझ्यासारख्या भीषणस्वरूपाला, शत्रूंच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उठवून देणाऱ्याला, आणि विलक्षण पराक्रम करणाऱ्याला पाहून, मी स्वतः जरी प्रतिस्पर्ध्यांस पादाक्रांत करणारा आहें तरी सुद्धां भिऊन गेलों ३५. --माझा मित्र किंवा माझा

पिव ॥ २४ ॥ या वृत्रहा परावति सना नवा च चुच्युवे। ता संसत्सु प्र वोचत ॥ २५ ॥ अपिबत् कद्रुवः सुतम् इन्द्रः सहस्रबाह्वे। अत्रा-देदिष्ट पौंस्यम् ॥२६॥ सत्यं तत् तुर्वशे यदौ विदानो अह्नवाय्यम्। वि आनट् तुर्वणे शमि ॥ २७ ॥ तरणिं वो जनानां त्रदं वाजस्य गोमतः। समानम् उ प्रशंसिषम् ॥ २८ ॥ ऋभुक्षणं न वर्तवे उक्थेषु तुग्र्यावृधम्। इन्द्रं सोमे सचा सुते ॥ २९ ॥ यः कृन्तत् इत् वि योन्यम् त्रिशोकाय गिरिं पृथुम्। गोभ्यो गातुं निरेतवे ॥ ३० ॥ यत् दधिषे मनस्यसि मन्दानः प्रेत् इयक्षसि। मा तत् क इन्द्र मृळय ॥ ३१ ॥ दभ्रं चित् हि त्वावतः कृतं शृण्वे अधि क्षमि। जिगातु इन्द्र ते मनः ॥ ३२ ॥ तवेत् ऊ ताः सुकीर्तयः असन् उत प्रशस्तयः। यत् इन्द्र मृळयासि नः ॥ ३३ ॥ मा नः एकस्मिन् आगसि मा द्वयोर् उत त्रिषु। वधी मा शूर भूरिषु ॥ ३४ ॥ बिभाय हि त्वावतः उग्रात् अभि प्रभंगिनः। दस्मात् अहं ऋतीषहः ॥ ३५ ॥ मा सख्युः शूनम् आ विदे मा पुत्रस्य

पुत्र यांची दुःस्थिति पाहण्याचें, हे अपारधनाढ्या देवा, माझ्या नशिवीं आणूं नको; देवा, तुझें अंतःकरण ( आमच्याकरितां ) कळवळून जावो ३६. —मानव हो ! ज्याला खरो-खरच कांहीं त्रास झाला नाहीं असा कोणीं मनुष्य आपल्या जिवलग मित्रास कधीं तरी असे म्हणेल काय कीं अमक्यानें आम्हांला मारलें, किंवा अमका आम्हांला सोडून गेला ? ३७. —हे वीरपुंगवा, सोमरस पिळून असाच जवळ आणला कीं तूं समृद्धीचें भाण्डार (खुलें करतोस), शिकारी मनुष्य आपले श्वान एकदम मोकळे करतो त्याप्रमाणें मोकळें करतोस,३८. —ते तुझे कल्याणकारक, रथाला योग्य, आणि हां हां म्हणतां जोडले जाणारे हरिद्वर्ण अश्व मीं हातीं धरून ( तुजजवळ ) आणतों म्हणजे आम्हां " ब्रह्म " स्तोत्र म्हणणारांना तूं इच्छित वरदान देशीलच ३९. —यच्चावत् द्वेष्ट्यांचा उच्छेद कर; ( भक्तांना ) पीडा करणाऱ्या दुष्टांचे समुदाय ठार कर, आणि जें निधान स्पृहणीय आहे तें आम्हांस अर्पण कर ४०. —इन्द्रा, तें निधान जरी कठिण स्थळीं, अचल जागीं, किंवा अवघड खोल ठिकाणीं जपून ठेवलेलें असलें तरी तें स्पृहणीय निधान तूं आम्हांस दे ४१ —जें विपुल ऐश्वर्य तूंच दिलेंस असें सर्व मनुष्यें म्हणतील, तेंच स्पृहणीय निधान तूं आम्हांस दे ४२.

अध्याय तिसरा समाप्त

## अध्याय चौथा

## सूक्त ४६

हे अपारनिधे (देवा), हे ( सन्मार्ग ) धुरीण, हे हरिद्वर्ण अश्वांवर आरुढ होणाऱ्या इन्द्रा, आम्हीं भक्त तुझ्यावर अवलंबून आहोंत १. —तूंच खरोखर, हे वज्रधरा,

---

प्रभूवसो । आवृत्वत् भूतु ते मनः ॥ ३६ ॥ को नु मर्याः अमिथितः सखा सखायम् अब्रवीत् । जहा को अस्मत् ईषते ॥ ३७ ॥ एवारे वृषभा सुते असिन्वन् भूरि आवयः । श्वघ्नीव निवता चरन् ॥ ३८ ॥ आ त एता वचोयुजा हरी गृभ्णे सुमद्रथा । य ईम् ब्रह्मभ्य इत् ददः ॥ ३९ ॥ भिन्धि विश्वा अप द्विषः परि बाधो जही मृधः । वसु स्पार्हं तत् आ भर ॥ ४० ॥ यत् वीळौ इन्द्र यत् स्थिरे यत् पर्शाने पराभृतम् । वसु स्पार्हं तत् आ भर ॥४१॥ यस्य ते विश्व मानुषः भूरेः दत्तस्य वेदति । वसु स्पार्हं तत् आ भर ॥ ४२ ॥

इति तृतीयोऽध्यायः

अथ षष्ठे चतुर्थोऽध्यायः

## सूक्तम् ४६

वशाख्यः इन्द्रः गायत्री

त्वावतः पुरूवसो वयम् इन्द्र प्रणेतः । स्मसि स्थात हरीणाम् ॥ १ ॥ त्वाम् हि सत्यम् अद्रिवो विप्र दातारम् इषाम् । विद्म दातारं रयीणाम् ॥ २ ॥ आ यस्य

मनोत्साह देणारा आहेस हें आम्हीं जाणतों, आणि ऐश्वर्य देणारा तूंच आहेस हेंहि आम्ही जाणतों २. —हे अनंतायुधा, हे अपारकर्तृत्वा, तुझा महिमा स्तुतिकीर्तनांनीं कविजन वर्णन करीत असतात ३. —ज्याचें संरक्षण मरुत् करीत असतात, (किंवा) ज्याचें संरक्षण द्वेषापासून अलिप्त असे अर्यमा आणि मित्र हे करीत असतात तो मनुष्य सन्मार्गवर्तीच असतो ४. —त्याला गोधन, अश्वधन, आणि शूर सैनिकांनीं संपन्न अशा ऐश्वर्याचा लाभ होतो; जो आदित्याच्या प्रेरणे प्रमाणें वागतो तो अशा ऐश्वर्यानें समृद्ध होतो कीं तें ऐश्वर्य पाहून इतरांस चुटपुटच लागावी ५. —ज्याचें बळ अत्युत्कट आहे, ज्याला भय कसें तें माहीतच नाहीं असा जगत्प्रभु जो इन्द्र, त्याच्यांजवळ आम्हीं (अढळ) संपत्तीचें दान मागतों ६. —कोणासहि न भिणाऱ्या अशा सर्व शक्ति त्याच्याच ठिकाणीं वास करतात; अशा त्या अपारनिधि इन्द्राला त्याचे हरिद्वर्ण अश्व हर्षनिर्भर करण्यासाठीं सोमरसाकडे घेऊन येवोत ७. —हे इन्द्रा, तुझा अत्युत्कट सोमहर्ष असा आहे कीं, तो वृत्राचा अगदीं समूळ नाश करून टाकतो; तो (भक्तांना) स्वर्गीय प्रकाशाचें वरदान देतो आणि शूरांसह–संग्रामामध्यें अजिंक्य होतो ८. —हे अखिलजन संसेव्या, तूं अनिवार आहेस, आणि सत्वसामर्थ्याच्या झटापटींत भक्ततारक म्हणून गाजत आहेस, तो तूं, हे अत्युत्कटबला इन्द्रा, आमच्या सोमयागाकडे आगमन कर, म्हणजे हे अक्षयनिधे देवा, ज्ञानधेनूंनीं गजबजलेल्या ठिकाणीं आम्हीं जाऊन पोहोंचूं ९. —पूर्वींप्रमाणेंच आतांहि गोधनाविषयींच्या, अश्वांविषयींच्या, आणि रथाविषयींच्या आमच्या इच्छेनुसार, हे महातेजा (इन्द्रा), तूं आम्हांस वरदान दे १०. —हे शूरा, तुझ्या कृपादानाचा अन्त खरोखरच मला लागणार नाहीं; तरी आम्हीं मागतों तें दान, हे दातृश्रेष्ठा, वज्रधरा, तूं आम्हांस दे, आणि सात्विक सामर्थ्यांनीं आमच्या बुद्धीची जोपासना कर ११. —जो अत्युदात्त आहे, ज्याची महती भक्तजन सदैव गातात तोच सर्वजनस्तुत इन्द्र (प्राणिमात्रांचे) सर्व जन्म जाणतो. त्याच तीव्रबलशाली इन्द्राला

---

ते महिमानं शतमूते शतक्रतो । गीर्भि र्गृणन्ति कारवः ॥ ३ ॥ सुनीथो घा स मर्त्यो यं मरुतो यम् अर्यमा । मित्रः पान्ति अद्रुहः ॥ ४ ॥ दधानो गोमत् अश्ववत् सुवीर्यम् आदित्यजूत एधते । सदा राया पुरुस्पृहा ॥ ५ ॥ तम् इन्द्रं दानम् ईमहे शवसानम् अभीर्वम् । ईशानं राय ईमहे ॥ ६ ॥ तस्मिन् हि सन्ति ऊतयो विश्वा अभीरवः सचा । तम् आवहन्तु सप्तयः पुरूवसुं । मदाय हरयः सुतम् ॥ ७ ॥ यस्ते मदो वरेण्यो य इन्द्र वृत्रहन्तमः । य आददिः स्व १ र्नृभि र्यः पृतनासु दुष्टरः ॥८॥ यो दुष्टरो विश्ववार श्रवाय्यो वाजेषु अस्ति तरुता । स नः शविष्ठ सवनाऽऽवसो गहि गमेम गोमति व्रजे ॥ ९ ॥ गव्यो षु णो यथा पुरा अश्वया उत रथया । वरिवस्य महामह ॥ १० ॥ न हि ते शूर राधसो अन्तं विन्दामि सत्रा । दशस्य नो मघवन् नू चित् अद्रिवो धियो वाजेभिर् आविथ ॥ ११ ॥ य ऋष्वः श्रावयत्सखा । विश्वेत् स

सर्व भक्तजन स्रुचा हातीं घेऊन पिढयान् पिढया आहुति अर्पण करीत आले आहेत १२. —सत्वसामर्थ्यांच्या झुंजांत तो दिव्यनिधिसंपन्न, दातृश्रेष्ठ, वृत्रनाशन इन्द्र आमचा नायक आणि संरक्षक झाला १३. —सोमपेयाच्या हर्षांत तुमच्या त्या शूरवीर, महाप्राज्ञ, इन्द्राप्रीत्यर्थ मोठया ( रसभरित ) वाणीनें गायन कर; त्याच्या सर्वसमर्थ विख्यात नांवाचें, जसें सूक्त असेल त्याप्रमाणें संकीर्तन कर १४ —तूं संपत्तीचा दाता, शरीराचा दाता आणि अभीष्ट निधीचा दाता आहेस. हे सर्वजनस्तुता, सत्वसामर्थ्यांच्या लढाईंत देखील सत्ववीराला तूं तें तत्काळ देतोस १५. —अखिल भुवनांचा प्रेरक, दिव्यनिधींना स्वपराक्रमानें हस्तगत करणारा, आणि ह्या ( मानवी ) देहाचा कल्पक अशा इन्द्राचें आतांच्याआतां वेळ न घालवितां ( मीं स्तवन करतों ) १६. —तो अत्यंत थोर आहे. त्याच्या विषयीं मला पूर्ण उत्साह वाटतो. मनोरथांची वृष्टि करणारा, स्वेच्छेनें लीला करणारा आणि सर्वसंचारी अशा त्या ( देवा ), प्रीत्यर्थ यज्ञप्रसंगीं म्हटल्या जाणाऱ्या पद्यांनीं आम्हीं स्तवन करतों. ( देवा ), सकलजनहितकारी अशा मरुतांना यजनीय तूंच आहेस, तुजला प्रणिपात करून आम्हीं स्तवनांनीं तुझेंच गुणगायन करतों १७. —जे (मरुत्) आपल्या वेगाच्या झपाट्यासरशीं गिरिशिखरेंच केवळ नव्हे, तर मोकाट वढाईखोरांचे यज्ञ आणि उगीचच मोठयानें गुरकावणाऱ्यांची चैनबाजी या सर्वांना एकदमच भिरकावून देतात १८. —दुष्टबुद्धि लोकांचें कमरडेंच मोडेल असें सामर्थ्य, हे अत्युत्कट वलाढ्या, तूं आम्हांमध्यें आण. आणि आमच्या स्वभावाला जुळेल असें वैभव, हे वुद्धिप्रेरका, आम्हांला दे; अगदीं पहिल्या प्रतीचें वैभव, हे वुद्धिप्रेरका आम्हांला दे १९. —हे उदारा, हे अत्युदारा, हे शत्रुभयंकरा, हे अद्भुतदर्शना, हे चिद्रूपा, हे मधुरसत्यरूपा, हे अरिमर्दना, हे विश्वाधिराजा; तें वैभव असें दे कीं जें दुर्दम्य असेल; जें शत्रूंना पादाक्रांत करील; जें लोकांनें पोषण करील आणि सत्वयुद्धांत अग्रेसर ठरेल २०. —कानीताचा

---

वेद जनिमा पुरुष्टुतः । तं विश्वे मानुषा युगा । इन्द्रं हवन्ते तविषं यतस्रुचः ॥ १२ ॥ स नो वाजेषु अविता पुरूवसुः पुरस्थाता मघवा वृत्रहा भुवत् ॥ १३ ॥ अभि वो वीरम् अन्धसो मदेषु गाय गिरा महा विचेतसम् । इन्द्रं नाम श्रुत्यं शाकिनं वचो यथा ॥ १४ ॥ ददी रेक्णस् तन्वे ददि वसु ददि वाजेषु पुरुहूत वाजिनम् । नूनम् अथ ॥ १५ ॥ विश्वेषाम् इरज्यन्तं वसूनां सासह्वांसं चित् अस्य वर्पसः । कृपयतो नूनम् अति अथ ॥ १६ ॥ महः सु वो अरम् इषे । स्तवामहे मीळ्हुषे । अरंगमाय जग्मये । यज्ञेभि र्गीर्भि र्विश्वमनुषां मरुताम् इयक्षसि । गाये त्वा नमसा गिरा ॥ १७ ॥ ये पातयन्ते अज्मभि । र्गिरीणां स्नुभिर् एषाम् । यज्ञं महिष्वणीनां सुम्नं तुविष्वणीनां प्राध्वरे ॥ १८ ॥ प्र भङ्ग दुर्मतीनाम् इन्द्र शविष्ठ आ भर । रयिम् अस्मभ्यं युज्यं चोदयन्मते ज्येष्ठं चोदयन्मते ॥ १९ ॥ सनितः सुसनितर् उग्र चित्र चेतिष्ठ सूनृत । प्रासहा सम्राट् सहुरिं सहन्तं भुज्युं वाजेषु पूर्व्यम् ॥ २० ॥ आ

पुत्र पृथुश्रवसा त्याच्या राजवटींत वश अश्व्य याला आज सकाळीं जितक्या वस्तु मिळाल्या तितक्या ज्याला भरपूर मिळाल्या असतील असा एखादा नास्तिक जरी असला तरी त्याला पुढें येऊं द्या २१ —ती देणगी किती मिळाली म्हणाल तर (त्यांतील) अश्वांची संख्या साठ हजार, उंटांची संख्या दहा हजार आणि एक हजार वीस; काळ्या घोड्या एक हजार, आणि तीन प्रकारच्या तांवड्या गाई दहा हजार (इतकीं जनावरें होतीं) २२. —शेंपट्या पिंजारून वाढत्या वेगानें धांवणारे दहा जोरदार श्यामकर्णवारू; ते असे कीं, त्यांना चावकानें इषारा केल्यावरोबर रथाचीं चाकें भरकन फिरूं लागतात २३. —महाऔदार्यशाली कानीताचा पुत्र पृथुश्रवा याच्या देणग्यांमध्येंच त्यानें एक सोन्याचा रथ दिला; त्यामुळें तो राजा अत्यंत उदार असा गणला जाऊन त्यानें अलौकिक कीर्ति संपादन केली २४ —हे वायु, आमच्या ह्या मोठ्या (यज्ञ) समारंभाला, तो आमचा यज्ञ तेजोवलयुक्त व्हावा म्हणून, तूं आगमन कर; तुझ्या दातृत्वाच्या योगानें आम्हीं पूर्वीं पुष्कळ कार्य केलें आहे, तसेंच तुझ्या महनीय दातृत्वानें आतांहि करूं —उषा प्रकाशली असतां (हे वायु) जो तूं सत्तर सत्तर अश्वांचे एकवीस समुदाय घेऊन संचार करतोस, तो तूं, हे सोमप्रिया, या सोमरसासह, ह्या सोमार्पण करणारांसह (उद्युक्त हो). तेजस्वी आणि पवित्र सोमरस प्राशन करणाऱ्या वायुदेवा, आम्हांस वरदान देण्यास (उद्युक्त हो) २६. —ज्यानें हें इतकें वैभव मला आपण होऊन देण्याकरितां (त्या राजास) हर्षनिर्भर केलें, तो पुण्यशील नहुषराजा "अरट्वा"चा अक्ष असलेल्या रथावर अधिष्ठित झाला; त्या वेळीं, महा कर्तृत्वशाली (वायुहि) आपलें कर्तृत्व आणखी गाजविण्यास प्रवृत्त झाला २७. तसेंच, हे वायुदेवा, (तुझ्या) प्रशंसनीय शरीराविषयीं पाहिलें तर तूं स्वतंत्रच आहेस. घृताभिषिक्त जर कोणी असेल तर हे वायू तूंच आहेस. जें अश्वाला हवेसें वाटतें, उंटालाहि पाहिजे असतें, श्वानालाहि हवें असतें असें काय, तर गमनवेग; आणि तो ह्या प्रकारचा: २८.

---

स एतु य ईवत् आँ । अदेवः पूर्तम् आ ददे । यथा चित् वशो अश्व्यः पृथुश्रवसि । कानीतेऽस्याः व्युष्या ददे ॥ २१ ॥ षष्टिं सहस्रा अश्व्यस्य अयुता ऽसनम् । उष्ट्रानां विंशतिं शता ॥ दश श्यावीनां शता दश त्रिअरुपीणाम् दश गवां सहस्रा ॥ २२ ॥ दश श्यावा ऋधत्रयो वीतवारास आशवः । मथ्रा नेमिं नि वावृतुः ॥ २३ ॥ दानासः पृथुश्रवसः कानीतस्य सुराधसः । रथं हिरण्यं ददत् मंहिष्ठः सुरिर् अभूत् वर्षिष्ठम् अकृत श्रवः ॥ २४ ॥ आ नो वायो महे तने याहि मखाय पाजसे । वयं हि ते चकृमा भूरि दावने सद्य श्चित् महि दावने ॥ २५ ॥ यो अश्वेभि र्वहते वस्त उस्रास् त्रिः सप्त सप्ततीनाम् । एभिः सोमेभिः सोमसुद्भिः सोमपा दानाय शुक्रपूतपाः ॥२६॥ यो मे इमं चित् उ त्मनाः अमन्दत् चित्रं दावने । अरट्वे अक्षे नहुषे सुकृत्वनि सुकृत्तराय सुक्रतुः ॥ २७ ॥ उचथ्ये वपुषि यः स्वराट् उत वायो घृतस्नाः । अश्वेषितं रजे-

—उत्साही भक्ताला प्रिय अशी देणगी म्हणजे साठ हजारघोड्यांचें पथक, आणि त्याचप्रमाणें जोमदार बैलांचा एक तांडा अशी मिळाली २९. —ज्याप्रमाणें गाई गोठ्याकडे धांवतात त्याप्रमाणें हे ओझ्याचे बैल मजकडेच आले ३०. —पशूंचा जो एक मोठा समुदाय चरत होता त्यांतील शंभर उंटांना त्यानें ओरडून हांक मारली, आणि पांढरे कुत्रे होते त्यांतील एकशें वीस कुत्र्यांना इषारा केला ३१. —बल्बूथ, तुरुक्ष इत्यादि ( म्लेंच्छ ) जाती पैकीं शंभर दास त्या भक्ताला मिळाले; हे वायुदेवा, तेच हे भक्त इन्द्राच्या संरक्षणानें, देवाच्या संरक्षणानें, हर्षनिर्भर होतात ३२. —त्याचप्रमाणें ही थोर, सर्वप्रकारें अनुकूल आणि सुवर्णालंकारांनीं नटलेली सुंदरी सज वश अश्व्याकडे त्यांनीं आणली आहे ३३.

## सूक्त ४७

तुम्हीं परमथोर; तेव्हां तुमची प्रेमळ भक्तावरील जी कृपा तीहि, हे वरुणा, हे मित्रा, तशी थोरच असणार. हे आदित्यानों, दुष्टाच्या द्वेषापासून ज्या भक्ताचें रक्षण तुम्हीं करतां त्याला पातक स्पर्श सुद्धां करूं शकत नाहीं; इतक्या तुमच्या सहायकशक्ती निराबाध असतात; तुमच्या सहायकशक्ती इतक्या उत्कृष्ट सहायकारी असतात. १. —हे देवानों, हे आदित्यानों, ( आमच्या ) पातकाचा परिहार कसा करावा हें तुम्हांलाच माहित आहे. पक्षी जसे आपले पंख ( पिलांवर ) पसरतात त्याप्रमाणें तुमच्या कृपेची पाखर आम्हांवर करा; कारण तुमच्या सहायशक्ती उत्कृष्ट असतात २. —पक्षी आपले पंख पसरतात त्याप्रमाणें तुमच्या त्या कल्याणकारी कृपेचें छत्र आम्हांवर ठेवा, म्हणजे हे सर्वज्ञ देवानों,

षितं शुनेषितं प्र अज्म तत् इदं नु तत् ॥ २८ ॥ अध प्रियम् इषिराय षष्टिम् सहस्रा ऽसनम् अश्वानाम् इत् न वृष्णाम् ॥ २९ ॥ अध यत् चारथे गणे शतम् उष्ट्रान् अचिक्रदत् । अध श्वित्नेषु विंशतिं शता ॥ ३० ॥ शतं दासे बल्बूथे विप्रस् तरुक्ष आ ददे । ते ते वायो इमे जना मदन्ति इन्द्रगोपा मदन्ति देवगोपाः ॥ ३१ ॥ अध स्या योषणा मही प्रतीची वशम् अश्व्यम् । अधिरुक्मा वि नीयते ॥ ३२ ॥

## सूक्तम् ४७

आप्त्यस् त्रितः आदित्याः महापंक्तिः

महि वो महताम् अवो वरुण मित्र दाशुषे । यम् आदित्या अभिद्रुहो रक्षथा नेम् अघं नशत् । अनेहसो व ऊतयः सुऊतयो व ऊतयः ॥ १ ॥ विदा देवा अघानाम् आदित्यासो अपाकृतिम् । पक्षा वयो यथोपरि वि अस्मे शर्म यच्छत । अनेहसो व ऊतयः सुऊतयो व ऊतयः ॥ २ ॥ वि अस्मे अधि शर्म तत् पक्षा वयो न यन्तन ।

त्यांत यच्चावत् संरक्षणें आलींच असें आम्हीं समजतों; कारण तुमच्या सहायशक्ती उत्कृष्ट सहायकारी असतात ३. —सर्व कांहीं सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्या देवांनों, ज्याला तुम्हीं आसरा दिला, ज्याला जीवनाचा मार्ग दाखविला, त्या मनुष्यासाठींच आदित्य हे जगांतील सर्व वैभवावर आपला अधिकार चालवीत असतात ४. —हुषार सारथी (मार्गांतील) खांचखळगे टाळून रथ हांकतात, त्याप्रमाणें आमचे रथी (इन्द्रियें) पातकांना बाजूस ढकलून देवोत; अशा करितां कीं त्यामुळें आम्हीं इन्द्राच्या कल्याणकारी आश्रयाखालीं राहूं, आदित्यांच्या कृपाछत्राखालीं राहूं ५. —कारण यातनांनीं गांजलला असा जो जो मनुष्य असेल त्याच्याकडे, हे देवानों, हे भक्ताकडे धांवत जाणाऱ्या आदित्यानों, तुम्हीं जाऊन पोहोंचलांत, कीं, तो मनुष्य तुम्हीं दिलेल्या वरदानाचा उदंड वाटेकरी होतो. कारण तुमच्या सहायकशक्ति...उत्कृष्ट सहायकारी असतात ६. —त्याला कोणताहि भयंकर दोष बाधत नाहीं, कोणतेंहि जडभारी अरिष्ट त्याच्यावर कोसळत नाहीं. हे आदित्यानों, ज्याला तुम्हीं आपला आश्रय देतां (त्यालाच हा लाभ घडतो) ७. —हे देवानों, तुमच्या छत्राखालीं असतांना आंगावर चिलखत घालून युद्धांत लढावें त्याप्रमाणें आम्हीं (सुरक्षित) राहतों; तर आमचें पातक घोर असो, किंवा क्षुल्लक असो त्याच्यापासून तुम्हीं आम्हांस मुक्त करा ८. —अनंतअदिति आम्हांस मुक्त करो, अदिति कल्याणप्रद स्थान देवो, भगवान् मित्राची, अर्यमाची, वरुणाची ती माता होय ९. —देवानों, ज्यापासून आश्रय लाभतो, ज्यापासून उत्कर्ष होतो, ज्यापासून आरोग्य लाभतें अशा प्रकारचें जें तिहेरी कवचा प्रमाणें आहे, तें कल्याण आम्हांस अर्पण करा १०. —पोहोणारानें (उडी टाकण्याकरितां) तीरावरून खालीं पाहावें त्या प्रमाणें, हे आदित्यानों, तुम्हीं आम्हांकडे खालीं दृष्टि फेंका. अश्वारूढ सैनिक (पाण्याला) उतार असेल तेथून घोड्याला नेतो, त्याप्रमाणें आम्हांला सुगम मार्गानें

---

विश्वानि विश्ववेदसो वरूथ्या मनामहे । अनेहसो व ऊतयः सुऊतयो व ऊतयः ॥३॥ यस्मा अरासत क्षयं जीवातुं च प्रचेतसः । मनो र्विश्वस्य घेत् इमे आदित्या राय ईशते । अनेहसो व ऊतयः सुऊतयो व ऊतयः ॥ ४ ॥ परि णो वृणजन् अघा दुर्गाणि रथ्यो यथा । स्यामेत् इन्द्रस्य शर्मणि आदित्यानाम् उतावसि । अनेहसो० ॥ ५ ॥ परिह्वतेत् अना जनो युष्मादत्तस्य वायति । देवा अदभ्रम् आशवो यम् आदित्या अहेतन । अनेहसो० ॥ ६ ॥ न तं तिग्मं चन त्यजो न द्रासत् अभि तं गुरु । यस्मा उ शर्म सप्रथः आदित्यासो अराध्वम् । अनेहसो० ॥७॥ युष्मे देवा अपि ष्मसि युध्यन्त इव वर्मसु । यूयं महो न एनसो यूयम् अर्भात् उरुष्यत । अनेहसो० ॥८॥ अदिति र्न उरुष्यतु अदितिः शर्म यच्छतु । माता मित्रस्य रेवतः अर्यम्णो वरुणस्यच । अनेहसो० ॥ ९ ॥ यत् देवाः शर्म शरणं यत् भद्रं यत् अनातुरम । त्रिधातु यत् वरूथ्यं तत् अस्मासु वि यन्तन । अनेहसो० ॥ १० ॥ आदित्या अव हि ख्यत अधि कूलात्

न्या ११ —या जगांत राक्षसीवृत्ती धरणाराचें कल्याण कधीं न होवो. आमचा घात करूं पाहणाराचें कधीं न होवो, आणि तसेंच हळूच आमच्याजवळ येऊन उपद्रव करूं पाहणाराचेंहि न होवो. पण धेनूंना सुख होवो, आणि यशःप्राप्तिसाठीं झगडणाऱ्या वीराचें कल्याण असो १२ —देवानों जें कांहीं पापकर्म आह्मीं उघडपणें केलें असेल, जें कांहीं गुप्तपणें केलेलें असेल तें तें सर्व आमच्यापासून त्रित आप्तय याच्याकडे दूर पोहोंचवून द्याः कारण० १३. —हे द्युकन्यके उषे, जें जें दुःस्वप्न आम्हांला अथवा आमच्या धेनूंना बाधक असेल तें तें, हे उज्ज्वलप्रभाशालिनी उषे, तूं त्रितआप्तय याच्याकडे दूर पोहोंचीव १४. —हे द्युकन्यके, त्या दुःस्वप्नांचा तो अलंकार करो, किंवा एक माळच्या माळ बनवो; परंतु आम्हीं आपलें एकंदर दुःस्वप्न त्रितआप्तयाच्या ठिकाणीं ठेऊन देऊं असें कर १५. —तसलेंच ( दुःस्वप्नरूप ) अन्न सेवन करणारा, तसलेंच काम करणारा, आणि त्याच ( दुःस्वप्न ) भागाचा स्वीकार करणारा जो त्रितआप्तच, आणि द्वित आप्तच, त्याच्याकडे, हे उषे, आमचें दुःस्वप्न पोहोंचवून दे १६. —यज्ञपशूच्या अंगांतील कला आणि त्याचे खूर सुद्धां झाडून सारे अवयव आम्ही ज्याप्रमाणें दुसरीकडे नेऊन टाकतों, ( किंवा ) ज्याप्रमाणें घेतलेले कर्ज आम्ही ( पैन पै ) देऊन टाकतों. त्याप्रमाणें आमचें सर्व दुःस्वप्न आम्हीं त्रित आप्त्यापाशीं नेऊन ठेवतों १७. —याप्रमाणें आज आम्हीं जय मिळविला आहे, लाभ संपादन केला आहे, आम्हीं पापमुक्त झालों आहों. तर हे उषे, पहा, कीं ज्या दुःखस्वप्नानें आम्हीं भेदरलों होतों तें दुःस्वप्न तुझ्या तेजस्वी कांतीनें दूर नाहींसें होवो, हे विबुधांनो, तुमच्या सहायक शक्ति निरावाध असतात; तुमच्या शक्ति उत्कृष्ट सहाय्यकारी असतात १८.

---

इव स्पशः । सुतीर्थं अर्वतो यथा अनु नो नेपथा सुगम् । अनेहसो० ॥ ११ ॥ नेह भद्रं रक्षस्विने नावयै नोपयै उत । गवे च भद्रं धेनवे वीराय च श्रवस्यते । अनेहसो० ॥ १२ ॥ यत् आवि यंत् अपीच्यं देवासो अस्ति दुष्कृतम् । त्रिते तत् विश्वम् आप्त्ये आरे अस्मत् दधातन । अनेहसो० ॥ १३ ॥ यत् च गोषु दुष्वप्न्यं यत् चास्मे दुहित र्दिवः । त्रिताय तत् विभावरि आप्त्याय परा वह । अनेहसो० ॥ १४ ॥ निष्कं वा घा कृणवते स्रजं वा दुहित र्दिवः । त्रिते दुष्वप्न्यं सर्वम् आप्त्ये परि दद्मसि अनेहसो० ॥१५॥ तत् अन्नाय तत् अपसे तं भागम् उपसेदुषे । त्रिताय च द्विताय च उषो दुष्वप्न्यं वह । अनेहसो० ॥ १६ ॥ यथा कलां यथा शफं यथ ऋणं संनयामसि । एवा दुष्वप्न्यं सर्वम् आप्त्ये संनयामसि । अनेहसो० ॥ १७ ॥ अजैष्मा-द्याऽसनाम चा-भूमा-नागसो वयं । उषो यस्मात् दुष्वप्न्यात् अभैष्मा-प तत् उच्छतु । अनेहसो० ॥ १८ ॥

---

## सूक्त ४८

मधुर आणि अतिशय सुखप्रद अशा तारुण्य(दायी सोमा)चा मीं आस्वाद घेतला. मी उत्तम बुद्धिमान् आहे, देवाच्या ठिकाणीं उत्तम रीतीनें लक्ष लावणारा आहे; दिव्यविभूति आणि मनुष्यें हीं सर्वच त्या(सोमा)ला फारच मिष्ट असें म्हणून (त्याचा आस्वाद घेण्या-करितां ) त्याच्या भोंवतीं फिरत राहतात १. —तूं आंत हृदयांत शिरलास; तेव्हां आतां तूं अदितीच ( अनाद्यनंत ) झालास. दैवी कोपाचा तूं उपशम करणारा आहेस, ( तर ) हे सोमरसा, इंद्राचें मन प्रसन्न करून श्रौष्टी प्रमाणें आमच्या वाहनाची धुरा दिव्यवैभवाकडे कर २. —आम्हीं दिव्यरसाचें प्राशन केलें; आह्मीं अमर झालों; दिव्यप्रकाशाला पावलों आणि देवांना ओळखलें. आतां धर्मविमुख दुष्ट आमचें काय करणार ? हे अमरदेवा, मनुष्याची कावेबाजी तरी आमचें काय वांकडें करणार ? ३. —आल्हाददायका रसा आमचें कल्याण होऊं दे, ( देवांनीं ) तुला प्राशन करून-आपल्या हृदयांत ठेवलें आहे; तर हे सोमा, प्रेमळ पिता जसा पुत्राला, सन्मित्र जसा मित्राला, त्याप्रमाणें हे प्रशंसनीय रसा तूं सुखकर हो; तूं सुबुद्धिप्रेरक होऊन हे सोमा, आमच्या उत्तमजीवनासाठीं आमचें आयुष्य तूं वृद्धिंगत कर ४. —हे मीं प्राशन केलेले यशस्कर आणि पापनिर्मुक्त करणारे सोमरस, रथ आणि वृषभ जसे एकत्र जोडलेले असतात तसे माझ्या गात्रांत अगदीं भिनून गेले आहेत; ते माझें रक्षण करोत, ते मला चारित्र्यापासून भ्रष्ट न होऊं देवोत, मला रोगांपासूनहि दूर ठेवोत ५. —घांसून प्रदीप्त झलेल्या अग्निप्रमाणें मला उज्ज्वल कर. आम्हाला उत्तम दृष्टि दे, नेहमीं ऐन उमेदींत ठेव. हे सोमा, तुझ्या हर्षांत असतांना मीं वैभवशाली आहेच असें वाटतें. तर तशीच समृद्धि तूं निरंतर चालीव ६ —तुजला पिळून सिद्ध केला

## सूक्तम् ४८

काण्वः प्रगाथः सोमः त्रिष्टुप्

स्वादोर् अभक्षि वयसः सुमेधाः सुआध्यो वरिवोवित्तरस्य। विश्वे यं देवा उत मर्त्यासो मधु ब्रुवन्तो अभि संचरन्ति ॥ १ ॥ अन्त श्च प्रा–गाः अदिति र्भवासि अवयाता हरसो दैव्यस्य ॥ इन्दो इन्द्रस्य सख्यं जुषाणः श्रौष्टीव धुरम् अनु राये ऋध्याः ॥ २ ॥ अपाम सोमम् अमृता अभूम अगन्म ज्योतिर् अविदाम देवान्। किं नूनम् अस्मान् कृणवत् अरातिः किमु धूर्तिर् अमृत मर्त्यस्य ॥ ३ ॥ शं नो भव हृद आ पीत इन्दो पितेव सोम सूनवे सुशेवः। सखेव सख्ये उरुशंस धीरः प्र ण आयु र्जीवसे सोम तारीः ॥ ४ ॥ इमे मा पीता यशसः उरुष्यवो रथं न गावः सम् अनाह पर्वसु। तेमा रक्षन्तु विस्रसश्चरित्रात् उत मा स्रावात् यवयन्तु इन्दवः ॥ ५ ॥ अग्निं न मा मथितं सं दिदीपः प्र चक्षय कृणुहि वस्यसो नः। अथा हि ते मद आ सोम मन्ये रेवान् इव प्रचरा पुष्टिम् अच्छ ॥ ६ ॥ इषिरेण ते मनसा सुतस्य भक्षीमहि

म्हणजे उत्साहशाली चित्तानें पित्याच्या धनाचा ( उपभोग घ्यावा त्या ) प्रमाणें आम्हीं (अढळ) वैभवाचा उपभोग घेऊं; हे सोमराजा, सूर्य जसा प्रकाशपूर्ण दिवस वाढवितो त्याप्रमाणें आमचें आयुष्य तूं वृद्धिंगत कर ७. —राजा सोमा, आम्हांवर कृपा कर; तुझा विजय असो. देवाच्या आज्ञेनुसार वागणारे आम्हीं भक्त तुझे आहोंत हें लक्षांत घे. हे तेजस्वी पेया, तुझें चातुर्यबल आणि आवेश जागृत असतो; तूं आमचा स्वामी आहेस, तर आम्हांस उगीच्या उगीच दूर ढकलून देऊं नको ८. —आमच्या देहाचा संरक्षक, हे सोमा, तूंच आहेस. मनुष्यांवर आपली दृष्टि ठेवणारा तूं आमच्या शरीराच्या नसानसांत मुरून गेला आहेस. तुझ्या आज्ञेचें उल्लंघन आमच्याकडून होत असेल त्याची क्षमा कर; हे दिव्यरसा, तूं भक्तसखा, आम्हांला अभिलषणीयच आहेस ९. —अन्तःकरणाला प्रसन्नता देणारा भक्तसखा जो सोम त्याची कांस आम्हीं सोडणार नाहीं. हे हरिदश्वा देवा, त्याचें प्राशन करणारा जो मीं त्याचा तो कधीं घात करणार नाहीं. जो हा सोमरस आम्हीं आमच्यामध्यें ठेवला आहे त्याच्यासाठीं आयुष्यवर्धक इन्द्राला मी शरण जातों १०. —व्याधि अंगांत पक्या खिळलेल्या होत्या त्या पार नाहींशा झाल्या; त्यांनीं आम्हाला फारच छळलें, पण शेवटीं त्यांनींच अंधारांत तोण्ड दडविलें. त्यांचीच गाळण उडाली. उदारधी सोम आमच्यांत अधिष्ठित झाला आहे,तेव्हां आतां आमचें आयुष्य वाढेल अशाच स्थितींला आम्हीं पोहोंचलों आहों ११. —हे पितरांनों, हा सोमरस आम्हीं आमच्या हृदयांत ओतला आहे. हा अमर रस आम्हां मर्त्य मानवांत प्रविष्ट झाला आहे; अशा त्या सोमाला आम्हीं हविर्दानानें संतुष्ट करून–त्याच्या सौजन्याच्या छाये खालीं राहूं १२. —सोमरसा, आमच्या वाडवडिलांशींहि तूं असाच गोडीनें राहून आकाश आणि पृथ्वी यांच्यामध्यें सर्वत्र पसरलास. हे तेजस्वीपेया, त्या तुला हवि अर्पण करून आम्हीं (अढळ) धनाचे अधिपति होऊं १३. —दिव्यविभूतिनों, तुम्हींच आमचे तारक आहांत;

पित्र्यस्येव रायः । सोम राजन् प्र ण आयूंषि तारीर् अहानीव सूर्यो वासराणि ॥ ७ ॥ सोम राजन् मृळया नः स्वस्ति तव स्मसि व्रत्यास् तस्य विद्धि । अलर्ति दक्षः उत मन्युर् इन्द्रो मा नो अर्यो अनुकामं परा दाः ॥ ८ ॥ त्वं हि नस् तन्वः सोम गोपाः गात्रे गात्रे निषसत्था नृचक्षाः । यत् ते वयं प्रमिनाम व्रतानि स नो मृळा सुसखा देव वस्यः ॥ ९ ॥ ऋदूदरेण सख्या सचेय यो मा न रिष्येत् हरिअश्व पीतः । अयं यः सोमो नि अधायि अस्मे तस्मै इन्द्रं प्रतिरम् एमि आयुः ॥ १० ॥ अप त्याः अस्थुर् अनिराः अमीवाः निर् अत्रसन् तमिषीचीर् अभैषुः । आ सोमो अस्मान् अरुहत् विहायाः अगन्म यत्र प्रतिरन्त आयुः ॥ ११ ॥ यो नः इन्दुः पितरो हृत्सु पीतो अमर्त्यो मर्त्यान् आविवेश । तस्मै सोमाय हविषा विधेम मृळीके अस्य सुमतौ स्याम ॥ १२ ॥ त्वं सोम पितृभिः संविदानो अनु द्यावापृथिवी आ ततन्थ । तस्मै ते इन्दो हविषा विधेम वयं स्याम पतयो रयीणाम् ॥ १३ ॥ त्रातारो देवा अधिवोचता

आमच्याशीं दोन शब्द तरी बोला. झोंपेचा पगडा आमच्यावर बसूं नये आणि आम्हीं वाह्यात वडवड करूं नये असें करा. सोमाला आमची नेहमीं आवड राहून आम्हीं शूर वीरांनीं युक्त व्हावें आणि देवाचें संकीर्तन करावें असें घडवा १४. —हे सोमा, तूं सर्वच प्रकारांनीं आमच्यांत तरतरी उत्पन्न केली आहेस. तर दिव्यप्रकाशाचा लाभ करून देणारा, मनुष्यमात्रावर आपली दृष्टि ठेवणारा असा तूं आमच्या हृदयांत प्रविष्ट हो. हे तेजस्वी रसा, आमची कळकळ बाळगून आपल्या सहायशक्तींनीं आमच्या पाठी मागें, तसेंच पुढेंहि राहून आमचें रक्षण कर १५.

## सूक्त ४९

हे अग्निदेवा, तूं इतर अग्नींसह आगमन कर; आम्हीं तुजला यज्ञसंपादक म्हणून आदरानें निमंत्रण करीत आहों. ही हविर्युक्त स्रुचा ( पळी ) तुजपुढें नम्र होऊन उभी आहे, ती तुज परमपूज्य देवाला कुशासनावर अधिष्ठित करण्यासाठीं तुजपर्यंत जाऊन पोहोंचो १. —हे मन्थनोद्भवा देवा, हे अङ्गिरा, अध्वरयागांत (घृतपूर्ण) स्रुचा तुझ्याच कडे धांव घेतात. ऊर्जस्वितेचा पालक, घृतार्द्रकेश आणि यज्ञामध्यें ज्याचें प्रथम पूजन होतें अशा तुज अग्नीची आम्हीं प्रार्थना करतों २. —हे अग्नि, तूं काव्यस्फूर्तिदाता, आणि ( कर्मफल )विधाता आहेस; हे पावना, तूं देवांचा यजनीय होता आहेस. तूं आनंदरूप आहेस, आणि ज्ञानी भक्तांनीं अध्वरयागांमध्यें मननीय स्तोत्रांच्या योगानें ज्याचें स्तवन करावें असा अत्यंत पूज्य आणि तेजस्वी देव आहेस ३. —कोणाचा द्वेष न करणारे आणि भक्तोत्सुक अशा दिव्यविभूतिंना, हे तारुण्यमूर्ते देवा, हे चिरंतना, तूं हविर्ग्रहणासाठीं येथें आण. व्यवस्थितपणें म्हटलेल्या आमच्या प्रेमळ स्तवनांकडे, हे दिव्यनिधे, तूं आगमन

नो मा नो निद्रा ईशत मोत जल्पिः । वयं सोमस्य विश्वह प्रियासः सुवीरासो विदथम् आवदेम ॥ १४ ॥ त्वं नः सोम विश्वतो वयोधास् त्वं स्वर्वित् आ विशा नृचक्षाः । त्वं न इन्दो ऊतिभिः सजोषाः पाहि पश्चात्तात् उत वा पुरस्तात् ॥ १५ ॥

## सूक्तम् ४९.

प्रागाथो भर्गः अग्निः बृहती

अग्न आ याहि अग्निभि र्होतारं त्वा वृणीमहे । आ त्वाम् अनक्तु प्रयता हविष्मती यजिष्ठं बर्हिर् आसदे ॥ १ ॥ अच्छा हि त्वा सहसः सूनो अङ्गिरः स्रुच श्चरन्ति अध्वरे । ऊर्जो नपातं घृतकेशम् ईमहे अग्निं यज्ञेषु पूर्व्यम् ॥ २ ॥ अग्ने कवि र्वेधाः असि होता पावक यक्ष्यः । मन्द्रो यजिष्ठो अध्वरेषु ईड्यो विप्रेभिः शुक्र मन्मभिः ॥ ३ ॥ अद्रोघम् आ वह उशतो यविष्ठ्य देवान् आजस्र वीतये । अभि

कर; आणि ( वेदीवर ) आरूढ झालेला असा तूं आमच्या ध्यानस्तुतींनीं आनंदित हो ४. —निःसीम असा तूंच आहेस. हे भक्ततारका अग्नि, तूं सनातनधर्मरूप आणि प्राज्ञ आहेस. समिधांनीं प्रज्वलित झालेल्या अग्निदेवा, हे प्रखरदीप्ते देवा, कर्माचरण करणारे ज्ञानी भक्त तुझीच सेवा करीत असतात. ५. —हे सुप्रकाशा तूं प्रकाशितच रहा, तूं देदीप्यमान रहा. लोकांचें आणि स्तोतृजनाचें कल्याण कर. तूं परम थोर आहेस, तर शत्रूंना जिंकणारे आणि अग्नीची सेवा करणारे असे माझे धुरंधर यजमान देवांच्या आश्रयछत्रा खालीं वास करोत ६. —ज्याप्रमाणें भूमिवर दाट वाढलेलें जंगल, हे अग्नि, तूं एकदम जाळून खाक करतोस, त्याप्रमाणें, हे अनुकूलप्रकाशा देवा, जो कोणी आमच्या लोकांचा द्वेष करीत असेल, किंवा मनांत दुष्ट बेत रचून तो साधण्याविषयीं जो आतुर असेल त्याला तूं जाळून भस्म कर ७. —आमचें शत्रुत्व करणाऱ्या मनुष्याच्या, किंवा राक्षसाच्या, किंवा पापाचें स्तोम माजविणाऱ्याच्या हातीं आम्हांस देऊं नको; तर हे तारुण्यमूर्ते देवा, जीं अप्रतिहत, भक्ततारक आणि कल्याणप्रद अशीं तुझीं रक्षणसाधनें आहेत त्यांनीं आमचें संरक्षण कर ८. —हे अग्ने, आम्हीं केलेल्या एका स्तुतीनेंच आमचें रक्षण कर; आह्मीं दुसरी स्तुति करतों, त्या दुसरीनेंहि रक्षण कर. हे ऊर्जस्वितच्या प्रभो, तीन स्तुतींनीं तरी रक्षण कर. हे दिव्यनिधे, आतां तुझ्या चार स्तुति केल्या आहेत त्यांनीं प्रसन्न होऊन तरी आमचें रक्षण कर ९. —दानधर्म न करणारे जे राक्षस त्यां सर्वांपासून रक्षण कर. सत्वयुद्धांत यश दे. तूं जो आमचा अत्यंत जवळचा आप्त त्या तुझ्याकडेच आम्हीं देवसेवा घडावी म्हणून, आणि आमची अभिवृद्धि व्हावी म्हणून धांवत येतों १० —हे अग्नि, हे पावना, तरतरी वाढविणारें आणि प्रसंसनीय असें जें ऐश्वर्य तें आम्हांस अर्पण कर. हे सर्वोपमा देवा, तें जरी सर्वांना स्पृहणीय वाटतें तरी नीतीच्या सन्मार्गानेंच तें यशस्कर होतें ११. —त्याच्या योगानें आम्हीं संग्रामांमध्यें शत्रुसैन्याची धूळधाण उडवून देऊं आणि आम्हीं

---

प्रयांसि सुधिता वसो गहि मन्दस्व धीतिभि र्हितः ॥ ४ ॥ त्वम् इत् सप्रथाः असि अग्ने त्रातर्ऋतः कविः। त्वां विप्रासः समिधान दीदिवः आ विवासन्ति वेधसः॥५॥ शोच शोचिष्ठ दीदिहि विशे मयो रास्व स्तोत्रे महाँ असि। देवानाम् शर्मन् मम सन्तु सूरयः शत्रूषाहः सु अग्नयः ॥ ६ ॥ यथा चित् वृद्धम् अतसम् अग्ने संजूर्वसि क्षमि। एवा दह मित्रमहो यो अस्मध्रुक् दुर्मन्मा कश्च वेनति ॥ ७ ॥ मा नो मर्ताय रिपवे रक्षस्विने माऽ घशंसाय रीरधः। अस्रेधद्भिस् तरणिभि र्यविष्ठ्य शिवेभिः पाहि पायुभिः ॥ ८ ॥ पाहिनो अग्ने एकया पाहि उत द्वितीयया। पाहि गीर्भिस् तिसृभिर् ऊर्जां पते पाहि चतसृभि र्वसो ॥९॥ पाहि विश्वस्मात् रक्षसो अराव्णः प्र स्म वाजेषु नः अव। त्वाम् इत् हि नेदिष्ठं देवतातये आपिं नक्षामहे वृधे ॥ १० ॥ आ नो अग्ने वयोवृधं रयिं पावक शंस्यम्। रास्वा चन उपमाते पुरुस्पृहं सुनीती स्वयशस्तरम्॥११॥ येन वंसाम पृतनासु शर्धतस् तरन्तो अर्य आदिशः। स त्वं नो वर्ध प्रयसा शचीवसो

जे आर्यजन ते तुझ्या आज्ञा बरोबर पाळूं. तर हे दिव्यशक्तींच्या निधे, तूं प्रेमळपणानें आमचा उत्कर्ष कर, आणि अभीष्टाचा लाभ करून देणाऱ्या ध्यानबुद्धींनां प्रेरणा कर १२. —शिंगें पाजळणाऱ्या वृषभाप्रमाणें अग्नि हा आपलीं ज्वालारूप शिंगें परजतो. त्याच्या दाढा जलाल, त्या कोणालाहि आवरत नाहींत. त्याचे दांत देखील फार तीक्ष्ण. मन्थनाच्या जोरानेंच तो प्रकट होणारा महानुभाव आहे १३. —जेव्हां तूं छाती ठोकून पुढें उभा राहतोस तेव्हां, हे वीरपुंगवा अग्नि, तुझ्या दातांचा तडाका कोणीं सोसूं म्हणेल तर तें शक्य नाहीं. हे दिव्य होत्या, आमचा हविर्भाग तूं परिपूर्ण करून घे. आणि अत्यंत अभिलषणीय अशीं जीं अनेक धनें आहेत तीं आम्हांस मिळवून दे १४. —वनांत असतांना, तुझ्या माता ज्या अरणि त्यांच्या गर्भांत तूं शयन करतोस. नंतर मर्त्य भक्तजन तुला प्रज्वलित करतात. तूं निरंतर जागरूक राहून यज्ञकर्त्यांचे हविर्भाग ( दिव्यविबुधांकडे ) पोहोंचवितोस आणि म्हणूनच देवांमध्यें राजाप्रमाणें शोभतोस १५. —हे अग्नि, अत्यंत त्यागी ( उदार ) आणि कधींहि क्षीण न होणारा जो तूं त्या तुझेंच गुणानुवाद सातजण ऋत्विज् गातात. ( पातकांचे ) पर्वत तूं आपल्या प्रतापानें, आपल्या शुद्धदीप्तिनें छिन्नभिन्न करतोस, म्हणून हे अग्निदेवा, तूं आम्हां मानवांच्या अगदीं वर पलीकडे रहा १६. —अग्नीची,–त्या अग्नीचीच, त्या तुमच्या दुर्निवार देवाचीच प्रार्थना आम्हीं कुशासन व्यवस्थितपणें मांडून करतों. समिधांवर हविर्भाग ठेवून मानवांचा होता जो अग्नि त्याची आम्हीं प्रार्थना करतो १७. —स्पष्ट दिसणाऱ्या विवेचक बुद्धीनें कल्याणकर सामगायनांमध्यें हे अग्नि, तुझा भक्त तुझ्या ठिकाणीं रंगून जातो; म्हणून जें नाना रूपानें प्रकट होतें आणि जें अगदीं निकट असावें लागतें असें सत्वसामर्थ्य तूं मोठ्या ईर्ष्येनें आमच्या रक्षणासाठीं आमच्याकडे घेऊन ये १८. —हे अग्नि, तूं स्तोतृजनांचा प्रभु आहेस. हे देवा, तूं राक्षसांना जाळून खाक करणारा आहेस; तूं (भक्तांना) कधींहि सोडून न जाणारा परमथोर घरधनी आहेस. तूं द्युलोकाचा प्रतिपालक आणि (भक्त)गृहाचा प्रेमळ संरक्षक आहेस १९.

---

जिन्वा धियो वसुविदः ॥ १२॥ शिशानो वृषभो यथा अग्निः शृंगे दविध्वत्। तिग्मा अस्य हनवो न प्रतिधृषे सुजम्भः सहसो यहुः ॥ १३ ॥ न हि ते अग्ने वृषभ प्रतिधृषे जम्भासो यत् वि तिष्ठसे । स त्वं नो होतः सुहुतं हविष् कृधि वंस्वा नो वार्या पुरु ॥१४॥ शेषे वनेषु मात्रोः सं त्वा मर्तास इन्धते । अतन्द्रो हव्या वहसि हविष्कृत आदित् देवेषु राजसि ॥ १५ ॥ सप्त होतारस् तमित् ईळते त्वा। अग्ने सुत्यजम् अन्हयम् ॥ भिनत्सि अद्रिं तपसा वि शोचिषा प्राग्ने तिष्ठ जनान् अति ॥१६॥ अग्निमग्निं वो अध्रिगुं हुवेम वृक्तबर्हिषः । अग्निं हितप्रयसः शश्वतीषु आ होतारं चर्षणीनाम् ॥ १७ ॥ केतेन शर्मन् सचते सुषामणि अग्ने तुभ्यं चिकित्वना। इषण्यया नः पुरुरूपम् आ भर वाजं नेदिष्ठम् ऊतये ॥ १८ ॥ अग्ने जरितर् विश्पतिस् तेपानो देव रक्षसः। अप्रोषिवान् गृहपति र्महाँ असि दिवस् पायु र्दुरोणयुः ॥ १९ ॥ मा नो

—कोणाहि राक्षसाला आमच्यामध्यें घुसूं देऊं नकोस. हे तेजोवैभवा, जादुटोणा करणाऱ्या दुष्टांची जादूहि आमच्यावर चालूं देऊं नकोस. दैन्य आणि उपासमार यांना कोसोंगणती दूर पळवून लाव, आणि हे अग्ने, राक्षसवृत्ति दुर्जनांचा उच्छेद कर २०.

## सूक्त ५०

इन्द्र दोन गोष्टी करो; पहिली ही कीं, इकडे वळून आमची विनंति ऐको; आणि दुसरी ही कीं आम्हांविषयीं अनुकूल मन ठेऊन, तो भगवंत, तो उत्कटबलाचा सागर, सोमपानार्थ येथें येवो १. —त्या स्वयंप्रकाश, स्वतंत्र आणि वीरपुंगव देवाचें स्वतः द्यावापृथिवींनीं ( ओजस्वितेसाठीं ) स्तोत्रांच्या योगानें स्तवन केलें; सर्व उत्कृष्ट वस्तूंत तूंच अग्रेसर होऊन बसला आहेस, तथापि तुझें मन सोमरप्राशनाकरितां उत्कंठित असतें २. —हे अपार-निधे इन्द्रा, हें सोमपेय तूं चषकांत ओत ( आणि प्राशन कर ). हे हरिदश्वा, संग्रामा-मध्यें शत्रूंना पादाक्रांत करणारा' धडाडीचा वीर तूं आहेस; आणि तुझ्यावर कोणीहि चाल करूं शकत नाहीं हें आम्हांस पक्कें माहीत आहे ३. —हे सत्यसंकल्पा, हें औदार्यमूर्त्ते, तूं आपल्या पराक्रमानें जसें मनांत आणशील तसें, हे इन्द्रा, तें झालेंच म्हणून समज. आम्हीं सत्वर सज्ज होऊं म्हणतों, तर हे रम्यमुकुटा, हे वज्रधरा, तुझ्या प्रसादानें आम्हीं सत्वसामर्थ्य प्राप्त करून घेऊं असें कर ४. —हे सकलशक्तींच्या प्रभो, इन्द्रा, आपल्या सर्वसामर्थ्यांनीं आम्हांला समर्थ कर; तूंच जणो आमचें भाग्य, म्हणून तूं जो यश-स्कर आणि अभीष्टदाता त्या तुझ्या पाठीमागें आम्हीं धांवत सुटतों ५. —तूं अश्वांची

रक्ष आ वेशीत् आ घृणीवसो मा यातु यातुमावताम्। परोगव्यूति अनिराम् अप क्षुधम् अग्ने सेध रक्षस्विनः ॥ २० ॥

## सूक्तम् ५०

प्रागाथो भर्गः इन्द्रः बृहती

उभयं शृणवत् च नः इन्द्रो अर्वाग् इदं वचः। सत्राच्या मघवा सोमपीतये धिया शविष्ठ आगमत् ॥ १ ॥ तंहि स्वराजं वृषभं तम् ओजसे धिषणे निष्टतक्षतुः। उतो—पमानां प्रथमो निषीदसि सोमकामं हि ते मनः ॥ २ ॥ आ वृषस्व पुरूवसो सुतस्य इन्द्र अन्धसः। विद्मा हि त्वा हरिवः पृत्सु सासहिम् अधृष्टं चित् दधृष्वणिम् ॥ ३ ॥ अप्रामिसत्य मघवन् तथेत् असत् इन्द्र क्रत्वा यथा वशः। सनेम वाजं तव शिप्रिन् अवसा मक्षू चित् यन्तो अद्रिवः ॥ ४ ॥ शग्धि ऊ षु शचीपते इन्द्र विश्वाभिर् ऊतिभिः। भगं न हि त्वा यशसं वसुविदम् अनु शूर चरामसि ॥ ५ ॥ पौरो अश्वस्य पुरुकृत् गवाम् असि उत्सो देव हिरण्ययः।

समृद्धि करणारा आहेस, गोधनाची विपुलता करणारा आहेस. हे देवा, तूं अक्षय सुवर्णाचा झराआहेस. तुझ्या देणगीला आडकाठी कोण करील ? कोणीं करणार नाहीं, म्हणून आम्हीं जें जें मागत आहों, तें तें देऊन टाक ६. —तुझ्या ह्या सेवकाकरितां येथें ये. आमचें अभीष्ट आम्हांस देण्याकरितां तुजजवळ भरपूर भाग्य आहे. तर हे उदारश्रेष्ठा इन्द्रा, प्रकाश-गोधनाविषयींचीं, आणि अश्वांविषयींची आमची वाञ्छा तूं परिपूर्ण कर ७. —(इच्छित वस्तूंचा ) सांठा शेंकडो वेळ, हजारों वेळ देण्याला तूं समर्थ आहेस. आम्हीं मार्मिक आणि गोड स्तोत्रें म्हणणारे भक्त, कृपा संपादन करण्याकरितां इन्द्राचें संकीर्तन करून त्या पुरंदराला आमच्याकडे वळवून आणतों ८. —ज्ञानी असो, अज्ञानी असो, हे इन्द्रा, कोणीहि तुझें भक्तिपूर्वक स्तवन केलें तरी, हे अनंतकर्तृत्वा, हे अजिंक्यक्रोधा, हे अहंकार जिंकणाऱ्या देवा, तुझ्या कृपेनें त्याला आनंद हा झालाच पाहिजे ९. —ज्याचे बाहु कणखर, दुष्टांचा सप्पा उडविण्यांत जो पटाईत, वृत्रांच्या नगरांचा विध्वंसक म्हणून पुरंदर ( नांवानें जो प्रसिद्ध, ) असा इन्द्र माझी हांक ऐकेल तोंपर्यंत आम्हीं उत्कृष्ट वस्तूची वांच्छा धरणारे भक्त त्या अभीष्टदात्याची, त्या अपारकर्तृत्व इन्द्राची, स्तोत्रगायनांनीं विनवणी करीत राहूं १०. —आम्हीं स्वतःला पातकी समजत नाहीं, कंजूष समजत नाहीं, किंवा कर्मभ्रष्टहि समजत नाहीं; वीरप्रवर जो इन्द्र त्याला सोमरस पिळून होतांच जर आम्हीं आर्जवानें आपलासा करून घेतों (तर आम्हीं तसें कां समजूं ? ) ११. —शत्रुभयंकर आणि अप्रतिकार्य अशा इन्द्राचेंच आम्हीं युद्धांमध्यें सहाय घेतों; तो कोणाचेंहि ऋण शिल्लक ठेवीत नाहीं. तो अजिंक्य आहे; तो विजयशाली उत्कृष्ट सेनानी इन्द्र भरधौशानें चाल करणारा जो सत्ववीर असेल, त्याला नेमकें ओळखतो, आणि त्याच्या सन्निध राहतो १२, —इन्द्रा, जेथून आम्हांला भय असेल तेथें आम्हांला निर्भय कर. हे दातृश्रेष्ठा, तुझ्या संरक्षणाखालीं आम्हांला बलवान् कर, आणि द्वेष्ट्यांना, घातक्यांना निर्दाळून टाक १३. —हे कृपावैभवाच्या अधिपते, श्रेष्ठ असें जें आश्रयस्थान

---

नकि हिं दानं परिमर्धिषत् त्वे यद्यत् यामि तत् आभर ॥ ६ ॥ त्वं हि आ इहि चेरवे विदाः भगं वसुत्तये। उत् वावृषस्व मघवन् गविष्टये उत् इन्द्र अश्वमिष्टये ॥ ७ ॥ त्वं पुरू सहस्राणि शतानि च यूथा दानाय मंहसे। आ पुरंदरं चकृम विप्रवचसः इन्द्रं गायन्तो ऽ वसे ॥८॥ अविप्रो वा यत् अविधत् विप्रो वा इन्द्र ते वचः । स प्र ममन्दत् त्वाया शतक्रतो प्राचामन्यो अहंसन ॥ ९ ॥ उग्रबाहु र्म्रक्षकृत्वा पुरंदरो यदि मे शृणवत् हवम्। वसूयवो वसुपतिं शतक्रतुं स्तोमैर् इन्द्रं हवामहे ॥ १० ॥ न पापासो मनामहे ना-रायासो न जल्हवः। यदित् नु इन्द्रं वृषणं सचा सुते सखायं कृणवामहै ॥ ११ ॥ उग्रम् युयुज्म पृतनासु सासहिं ऋणकातिम् अदाभ्यम्। वेदा भृमं चित् सनिता रथीतमो वाजिनं यमित् ऊ नशत् ॥ १२ ॥ यत इन्द्र भयामहे ततो नो अभयं कृधि। मघवन् शग्धि तव तत् नः ऊतिभि र्वि द्विषो

त्याचा प्रतिपालक तूं आहेस; म्हणूनच हे दातृवर्या, हे स्तुतिनाथा, सोमरस पिळून ठेऊन आम्हीं तुझा धांवा करीत आहों १४. —वृत्रनाशन इन्द्र हाच आमच्यावर कृपादृष्टि ठेऊन आमचें शत्रूपासून संरक्षण करणारा आहे; तो सर्वश्रेष्ठ देव आमच्या ( सैन्याच्या ) शेवटच्या भागाचें, तसेंच मधल्याहि भागाचें संरक्षण करो; आमच्या पिछाडीचें, तसेंच आमच्या अघाडीचेंहि तो रक्षण करो १५. —इन्द्रा, तूं आमच्या मागील बाजूनें, खालील बाजूनें, वरच्या बाजूनें, समोरच्या बाजूनें, किंबहुना सर्व बाजूंनीं संरक्षण कर. दिव्यविभूतिकडून आम्हांस जें भय आहे तें आम्हांपासून दूर कर आणि देवनिन्दकाच्या हत्यारापासूनहि आमचा बचाव कर १६. —हे इन्द्रा, आज म्हटलें तर आज, उद्यां म्हटलें तर उद्यां, किंवा परवां म्हटलें तरी देखील आमचें रक्षण कर. ( कारण ) आमचेंच काय, पण यच्चावत् स्तोतृजनांचेंहि, हे सज्जनपालका, तूं दिवसा, रात्रीं, सार्वकाळ रक्षण करतोस १७. —शत्रूंच्या नगरांचा विध्वंसक, ऐश्वर्यवान्, अपारदातृत्वशालि असा तूं वीर आपलें शौर्य गाजविण्या करितां सज्ज झाला आहेस; आणि हे अनंत कर्तृत्वा, ज्या तुझ्या भुजदण्डांनीं वज्र पेलून धरलें आहे, ते तुझे दोन्ही भुजदण्डहि वीराला योग्य असेच विशाल आहेत १८.

## सूक्त ५१

ह्या इन्द्राप्रीत्यर्थ आणखी एक सर्वसाधारण स्तवन म्हणा; तो सामगायनानें प्रसन्न होतो; म्हणून सोम अर्पण करणारे भक्त इन्द्राचा विलक्षण जोम वाढवीतच राहतात.

वि मृधो जहि ॥ १३ ॥ त्वं हि राधस्पते राधसो महः क्षयस्य असि विधतः। तं त्वा वयं मघवन् इन्द्र गिर्वणः सुतावन्तो हवामहे ॥ १४ ॥ इन्द्रः स्पळ् उत वृत्रहा परस्पाः नो वरेण्यः। स नो रक्षिषत् चरमं स मध्यमं स पश्चात् पातु नः पुरः॥१५॥ त्वं नः पश्चात् अधरात् उत्तरात् पुरः इन्द्र नि पाहि विश्वतः। आरे अस्मत् कृणुहि दैव्यं भयं आरे हेतीर् अदेवीः ॥१६॥ अद्याद्या श्वश्वः इन्द्र त्रास्व परे च नः। विश्वा च नो जरितॄन् सत्पते अहा दिवा नक्तं च रक्षिषः ॥ १७ ॥ प्रभङ्गी शूरो मघवा तुवीमघः संमिश्लो वीर्याय कम्। उभा ते बाहू वृषणा शतक्रतो नि या वज्रं मिमिक्षतुः ॥ १८ ॥

## सूक्तम् ५१

काण्वः प्रगाथः इन्द्रः पंचपदा पंक्तिः

प्रो अस्मै उपस्तुतिं। भरता यत् जुजोषति। उक्थैर् इन्द्रस्य माहिनं वयो वर्धन्ति सोमिनो। भद्रा इन्द्रस्य रातयः ॥ १ ॥ अयुजो असमो नृभिर् एकः

(कारण) इन्द्राच्या देणग्या तशाच मंगलमय असतात १. —त्याला कोणाचें सहाय्य लागत नाहीं, त्याच्यासारखा सुद्धां दुसरा कोणीं नाहीं. तो कधीं दमत नाहीं. शूरांच्या योगानें पुष्कळ लोकांनाच काय, पण आपल्या ओजस्वितेनें सर्व वस्तुमात्राला तो वृद्धिंगत करतो; याप्रमाणें इन्द्राच्या देणग्या० २. —घोड्यांना इशारत होते न होते तोंच, तत्काळ वरदान देणारा इन्द्र येऊन थडकतो. याप्रमाणें तूं जे जे पराक्रम करतोस ते किती म्हणून सांगावे? इन्द्राच्या देणग्या (अशाच) मंगल असतात ३. —तूं आगमन कर; तुझा महिमा वृद्धिंगत करणारीं ब्रह्मस्तवनें आम्हीं म्हणूं; हें अत्युत्कटबला इन्द्रा, जीं तुला अतिशय आवडलीं, ज्यांच्या योगानें तुझी कीर्ति गाणाऱ्या भक्ताचें तूं कल्याण करतोस तींच स्तोत्रें म्हणूं. पहा, इन्द्राच्या देणग्या (अशाच)मंगल असतात ४. —सोमरस अर्पण करून जो तुझें अर्चन करतो; तुला प्रणिपात करून जो तुझी सेवा करतो, जो शत्रूवर चालून जाण्याची धडाडी दाखवितो, त्या भक्ताचें मन, हे इन्द्रा, तूं तसेंच धैर्यशाली केलेलें असतें. तुझ्या देणग्या ५. —चतुर मनुष्य खांचखळगे पाहून चालतो, तशाच काळजीनें जाज्वल्य इन्द्र खालीं (जगाकडे) दृष्टि देतो, आणि आपणास सोमरस अर्पण करणाऱ्या चतुर भक्ताचा जिवलग मित्र म्हणवितो ६. —सकल दिव्यविभूति आपलें शौर्य दाखवितात, ते हे इन्द्रा, तुझ्याच कर्तृत्वाच्या जोरावर दाखवितात. म्हणूनच जगांतील अखिल (ज्ञानरूप) गोधनांचा स्वामी तूच ठरलास. कारण तुज इन्द्राच्या देणग्या मंगलमय असतात ७. —देवसेवा घडावी म्हणूनच हे इन्द्रा, तुझ्याच निरुपम बलाची मी महती गातों; कारण हे सकलशक्तींच्या नाथा, आपल्या ओजस्वितेनें वृत्ताचा नाश तूंच करतोस (याप्रमाणें तुज) इन्द्राच्या देणग्या० ८. —लावण्यवती स्त्रियांप्रमाणेंच प्रेक्षणीय पुरुषहि त्यानें उत्पन्न केले, आणि त्यायोगानें मानवी युग (कसें असतें) तें समजण्यास एक स्पष्ट निदर्शक झालें; म्हणूनच इन्द्र प्रख्यात झाला, (याप्रमाणें त्या) इन्द्राच्या० ९. —इन्द्रा, तुझें जें

कृष्टीर् अयास्यः। पूर्वीर् अति प्र वावृधे विश्वाजातानि ओजसा। भद्रा इन्द्रस्य रातयः ॥ २ ॥ अहितेन चित् अर्वता। जीरदानुः सिषासति। प्रवाच्यम् इन्द्र तत् तव वीर्याणि करिष्यतः। भद्रा इन्द्रस्य रातयः ॥ ३ ॥ आ याहि कृणवाम ते। इन्द्र ब्रह्माणि वर्धना। येभिः शविष्ठ चाकनो भद्रं इह श्रवस्यते। भद्रा इन्द्रस्य रातयः ॥ ४ ॥ धृषत श्चित् धृषत्मनाः। कृणोषि इन्द्र यत् त्वम्। तीव्रैः सोमैः सपर्यतो नमोभिः प्रतिभूषतः। भद्राः० ॥ ५ ॥ अवचष्टे ऋचीषमः। अवताम् इव मानुषः। जुष्ट्वी दक्षस्य सोमिनो सखायं कृणुते युजं। भद्रा इन्द्रस्य० ॥ ६ ॥ विश्वे त इन्द्र वीर्यं। देवा अनु क्रतुं ददुः॥ भुवो विश्वस्य गोपतिः पुरुष्टुत। भद्रा० ॥ ७ ॥ गृणे तत् इन्द्र ते शवः उपमं देवतातये॥ यत् हंसि वृत्रम् ओजसा शचीपते। भद्राः इन्द्रस्य रातयः॥ ८ ॥ समनेव वपुष्यतः

उत्कटवल प्रकट झालें त्याला, तुला स्वतःला, आणि त्याचप्रमाणें तुझ्या कर्तृत्वाला, हे अपार-प्रकशा, दातृश्रेष्ठा, भक्तजनांनीं तुझ्या कृपाछत्राखालीं राहूनच वृद्धिंगत केलें आहे १०. —हे वृत्रनाशना, तूं आणि मी, असे दोघे विजयप्राप्त्यर्थ एकत्र होऊं, म्हणजे हे अशनिधरा, हे शूरा, अधार्मिक मनुष्य देखील आपल्या दोघांकडे पाहून मानच डोलवील ११ —आम्हीं त्या सत्यस्वरूपाचें, त्या तारुण्योत्साहाची मूर्तिच अशा इन्द्राचें स्तवन करतों. असत्याची आम्ही प्रशंसा करीत नाहीं. अधार्मिक मनुष्याचें हत्यार मोठें प्रवळ खरें, पण धार्मिक भक्ताच्या ज्ञानाचा प्रकाश त्याहिपेक्षां प्रवल असतो. कारण इन्द्राच्या देणग्या अशाच मंगलमय असतात १२.

## सूक्त ५२

हा पहा, महा पुरुषांचा आवडता पुरातन देव आपल्या महत्कृत्यांच्या योगानें व्यक्त झाला आहे. त्याच्याद्वारेंच पिता मनु ह्यानें आपल्या ध्यानबुद्धि देवाच्या ठिकाणीं एकाग्र केल्या १. —आपल्या पाठीवर सोमवल्ली वाहून आणणाऱ्या भक्तांनीं द्युलोकाची मर्यादा ओलांडून टाकणाऱ्या देवाचा त्याग कधीं केला नाहीं. त्यांनीं ( देवाप्रीत्यर्थ ) उक्थें आणि प्रार्थनासूक्तेंच गायलीं २. —त्या सर्वज्ञ इन्द्रानें अङ्गिरांसाठीं प्रकाशाचीं द्वारें मोकळीं केलीं, हाच त्याचा पराक्रम मी वर्णन करतों ३. —पुरातन काळापासून कवींची स्फूर्ति वृद्धिंगत करणारा, वाचेला चालन देणारा, " अर्क " स्तोत्रांचा मंगलविषय असा जो इन्द्र, तो आमच्या येथें यज्ञांत आम्हांवर कृपा करण्यासाठीं प्राप्त होवो ४. —आणि म्हणूनच तुझ्या पराक्रमाला अनुरूप, आणि तुजला प्रिय अशा यज्ञकर्मानुरूप,

---

कृणवत् मानुषा युगा ॥ विदे तत् इन्द्र श्चेतनम् अध श्रुतो । भद्राः० ॥ ९ ॥ उत् जातम् इन्द्र ते शवः । उत् त्वाम् उत् तव क्रतुम् ॥ भूरिगो भूरि वावृधु मघवन् तव शर्मणि । भद्राः० ॥ १०॥ अहं च त्वं च वृत्रहन् । सं युज्याव सनिभ्य आ ॥ अरातीवा चित् अद्रिवः अनु नौ शूर मंसते । भद्राः० ॥ ११ ॥ सत्यम् इत् वा उ तं वयम् । इन्द्रं स्तवाम नानृतम् ॥ महाँ असुन्वतो वधो भूरि ज्योतींषि सुन्वतः । भद्रा इन्द्रस्य रातयः ॥ १२ ॥

## सूक्तम् ५२

पूर्ववत् इन्द्रः अनुष्टुप्, गायत्री

स पूर्व्यो महानां वेनः क्रतुभिर् आनजे । यस्य द्वारा मनुष्पिता देवेषु धिय आनजे ॥१॥ दिवं मानं न उत्सदन् सोमपृष्ठासो अद्रयः । उक्था ब्रह्म च शंस्या ॥२॥ स विद्वाँ अङ्गिरोभ्य इन्द्रो गा अवृणोत् अप । स्तुषे तत् अस्य पौंस्यम् ॥ ३ ॥ स

"स्वाहा" शब्दप्रचुर अशीं ऋक्स्तोत्रें ऋत्विजांनीं मोठया आवेशानें म्हटलीं; हे इन्द्रा, तूं (प्रकाश) गोधनांचा समूह भक्तांना द्यावास म्हणून म्हटलीं ५. —शौर्याचीं जीं जीं यच्चावत् कृत्यें पूर्वीं घडलीं किंवा पुढें घडतील, तीं तीं सर्व इन्द्राच्याच ठिकाणीं संभवतात. आणि अध्वरयाग हें त्याचेंच रूप आहे ही गोष्ट अर्क स्तोत्रें म्हणणारे भक्त जाणतात ६. —जेव्हां समाजांतील पांचहि संघांकडून इन्द्राच्या ठिकाणीं लक्ष लागून प्रार्थनाघोष चालतात तेव्हांच तो स्तोतृजनाच्या शत्रूंचा तडाक्यासरशीं संहार करतो, आणि सर्व मानसन्मानांचें निवासस्थान होऊन राहतो ७. —ही सुद्धां तुझीच प्रशंसा होय; कारण तूं पराक्रम तसेच केले आहेस, आणि दिव्यचक्राचा मार्गहि पण तूंच राखला आहेस ८. —वृष्टि करणाऱ्या वीर्यशाली इन्द्राच्या (कृपेनें) नानाप्रकारच्या धान्यांची समृद्धि झाली असतां, पशू जसे आपलें खाद्य गृहण करतात, तसेच इतर सर्व प्राणीहि जगण्यासाठीं आपआपला मार्ग चोखाळित असतात ९. —तें (वरदान) स्वीकारून पुनः तुझ्या कृपेची वाञ्छा धरणारे आम्हीं भक्तजन तुमच्यासह चातुर्यसंपन्न पुत्रांचे वडील व्हावें अशी इच्छा बाळगतों; ती मरुतांचा स्वामी जो इन्द्र त्याचें माहात्म्य वाढवावें म्हणूनच बाळगतों १०. —योग्यकाळीं प्रादुर्भूत होणारा तेजोनिधि जो तूं त्या तुझें स्तवन, हे शूरा, आम्हीं ऋक्सूक्तांनीं करतों; तर हे इन्द्रा, तुझ्या सहायानें आम्हीं विजय मिळवूंच मिळवूं. (अभीष्ट वस्तूंचा) वर्षाव करणारे रुद्र आणि प्रसन्नांतःकरणाचे पर्वत हे वृत्राचा नाश करण्याच्या प्रसंगीं आणि युद्धप्रसंगीं आमचेच असतात; तसेंच महाबलिष्ठ जो इन्द्र तोहि त्यांचें गुणसंकीर्तन आणि स्तवन करणाऱ्या भक्तापाशींच असतो, म्हणून सर्व इन्द्रप्रमुख देव आमच्यावर कृपा करोत १२.

---

प्रत्नथा कविवृधः इन्द्रो वाकस्य वक्षणिः। शिवो अर्कस्य होमनि अस्मत्रा गन्तु अवसे ॥ ४ ॥ आत् ऊं नु ते अव क्रतुं स्वाहा वरस्य यज्यवः। श्वात्रम् अर्काः अनूषत इन्द्रं गोत्रस्य दावने ॥ ५ ॥ इन्द्रे विश्वानि वीर्या कृतानि कर्त्वानि च। यम् अर्काः अध्वरं विदुः ॥ ६ ॥ यत् पाञ्चजन्यया विशा इन्द्रे घोषा असृक्षत। अस्तृणात् बर्हणा विपो अर्यो मानस्य स क्षयः ॥ ७ ॥ इयम् उ ते अनुष्टुति श्चकृषे तानि पौंस्या। प्राव श्चक्रस्य वर्तनिम् ॥ ८ ॥ अस्य वृष्णो वि ओदने उरु क्रमिष्ट जीवसे। यवं न पश्व आ ददे ॥ ९ ॥ तत् दधाना अवस्यवो युष्माभि र्दक्षपितरः। स्याम मरुत्वतो वृधे ॥ १० ॥ बळ् ऋत्वियाय धाम्ने ऋक्वभिः शूर नोनुमः। जेषामेन्द्र त्वया युजा ॥ ११ ॥ अस्मे रुद्रा मेहना पर्वतासो वृत्रहत्ये भरहूतौ सजोषाः। यः शंसते स्तुवते धायि पज्रः इन्द्रज्येष्ठा अस्माँ अवन्तु देवाः ॥ १२ ॥

## सूक्त ५३

आमचे स्तोत्रकलाप तुजला हृष्टचित्त करोत; हे वज्रधरा, आम्हांवर कृपाप्रसाद कर, आणि धर्मद्वेष्ट्यांना अगदीं ठार मारून टाक १. —दानधर्म न करणाऱ्या वित्तशठांना आपल्या पायानें चिरडून टाक. तूं परमथोर आहेस, तुझ्यासारखा तूंच, दुसरा कोणीहि नाहीं २. —जे पिळून सिद्ध झालेले असतात, आणि जे पिळावयाचे असतात, अशा सर्व सोमपल्लवांचा प्रभू तूं आहेस; इतकेंच काय, पण सकल मानवांचा राजाहि तूंच आहेस ३. —तर इकडे ये, आणि सज्जनांचा निवास द्युलोकांतच होणार अशी घोषणा करात परत जा. कारण पृथ्वी आणि दिव्यलोक अशा दोन्हीं ठिकाणीं तूं ओतप्रोत भरून राहिला आहेस ४. —तो पर्वत–कीं ज्याला शेंकडोंच काय, पण ( अज्ञानरूप ) शिखरें हजारों आहेत, त्याला, हे इन्द्रा, तूं भक्तांसाठीं विदारण केलेंस ५. —म्हणून दिवसा काय आणि रात्रीं काय, सोमरस पिळून सिद्ध झाला म्हणजे आम्हीं तुझा धांवा करतों, तर आमचे हेतु पूर्ण कर ६. —यौवनाढ्य, भरदार मानेचा, खालीं न वांकणारा आणि पराक्रमाची वृष्टि करणारा असा वीरपुंगव इन्द्र म्हणतात तो कोठें आहे ? कोणता ब्रह्मस्तवन करणारा भक्त त्याची सेवा करीत आहे ? ७. —तो वीर्यशाली देव पूर्णपणें सुप्रसन्न होऊन कोणाच्या सोमसवनास जातो ? कोणता भक्त इन्द्रावरच निष्ठा ठेवतो ? ८. —हे वृत्रनाशना, तुझीं वरदानें कोणाला लाभलीं ? तुझ्या उत्तमोत्तम पराक्रमांपासून लाभ कोणाला झाला ? तुझ्या गायनांत कोणता भक्त अगदीं गढून गेला ? ९. —म्हणून सर्वांमध्यें ह्याच मर्त्यजनाच्या गृहांत हा सोमरस सिद्ध केला आहे तर झटकर ये आणि तो प्राशन कर १०. —हा रस सामान्य नव्हे. अगदीं **शर्यणावतांत सुषोमा** नदीच्या काठीं **आर्जिकीय** प्रांतांत जो होतो तो हा अत्यंत

## सूक्तम् ५३

प्रगाथः इन्द्रः गायत्री

उत् त्वा मदन्तु स्तोमाः कृणुष्व राधो अद्रिवः। अव ब्रह्मद्विषो जहि ॥ १ ॥ पदा पणीन् अराधसो नि बाधस्व महाँ असि। न हि त्वा कश्चन प्रति ॥ २ ॥ त्वम् ईशे सुतानाम् इन्द्र त्वम् असुतानाम्। त्वं राजा जनानाम् ॥ ३ ॥ ऐहि प्रेहि क्षयो दिवि आघोषन् चर्षणीनाम्। ओभे पृणासि रोदसी ॥ ४ ॥ त्वं चित् पर्वतं गिरिं शतवन्तं सहस्रिणम्। वि स्तोतृभ्यो रुरोजिथ ॥ ५ ॥ वयम् उत् त्वा दिवा सुते वयं नक्तं हवामहे। अस्माकं कामम् आ पृण ॥ ६ ॥ क्व स्यो वृषभो युवा तुविग्रीवो अनानतः। ब्रह्माकस् तं सपर्यति ॥ ७ ॥ कस्य स्वित् सवनं वृषा जुजुष्वान् अव गच्छति। इन्द्रं क उ स्वित् आ चके ॥ ८ ॥ कं ते दानाः असृक्षत वृत्रहन् कं सुवीर्या। उक्थे क उ स्वित् अन्तमः ॥ ९ ॥ अयं ते मानुषे जने सोमः पूरुषु सूयते। तस्येहि प्र द्रवा

उल्लासप्रद रस तो हा येथें आहे ११. —तर आज आम्हांवर महदुपकार करण्यासाठीं—तुझा जो आवेश दुर्जनांची दाणादाण उडवितो तो हर्षावेश अनुभविण्यास हे इन्द्रा, धांवून ये आणि हा रुचिर सोमरस प्राशन कर १२.

## सूक्त ५४

हे इन्द्रा, आमच्या शूर नेत्यांनीं तुला पूर्वेकडून, पश्चिमेकडून, वरून उत्तरेकडून, तसेंच खालीं दक्षिणेकडून, (एवंच) जेथें असशील त्या सर्व ठिकाणांहून तुला हांक मारली आहे. तर आपल्या वेगवान् अश्वांच्या योगानें सत्वर येथें ये १, —मग ह्यावेळीं तूं अमृतस्रावी द्युलोकांत हर्षनिर्भर झालेला असलास, किंवा दिव्यप्रकाशदायक भवनांत आनंदमग्न असलास, अथवा सोमपेयाच्या समुद्रांत तल्लीन असलास तरी येथें आगमन कर २. —तुज परमश्रेष्ठाला, तुज अनंताला, आमच्या हितासाठीं हे इन्द्रा, धेनूप्रमाणें (लाभदायक म्हणून) सोमप्राशनार्थ पाचारण करीत आहों ३. —हे इन्द्रा, तुझा महिमा, आणि हे देवा, तुझी ती तेजस्विता, तुझे हरिद्वर्ण अश्व रथांतून इकडे घेऊन येवोत ४. —हे इन्द्रा, तुझेंच गुणगायन होतें, तुझेंच स्तवन होतें; तूं थोर, तूं शत्रुभयंकर आहेस. प्रभुत्वहि तूंच देतोस; तर आमचा सोमरस तूं प्राशन कर ५. —सोमरस पिळून आणि प्रेमरूप हवि तुझ्या पुढें ठेऊन आमच्या यज्ञमंडपांतील ह्या कुशासनावर तूं आरोहण करावेंस म्हणून आम्ही तुला हांक मारीत आहोंत ६. —हे इन्द्रा; तूं सर्वांना सर्वसामान्य असा देव आहेस म्हणूनच आम्हीं तुझा धांवा मांडला आहे ७. —हेंच तें मधुर सोमपेय आमच्या शूर मित्रांनीं ग्राव्यांच्या योगानें चुरून वनविलें आहे. तर हे इन्द्रा, प्रसन्नान्तःकरणानें तें

पिब ॥१०॥ अयं ते शर्यणावति सुषोमायाम् अधि प्रियः। आर्जीकीये मदिन्तमः ॥११॥ तम् अद्य राधसे महे चारुं मदाय घृष्वये। एहीम् इन्द्र द्रवा पिब ॥ १२ ॥

## सूक्तम् ५४

प्रगाथः इन्द्रः गायत्री

यत् इन्द्र प्राक् अपाक् उदक् न्यक् वा हूयसे नृभिः। आ याहि तूयम् आशुभिः ॥१॥ यत् वा प्रस्रवणे दिवो मादयासे स्वर्णरे। यत् वा समुद्रे अन्धसः ॥२॥ आ त्वा गीर्भिर् महाम् उरुं हुवे गाम् इव भोजसे। इन्द्र सोमस्य पीतये ॥ ३ ॥ आ ते इन्द्र महिमानं हरयो देव ते महः। रथे वहन्तु बिभ्रतः ॥ ४ ॥ इन्द्र गृणीष उ स्तुषे महाँ उग्र ईशानकृत्। आ इहि नः सुतं पिब ॥ ५ ॥ सुतावन्तस् त्वा वयं प्रयस्वन्तो हवामहे। इदं नो बर्हिर् आसदे ॥ ६ ॥ यत् चित् हि शश्वताम् असि इन्द्र साधारणस् त्वम्। त्वा वयं हवामहे ॥ ७ ॥ इदं ते सोम्यं मधु अधुक्षन् अद्रिभि

तू प्राशन कर ८. —सर्व परकीयांना, मग ते कितीहि शहाणे असोत, बाजूस सारून सत्वर आमच्याकडे ये; आणि आमच्याविषयीं उत्तम कीर्ति होईल असें कर ९. —ठिपक्यांनीं आणि सुवर्णालंकारांनीं मंडित अशा धेनूंचा दाता जो ( इन्द्र ) तो माझा राजा होय; तर दिव्य विभूतिनों, तो दातृश्रेष्ठ मजवर रुष्ट न होईल असें करा १०. —हजारों ठिपकेदार धेनूंचें खिल्लार आणि शिवाय मोठमोठे रम्य, ठसठशीत आणि तेजस्वी सुवर्णालंकार अशी देणगी मी त्याच्याचकडून मिळवीन ११. —गाढ संकटांत गढलेला जो मी बालक त्याच्यावर केलेल्या सहस्रावधि कृपाप्रसादांनीं दिव्य विभूतिंमध्यें प्रख्याति झाली १२.

## सूक्त ५५

त्रस्त झालेले लोक, उत्तमोत्तम वैभवाचा मार्ग दाखविणारा आणि तें मिळवून देणारा जो इन्द्र त्याचें संकीर्तन करून रक्षणासाठीं मोठ्या त्वरेनें ( त्याला हांक मारतात त्याप्रमाणें ) मीहि अध्वरयागांमध्यें सोमरस पिळून, कर्तृत्वशाली सहायकाला हांक मारावी त्याप्रमाणें, त्या विश्वंभराला हांक मारीत आहे. १. —तो हर्षोत्फुल्ल झाला म्हणजे त्या सुंदर मुकुटधारी देवाला, कोणीहि घातकी, कोणताहि निश्चल किंवा चल पदार्थ आंवरून धरूं शकत नाहीं; असा हा अप्रतिहत इन्द्र, सोमरस अर्पण करणाऱ्याला, स्तोतृजनाला आणि गायन करणाऱ्या भक्ताला आदरून त्याचे इच्छित पूर्ण करतो २. —हा जो सर्वसमर्थ अश्वसंपन्न इन्द्र, तो अन्तःकरणाची शुद्धि करणारा आहे. तो एक सोन्याची वजरी आहे ( असें म्हटलें तरी चालेल ) असा तो

---

नॄभिः। जुषाणः इन्द्र तत् पिब ॥ ८ ॥ विश्वाँ अर्यो विपश्चितो अति ख्यस् तूयम् आगहि। अस्मे धेहि श्रवो बृहत् ॥ ९ ॥ दाता मे पृषतीनाम् राजा हिरण्यवीनाम्। मा देवाः मघवा रिषत् ॥ १० ॥ सहस्रे पृषतीनाम् अधि चन्द्रम् बृहत् पृथु। शुक्रम् हिरण्यम् आददे ॥ ११ ॥ नपातो दुर्गहस्य मे सहस्रेण सुराधसः। श्रवो देवेषु अक्रत ॥ १२ ॥

## सूक्तम् ५५

प्रागाथः कलिः इन्द्रः बृहती

तरोभि र्वो विदद्वसुम् इन्द्रं सबाध ऊतये। बृहत् गायन्तः सुतसोमे अध्वरे हुवे भरं न कारिणम् ॥ १ ॥ न यं दुध्राः वरन्ते न स्थिरा मुरो मदे सुशिप्रम् अन्धसः ॥ य आदृत्य शशमानाय सुन्वते दाता जरित्रे उक्थ्यम् ॥ २ ॥ यः शक्रो मृक्षो अश्व्यो यो वा कीजो हिरण्ययः। यः ऊर्वस्य रेजयति अपावृतिम् इन्द्रो

वृत्रनाशन इन्द्र, ज्ञानकिरणांवर घट्ट बसलेलें झांकण उखळून मोकळें करतो ३. —किंवा असेंहि म्हणा कीं, विपुल सांठविलेला परंतु पुरून ठेवलेला द्रव्याचा खजिनाच खणून काढून तो ( इन्द्र ) आपल्या भक्ताला अर्पण करतो. तो रुचिरमुकुट हरिदश्व इन्द्र काय करणार नाहीं ? तो जी गोष्ट मनांत आणील ती आपल्या कर्तृत्वानें करीलच करील ४. —हे सर्वस्तुता वीरा, तूं पूर्वी शूर भक्तांकडून जिची अपेक्षा करीत होतास ती तुझी प्रियवस्तु-म्हणजे यज्ञ, सामगायन आणि आतुरतेनें केलेलें स्तवन, हें सर्व आम्हीं तुला अर्पण करतों ५. —हे सकलजनाहूता वज्रधरा, हे आकाशस्थायी, हे सोमप्रिया, सोमरस पिळतां क्षणींच तुजला हर्ष होतो. प्रार्थनासूक्तें आणि सोमार्पण करणाऱ्या भक्ताला त्याची इच्छित वस्तु देणारा कोणी असेल तर तो तूंच आहेस ६. —आतां, ह्या घटकेला, आणि उद्यां येथें ( यज्ञांत ) वज्रधर इन्द्राचें गौरव करूं. आज तुम्हीं त्याला निर्मळ अन्तःकरणानें सोमरस अर्पण करा, आणि त्या विश्रुत देवाच्या ठिकाणीं लीन व्हा. ७. —मेंढ्यांना फाडून खाणारा क्रूर लांडगा; पण तो देखील ह्या इन्द्राच्या धोरणांतच राहतो. तर हे इन्द्रा, तूं आमचें स्तवन मान्य करून आपल्या अतर्क्य इच्छेनुरूप येथें आगमन कर ८. —असा कोणता पराक्रम आहे कीं, जो ह्या इन्द्रानें करून दाखविला नाहीं ? असा कोण आहे कीं, कान असूनहि ज्यानें हा( इन्द्र )च वृत्रनाशन आहे असें जन्मापासून सुद्धां ऐकिलें नाहीं ? ९. —ह्याचा धाक किती तरी मोठा अनिवार; ह्या वृत्रनाशनाचें बळ कितीतरी असह्य ! मग रोजच्या प्राप्तीकडे डोळे लावून बसणाऱ्या आणि बेसुमार व्याज उकळणाऱ्या कंजुषांना तो आपल्या पराक्रमानें वठणीस आणणार नाहीं काय ? १०. —हे अनादि देवा, हे वृत्रनाशना, हे सर्वजनाहूता वज्रधरा, आम्हीं सकल भक्तजन तुझीं स्तोत्रें पोषक अन्नाप्रमाणें ( हृदयाशीं ) घट्ट कवटाळून धरतों ११. —हे नाना कर्तृत्वशाली इन्द्रा, तुझ्याजवळ जीं अगणित रक्षणें आहेत तीं ( भक्तांच्या मनांत )

---

गव्यस्य वृत्रहा ॥ ३ ॥ निखातं चित् यः पुरुसं भृतं वसु। उत् इत् वपति दाशुषे ॥ वज्री सुशिप्रो हर्यश्व इत् करत् इन्द्रः क्रत्वा यथा वशत् ॥ ४ ॥ यत् ववन्थ पुरुष्टुत पुरा चित् शूर नृणाम्। वयं तत् ते इन्द्र सं भरामसि यज्ञम् उक्थं तुरं वचः ॥ ५ ॥ सचा सोमेषु पुरुहूत वज्रिवो मदाय द्युक्ष सोमपाः। त्वम् इत् हि ब्रह्मकृते काम्यं वसु देष्ठः सुन्वते भुवः ॥ ६ ॥ वयम् एनम् इदा ह्यो अपीपेमे-ह वज्रिणम्। तस्मा उ अद्य समना सुतं भर आ नूनं भूषत श्रुते ॥ ७ ॥ वृक श्चित् अस्य वारणः उरामथिर् आ वयुनेषु भूषति। सेमं नः स्तोमं जुजुषाण आ गहि इन्द्र प्र चित्रया धिया ॥ ८ ॥ कत् ऊ नु अस्य अकृतम् इन्द्रस्य अस्ति पौंस्यम्। केनो नु कं श्रोमतेन न शुश्रुवे जनुषः परि वृत्रहा ॥ ९ ॥ कत् ऊ महीर् अधृष्टाः अस्य तविषीः कत् ऊ वृत्रघ्नो अस्तृतम्। इन्द्रो विश्वान् बेकनाटाँ अहर्दृशः उत क्रत्वा पणीरँ अभि ॥ १० ॥ वयं घा ते अपूर्व्य इन्द्र ब्रह्माणि वृत्रहन्। पुरुतमासः

आकांक्षा उत्पन्न करतात; तर हे दिव्यनिधे, परक्यांनीं केलेलीं ( दिखाऊ ) सवनें सोडून आमच्याकडे ये आणि, हे प्रबलोत्तमा, आमचा धांवा ऐक १२. —आम्हीं तुझे स्तोतृजन तुझ्याच ठिकाणीं राहणार; हे सर्वजनाहूता भगवंता, तुझ्यावांचून आमची कींव दुसरा कोण करणार आहे बरें ! १३. —तर अविचार उत्पन्न करणाऱ्या ह्या उपासमारापासून, आणि ह्या शिव्याशापांच्या वातावरणापासून तूं आमची सुक्तता कर. आपल्या संरक्षकशक्तीनें, आपल्या अद्भुत इच्छेनें, हे शक्तिमत्श्रेष्ठा, तूं आम्हांस संभाळून घे. खरा मार्गदर्शक तूंच आहेस १४. —तुमचा सोमरस तुम्हीं सिद्ध ठेवा. दिवस मोजीत काळ कण्ठणाऱ्या दीनानों, भिऊं नका. विध्वंसक परिस्थिति दूर पळून जात आहे, आपण होऊन दूर जात आहे १५.

## सूक्त ५६

ते जे खरे क्षत्रिय, ते जे भक्तावर कृपा करणारे आदित्य, त्यांच्या जवळ अभीष्टप्राप्तिसाठीं आम्हीं कृपेची याचना करतों १. —भक्तसखा वरुण, तसाच अर्यमा, आम्हांस पातकापासून पलीकडे नेवो. तें कसें तें आदित्यच जाणतात २. —त्या (आदित्यां)चें जें अद्भुत आणि प्रशंसनीय कृपेचें कवच आहे तें, भक्तीचा अलंकार देवाला समर्पण करणाऱ्या करतांच आहे ३. —हे वरुणा, हे मित्रा, हे अर्यमन्, तुम्हीं जसे थोर, तशी तुमची कृपाहि थोरच असते. त्या कृपेची आम्हीं तुमच्यापाशीं याचना करतों ४. —आम्ही ठार मारले जाण्या पूर्वींच, आणि हे आदित्यानों, आम्हीं जिवंत आहों तोंच आमच्याकडे

पुरुहूत. वज्रिवो भृतिं न प्र भरामसि ॥ ११ ॥ पूर्वी श्चित् हि त्वे तुविकूर्मिन् आशसो हवन्ते इन्द्र ऊतयः । तिर श्चित् अर्यः सवनाऽऽवसो गहि शविष्ठ श्रुधि मे हवम् ॥ १२ ॥ वयं घा ते त्वे इद्दु इन्द्र विप्राः अपि ष्मसि । नहि त्वत् अन्यः पुरुहूत क श्चन मघवन् अस्ति मर्डिता ॥ १३ ॥ त्वं नो अस्याः अमतेर् उत क्षुधः अभिशस्तेर् अव स्पृधि । त्वं नः ऊती तव चित्रया धिया शिक्षा शचिष्ठ गातुवित् ॥ १४ ॥ सोमः इत् वः सूतो अस्तु कलयो मा बिभीतन । अप इत् एष ध्वस्माऽयति । स्वयं घैशो अपायति ॥ १५ ॥

## सूक्तम् ५६

सांमदो मैत्रावरुणिः मित्रावरुणौ गायत्री

त्यान् नु क्षत्रियान् अवः आदित्यान् याचिषामहे । सुमृळीकाँ अभीष्टये ॥ १ ॥ मित्रो नो अति अंहतिं वरुणः पर्षत् अर्यमा । आदित्यासो यथा विदुः ॥ २ ॥ तेषां हि चित्रम् उक्थ्यं वरूथम् अस्ति दाशुषे । आदित्यानाम् अरं कृते ॥ ३ ॥ महि वो महताम् अवो वरुण मित्र अर्यमन् । अवांसि आ वृणीमहे ॥ ४ ॥ जीवान् नो अभि-

धांवत या. भक्तांचा धावा ऐकणाऱ्या देवांनों, या वेळेस तुम्हीं कोठें आहां बरें ? ५. —सोमार्पण करणाऱ्याला, परंतु थकल्याभागलेल्या भक्ताला, चिलखताप्रमाणें जो तुमचा आसरा आहे तो आम्हांला मिळेल असें आश्वासन द्या. ६. —हे देवानों, पातक्याची पापापासून मुक्तता आणि निर्दोष पुण्यवंताला रत्नसंपत्ति, अशी, हे कलंकरहित आदित्यांनों, तुमची व्यवस्था आहे ७. —कोणताहि अडथळा आम्हांस डांवून न ठेवो; (ईश्वर) आम्हांस महत्कार्यासाठीं सर्व बाजूंनीं मोकळे ठेवो, कारण हा लोकविश्रुत इन्द्रच कायतो आत्मवश आहे; ८. —कपटी कुटिल शत्रूंच्या जाळ्यांत आम्हीं अडकून पडूं असें, हे कृपाळू देवांनों, तुम्हीं कदापि करूं नका. ९. —हे श्रेष्ठ अदिति, आमचें अभीष्ट आम्हांस प्राप्त व्हावें म्हणून तुज भक्तवत्सल देवीची प्रार्थना आम्हीं करीत आहों १०. —ज्या तुझे पुत्र भीषणस्वरूप आहेत अशा देवि, उथळ आणि खोल अशा दोन्ही प्रकारच्या उदकप्रवाहांतून तूंच पार नेतेस; तर घातकी दुष्टांच्या हातून आमच्या मुलांलेंकरांतून कोणालाहि इजा होऊं देऊं नको ११. —हे व्यापनशीले, हे विस्तृतनिवासे देवि, आम्हां तुझ्या निर्मत्सर भक्तांचा चोहोंकडे विस्तार व्हावा, आणि आमच्या मुलाबाळांनींहि आणि जगावें असें कर १२. —लोकांच्या शिरःस्थानीं जे वास करतात, जे अपराजित आपल्या यशानें उज्वल आहेत, ते हे देवच सनातन धर्मांच्या नियमांचें संरक्षण करतात १३. —हे आदित्यांनों, तुम्हीं ( दीनवत्सल ) आहांत तर क्रूर लांडग्यांच्या जबड्यांतून आम्हांस सोडवा; हे अदिते, आम्हांला एखाद्या चोराप्रमाणें बांधून ठेविलें आहे, तर आम्हांला बन्धमुक्त कर १४. —ही घातक कट्यार—हीं दुष्ट बुद्धि, आम्हांला न मारतां, हे आदित्यांनो, आमच्यापासून हुकून बाजूला जावो १५. —दानशूर आदित्यांनो, पूर्वीप्रमाणें तुमच्या संरक्षणानें आम्हीं आतांहि शांतिसुखाचा उपभोग घेऊं असें करा १६. —जो पाठीमागें पाय घेऊं म्हणेल त्या प्रत्येकाला देखील, त्यानें

धेतन आदित्यासः पुरा हथात्। कत् ह स्थ हवनश्रुतः ॥ ५ ॥ यत् ह श्रान्ताय सुन्वते वरूथम् अस्ति यत् छर्दिः। तेना नो अधि वोचत ॥ ६ ॥ अस्ति देवाः अंहोः उरु अस्ति रत्नम् अनागसः। आदित्याः अद्भुतैनसः ॥ ७ ॥ मा नः सेतुः सिषेत् अयं महे वृणक्तु न स्परि। इन्द्र इत् हि श्रुतो वशी ॥ ८ ॥ मा नो मृचा रिपूणां वृजिनानाम् अविष्यवः। देवाः अभि प्र मृक्षत ॥ ९ ॥ उत त्वाम् अदिते महि अहं देवि उप ब्रुवे। सुमृळीकाम् अभिष्टये ॥ १० ॥ पर्षि दीने गभीर आँ उग्रपुत्रे जिघांसतः। माकिस् तोकस्य नो रिषत्॥ ११ ॥ अनेहो न उरुव्रजे उरूची वि प्रसर्तवे। कृधि तोकाय जीवसे ॥ १२ ॥ ये मूर्धानः क्षितीनाम् अदब्धासः स्वयशसः। व्रता रक्षन्ते अद्रुहः॥ १३ ॥ ते न आस्नो वृकाणाम् आदित्यासो मुमोचत। स्तेनं बद्धमिवा-दिते ॥ १४ ॥ अपो षु णः इयं शरुः आदित्याः अप दुर्मतिः। अस्मत् एतु अजघ्नुषी ॥ १५ ॥ शश्वत् हि वः सुदानवः। आदित्याः ऊतिभि र्वयम्। पुरा नूनं बुभुज्महे ॥ १६ ॥ शश्वन्तं हि

( उत्तमरीतीनें ) जगावें म्हणून तुम्हीं पापापासून परावृत्त करा १७. —बांधल्याप्रमाणें अगदीं जखडून गेलेला जो मी त्या मला हे अदिते जर तूं मुक्त करतेस, तर हे आदित्यांनो, तुमचा हा प्रशंसनीय प्रसाद आमच्या (स्वार्थ)त्यागप्रवृत्तीला कारण होवो १८. —जिच्या योगानें, हे आदित्यानों, शत्रूंवर चालून जातां येतें, ती तरतरी आम्हांमध्यें नाहीं, म्हणून तुम्हीं आमच्यावर दया करा १९. —हे आदित्यानों, कुशलतेनें बनविलेलें मृत्युचें घातक हत्यार, आम्हांस म्हातारपण येण्यापूर्वीच मारून टाकील असें करूं नका २० —द्वेषबुद्धि पार विलयास न्या. हे आदित्यानों, पातकाचा नायनाट करा, आणि आम्हांस चोहोंकडून घेरून टाकणाऱ्या दोषांचें परिमार्जन करा २१.

अध्याय चौथा समाप्त.

## अध्याय पांचवा

## सूक्त ५७

तुला आणि तुझ्या रथाला, ( तो रथ ) आमच्या रक्षणास आणि शांतिसुखास कारण होईल अशा रीतीनें हे इन्द्रा, हे प्रबलोत्तमा, हे सज्जनपालका, आम्ही आमच्याकडे वळवून आणतों. जो रथ मोठा कर्तत्वशाली आणि अरिमर्दन आहे त्याला आणतों. १. —हे महाप्रबला, महापराक्रमा, सर्वशक्तिमान् देवा, हे बुद्धिरूपा, तूं आपल्या सर्वव्यापक महिम्यानें हें विश्व भरून टाकलें आहेस २. —तूं जो श्रेष्ठ, त्या तुझ्या महिम्यानें ( असें होतें कीं ) सुवर्णाप्रमाणें तेजाळ आणि चोहोंकडे धांव-

प्रचेतसः प्रतियन्तं चित् एनसः। देवाः कृणुथ जीवसे ॥ १७ ॥ तत् सु नो नव्यं सन्यसे आदित्या यत् मुमोचति। बन्धात् बद्धमिवा-दिते ॥ १८॥ ना-स्माकम् अस्ति तत् तरः आदित्यासो अतिष्कदे। यूयम् अस्मभ्यं मृळत ॥ १९ ॥ मा नो हेति र्विवस्वतः आदित्याः कृत्रिमा शरुः। पुरा नु जरसो वधीत् ॥ २० ॥ वि षु द्वेषो वि अंहतिम्। आदित्यासो वि संहितम् विष्वक् वि वृहता रपः ॥ २१ ॥

इति षष्ठोष्टके चतुर्थोऽध्यायः।

## अथ पंचमोऽध्यायः

## सूक्तम् ५७

आङ्गिरसः प्रियमेधः इन्द्रः अनुष्टुप्, गायत्री

आ त्वा रथं यथोतये सुम्नाय वर्तयामसि। तुविकूर्मिम् ऋतीषहम् इन्द्र शविष्ठ सत्पते ॥ १ ॥ तुविशुष्म तुविक्रतो शचीवो विश्वया मते। आ पप्राथ महित्वना ॥ २ ॥ यस्य ते महिना महः परि ज्मायन्तम् ईयतु। हस्ता वज्रं हिरण्य-

णारें जें तुझें वज्र तें आपल्या दोन्हीं हातांत तूं वागवूं शकतोस ३. —अखिल मानवांचा प्रतिपालक, ( शत्रुपुढें ) कधींहि न वांकणाऱ्या उत्कटबलाचा प्रभु, वेगानें धांवणाऱ्या रथांचा स्वामी, असा जो इन्द्र त्याला त्याच्या सहायक शक्तींसह त्याच्या शीघ्रगामी वीरांसह येथें पाचारण करतों ४. —स्वर्गीय प्रकाश मिळवून देणाऱ्या (संग्रामा)त ज्याचा निरंतर उत्कर्षच असतो, त्या इन्द्राला शूर सैनिक आपल्या अभीष्ट सिद्धिसाठीं आणि रक्षणासाठीं नाना प्रकारांनीं विनवीत असतात ५. —ज्याच्या अस्तित्वाला मर्यादा घालतां येत नाहीं, ज्याची धडाडी निःसीम, जो शत्रुभयंकर पण सहज प्रसन्न होणारा, जो सर्व वस्तूंचा एकच अधिपति होय ६. —त्याला, त्या इंद्रालाच, त्यानें आमच्यावर महत् कृपाप्रसाद करावा आणि सोमरस प्राशन करावा, म्हणून मी प्रार्थनेनें द्रव आणीत आहे; तोच रणभैरव सकळ मानवांनीं प्रथम केलेल्या स्तुतींचा भोक्ता होय ७. —हे विकसितप्रभावा, कोणताहि मर्त्य तुझ्या मित्रप्रेमाचा अन्त लावूं शकत नाहीं, किंवा तुझ्या उत्कट सामर्थ्यांना व्यापून टाकूं शकत नाहीं ८ —तुझ्या रक्षणाखालीं आणि तुझ्या सहायानें, उदकांत, आणि सर्य प्रकाशांत जें महत् धन आहे तें, हे वज्रधरा, आम्ही संग्रामांत जिंकून घेऊं असें कर ९ —म्हणून तुजला आम्हीं स्तुतिंनींच आपलासा करतों; हे अत्यंत स्तवनप्रिया, अशानेंच सत्वप्राप्तीच्या युद्धांत तूं पुरुमाय्याचें रक्षण केलेंस १०. —तूं असा आहेस कीं तुझें सख्य तर गोडच, परंतु तुझें मार्गदर्शकत्व तर त्याहून गोड आहे. हे अशनिधरा, पण तुझा यज्ञ मात्र भक्तिभावानें केला पाहिजे ११. —आम्हांला, आमच्या लेंकरांना, मोकळेपणाचा यथेच्छ लाभ दे; आम्हीं विस्तृत जागीं राहूं असें कर, आणि आम्हीं उत्तम रीतीनें जगावें म्हणून आम्हांला उदारचरित कर १२ —शूरांना विस्तीर्ण प्रदेश, धेनूंना मनसोक्त मोकळीक, आणि रथाला यथास्थित वाट ह्या गोष्टी हव्या असतील तर त्याला देवभक्ति हा मार्ग आहे असें आम्हीं समजतों १३. —माझ्या सोमरसानें हर्ष पावणारे असे जोडी जोडीनें

यम् ॥ ३ ॥ विश्वानरस्य वः पतिम् अनानतस्य शवसः। एवै श्र चर्षणीनाम् ऊती हुवे रथानाम् ॥ ४ ॥ अभिष्टये सदावृधं स्वर्मीळ्हेषु यं नरः। नाना हवन्त ऊतये ॥ ५ ॥ परोमात्रम् ऋचीषमम् इन्द्रम् उग्रं सुराधसम्। ईशानं चित् वसूनाम् ॥ ६ ॥ तंतम् इत् राधसे महे इन्द्रं चोदामि पीतये। यः पूर्व्याम् अनुस्तुतिम् ईशे कृष्टीनां नृतुः ॥ ७ ॥ न यस्य ते शवसान सख्यम् आनंश मर्त्यः। नकिः शवांसि ते नशत् ॥ ८ ॥ त्वाऊतासस् त्वा युजा अप्सु सूर्ये महत् धनम्। जयेम पृत्सु वज्रिवः ॥ ९ ॥ तं त्वा यज्ञेभिर् ईमहे तं गीर्भि र्गिवणस्तम। इन्द्र यथा चित् आविथ वाजेषु पुरुमाय्यम् ॥ १० ॥ यस्य ते स्वादु सख्यं स्वाद्वी प्रणीतिर् अद्रिवः। यज्ञो वितंतसाय्यः ॥ ११ ॥ उरु णस् तन्वे तने उरु क्षयाय नस् कृधि। उरु णो यन्धि जीवसे ॥ १२ ॥ उरुं नृभ्य उरुं गवे उरुं रथाय पन्थाम्। देववीतिं मनामहे ॥ १३ ॥

सहा शूर परिचारक मिष्टान्नें घेऊन उभे आहेत १४. —**इन्द्रोत** राजा यज्ञाला आला तेव्हां त्याच्यापासून दोन अवलक, **ऋक्षा**च्या पुत्रापासून दोन **हरित्** रंगाचे, आणि **आश्वमेधा**पासून दोन लाल रंगाचे याप्रमाणें अश्व मिळाले त्यांचा मी स्वीकार केला १५. —**इन्द्रोता**चे अश्व रथाला जोडण्याला फारच चांगले होते; **ऋक्षा**च्या घोड्यांचे लगाम मौल्यवान् आणि **आश्वमेधा**चे घोडे देखणे आणि साज घातलेले होते त्यांचा मीं स्वीकार केला १६. —**अतिथिग्वा**चा पुत्र जो शुद्धाचरणी **इन्द्रोत** त्याच्या कडून सहा अश्व मिळाले त्यांच्या बरोबर तितक्याच घोड्याहि मिळाल्या १७. —ह्या सहा अवलक अश्वांमध्यें त्यांच्या बरोबर एक तजेलेदार तलक घोडी, दुसरी एक लाल होती, आणि तिसरी एक अशी होती कीं तिचा लगाम तर उत्तम होताच, पण ती चावकाच्या नुसत्या इषाऱ्यानेंच तडक धांवत जाई १८. —सत्वयुद्धांतील सैनिक-बन्धूनों, तुम्हीं असे आहांत कीं कोणाहि निन्दकाला तुम्हांमध्यें एकहि दोष दाखवितां येणार नाहीं १९.

## सूक्त ५८

जो सोमरस तुमच्यासाठीं त्या वीराला ( इन्द्राला ) हर्षोत्फुल्ल करतो, त्याच्यापुढें त्रिष्टुप् स्तोत्रानें प्रशंसनीय झालेलें हें उत्साह-पेय तुम्हीं ठेवा. सद्बुद्धिचा लाभ व्हावा म्हणून देवभक्त हा ध्यानानें आणि एकाग्रमनानें ( देवाची ) सेवा करीत असतो १. —तुमच्या प्रकाशवाहिनींचा जो नद, स्वैरसंचारी सरितांचा जो गर्जणारा समुद्र, आणि ज्यांचा कोणीं घात करूं शकत नाहीं अशा ( उषारूप ) धेनूंचा जो पति त्याची तूं मार्ग-प्रतीक्षा करीत आहेस काय ? २. —ज्यांच्या कांसेंत दुधाचा अलोट सांठा आहे अशा चित्रविचित्र वर्णांच्या ज्या धेनू सोमरसांत आपलें दुग्ध मिश्रित करतात, त्यांचा निवास मात्र

**उप मा षट् द्वाद्वा नरः सोमस्य हर्ष्या । तिष्ठन्ति स्वादुरातयः ॥ १४ ॥ ऋज्रौ इन्द्रोत आ ददे हरी ऋक्षस्य सूनवि । आश्वमेधस्य रोहिता ॥१५॥ सुरथाँ अतिथिग्वे सुअभीशूँर् आर्क्षे । आश्वमेधे सुपेशसः ॥ १६ ॥ षड् अश्वाँ आतिथिग्वे इन्द्रोते वधू-मतः । सचा पूतक्रतौ सनम् ॥ १७ ॥ ऐषु चेतत् वृषण्वती अन्त ऋ्ज्रेषु अरुषी । सु अभीशुः कशावती ॥ १८ ॥ न युष्मे वाजबन्धवो निनित्सु श्चन मर्त्यः । अवद्यम् अधि दीधरत् ॥ १९ ॥**

## सूक्तम् ५८

**आङ्गिरसः प्रियमेधः  इन्द्रः  अनुष्टुप्, उष्णिक्**

**प्र प्र वस् त्रिष्टुभम् इषं मन्दद्वीराय इन्दवे । धिया वो मेधसातये पुरंध्या आ विवासति ॥ १ ॥ नदं वः ओदतीनां नदं योयुवतीनाम् । पतिं वो अघ्न्यानां धेनू-नाम् इषुध्यसि ॥ २ ॥ ता अस्य सूददोहसः सोमं श्रीणन्ति पृश्नयः । जन्मन्**

दिव्य विभूतींच्या मूलस्थानीं किंवा द्युलोकाच्या तिन्हीं देदीप्यमान प्रदेशांत असतो ३. वाग्धेनूंचा स्वामी, सत्यांतून उदित झालेला, आणि सज्जनांचा प्रतिपालक जो इन्द्र त्याची स्तुति जशी तुला येत असेल तशीच मोठ्यानें कर ४. —पहा, त्याच्या तेजोरूप अश्वांनीं त्याला यज्ञमण्डपांतच आणून सोडलें; आतां त्या ठिकाणीं आम्हीं त्याचें स्तवन करूं ५. —जेव्हां इन्द्रानें मधुर सोमाला गुहेंतून बाहेर आणलें, त्या वेळेस स्वर्गीय धेनूंनीं आपलें दाट दुग्ध त्या वज्रधराला अर्पण केलें ६. —इन्द्र ( आणि मी ) असे दोघे जेव्हां ( जगत् वृक्षाच्या ) तेजोमय बुधाच्या ठिकाणीं म्हणजे अगदीं घरांतच जाऊन पोहोंचूं, त्यावेळेस सोमरस प्राशन करून त्या( जगत् )मित्राच्या निवासस्थानीं एकवीस दिवस एकत्र बरोबरच राहूं ७. —मोठ्यानें स्तवन करा; ऋक्स्तोत्राचा घोष करा; हे प्रियमेधांनों, उच्चस्वरानें स्तवन करा; तुमचे पुत्र देखील तारस्वरानें स्तवन करोत. आपला धाडसी धुरीण असें समजून ( देवाचें ) ऋक्स्तोत्रानें स्तवन करा ८. —पहा, कर्ण्यांचा आवाज होऊं लागला, तुतारीनें पुनः पुनः कर्कश शब्द केला, धनुष्याचा दोरीचा टणत्कार सुरू झाला, तर आतां वेळ न घालवितां इन्द्रप्रीत्यर्थ मोठ्यानें प्रार्थनासूक्त म्हणा ९. —तत्काळ पान्हा सोडणाऱ्या आणि दुधानें तुरत भरलेल्या ठिपकेदार धेनू परत घरीं आल्यावरोबर, इन्द्रानें सोम प्राशन करावा यासाठीं, पात्रांत तोण्डातोण्ड भरलेला रस त्याच्यापुढें करा १०. —इन्द्रानें रस प्राशन केला; अग्नीनेंहि केला; सर्व दिव्यविभूति रस प्राशन करून हर्षनिर्भर झाल्या; तर आतां वरुण हा येथें आमच्यामध्येंच वास करो. वांसरासाठीं उत्सुक झालेल्या धेनू ज्याप्रमाणें हंबारत धांवतात त्याप्रमाणें आमच्या स्तुतिनिनादित वाक्धेनू वरुणाकडे त्वरेनें जातात ११. —वरुणा, तूं देव उत्कृष्टच आहेस; पहा कीं ( आकाशांतील ) झगझगीत छिद्रें ( जीं नक्षत्रें ) त्यांच्याकडे ( आकाशगंगा वाहते ) त्याप्रमाणें तुझ्या समुद्ररूप मुखांकडे सप्त सिंधू वाहतात १२.

देवानां विशस् त्रिषु आ रोचने दिवः ॥ ३ ॥ अभि प्र गोपतिं गिरा इन्द्रम् अर्च यथा विदे । सूनुं सत्यस्य सत्पतिम् ॥ ४ ॥ आ हरयः ससृज्रिरे अरुषीर् अधि बर्हिषि । यत्रा-भि संनवामहे ॥ ५ ॥ इन्द्राय गाव आशिरं दुदुह्रे वज्रिणे मधु । यत् सीम् उप ह्वरे विदत् ॥ ६ ॥ उत् यत् ब्रध्नस्य विष्टपं गृहं इन्द्रश्च गन्वहि । मध्वः पीत्वा सचेवहि त्रि सप्त सख्युः पदे ॥ ७ ॥ अर्चत प्र अर्चत प्रियमेधासो अर्चत । अर्चन्तु पुत्रकाः उत पुरं न धृष्णु अर्चत ॥ ८ ॥ अव स्वराति गर्गरो गोधा परि सनिष्वणत् । पिङ्गा परि चनिष्कदत् इन्द्राय ब्रह्म उद्यतम् ॥ ९ ॥ आ यत् पतन्ति एन्यः सुदुघाः अनपस्फुरः । अपस्फुरं गृभायत सोमम् इन्द्राय पातवे ॥ १० ॥ अपात् इन्द्रो अपात् अग्नि र्विश्वे देवाः अमत्सत । वरुणः इत् इह क्षयत् तम् आपो अभ्यनूषत वत्सः संशिश्वरीर् इव ॥ ११ ॥ सुदेवो असि वरुण यस्य ते सप्त सिन्धवः । अनु क्षरन्ति काकुदं सूर्म्यं सुषिराम् इव ॥ १२ ॥ यो

—आपल्या रथाला चांगले जोडलेले अश्व हवि अर्पण करणाऱ्याकडे ज्यानें ताड ताड दौडत नेले तोच हा आमचा भक्तोत्सुक धुरीण (इन्द्र). हें पहा त्याचें स्वरूप; त्यानें आपले अश्व येथें जवळ सोडले आहेत १३. —सर्वसमर्थ इन्द्र हा (शत्रूंना) कस्पटाप्रमाणें मानतो, सर्व द्वेष्ट्यांना कस्पटासमान मानतो. पहा, त्या भक्तप्रिय, परात्पर देवानें, उदकानें सळसळणाऱ्या मेघाला आपल्या नुसत्या आवाजानेंच दुभंग केलें १४. —अगदीं लहान नव्हे, व कुमारहि नव्हे, अशा इन्द्रानें रथावर आरोहण करून, ज्याचा तीव्र पराक्रम सर्वांना पुरून उरला अशा प्रचंड मृगासुराला, (जगाच्या) मातापितरांच्या हितासाठीं ठेंचून मारलें १५. —हे सुंदर कवचधारी देवा, हे गृहपते, इन्द्रा, तूं आपल्या सुवर्णाच्या रथावर आरोहण कर; म्हणजे त्याच रथावर—त्या आकाशगामी, असंख्यकिरण, रक्ततेजस्क, मंगलकारक आणि निष्कलंक रथावर आम्हीहि तुजजवळ उभे राहूं १६. —याप्रमाणें प्रणिपात करून भक्तजन त्या स्वयंप्रकाश देवाजवळ जाऊन बसतात; आणि त्याच्याजवळ अगदीं उत्कृष्ट जी वस्तु आहे ती त्यानें अर्पण करावी म्हणून (यज्ञाला) येण्यासाठीं त्याचें मन वळवितात १७. —पहा, ह्यांच्यापैकीं प्रियमेध हा पूर्वींच्या पद्धतीस अनुसरून यज्ञ करून आणि हवि अर्पून त्या पुराण पुरुषाच्या स्थानीं जाऊन पोहोंचला देखील १८.

## सूक्त ५९

जो प्राणिमात्रांचा राजा, ज्याचें गमन अप्रतिहत, जो रथारूढ होऊन संचार करतो, आणि जो भक्तांच्या सर्व सैन्यांचा तारक आहे असा सर्वश्रेष्ठ, वृत्रनाशन जो इन्द्र त्याचें

---

व्यतीरँ अफाणयत् सुयुक्ताँ उप दाशुषे। तक्वे नेता तदित् वपुर् उपमा यो अमुच्यत ॥ १३ ॥ अतीत् ऊ शक्र ओहते इन्द्रो विश्वाः अति द्विषः। भिनत् कनीनः ओदनं पच्यमानं परं गिरा ॥ १४ ॥ अर्भको न कुमारकः अधि तिष्ठत् नवं रथम्। स पक्षत् महिषं मृगं पित्रे मात्रे विभुक्रतुम् ॥ १५ ॥ आ तू सुशिप्र दंपते रथं तिष्ठा हिरण्ययम्। अध द्युक्षं सचेवहि सहस्रपादम् अरुषं स्वस्तिगाम् अनेहसम् ॥ १६ ॥ तं घेम् इत्था नमस्विनः उप स्वराजम् आसते। अर्थं चित् अस्य सुधितम् यत् एतवे आ वर्तयन्ति दावने ॥ १७॥ अनु प्रत्नस्य ओकसः प्रियमेधास एषाम्। पूर्वाम् अनु प्रयतिम् वृक्तबर्हिषो हितप्रयस आशत ॥ १८ ॥

## सूक्तम् ५९

पुरुहन्मा इन्द्रः बृहती

यो राजा चर्षणीनां याता रथेभिर् अध्रिगुः। विश्वासां तरुता पृतनानां ज्येष्ठो यो वृत्रहा गृणे ॥ १ ॥ इन्द्रं तं शुम्भ पुरुहन्मन् अवसे यस्य द्विता विधर्तरि।

मी स्तवन करतों १. —हे **पुरुहन्मा**, इन्द्रालाच तूं कृपाप्रसादासाठीं स्तवनांनीं अलंकृत कर. महत्आकाश ज्याप्रमाणें रवीला धारण करतें त्याप्रमाणें उभय लोकधारक जो इन्द्र त्याच्या हातांत त्याचें सुंदर वज्र ठेवलेलें आहे २. —ज्यानें हें ( जगत् )निर्माण केलें त्या अखण्डानन्दपूर्ण इन्द्राकडे कोणीहि ही आपल्या कृतीनें पोहोंचू शकत नाहीं. किंवा नुसत्या यज्ञांनींहि पोहोंचू शकत नाहीं. तो ( इन्द्र ) विश्वमान्य, अचाट समर्थ्यानें संपन्न, अप्रतिहत, आणि विजयी ओजस्वितेनें युक्त असा आहे ३. —ज्याला पराजय कसा तो माहित नाहीं, जो शत्रुभयंकर आहे, जो शत्रु सैन्यांचा चुराडा उडवून देतो, तो प्रकट होतांच, मोठ्या अफाट वेगाच्या नद्या, आणि वाक् धेनू त्याच्यापुढें नम्र होतात, इतकेंच काय पण, द्युलोक आणि भूलोक हेहि त्याच्यापुढें नम्र होतात. ४. —इन्द्रा, जरी नक्षत्रलोक शंभरपट ( तेजस्वी ) झाला, जरी पृथ्वी शंभरपट मोठी झाली, जरी सूर्य हजारों निर्माण झाले, तरी हे वज्रधरा, कोणतीहि उत्पन्न झालेली वस्तु, किंवा प्रत्यक्ष ( भू आणि स्वर् हे ) उभयलोक देखील तुझी मर्यादा गांठणार नाहींत. ५. —हे वीरोत्कृष्टा, हे उत्कट वलाढ्या, तूं आपल्या महिम्यानें, तूं आपल्या अचाट बलानें, आपलीं यच्चावत् पराक्रमाचीं कृत्यें भरून सोडलीं आहेस; तर हे उदारश्रेष्ठा, वज्रधरा, आपल्या अद्भुत सहायांनीं ह्या ( प्रकाश ) गोधनाच्या प्रदेशांत आमच्यावर अनुग्रह कर ६. —हे अखण्डजीवना इन्द्रा, ( तूं ) जेव्हां चित्रविचित्र रंगाचे किरणरूप अश्व रथाला जोडतोस, जेव्हां इन्द्र हा हरिद्वर्ण अश्व जोडतो त्या वेळच्या त्याच्या जो मनोत्साहाची जाणीव कोणाहि नास्तिकाला कधींहि होणार नाहीं. ७. —जो श्रेष्ठांतहि श्रेष्ठ, पूजनीयांत अत्यंत पूजनीय, वरदान देण्याला सदैव सज्ज, त्या ( इन्द्रा )चें स्तवन करा; संकटें क्षुल्लक असोत वा दुस्तर असोत, संकटकालीं त्यालाच हांक मारावी, सत्वप्राप्तीच्या प्रयत्नांत त्याचाच धांवा करावा ८. —हे दिव्यनिधे, तूं आम्हांला प्रोत्साहन दे; हे वीरा, तुझ्या उत्तमोत्तम कृपेचा लाभ मिळ-विण्यास आम्हांला उत्तेजन दे. हे भगवंता, दातृत्वाविषयीं मला उद्युक्त कर; हे इन्द्रा,

---

हस्ताय वज्रः प्रतिधायि दर्शतो महो दिवे न सूर्यः ॥ २ ॥ नकि ष्टं कर्मणा नशत् य श्चकार सदावृधम् । इन्द्रं न यज्ञै र्विश्वगूर्तम् ऋभ्वसम् अधृष्टं धृष्णु—ओजसम् ॥ ३ ॥ अषाळ्हम् उग्रं पृतनासु सासहिं यस्मिन् महीर् उरुज्रयः । सं धेनवो जायमाने अनो-नुवु र्द्यावः क्षामो अनोनुवुः ॥ ४ ॥ यत् द्यावः इन्द्र ते शतं शतं भूमीर् उत स्युः । न त्वा वज्रिन् सहस्रं सूर्या अनु न जातम् अष्ट रोदसी ॥ ५ ॥ आ पप्राथ महिना वृष्ण्या वृषन् विश्वा शविष्ठ शवसा । अस्माँ अव मघवन् गोमति व्रजे वज्रिन् चित्रा-भिर् ऊतिभिः ॥ ६ ॥ न सीम् अदेवः आपत् इषम् दीर्घायो मर्त्यः । एतग्वा चित् यः एतशा युयोजते हरी इन्द्रो युयोजते ॥ ७ ॥ तं वो महो महाय्यम् इन्द्रं दानाय सक्षणिम् । यो गाधेषु य आ ऽ रणेषु हव्यो वाजेषु अस्ति हव्यः ॥ ८ ॥ उदू षु णो

श्रेष्ठ प्रतीची कीर्ति संपादन करण्यासहि मला उद्युक्त कर ९. —हे इन्द्रा, तूं सद्धर्मांचा भोक्ता आमचा (प्रभु) आहेस, आणि म्हणूनच निंदकांना तूं वठणीवर आणतोस. हे अपार-पौरुषा, अधार्मिक दुष्टाला तूं आपल्या दोन्हीं पायांखालीं दावून धर आणि आयुधांनीं प्रहार करून त्याचा चुराडा उडव १०. —भलताच नेमधर्म करणारा, माणुसकी सोडलेला, यज्ञया न करणारा, किंवा देवाला न जुमानणारा असा जो कोणी असेल त्याचे धुडके, तुझ्या नेहमीं जवळ राहणारा जो पर्वत ( वज्र ) तोच उडवून देईल, इतकेंच नाहीं तर त्या पाखण्ड्याला तें वज्र पार चेंचून टाकील ११. —हे इन्द्रा, हे उत्कट-बलाढ्या, आम्हांला देण्याकरितां धान्याप्रमाणें ह्या ( दैवीसंपत्ति ) आपल्या मुठींत ठेव. तूं आमचा पाठिराखा आहेस तर त्यांना दुप्पट जोरानें वळकट धरून ठेव, आमची वाणी राखणारा तूंच आहेस १२. —मित्रानों, तुम्हांला सत्कर्माची इच्छा आहे, परंतु त्या शराची स्तुति आम्हांला कशी साधेल? तो उदार यज्ञसंपादक आणि मोठ्या निधड्या छातीचा आहे १३. —हे अखिलजनपूज्या, कुशासन सिद्ध करणाऱ्या शेंकडों ऋषिंनीं तुझी स्तुति केली आहे. कारण हे शूरा, एकेकाला, एकेक, ह्याप्रमाणें तूं गोवत्सांचें दान ( सर्वांना ) केलेंस १४. —शूरदेवाचा जो उदारधी मित्र, त्यानें कानाला धरून वत्साला त्या तिघांकडून आमच्याकडे आणलें, ज्याप्रमाणें दूध काढण्याकरितां शेळीचे कान धरून आणतात त्याप्रमाणें आणलें १५.

## सूक्त ६०

अग्निदेवा, तूं आपल्या दीप्तिनें सर्व प्रकारच्या शत्रुत्वापासून, आणि दुष्ट मनुष्याच्या द्वेषापासून आमचें रक्षण कर १. —ज्या तुझें प्रकट होणें सर्वांना प्रिय वाटतें अशा

---

वसो महे मृशस्व शूर राधसं । उदू षु मह्यै मघवन् मघत्तये उत् इन्द्र श्रवसे महे ॥९॥ त्वं न इन्द्र ऋतयुस् त्वानिदो नितृम्पसि । मध्ये वसिष्व तुविनृम्ण ऊर्वो र्नि दासं शिश्नथो हथैः ॥ १० ॥ अन्यव्रतम् अमानुषम् अयज्वानम् अदेवयुम् । अव स्वः सखा दुधुवीत पर्वतः सुघ्नाय दस्युं पर्वतः ॥११॥ त्वं न इन्द्र आसां हस्ते शविष्ठ दावने । धानानां न सं गृभाय अस्मयुः द्विः सं गृभाय अस्मयुः ॥१२॥ सखायः क्रतुम् इच्छत कथा राधाम शरस्य । उपस्तुतिं भोजः सूरि र्यो अन्हयः ॥१३॥ भूरिभिः समह ऋषिभि र्बर्हिष्मत्भि स्तविष्यसे । यत् इत्थम् एकमेकम् इत् शर वत्सान् परा ददः ॥ १४ ॥ कर्णगृह्या मघवा शौरदेव्यो वत्सं नस् त्रिभ्य आनयत् । अजां सूरि र्न धातवे ॥ १५ ॥

## सूक्तम् ६०

सुदीति–पुरुमीळ्हौ अग्निः गायत्री

त्वं नो अग्ने महोभिः पाहि विश्वस्य अराते । उत द्विषो मर्त्यस्य ॥ १ ॥ नहि मन्युः पौरुषेयः ईशे हि वः प्रियजात । त्वम् इत् असि क्षपावान् ॥ २ ॥ स नो

अग्निदेवा, कोणत्याहि पुरुषाचा क्रोध तुला उपद्रव करूं शकत नाहीं. ( खरा ) रजनीनाथ तूंच आहेस २. —म्हणून अखिल विभूतिंसह ( येऊन ) हे ओजस्वितेच्या पालका, हे कल्याणमूर्ते, सर्वांना अभिलषणीय वाटणारें वैभव आम्हांला अर्पण कर ३. —ज्या भक्ताचें तूं संरक्षण करतोस त्या मर्त्य भक्ताला कोणताहि अधार्मिक दुष्ट, शाश्वत संपत्तीपासून दूर लोटूं शकत नाहीं. ४. —हे ज्ञानी अग्निदेवा, मेधाजननाच्या ( म्हणजे बुद्धिलाभ करून घेण्याच्या ) प्रयत्नांत ज्याला तूं ( ज्ञान ) धनाकडे प्रेरणा करतोस, तो तुझ्या सहायानें ज्ञान गोधनांच्या ठिकाणीं जाऊन पोहोंचणारच ५. —बहुत वीर्यशाली पुरुषांनीं युक्त असें जें उत्कृष्ट धन तें भक्तजनाला, हे अग्निदेवा, तूंच आहेस; म्हणून आमचें जें अभीष्ट तिकडे आम्हांस ने ६. —आम्हांला मुक्त कर. हे सर्वज्ञा देवा, पापाचरणी मनुष्याच्या किंवा दुष्टबुद्धि मनुष्याच्या हातीं आम्हांस देऊं नको ७. —अग्निदेवा, तुज देवाचें वरदान विफल करण्याची शक्ति कोणत्याहि नास्तिकाच्या ठिकाणीं नाहीं; आणि जें जें उत्कृष्ट आहे त्याचा स्वामी तूंच आहेस ८. —म्हणून अतिश्रेष्ठ असें जें अभीष्ट तें, हे ओजस्वितेच्या प्रभो, हे भक्तसख्या दिव्यनिधे, आम्हां स्तोतृजनांकरितां आमच्या अगदीं सन्निध तूं आणून ठेव ९. —म्हणूनच त्या तीव्रज्वाल, दर्शनीय अग्निकडे आमच्या स्तुति, (जावोत) त्या अपारधनाढ्याकडे, अगणीत भक्तांनीं स्तविलेल्या त्या अग्नीकडे आमचे यज्ञ प्रणिपातपूर्वक आमच्या रक्षणार्थ जाऊन पोहोंचोत १०. —सामर्थ्यप्रभव आणि सकलवस्तुमात्र जाणणारा जो अग्नि त्याच्याकडे ( त्या स्तुति जाऊन पोहोंचोत ). अभिलषणीय असें जें धन आहे त्याची देणगी (भक्तांना) द्यावी यासाठीं तो, मर्त्यांमध्यें अमर यज्ञसंपादक म्हणून, आणि मानवी प्रजेमध्यें हर्षनिर्भर देव म्हणून, अशा दोन्हीं प्रकारांनीं राहिला आहे ११. —दिव्यविभूतिंचें यजन व्हावें म्हणून अग्निकडे; अध्वरयागाला भक्तिपूर्वक आरंभ झाला म्हणजेहि अग्नीकडेच; ज्याचें ध्यान प्रथम करतात त्या अग्नीकडे, तडफदार वीरांतहि अग्निकडेच, भूमिवर सत्ता पाहिजे असेल तेव्हांहि अग्नीकडेच ( त्या स्तुति )

---

विश्वेभि र्देवेभिर् ऊर्जो नपात् भद्रशोचे । रयिं देहि विश्ववारम् ॥ ३ ॥ न तम् अग्ने अरातयो मर्तं युवन्त रायः । यं त्रायसे दाश्वांसम् ॥ ४ ॥ यं त्वं विप्र मेधसातौ अग्ने हिनोषि धनाय । स तव ऊती गोषु गन्ता ॥ ५ ॥ त्वं रयिं पुरुवीरम् अग्ने दाशुषे मर्ताय । प्रणो नय वस्यः अच्छ ॥ ६ ॥ उरुष्या णो मा परा दाः अघायते जातवेदः । दुराध्ये मर्ताय ॥ ७ ॥ अग्ने माकि ष्टे देवस्य रातिम् अदेवो युयोत । त्वम् ईशिषे वसूनाम् ॥ ८ ॥ स नो वस्वः उप मासि ऊर्जो नपात् माहिनस्य । सखे वसो जरितृभ्यः ॥ ९ ॥ अच्छा नः शीरशोचिषं गिरो यन्तु दर्शतम् । अच्छा यज्ञासो नमसा पुरूवसुं पुरुप्रशस्तम् ऊतये ॥१०॥ अग्निं सूनुं सहसो जातवेदसं दानाय वार्याणाम् । द्विता यो भूत् अमृतो मर्त्येषु आ होता मन्द्रतमो विशि ॥ ११ ॥ अग्निं वो देवयज्यया अग्निं प्रयति अध्वरे । अग्निं धीषु प्रथमम् अग्निम् अर्वति अग्निं क्षैत्राय

जाऊन पोहोंचतात १२. —अग्नि हा उत्साहाविषयींच्या प्रेमांत आम्हांस ठेवो. तो जो अत्युत्कृष्ट वस्तूंचा अधिपति आहे, आमच्या पुत्रपौत्रांना दिव्य वस्तूचा लाभ निरंतर व्हावा म्हणून आम्हीं त्या सत्‌रूप आणि परंपरारक्षक अग्नीची करुणा भाकतों १३. —त्याच्या कृपेचा लाभ व्हावा म्हणून, प्रार्थनासूक्तांच्या योगानें त्या तीव्रज्वाळ अग्नीचें स्तवन कर; शाश्वत संपत्तिसाठीं, हे **पुरुमीळ्हा,** हे शूर भक्तांनों, त्या सर्वश्रुत अग्नीची स्तुति करा; **सुदीति** करतां त्याचा कृपाश्रय मागून घ्या १४. —द्वेषवुद्धि आमच्यापासून दूर व्हावी यासाठीं आम्हीं अग्नीचें गुणगायन करतों; त्यानें सुखशांति द्यावी म्हणून त्याचे गुणानुवाद गातों; अखिल मानवजातींत भक्तरक्षक म्हणून त्यालाच हांक मारणें उचित होय. ऋषूंचाहि तो प्रकाशक झाला आहे १५.

## सूक्त ६१

हवि सिद्ध करा; (अग्निदेव) येथें प्राप्त झाला आहे, आणि त्याचे धर्मविधि बरोबर जाणणारा अध्वर्यू (अग्नीला अर्पण करण्याकरितां) पुनः आहुति मागत आहे १. —मनु आसनस्थ झाला तेव्हां त्याच्या शेजारीं, त्या तीव्ररश्मिची स्थापना, देवाच्या सख्यत्वाचा अनुभव घेणाऱ्या यज्ञसंपादकानें केली २. —मननाच्याहि जो पलिकडे आहे त्या **रुद्रां**चा वास आपल्या लोकांमध्यें असावा अशी सर्वांची इच्छा असते, म्हणूनच (हृदयांत) निलीन असलेल्या देवाची स्तुति ते आपल्या जिव्हेनें करतात ३. (आमचा) निकट आप्त असें जें अन्तरिक्ष तें अतिशय तापून गेलें. कारण, (भक्तांना) यौवनसंपन्न करणारा अग्नि वनें दग्ध करूं लागला, आणि त्यानें पाषाणांच्या (मोठ

---

साधसे ॥ १२ ॥ अग्निर् इषां सख्ये ददातु नः ईशे यो वार्याणाम्। अग्निः तोके तनये शश्वत् ईमहे वसुं सन्तं तनूपाम् ॥ १३ ॥ अग्निम् ईळिष्व अवसे गाथाभिः शीरशोचिषम्। अग्निं राये पुरुमीळ्ह श्रुतं नरो अग्निं सुदीतये छर्दिः ॥ १४ ॥ अग्निं द्वेषो योतवै नो गृणीमसि अग्निं शं यो श्च दातवे। विश्वासु विक्षु अवितेव हव्यो भुवत् वस्तु ऋषूणाम् ॥ १५ ॥

## सूक्त ६१

प्रागाथो हर्यतः अग्निः गायत्री

हवि-ष्कृणुध्वम् आ गमत् अध्वर्यु र्वनते पुनः। विद्वाँ अस्य प्रशासनम् ॥१॥ नि तिग्मम् अभि अंशुं सीदत् होता मनौ अधि। जुषाणो अस्य सख्यम् ॥ २ ॥ अन्तर् इच्छन्ति तं जने रुद्रं परो मनीषया। गृभ्णन्ति जिह्वया ससम् ॥ ३ ॥ जामि

मोठया ) शिला आपल्या जिव्हेनें दुभंग केल्या ४. —हा देदीप्यमान वत्स इकडे तिकडे वागडत आहे, त्याला बान्धून ठेवणारा कोणी आढळतच नाहीं, आपल्या भक्तासाठीं गर्जना करणें हें त्याला फार आवडतें ५. —त्याचें अश्वाप्रमाणें जें एक प्रचंड धिप्पाड वाहन आहे तें ( रथाला ) जोडलें आहे, पहा त्या रथाचे ताण दिसूं लागले ६. —सात जण (ऋत्विज् ) एकीचें दोहन करीत आहेत, आणि धों धों शब्द करणारा नदीचा प्रवाह वाहत आहे त्या ठिकाणीं, दोघेजण पांच जणांना कार्यांकडे प्रवृत्त करीत आहेत ७. —दहांनीं आर्जव करतांच इन्द्रानें त्रिधारी हत्यारानें विवस्वानाचा ( उदक )संचय आकाशांतून उलथून पाडला. ८. अग्नीची तीन प्रकारची अपूर्व ज्योति अध्वरहोमाकडे गमन करते, आणि ऋत्विज् तिला मधानें उद्वर्तन करतो ९. —अग्निला प्रणिपात करून ( ऋत्विज् असें करतात कीं, ) उंच चाकाचें, गरगर फिरणारें, खोल बुडाचें आणि कधींहि रिकामें न होणारें असें धर्मपात्र, ( दुग्धानें ) भरून टाकतात १०. —पहा ते ग्रावे चटाचट सोम पिळूं लागले, आणि महावीरपात्र बाजूस उचलून ठेवल्यावर पुष्करपात्रांत मध ओतून ठेवला ११. —आतां धेनूंनों, तुम्हीं त्या पात्राजवळ जाऊन त्याचें रक्षण करा; कारण ( यज्ञाला दुग्धाचें ) हव्य पुरविणारीं तींच मोठीं पात्रें आहेत; त्यांचे दोन्ही कान सुवर्णाचे केलेले असतात १२. —सोमरस पिळल्यावर, आकाश आणि पृथ्वी यांची जी ( दुग्धरूप ) शोभा ती त्या ( रसांत ओता ), आणि ( स्थंडिलरूप ) पृथ्वीवर वीर्यशाली देवाची स्थापना करा १३. —त्यांना आपलें घर कोणतें तें पक्कें माहीत आहे म्हणून त्यांच्या ज्या प्रिय आप्त आणि माता, त्यांच्या सह आणि परस्परांसह ते वांसराप्रमाणें खेळतात १४. —( महावीर पात्रांतील हव्य ) आपल्या ओष्ठ प्रान्तांत ( घेऊन ) भक्षण करणाऱ्या अग्निला इन्द्राच्या शेजारी आकाशांत आसन करतात; ( भक्ताचा ) प्रणिपात आणि स्वर्गीय प्रकाश हे अग्नीच्या ठिकाणीं

---

अतीतपे धनु वंयोधा अरुहत् वनम्। दृपदं जिह्वयाऽऽवधीत्॥ ४॥ चरन् वत्सो रुशन् इह निदातारं न विन्दते। वेति स्तोतव अंब्यम्॥ ५॥ उतो नु अस्य यन् महद् अश्ववद् योजनं बृहत्। दामा रथस्य दद्दृशे॥ ६॥ दुहन्ति सप्त एकाम् उप द्वा पञ्च सृजतः। तीर्थे सिन्धोर् अधि स्वरे॥ ७॥ आ दशभि र्विवस्वतः इन्द्रः कोशम् अचुच्यवीत्। खेदया त्रिवृता दिवा॥ ८॥ परि त्रिधातुर् अध्वरं जूर्णिर् एति नवीयसी। मध्वा होतारो अञ्जते॥ ९॥ सिञ्चन्ति नमसाऽवतम् उच्चाचक्रं परिज्मानम्। नीचीनबारम् अक्षितम्॥ १०॥ अभि आरम् इद् अद्रयो निषिक्तं पुष्करे मधु। अवतस्य विसर्जने॥ ११॥ गावः उपा–वता–वतं मही यज्ञस्य रप्सुदा। उभा कर्णा हिरण्यया॥ १२॥ आ सुते सिञ्चत श्रियं रोदस्योर् अभिश्रियम्। रसा दधीत वृषभम्॥ १३॥ ते जानत स्वम् ओक्यं सं वत्सासो न मातृभिः। मिथो नसन्त जामिभिः॥ १४॥ उप स्रक्वेषु बप्सतः कृण्वते धरुणं दिवि। इन्द्रे अग्ना

असतात १५. —कृषिकर्म करणारा भक्त सूर्याच्या सात प्रकारच्या किरणांच्या योगानें सात पायांच्या पुष्ट धेनूंपासून उत्साह आणि तेजस्विता यांचें दोहन करतो. १६ —हे मित्रावरुणानों, रवीचा उदय होतांच त्यानें सोमाचा आस्वाद घेतला, सोम हेंच आतुराचें खरें औषध १७. —आणखी पहा कीं, ह्या प्रेमळ देवाला अर्पिलेले हवि ठेवण्याचें जें स्थान ( तेथून ) आपल्या ( ज्वालारूप ) जिव्हेनें त्यानें आकाशालाहि व्याप्त केलें १८.

## सूक्त ६२

अश्वीहो, सद्धर्मानें चालणाऱ्या भक्तासाठीं तुम्ही रथ जोडून त्वरेनें क्षितिजावर उदय पावतां, तर तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या अगदीं सन्निध असूं द्या १. —डोळ्यांचें पातेंहि लवकर हालत नसेल इतक्या त्वरेनें धांवणाऱ्या रथांतून, हे अश्वीहो, इकडे या; आणि तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या अगदीं सन्निध असूं द्या २. —अश्वीहो, अतिशय तप्त झालेल्या जागीं तुम्ही अत्रिऋषीकरितां थंडगार बर्फ पसरून दिलेंत, तशीच तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या अगदीं सन्निध असूं द्या ३. —तुम्हीं कोठेंहि असलां, कोठेंहि गेलां, आणि ससाण्याप्रमाणें कोणीकडेहि उडून चालला तरी तुमची सद्भावना आमच्या सन्निध असूं द्या ४. —आज तुम्हीं कोठें तरी, आणि केव्हांतरी आमचा हा करुण धांवा ऐकणारच. तर तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या अगदीं सन्निध असूं द्या. ५. —हे अश्वीहो, ज्या तुम्हांला (पहाटेच्या) अगदीं पहिल्या प्रहरीं भक्त वारंवार पाचारण करतात त्या तुमचें अत्यंत निकट आप्तत्व मला मिळावें म्हणून मी तुम्हांपाशीं याचना करतों, तर तुमची सद्भावानायुक्त कृपा आह्मांवर असूं

नमः स्वः ॥ १५ ॥ अधुक्षत् पिप्युषीम् इषम् ऊर्जं सप्तपदीम् अरिः । सूर्यस्य सप्तरश्मिभिः ॥ १६ ॥ सोमस्य मित्रावरुणा उदिता सूर आ ददे । तत् आतुरस्य भेषजम् ॥ १७ ॥ उतो नु अस्य यत् पदं हर्यतस्य निधान्यम् । परि द्यां जिह्वया तनत् ॥ १८ ॥

## सूक्तम् ६२

आत्रेयो गोपवनः अश्विनौ गायत्री

उदीराथाम् ऋतायते युञ्जाथाम् अश्विना रथम् । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १ ॥ निमिषश् चित् जवीयसा रथेना–यातम् अश्विना । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ २ ॥ उप स्तृणीतम् अत्रये हिमेन घर्मम् अश्विना । अन्ति षद् भुतु वाम् अवः ॥ ३ ॥ कुह स्थः कुह जग्मथुः कुह श्येनेव पेतथुः । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ ४ ॥ यत् अद्य कर्हि कर्हि चित् शुश्रुयातम् इमं हवं । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ ५ ॥ अश्विना यामहूतमा नेदिष्ठम् यामि आप्यम् । अन्ति षद् भूतु वाम्

द्या. ६. —अश्वी देवानों, ज्यानें चांगलें संरक्षण होईल असें एक गृह तुम्ही अत्रिऋषी-साठीं करून दिलेंत तर तुमची सद्भावनायुक्त कृपा आम्हांवर असो ७. —करुणरसानें ओथंबलेलें स्तवन करणाऱ्या अत्रिसाठीं तुम्हीं ( त्याच्या भोंवतालचा ) आगीचा डोंब विझवून टाकलात, तर तुमची...कृपा आह्मांवरहि असूं द्या ८. सप्तवध्रीच्या प्रार्थनेनें तुम्ही अग्नीची ( ज्वालारूप ) धारा पाजळून ठेवलीत तर तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या सन्निध असूं द्या ९. —हे वीर्यधनहो, इकडे आगमन करा, आमची हांक ऐका आणि तुमची...कृपा...असूं द्या १०. —एखाद्या जुनाट म्हाताऱ्याप्रमाणें आह्मांस पुनः पुनः तुमची प्रार्थना करावी लागते हें काय बरें ? तर तुमची ...कृपा...असूं द्या. ११. —तुम्ही दोघे आहांत, परंतु तुमचें जातिस्वरूप अगदीं सारखें आणि तुमचा बन्धु-भावहि एकसारखा आहे, तर तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या सन्निध असो १२. —हे अश्वीहो, तुमचा जो रथ अन्तरिक्ष आणि द्यावा पृथिवा यांना भेदून जातो, (तशीच), तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या अगदीं सन्निध असो. १३. —सहस्रावधि गोधनांनीं आणि अश्वांनीं युक्त अशा ऐश्वर्यानिशीं आमच्याकडे या ( आणि ) तुमची... कृपा आह्मांवर असूं द्या. १४. —सहस्रावधि गोधनांच्या आणि अश्वांच्या वैभवासह आम्हांला दूर ढकलून जाऊं नका, तुमची...कृपा...असूं द्या १५. —पहा, आरक्त-वस्त्र परिधान केलेली उषा येऊन ठेपली, त्या सद्धर्मप्रिय देवीनें आपली कान्ति प्रकट केली, तर आतां तुमची...कृपा सन्निध असूं द्या. १६. —हातांत कुऱ्हाड घेतलेला पुरुष जसा वृक्षाकडे न्याहाळून पाहतो तसा, हे अश्वीहो, शत्रू ( आमच्याकडे ) न्याहाळून पाहत आहे, तर तुमची...कृपा...सन्निध असूं द्या १७, —कृष्णवर्ण शत्रूंनीं तुमच्या भक्तजनांवर हल्ला केला आहे तर नगर-दुर्ग फोडावे त्याप्रमाणें शत्रूंचा व्यूह फोडून टाका आणि तुमची सद्भावनायुक्त कृपा आमच्या अगदीं सन्निध असूं द्या १८.

---

अवः ॥ ६ ॥ अवन्तम् अत्रये गृहं कृणुतं युवम् अश्विना । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ ७ ॥ वरेथे अग्निम् आतपो वदते वल्गु अत्रये । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ ८ ॥ प्र सप्तवध्रिर् आशसा धाराम् अग्ने अशायत । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ ९ ॥ इहा गतं वृषण्वसू श्रुणुतं मे इमं हवम् । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १० ॥ किम् इदं वां पुराणवत् जरितोर् इव शस्यते । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ ११ ॥ समानं वां सजात्यं समानो बन्धुर् अश्विना । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १२ ॥ यो वां रजांसि अश्विना रथो वियाति रोदसी । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १३ ॥ आ नो गव्येभिर् अश्व्यैः सहस्रैर् उप गच्छतम् । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १४ ॥ मा नो गव्येभिर् अश्व्यैः सहस्रेभिर् अति रव्यतम् । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १५ ॥ अरुणप्सुर् उषा अभूत् अक-र्ज्योति ऋतावरी । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १६ ॥ अश्विना सु विचाकशत् वृक्षं परशुमानिव । अन्ति

## सूक्त ६३

तुम्ही सत्वविजयोत्सुक आहांत; तर प्रत्येक समाजाचा सर्वप्रिय अतिथि जो अगम्यस्वरूप अग्नि त्याचें मीं तीव्रभावनेच्या मननीय स्तोत्रांनीं संकीर्तन करतों १. —हविर्भाग हातांत घेतलेले भक्तजन घृताहुतिप्रिय अग्नीचे गुणानुवाद जगत्मित्र ( सूर्या )प्रमाणें नामांकित स्तुतींनीं गातात, २. —स्तवनार्ह, सकलवस्तुमात्राला जाणणारा जो अग्नि त्याचें मी ( स्तवन करतों. ); देवाप्रीत्यर्थ यज्ञ चालू झाला असतां त्यांतील हविर्भाग त्यानेंच दिव्यविभूतिंकडे पोहोंचविले आहेत ३. —अन्धकारांचा निःशेष निःपात करणारा, "अनू" कुलोत्पन्नांचा मित्र, ( दिव्यविभूतिंत ) अग्रेसर, असा जो अग्नि त्याला आम्हीं शरण आहोंत. ऋक्षाचा पुत्र प्रख्यात **श्रुतर्वा** तो ह्या ( अग्नी ) च्या रश्मिसमूहांतच उत्कर्ष पावतो ४. —जो मृत्युरहित, जो वस्तुजात जाणणारा, अन्धकारांतून पलीकडे नेणारा, दर्शनीय, घृताहुतिप्रिय आणि स्तवनयोग्य आहे त्या अग्नीला ( आम्हीं शरण गेलों ) ५. —त्रस्त झालेले हे जन हवि अर्पण करून ज्या अग्नीची सेवा करितात, आणि घृतपूर्ण स्रुचा हातीं घेऊन ज्याला भक्त आहुति देतात ( त्याला आम्हीं शरण गेलों ) ६. —हे अग्ने, ही अपूर्व आणि मनःपूर्वक केलेली स्तुति, हे हर्षनिर्भरा, हे सत्प्रभवा, सत्पराक्रमा, मूढत्वनाशना, अद्भुतस्वरूपा, हे भक्तांच्या अतिथे, आमच्याकडून तुझ्या ठायीं अर्पण झाली आहे ७. —हे अग्निदेवा ती स्तुति तुला अत्यंत आल्हादप्रद, अत्यंत मनोहर आणि अत्यंत प्रिय होवो; तिच्या योगानें तुझें स्तवन उत्तम होऊन तूं हर्षानें प्रफुल्ल हो ८. —ती स्तुति

---

यद् भूतु वाम् अवः ॥ १७ ॥ पुरं न धृष्णो आ रुज कृष्णया बाधितो विशा । अन्ति षद् भूतु वाम् अवः ॥ १८ ॥

## सूक्तम् ६३

आर्क्षः श्रुतर्वणः अग्निः अनुष्टुप्, गायत्री

विशोविशो वो अतिथिं वाजयन्तः पुरुप्रियम् । अग्निं वो दुर्यं वचः स्तुषे शूषस्य मन्मभिः ॥ १ ॥ यं जनासो हविष्मन्तो मित्रं न सर्पिरासुतिम् । प्रशंसन्ति प्रशस्तिभिः ॥ २ ॥ पन्यांसं जातवेदसं यो देवतात्य् उद्यता । हव्यान्य् ऐरयत् दिवि ॥ ३ ॥ आऽगन्म वृत्रहन्तमं ज्येष्ठम् अग्निम् आनवम् । यस्य श्रुतर्वा बृहन् आर्क्षो अनीक एधते ॥ ४ ॥ अमृतं जातवेदसं तिरस् तमांसि दर्शतम् । घृताहवनम् ईड्यम् ॥ ५ ॥ सबाधो यं जना इमे अग्निं हव्येभिर् ईळते । जुह्वानासो यतस्रुचः ॥ ६ ॥ इयं ते नव्यसी मतिर् अग्ने अधाय्य् अस्मद् आ । मन्द्र सुजात सुक्रतो अमूर दस्म अतिथे ॥ ७ ॥ सा ते अग्ने शन्तमा चनिष्ठा भवतु प्रिया । तया वर्धस्व

तुझ्या तेजांनीं तेजस्वी होऊन (अज्ञान) अन्धकाराचा उच्छेद करण्याच्या कार्यांत तुझ्या पूर्वीच्या कीर्तीत आणखी महत् कीर्तीची भरच घालील. ९. —अश्वाप्रमाणें वेगवान्, रथाला व्यापून टाकणारा, इन्द्राप्रमाणें तीव्रतेजस्क, आणि सत्प्रतिपालक अशा अग्नीचें स्तवन करा; हे जनहो! त्याची महती, त्याचें प्रत्येक स्तुत्यकृत्य, यांचा घोष तुम्हीं करीत रहा १०. —हे अंगिरा अग्ने, तुला गोपवनानें आपल्या स्तुतीनें प्रसन्न केलें आहे, तर हे भक्तपावना तो तूं आमची हांक ऐक ११. —त्रस्त झालेले भक्तजन सत्वसंग्रामांत तुझें स्तवन करतात, तो तूं ह्या (अज्ञान) शत्रुनाशनाच्या कार्यांत आमची आठवण ठेव १२. —ऋक्षाचा पुत्र आणि शत्रूचा मद उतरविणारा जो श्रुतर्वा त्याच्या यज्ञांत मी तुझ्या प्रीत्यर्थ हवन केल्यावर, मेंढयाच्या लोंकरीप्रमाणें मऊ केसांच्या चार अश्वांच्या मस्तकावर मी चुचकारून हात फिरविला १३. —शिविष्ठ राजाच्या रथाला जोडण्यायोग्य आणि जलद धांवणाऱ्या चार चलाख अश्वांनीं, पक्ष्यानें तुग्र्याला नेलें त्याप्रमाणें, माझ्या इष्ट वस्तूकडे (मला) त्वरित नेलें १४. —हे परुष्णि नदि, मी तुला खचित सांगतों, हे उदकानों, तुम्हांला विदित करतों कीं, शिविष्ठा प्रमाणें उत्कृष्ट दाता कोणीहि नाहीं १५.

## सूक्त ६४

दिव्यविभूतिंना घेऊन येण्यांत अत्यंत कुशल अशा अश्वांना, हे अग्ने, सेनानायक-प्रमाणें, तूं रथाला जोड, आणि आमचा प्रमुख होता होऊन येथें विराजमान हो १. देवा, तूं उत्तम ज्ञानी आहेस, तर दिव्यविभूतिंना आमच्याविषयीं कांहींतरी सांग; आणि

---

सुष्टुतः ॥ ८ ॥ सा द्युम्नैः द्युम्निनी बृहत् उपोप श्रवसि श्रवः । दधीत वृत्रतूर्यें ॥ ९ ॥ अश्वम् इत् गां रथप्रां त्वेषम् इन्द्रं न सत्पतिम् । यस्य श्रवांसि तूर्वथ पन्यंपन्यं च कृष्टयः ॥ १० ॥ यं त्वा गोपवनो गिरा चनिष्ठत् अग्ने अङ्गिरः । स पावक श्रुधी हवम् ॥ ११ ॥ यं त्वा जनास ईळते सबाधो वाजसातये । स बोधि वृत्रतूर्यें ॥ १२ ॥ अहं हुवान आर्क्षे श्रुतर्वणि मदच्युति । शर्धांसीव स्तुकाविनां मृक्षा शीर्षा चतुर्णाम् ॥ १३ ॥ मां चत्वार आशवः शविष्ठस्य द्रवित्नवः । सुरथासो अभि प्रयो वक्षन् वयो न तुग्र्यम् ॥ १४ ॥ सत्यम् इत् त्वा महेनदि परुष्णि अव देदिशम् । नेम् आपो अश्वदातरः शविष्ठात् अस्ति मर्त्यः ॥ १५ ॥

## सूक्तम् ६४

आङ्गिरसो विरूपः अग्निः गायत्री

युक्ष्वा हि देवहूतमाँ अश्वाँ अग्ने रथीरिव । नि होता पूर्व्यः सदः ॥ १ ॥ उत नो देव देवाँ अच्छा वोचो विदुष्टरः । श्रत् विश्वा वार्या कृधि ॥ २ ॥ त्वं ह यत् यवि-

(आज्ञा) सर्वांना खरोखरच उत्कृष्ट वनवून सोड २. —हे तारुण्यमूर्ते, हेमन्थनप्रभवा, उत्तम रीतीनें हवन झालेल्या अग्निदेवा, तूंच सद्धर्मप्रिय आणि यजनीय आहेस ३. —हा अग्नि शेंकडोंच काय, पण सहस्रावधि सात्विक सामर्थ्यांचा प्रभु आहे, तोच काव्यस्फूर्ति देणारा, शाश्वतसंपत्तीचें उत्तमांग होय ४. —कर्मकार लोक ज्याप्रमाणें चाकांना बाक देतात त्याप्रमाणें,हे अंगिरा, तुझ्याबरोबर ज्या दिव्यविभूतींना पाचारण होतें त्यांच्यासह ( येऊन ) आमच्या ह्या प्रस्तुत यज्ञाला योग्य वळण दे ५. —भक्ता **विरूपा अविनाशी** वेदवाणीनें तूं आतांच्या आतां त्या कामनावर्षक तेजोमय वीराला एक उत्कृष्ट स्तवन अर्पण कर ६. अत्यंत सूक्ष्मपणें निरीक्षण करणाऱ्या ह्या अग्नीच्या ज्वालारूप सैन्याच्या योगानें, आम्हीं प्रकाशधेनूंच्या स्थानांत कोणत्या अधार्मिक कंजुषाचा निःपात करावा वरें ? ७. दुग्धाचा भरपूर पान्हा सोडणारी अश्राप धेनु आपल्या तान्ह्या वांसराला जशी मोकलीत नाहीं, त्याप्रमाणें देवांच्या विभूति आमचा त्याग न करोत ८. —( उदकाच्या ) लाटेनें नौका फोडून टाकवी त्याप्रमाणें कोणाहि अट्टल पापबुद्धि दुष्टाचा अत्याचार आमचा नाश कधींहि न करो ९. —हे अग्ने, सर्व लोक तुझ्या तेजाला प्रणिपात करितात; हे देवा, त्याची महती गातात. तर आपल्या भीषण आयुधांनीं दुर्जनाचें निर्दलन कर १०. —हे अग्नि, प्रकाशगोधनाचा लाभ आम्हांस व्हावा म्हणून तुझें चिरवैभव तूं आम्हांभोंवतीं वेढून ठेवशील ना ? तूंच पापविमोचक आहेस, म्हणून आम्हांस पापविमुक्त कर ११ —ह्या मोठ्या धामधुमींत आमचें ओझें तूं पतकरलें आहेस, पण भाराखालीं वांकलेला मनुष्य जसा ओझें फेकून देतो त्याप्रमाणें तू मात्र तें ओझें फेंकून देऊं नको. तर अखण्ड यशोधन आम्हांकरितां जिंकून घे १२. —ही जी ( दुष्टांची ) घातकी बुद्धि आहे ती आम्हांव्यतिरिक्त दुसऱ्याला भेंडसावण्याकरितां त्याच्या मागें लागो. आमचें प्रचंड धाडस तूं वृद्धिंगत कर १३. —नमनरूप सेवा

ष्ठ्य सहसः सूनो आहुत । ऋतावा यज्ञियो भुवः ॥ ३ ॥ अयम् अग्निः सहस्रिणो वाजस्य शतिनस् पतिः । मूर्धा कवी रयीणाम् ॥ ४ ॥ तं नेमिं ऋभवो यथा आ नमस्व सहूतिभिः । नेदीयो यज्ञम् अङ्गिरः ॥ ५ ॥ तस्मै नूनम् अभिद्यवे वाचा विरूप नित्यया । वृष्णे चोदस्व सुष्टुतिम् ॥ ६ ॥ कम् उ स्वित् अस्य सेनया अग्नेर् अपाकचक्षसः । पणिं गोषु स्तरामहे ॥ ७ ॥ मानो देवानां विशः प्रस्नातीर् इव उस्राः । कृशं न हासुर् अघ्न्याः ॥ ८ ॥ मा नो समस्य दूढ्यः परिद्वेषसो अंहतिः । ऊर्मि र्न नावम् आ वधीत् ॥ ९ ॥ नमस् ते अग्न ओजसे गृणन्ति देव कृष्टयः । अमैर् अमित्रम् अर्दय ॥ १० ॥ कुवित् सु नो गविष्टये अग्ने सं वेषिषो रयिम् । उरुकृत् उरु णस् कृधि ॥ ११ ॥ मा नो अस्मिन् महाधने परा वर्क् भारभृत् यथा । संवर्गं सं रयिं जय ॥ १२ ॥ अन्यम् अस्मत् भिया इयम् अग्ने सिषक्तु दुच्छुना । वर्धा नो अमवत् शवः ॥ १३ ॥ यस्या—जुषत् नमस्विनः शमीम् अदुर्मखस्य वा । तं घेत् अग्नि

करणारा, आणि ज्याच्या यज्ञाला (पातकाचा) दोष चिकटला नाहीं अशा ज्या भक्ताची सेवा अग्नि गृहण करतो त्याच भक्ताला समृद्ध करून तो त्याच्यावर कृपा करतो १४. —पलीकडे शत्रू (उभे) आहेत, त्यांच्या सैन्याला सोडून अलीकडे आमच्या लोकांच्या सन्मुख त्वरेनें ये, आणि जेथें मीं आहे तेथें त्यांचें रक्षण कर १५. —हे अग्नि, पित्याप्रमाणें (आम्हांविषयींच्या) तुझ्या कोडकौतुकाची आम्हांला पूर्वीपासूनच जाणीव आहे आणि म्हणूनच तुझ्याजवळ आम्ही सुखासमाधानाची याचना करीत आहों १६.

## सूक्त ६५

ह्या मायाधीशाला, आणि आपल्या ओजस्वितेनें जगतावर सत्ता चालविणारा मरुतांचा स्वामी जो इन्द्र त्याला, (पातकाचा) ऊच्छेद करण्याकरितां मीं पाचारण करतों १. —हाच तो मरुतांचा मित्र इन्द्र. कीं ज्यानें शंभर धारांच्या वज्रानें वृत्राचें मस्तक विदीर्ण केलें २. —भक्तांच्या स्तुतीनें हर्षोत्फुल्ल होऊन ह्या मरुत्सखा इन्द्रानें समुद्राचें पाणी फेंकून मारून वृत्राला दूर उडवून दिलें ३. —तो हाच कीं ज्यानें,-ज्या इंद्रानें, मरुतांसह हें स्वर्गीय तेज सोमप्राशनार्थ जिंकून आणलें ४. —मरुतांचा स्वामी, सोमाचा भोक्ता, ओजस्वी आणि जगद्व्याळ, अशा इन्द्राचा आम्हीं स्तवनपूर्वक धांवा करीत आहों ५. —आम्हीं ह्या पुरातन मननीय स्तोत्रानें मरुत्प्रभु इन्द्राला-त्यानें सोमरसाचें प्राशन करावें म्हणून-पाचारण करीत आहों ६. —इन्द्रा, तूं मरुतांचा स्वामी आणि अभीष्टांची वृष्टि करणारा आहेस. तर हे अमितपराक्रमा, हे

---

वृधाऽवति ॥ १४ ॥ परस्याः अधि संवतः अवराँ अभि आ तर । यत्राहम् अस्मि तान् अव ॥ १५ ॥ विद्मा हि ते पुरा वयम् अग्ने पितुर्यथाऽवसः । अधा ते सुम्नम् ईमहे ॥ १६ ॥

## सूक्तम् ६५

काण्वः कुरुसुतिः इन्द्रः गायत्री

इमं नु मायिनं हुवे इन्द्रम् ईशानम् ओजसा । मरुत्वन्तं न वृञ्जसे ॥ १ ॥ अयम् इन्द्रो मरुत्सखा वि वृत्रस्या-भिनत् शिरः । वज्रेण शतपर्वणा ॥ २ ॥ वावृधानो मरुत्सखा इन्द्रो वि वृत्रम् ऐरयत् । सृजन् समुद्रियाः अपः ॥ ३ ॥ अयं ह येन वै इदं स्व मरुत्वता जितम् । इन्द्रेण सोमपीतये ॥ ४ ॥ मरुत्वन्तं ऋजीषिणम् ओजस्वन्तं विरप्शिनम् । इन्द्रं गीर्भिर् हवामहे ॥ ५ ॥ इन्द्रं प्रत्नेन मन्मना मरुत्वन्तं हवामहे । अस्य सोमस्य पीतये ॥ ६ ॥ मरुत्वाँ इन्द्र मीढ्वः पिबा सोमं शतक्रतो ।

सर्वजनस्तुता, ह्या यज्ञांत तूं सोमरस प्राशन कर ७. —तूं जो मरुत्सखा त्या तुझ्याचसाठीं, हे इन्द्रा, हा रस सिद्ध केला आहे, आणि हे अशनिधरा, सामगायक भक्त तुजला अगदीं मनःपूर्वक पाचारण करीत आहेत ८. —तर हा रस तूं प्राशन करच, तूं मरुतांचा सखा आहेस. स्वर्गीयप्रकाशानें उज्ज्वल झालेल्या यज्ञांत आपल्या तेजानें वज्राला तीव्र करून तूं सोमरस प्राशन कर ९. —हे इन्द्रा, ओजस्वितेनें उभा ठाकून चमूपात्रांत पिळलेला रस तूं प्राशन केलास आणि आपले दोन्ही ओष्ठप्रान्त झाडून टाकलेस १०. —इन्द्रा, तूं जेव्हां पाखंडी लोकांचा निःपात केलास तेव्हां तूं भयंकर सिंहनाद करतांना ऐकल्याबरोबर पृथ्वी आणि आकाश असे दोन्ही लोक थरथरां कापूं लागले ११. —आठ पदांची, नवांना व्यापणारी आणि सद्धर्माची द्योतक अशी जी स्तुति ती मी इन्द्राकडून ( स्फूर्ति मिळाल्यामुळें ) स्वतः विस्तृत केली आहे १२.

## सूक्त ६६

अमितपराक्रम इन्द्रानें, प्रकट होतांच अदिति मातेला विचारलें कीं भयंकर ( शत्रु-म्हणतेस ) ते कोणते ? कोण कोण तुझ्या ऐकण्यांत आले आहेत ? १. —तेव्हां ती उत्कटबलशालिनी अदिति बोलली कीं, और्णवाभ आणि अहीशु हे ते ( भयंकर ) शत्रु आहेत, तर पुत्रा, त्यांचा निःपात तुला केला पाहिजे २. —त्याबरोबर वृत्रनाशन इन्द्रानें, ( चाकांचे ) अरे तुंब्यात ( बसवितांना ) जसे जोरानें ठोकतात त्याप्रमाणें त्या ( शत्रूं ) ना बडवून काढलें, आणि पाखंड्यांचा नाश करणारा म्हणून अतिशय प्रख्यात झाला ३. —( तेव्हां ) सोमरसाचें हांडे, तोण्डोतोण्ड भरलेलीं मोठमोठीं तीस पात्रें, एकाच घोंटासरशीं इन्द्रानें प्राशन करून टाकलीं ४. —ज्यांना बूड कसें तें नाहींच अशा

---

अस्मिन् यज्ञे पुरुष्टुत ॥ ७ ॥ तुभ्येत् इन्द्र मरुत्वते सुताः सोमास अद्रिवः । हृदा हूयन्त उक्थिनः ॥ ८ ॥ पिबेत् इन्द्र मरुत्सखा सुतं सोमं दिविष्टिपु । वज्रं शिशान ओजसा ॥ ९ ॥ उत्तिष्ठन् ओजसा सह पीत्वी शिप्रे अवेपयः । सोमम् इन्द्र चमूसुतम् ॥ १० ॥ अनु त्वा रोदसी उभे क्रक्षमाणम् अकृपेताम् । इन्द्र यत् दस्युहाऽभवः ॥ ११ ॥ वाचम् अष्टापदीम् अहं नवस्रक्तिं ऋतस्पृशम् । इन्द्रात् परि तन्वं ममे ॥ १२ ॥

## सूक्तम् ६६

काण्वः पुरुसुतः इन्द्रः गायत्री

जज्ञानो नु शतक्रतु र्वि पृच्छत् इति मातरम् । के उग्राः के ह शृण्विरे ॥ १ ॥ आत् ईम् शवसी अब्रवीत् और्णवाभम् अहीशुवम् । ते पुत्र सन्तु निष्टुरः ॥ २ ॥ सम् इत् तान् वृत्रहा ऽखिदत् खे अराँ इव खेदया । प्रवृद्धो दस्युहाऽभवत् ॥ ३ ॥ एकया

अन्तरिक्ष प्रदेशांत वास्तव्य करणाऱ्या गन्धर्वाला देखील, ब्रह्मसूक्तांचा उत्कर्ष व्हावा म्हणून, त्यानें कडक शिक्षा केली ५. —त्यानें पर्वत फोडून त्यांपासून प्रवाह उत्पन्न केले, आणि पिंवळीं झालेलीं धान्याचीं टवटवीत कणसें लागास आणलीं ६. —ज्याच्या (पोलादी) पात्याला असंख्य धारा, ज्याच्या पुच्छाला हजारों पिसें असा, हे इन्द्रा, तुझा बाण एकच आहे आणि तोच तूं आपल्याजवळ बाळगतोस ७. —तर तत्काल प्रकट होतांच, त्या बाणाच्या योगानें, आमच्या स्तोतृजनांसाठीं, शूरांसाठीं, आणि स्त्रियांसाठीं, आहाराकरितां, हे ऋभुस्थिरा इन्द्रा, तूं अन्न घेऊन ये ८. —इन्द्रा, अशा प्रकारचीं सर्वोत्कृष्ट अचाट कृत्यें तूं पूर्वीं भरपूर केलींस, ही गोष्ट आमच्या हृदयांत पक्की बिंबली आहे ९. —व्यापक पावलांनीं गमन करणाऱ्या विष्णूनें सर्वच वस्तु (आमच्याकरितां) आणल्या आहेत; तुझ्याच प्रेरणेनें त्यानें शेंकडों महिष, आणि दुधाची खीर, आणि भात अशा वस्तु दिल्या तेव्हां एमुषवराहाला इन्द्रानें (भक्तांच्या स्वाधीन केलें) १०. —इन्द्रा, तुझें धनुष्य महाविशाल, उत्तम बनविलेलें आणि नयनमनोहर आहे; त्याची मधली पक्कड सुवर्णाची आहे. तसेच तुझे जे दोन्ही भुजदंड ते, प्रेक्षणीय, उत्तम कसलेले, (संग्रामांत शत्रूंना) लोळविणारे, आणि सत्यधर्मानें परिपुष्ट आहेत ११.

## सूक्त ६७

इन्द्रा, आमच्या सोमरसाचे पुरोडाश सहस्रवेळां गृहण कर, आणि हे वीरा, शेंकडों गोधनें भक्तांस अर्पण कर १. —परोपरीचीं भूषणें, धेनू, अश्व, आणि सुगंधी उटणीं यांचा स्वीकार, ह्या सुवर्णांच्या अलंकारांसहित कर २. —हे शत्रुमर्दना, कानाला

प्रतिधाऽपिबत् साकं सरांसि त्रिंशतम् । इन्द्रः सोमस्य काणुका ॥४॥ अभि गन्धर्वम् अतृणत् अबुध्नेषु रजःसु आ । इन्द्रो ब्रह्मस्य इत् वृधे ॥५॥ निर् अविध्यत् गिरिभ्य आ धारयत् पक्वम् ओदनम् । इन्द्रो बुन्दं सु आततम् ॥६॥ शतब्रध्नः इषुस् तव सहस्रपर्णः एक इत् । यम् इन्द्र चकृषे युजम् ॥७॥ तेन स्तोतृभ्य आ भर नृभ्यो नारिभ्य अत्तवे । सद्यो जात ऋभुष्ठिर ॥८॥ एता च्यौत्नानि ते कृता वर्षिष्ठानि परीणसा । हृदा वीळु अधारयः ॥ ९ ॥ विश्वेत्ता विष्णुर् आ भरत् उरुक्रमस् त्वेषितः । शतं महिषान् क्षीरपाकम् ओदनं वराहम् इन्द्रम् एमुषम् ॥१०॥ तुविक्षं ते सुकृतं सुमयं धनुः साधु बुन्दो हिरण्ययः । उभा ते बाहू रण्या सुसंस्कृता ऋदुपे चित् ऋदूवृधा ॥ ११॥

## सूक्तम् ६७

काण्वः कुरुसुतः इन्द्रः गायत्री

पुरोळाशं नो अन्धसः इन्द्र सहस्रम् आ भर । शता च शूर गोनाम् ॥ १ ॥
आ नो भर विअञ्जनं गाम् अश्वम् अभिअज्जनम् । सचा मना हिरण्यया ॥ २ ॥

शोभा आणतील अशीं भूषणें आणि कानाला गोड लागतील अशीं वृत्तें ( कानावर ) भरपूर पडूं दे. हे दिव्यनिधे, खरोखरच तुझी कीर्ति चोहोंकडे ऐकण्यांत येते ३. —इन्द्रा, भक्ताचा उत्कर्ष करणारा तुझ्याशिवाय कोणी नाहीं, त्याला उत्तम यश देणारा दुसरा नाहीं, त्याला वरदान देणाराहि नाहीं. हे वीरा, स्तोत्रकर्त्याला तुझ्यावांचून दुसरा कोणीच नाहीं ४. —इन्द्र हा कोणाच्यानेंहि मागें हटला जाणें शक्य नाहीं. त्या सर्वसमर्थाला शक्तीनें घेरून टाकणेंहि शक्य नाहीं. विश्वाची प्रार्थना तो ऐकतो, सर्व विश्वालाहि तो पाहतो ५. —अपराजित असा तो सर्व मनुष्यांचा क्रोध कस्पटासमान मानतो, निन्दकांना तर अगदींच कस्पटाप्रमाणें समजतो ६. —( भक्तासाठीं ) त्वरेनें धांवणाऱ्या त्या वृत्रनाशक सोमप्रिय इन्द्राचें जठर त्याच्या पराक्रमामुळें आणि भक्ताच्या सत्कर्माचरणामुळें सर्वदा परिपूर्णच असतें ७. —हे सोमा, तुझ्या ठिकाणीं सर्व उत्कृष्ट वस्तु, तशींच दानयोग्यता आणि सरळ स्वभाव अशीं सत्भाग्यें एकवटलीं आहेत ८. —आजपर्यंत धान्याकडे, धेनूंकडे, सुवर्णाकडे आणि अश्वांकडे जडलेली माझी वासना आतां मात्र तुझाच ध्यास घेऊन बसली आहे ९. —हे इन्द्रा, तुझें नांव घेऊन मी विळा हातीं घेत आहे, तर हे दातृश्रेष्ठा, आज दिवसभर किंवा ह्याच्या पूर्वीच जी रास घातली आहे त्या धान्याची तूं आपल्या मुठीनें पूर्तता कर १०.

## सूक्त ६८

हा ( भक्तिरूप ) सोम मोठा कार्यकर्ता, कोणाला आकळला न जाणारा, विश्वाला जिंकणारा, आणि फलांकुर उत्पन्न करणारा आहे. त्याच्या काव्यस्फूर्तीनें विप्र हा ऋषि

---

उत नः कर्णशोभना पुरूणि धृष्णु आ भर । त्वम् हि शृण्विषे वसो ॥ ३ ॥ नकीं वृधीक इन्द्र ते न सुसाः न सुदाः उत । नान्यस् त्वत् शूर वाघतः ॥ ४ ॥ नकीम् इन्द्रो नि कर्तवे न शक्रः परिशक्तवे । विश्वं शृणोति पश्यति ॥ ५ ॥ स मन्युं मर्त्यानाम् अदब्धो नि चिकीषते । पुरा निद श्चिकीषते ॥ ६ ॥ क्रत्व इत् पूर्णम् उदरं तुरस्य अस्ति विधतः । वृत्रघ्नः सोमपाव्नः ॥ ७ ॥ त्वे वसूनि सङ्गता विश्वा च सोम सौभगा । सुदातु अपरिह्वृता ॥ ८ ॥ त्वाम् इत् यवयु र्मम कामो गव्यु र्हिरण्ययुः । त्वाम् अश्वयुर् आ ईषते ॥ ९ ॥ तवेत् इन्द्राऽहम् आशंसा हस्ते दात्रं चना ददे । दिनस्य वा मघवन् संभृतस्य वा पूर्धि यवस्य काशिना ॥ १० ॥

## सूक्तम् ६८

भार्गवः कृत्नुः सोमः गायत्री

अयं कृत्नुर् अगृभीतो विश्वजित् उद्भित् इत् सोमः । ऋषि र्विप्रः काव्येन ॥१॥
अभ्यूर्णोति यत् नग्नं भिषक्ति विश्वं यत् तुरम् । प्रेम् अन्धः ख्यत् निःश्रोणो भूत् ॥२॥

होतो १. —जें जें उघडें असतें त्याच्यावर तो आच्छादन घालतो, जे रोगानें पिडीत असतात त्या सर्वांना हा औषध देतो; हा डोळे नसून पाहतो, आणि पाय नसतांहि सर्वत्र संचार करतो २. —( भक्तिरूप ) सोमा, शरीर झिजवून टाकणाऱ्या द्वेषापासून आम्हांला आंवरून धरणारा तूं आहेस; आणि दुसऱ्यांनीं जर आमच्याविषयीं द्वेष धरला असेल तर त्याच्यापासून आमचें रक्षण करणारें उत्तम चिलखतहि तूंच आहेस ३. —मनांत नुसता विचार आणून तुझ्या चातुर्याच्या बलांनीं, हें सोमप्रिय देवा, तूं आकाश आणि पृथिवी या उभय लोकांतून पातकी द्वेष्टयांची हकालपट्टी कर ४. —स्वार्थबुद्धि बाळगणारे लोकहि ( तुझ्या सेवेनें ) आपलें अभीष्ट साधतात, आणि दात्याची देणगी पदरांत पाडून घेतात. तसेंच वासनातृष्णेनें व्याकुळ झालेले जन देखील आपला हेतु पूर्ण करून घेतात ५. —( पण ) भक्ति ही नाहींसें झालेलें ( समाधान ) मिळवून देतें; सत्यधर्मानें वागणाराला प्रोत्साहन देते, आणि शेवटपर्यंत न टिकणारें आयुष्य सुद्धां दीर्घ करूं शकते ६. —हे सोमा, तुझा पराक्रम उन्मत्तपणाचा नाहीं; तूं कल्याणप्रद आणि आम्हांवर कृपा करणारा, अचंचल आहेस, तर आमच्या अन्तःकरणाला समाधान देणारा हो ७. —हे सोमा, आमचा थरकांप करूं नको, आम्हांला भय दाखवूं नको. राजा सोमा, त्वेषानें आमच्या हृदयावर घाव घालूं नको ८. —स्वतःच्या प्रदेशांत, माझ्या घरांत देवांचे द्वेष्टे मी प्रत्यक्ष पहात आहे; तर हे देवराजा, त्या द्वेष्टयांचा संहार कर; हे अभीष्टवर्षका, त्या क्रूरांचा नाश कर ९.

## सूक्त ६९

अमितपराक्रमा इन्द्रा, तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणासही 'मजवर कृपा कर' असें मीं कधीं म्हटलें नाहीं; तर हे इन्द्रा आम्हांवर दया कर १. —अविनाशी असा तूं

---

त्वं सोम तनूकृद्भ्यो द्वेषेभ्यो ऽन्यकृतेभ्यः । उरु यन्ताऽसि वरूथम् ॥ ३ ॥ त्वं चित्ती तव दक्षैः दिव आ पृथिव्या ऋजीपिन् । यावीर् अघस्य चित् द्वेषः ॥ ४ ॥ अर्थिनो यन्ति चेत् अर्थं गच्छान् इत् ददुषो रातिम् । ववृज्युस् तृष्यतः कामम् ॥ ५ ॥ विदत् यत् पूर्व्यं नष्टम् उत् ईम् ऋतायुम् ईरयत् । प्रेम् आयुस् तारीत् अतीर्णम् ॥ ६ ॥ सुशेवो नो मृळयाकुर् अदृप्तक्रतुर् अवातः । भवा नः सोम शं हृदे ॥७॥ मा नः सोम संविविजो मा वि बीभिषथाः राजन् । मा नो हार्दि त्विषा वधीः ॥८॥ अव यत् स्वे सधस्थे देवानां दुर्मतीर् ईक्षे । राजन् अप द्विषः सेध मीढ्वो अप स्रिधः सेध ॥९॥

## सूक्तम् ६९

एकद्यूः इन्द्रः गायत्री

नहि अन्यं बळाऽकरं मर्डितारं शतक्रतो । त्वं नः इन्द्र मृळय ॥ १ ॥ यो नः शश्वत् पुराऽऽविथ अमृध्रो वाजसातये । सत्वं नः इन्द्र मृळय ॥ २ ॥ किम् अङ्ग

आम्हीं सत्वाढच व्हावें म्हणून पूर्वींपासूनच सर्वकाळ आमचें रक्षण केलेलें आहेस. तर हे इन्द्रा, आतांहि आम्हांवर दया कर २. —हे दीनदयाळा, सोम अर्पण करणाराचें रक्षण करणारा तूंच नाहींस काय ? तर हे इन्द्रा, आम्हांला उत्तम रीतीनें शक्तिमान् करशील ना ? ३. —इन्द्रा आमच्या रथावर तुझी कृपादृष्टि असूं दे; तो जर कदाचित् मागें राहिला तर त्याला सर्वांच्या पुढें काढ ४. —छे, छे ! देवा काय हें ? असा स्वस्थ कां बसलास ? आमचा रथ अगदीं पहिला असूं दे. आणि सत्वाढचतेची आवड उत्पन्न करणारें यश आमच्या सन्निध आण ५. —सत्यविजयाची आवड उत्पन्न करणाऱ्या आमच्या रथाचें तूं रक्षण कर. यापेक्षां तुजला करण्याला सोपी अशी दुसरी कोणती गोष्ट आहे ? आम्हांला विजयोत्सुक कर ६. —इन्द्रा, आम्हांला बलाढच कर; तूं आमचा नगरदुर्ग आहेस; ही आमची मंगल आणि सद्धर्मरत ध्यानवुद्धि तुझ्या ठिकाणींच येत आहे ७. —कोणत्याही निन्द्यकर्मीत आम्हांला गुरफटूं देऊं नको; (कारण) हें रणाङ्गण विस्तीर्ण, हें युद्ध हितप्रद आहे, आणि (सर्व) अडथळे दूर झालेले आहेत ८. —हे इन्द्रा, यजनीय असें जें तुझें चौथें नांव आहे तें तूं केव्हां धारण केलेंस हीच उत्कण्ठा आम्हांस लागली आहे; आणि म्हणूनच तूं आमचा प्रतिपालक असें सर्व लोक समजतात ९. —'एकद्यू'नें तुमची महती वाढविली आहे; हे अमर देवांनो, हे देवीनों, तुम्हांला हर्षोत्फुल्ल केलें आहे. तर त्याला प्रशंसनीय वरदान अर्पण करा. (आणि त्यासाठीं) ध्यान हेंच ज्याचें धन असा (अग्निदेव) प्रातःकालीं सत्वर आगमन करो १०.

---

## सूक्त ७०

इन्द्रा तूं महाबाहु आहेस; तर (आम्हांस देण्याकरितां) आपल्या उजव्या हस्तांत वाखाणण्यायोग्य, अद्भुत, आणि सर्व संग्राहक असें वरदान धारण कर १. —आम्हांला

---

रध्रचोदनः सुन्वानस्याविता इत् असि । कुवित् सु इन्द्र नः शकः ॥ ३ ॥ इन्द्रः प्र णो रथं अव पश्चात् चित् सन्तम् अद्रिवः । पुरस्तात् एनं मे कृधि ॥ ४ ॥ हन्तो नु किम् आससे प्रथमं नो रथं कृधि । उपमं वाजयु श्रवः ॥ ५ ॥ अव नो वाजयुं रथं सुकरं ते किमित् परि । अस्मान्त्सु जिग्युषस्कृधि ॥ ६ ॥ इन्द्र दृंहस्व पूर् असि भद्रा ते एति निष्कृतम् । इयं धी ऋत्वियावती ॥ ७ ॥ मा सीम् अवद्य आ भाक् ऊर्वी काष्ठा हितं धनम् । अपावृक्ताः अरत्नयः ॥ ८ ॥ तुरीयं नाम यज्ञियं यदा करस् तत् उश्मसि । आदित् पति र्नः ओहसे ॥ ९ ॥ अवीवृधत् वो अमृताः अमन्दीत् एकद्यूः देवाः उत या श्च देवीः ॥ तस्मै उ राधः कृणुत प्रशस्तं । प्रात मंक्षू धियावसु जंगम्यात् ॥ १० ॥

---

हें माहीत आहे कीं, तुझें कर्तृत्व अचाट, तुझें दातृत्व अफाट, तुझें ऐश्वर्य अलोट आणि तुझा कृपालव निर्मर्याद आहे २. —तूं वरदान देण्याचें मनांत आणशील तर हे शूरा, वृषभाप्रमाणें उग्र असा दिव्यगण किंवा मर्त्यमानव ह्यांपैकीं कोणाच्यानेंहि तुझा हात धरवणार नाहीं ३. —या, इकडे या, दिव्यनिधींचा अधिपति आणि स्वयंप्रकाश अशा इन्द्राचें आपण स्तवन करूं या; म्हणजे आपल्या कृपेनें तो आम्हांला उद्दाम होऊं देणार नाहीं ४. —स्तवन चालूं द्या, गुणगायनहि चालूं द्या; म्हणजे आमचें सामगायन तो श्रवण करील, आणि कृपाकटाक्षानें ( आपणांस ) आशीर्वाद देईल ५. —तुझ्या उजव्या हातानें आम्हांला आमचें इच्छित अर्पण कर, आणि डाव्या हातानें आमची पाठ थोपट. हे इन्द्रा, दिव्यनिधिपासून आम्हांला दूर ठेऊं नको ६. —आमच्या सन्निध ये; दुर्जनांवर झपाट्यानें हल्ला चढविण्याऱ्या देवा, ज्यानें कधीं दानधर्म केला नाहीं, आणि जो दानधर्माचा कट्टा विरोधी आहे त्याचें सर्वस्व हरण करून तें भक्तजनांकडे घेऊन ये. ७. —इन्द्रा, तुझा जो सत्वप्रभाव आहे, तो खरोखर ज्ञानीस्तोतृजनांनींच आपलासा करावा; पण तो आम्हांलाहि हस्तगत होईल असें कर ८ —ते तुझे सत्वपराक्रम जे ( भक्तांना ) तत्काळ स्फुरण चढवितात ते आमच्या दृष्टीनेंहि सर्वतोपरी आल्हादप्रदच आहेत; मग त्यांच्याकरितां जे अगदीं लालस आहेत ते तत्काळ त्यांची प्रशंसा करतात ( ह्यांत काय नवल ? ) ९.

अध्याय पांचवा समाप्त

## सूक्तम् ७०

कुसीदी इन्द्रः गायत्री

आ तू नः इन्द्रं क्षुमन्तं चित्रं ग्राभं सं गृभाय । महाहस्ती दक्षिणेन ॥ १ ॥
विद्मा हि त्वा तुविकूर्मिं तुविदेष्णं तुवीमघम् । तूविमात्रम् अवोभिः ॥ २ ॥ नहि
त्वा शूर देवाः न मर्तासो दित्सन्तम् । भीमं न गां वारयन्ते ॥ ३ ॥ आ इतो नु
इन्द्रं स्तवाम ईशानं वस्वः स्वराजम् । न राधसा मर्धिषत् नः ॥ ४ ॥ प्र स्तोषत्
उप गासिषत् श्रवत् साम गीयमानम् । अभि राधसा जुगुरत् ॥ ५ ॥ आ नो भर
दक्षिणेन अभि सव्येन प्र मृश । इन्द्र मा नो वसो र्निं भाक् ॥ ६ ॥ उप क्रमस्व
आ भर धृषता धृष्णो जनानाम् । अदाशूस्तरस्य वेदः ॥ ७ ॥ इन्द्र य उ नु ते
अस्ति वाजो विप्रेभिः सनित्वः । अस्माभिः सु तं सनुहि ॥ ८ ॥ सद्योजुवस् ते
वाजाः अस्मभ्यं विश्वचंद्राः । वशैश्च मक्षू जरन्ते ॥ ९ ॥

इति षष्ठे पंचमोऽध्यायः

## अध्याय सहावा

## सूक्त ७१

हे वृत्रनाशना, तूं ह्या भूलोकीं किंवा दूरच्या स्वर्लोकीं ( कोठेंहि ) असलास तरी तेथून ह्या समृद्धिकर यज्ञांतील मधुररसाकडे अति त्वरेनें आगमन कर १. —हे सिद्ध केलेले सोमरस तीक्ष्ण आणि हर्षोत्फुल्ल करणारे आहेत; तर आगमन कर, आणि तुजला समाधान होईल इतक्या आसोशीनें ते प्राशन कर २. —उत्साही सोमरसानें हर्षोत्फुल्ल हो; तुझा क्रोध निवारण करण्यास, तुझ्या अन्तःकरणास प्रसन्न करण्यास तो समर्थ आहे. ३. —अजातशत्रो इन्द्रा, येथें आगमन कर; द्युलोकाच्या निकटवर्ती देदीप्यमान लोकांत देखील तुजला पाचारण होतें ४. —हा रस तुझ्यासाठीं आहे. ग्राव्यांच्या योगानें पिळून सिद्ध केलेला हा गोदुग्धमिश्रित सोमरस तुजला हर्ष व्हावा म्हणून, हे इन्द्रा, तुजसाठीं हवन केला जात आहे, ( तो प्राशन कर ) ५. —इन्द्रा, माझी हांक चांगली ऐकून घे, आणि हा गोदुग्धमिश्रित सोमरस प्राशन करून तृप्ति पाव. ६. —इन्द्रा, हा जो चमसांमध्यें आणि चमूपात्रांमध्यें तुझ्याकरितां सोमरस ठेवलेला आहे तो तूं प्राशन कर; त्या रसावर सत्ता तुझी आहे ७. —हा जो चमूपात्रांत ठेवलेला सोमरस आकाशांतील चंद्राप्रमाणें आल्हाददायक आहे तो तूं प्राशन कर; त्याच्यावर सत्ता तुझी आहे. ८. —हा जो सोमरस द्युलोकांतील श्येन पक्षानें रजोलोकाच्या पलीकडून आपल्या गर्वांत धरून आणला आहे, ज्याला अजून दुसऱ्या कोणीं स्पर्शहि केला नाहीं तो तूं प्राशन कर; त्याच्यावर तुझीच सत्ता आहे ९.

---

## अथ षष्ठोऽध्यायः

## सूक्तम् ७१

काण्वः कुसीदः इन्द्रः गायत्री

आ प्र द्रव परावतोऽर्वावत श्च वृत्रहन् । मध्वः प्रति प्रभर्मणि ॥ १ ॥ तीव्राः सोमास आ गहि सुतासो मादयिष्णवः । पिबा दधृक् यथो–चिषे ॥ २ ॥ इषा मन्दस्व आत् उ ते अरं वराय मन्यवे । भुवत् ते इन्द्र शं हृदे ॥ ३ ॥ आ तू अशत्रो आ गहि नि उक्थानि च हूयसे । उपमे रोचने दिवः ॥ ४ ॥ तुभ्या-यम् अद्रिभिः सुतो गोभिः श्रीतो मदाय कम् । प्र सोमः इन्द्र हूयते ॥ ५ ॥ इन्द्र श्रुधी सु मे हवम् अस्मे सुतस्य गोमतः । वि पीतिं तृप्तिम् अश्नुहि ॥ ६ ॥ य इन्द्र चमसेषु आ सोम श्चमूषु ते सुतः । पिबे-त् अस्य त्वम् ईशिषे ॥ ७ ॥ यो अप्सु चन्द्रमा इव सोम श्चमूषु ददृशे । पिबे-त् अस्य त्वम् ईशिषे ॥८॥ यं ते श्येनः पदा ऽऽ भरत् तिरो रजांसि अस्पृतम् । पिबे-त् अस्य त्वम् ईशिषे ॥ ९ ॥

## सूक्त ७२

महापराक्रमी देवांचें जें महत्‌रक्षण, त्या रक्षणाचीच याचना आम्हीं आमच्या सहायासाठीं करीत आहों १. —तर ते वरुण, मित्र आणि अर्यमा हे निरंतर आमच्या सन्निध असोत; ते भक्तांचा उत्कर्ष करणारे आणि महाप्राज्ञ आहेत २. —नावेच्या योगानें उदकें तरून पार जावें त्याप्रमाणें ह्या नाना प्रकारच्या असंख्य भानगडींतून आम्हांस पार न्या. सनातन धर्माचे धुरीण तुम्हीं आहांत ३. —जी वस्तु मनोहर आहे, तीच हे अर्यमन् देवा, आमची होवो. वरुणा, जी वस्तु अभिलषणीय असेल तीच आमची असो, आम्हीं त्या अत्युत्कृष्ट वस्तूकरितांच तुमची विनवणी करीत आहों ४. —हे महाप्राज्ञ देवानों, हे शत्रु-विदारणानों, जें जें अभिलषणीय आहे त्याचे अधिपति तुम्हीं आहांत; पण जें जें पापरूप असेल त्याच्याशीं मात्र, हे आदित्यानों, तुमचा संबंध नसतो ५. —आम्हीं घरांत रहात असलों, किंवा हे महोदार देवानों, मार्गांत प्रवास करीत असलों, तरी हे देवांनों अभ्युन्नतीसाठीं, आम्हीं तुमचाच धांवा करतों ६. —हे इन्द्रा, हे विष्णु, हे अश्वीहो, हे मरुतांनों; आम्हां एकसारख्या एकजात भक्तांकडे सत्वर लक्ष द्या ७. —हे दातृश्रेष्ठहो, खरोखर, ( अदिति ) मातेच्या उदरांत एकत्र वास झाल्यानें तुमचा परस्परांशीं असलेला भ्रातृभाव आम्हीं सर्व टिकाणीं सहजच प्रसिद्ध करतों ८. —हे इन्द्रप्रमुख देवांनों, तुम्हीं दातृश्रेष्ठ आणि दिव्यतेजानें तळपत आहांत, म्हणून आम्हीं तुमचीच विनवणीं करीत आहों ९.

---

## सूक्तम् ७२

कुसीदी विश्वे देवाः गायत्री

देवानाम् इत् अवो महत् तत् आ वृणीमहे वयम्। वृष्णाम् अस्मभ्यम् ऊतये ॥ १ ॥ ते नः सन्तु युजः सदा वरुणो मित्रो अर्यमा। वृधास श्च प्रचेतसः ॥२॥ अति नो विष्पिता पुरु नौभिर् अपो न पर्षथ। यूयं ऋतस्य रथ्यः ॥ ३ ॥ वामं नो अस्तु अर्यमन् वामं वरुण शंस्यम्। वामं हि आ वृणीमहे ॥ ४ ॥ वामस्य हि प्रचेतसः ईशानासो रिशादसः। नेम् आदित्याः अघस्य यत् ॥ ५ ॥ वयम् इत् वः सुदानवः क्षियन्तो यान्तो अध्वन् आ। देवाः वृधाय हूमहे ॥ ६ ॥ अधि नः इन्द्र एषां विष्णो सजात्यानाम्। इता मरुतो अश्विना ॥ ७ ॥ प्र भ्रातृत्वं सुदानवः अध द्विता समान्या। मातु र्गर्भे भरामहे ॥ ८ ॥ यूयं हि ष्ठा सुदानवः इन्द्रज्येष्ठाः अभिद्यवः। अधा चित् वः उतब्रुवे ॥ ९ ॥

## सूक्त ७३

मित्राप्रमाणें सर्वांना प्रिय, ( मानवांचा ) उत्तमोत्तम अतिथि, आणि रथाप्रमाणें आल्हादप्रद असा जो अग्नि त्याचें मीं स्तवन करतों. १. —महाप्राज्ञ आणि काव्यस्फूर्ति देणारा जो अग्नि त्याची दिव्यविभूतिंनीं मर्त्यमानवांमध्यें स्थापना केली २. —हे यौवनाढ्या, तूं शूरभक्तांचा प्रतिपाल कर; त्यांच्या स्तुति ऐकून घे, आणि त्यांच्या स्वतःचें आणि मुलांलेंकरांचें रक्षण कर ३. —हे अङ्गिरा अग्ने, हे ऊर्जस्वितेच्या पालका, हे देवा, तुझें आकलन करण्याला आणि तुझ्या आवेशाला योग्य अशा कोणत्या वाणीनें आम्हीं तुझें स्तवन करावें ? ( तें कळत नाहीं ). ४. —( पातक्यांना ) रगडून टाकणाऱ्या महानुभाव देवा, कोणत्या यज्ञाची (इच्छा करून) मीं तुजला मनोभावानें सेवा अर्पण करावी ? हा प्रणिपात माझा असें मीं तुजला किती वेळ बोलून दाखवावें ? ५. —तर आतां तूं आमच्यासाठीं आमच्या स्तुतींविषयीं असें कर कीं त्या उत्तम ठिकाणीं राहणाऱ्या होतील, आणि सत्वसामर्थ्य हेंच त्यांचें धन होईल. ६. —हे यज्ञगृहाधिपा, (भक्तांच्या) स्तुति ज्याच्या प्रीत्यर्थ होतात असा तूं, कोणत्या भक्ताच्या परिपक्व ध्यानबुद्धीला (प्रकाश) धेनूंच्या प्राप्तीसाठीं प्रोत्साहन देत आहेस ? ७. —महत्कार्य कुशल, युद्धांत अग्रेसर, आणि सत्वधीर जो अग्नि त्याला आपआपल्या गृहांत त्या ( ऋत्विजां ) नीं अलंकृत केलें आहे. ८. —हे अग्नि, ( तुझा भक्त असा असतो कीं ) तो नेहमीं जनहिततत्पर, सत्पुरुषांचा सहवास करणारा असतो; त्याचा कोणी घात करूं शकत नाहीं. उलट तोच दुर्जनांना मारतो, आणि शूर पुत्रपौत्रांसह उत्कर्षाला पावतो ९.

---

## सूक्तम् ७३

उशनाः　　अग्निः　　गायत्री

प्रेष्ठं वो अतिथिम् । स्तुषे मित्रम् इव प्रियम् । अग्निं रथं न वेद्यम् ॥१॥ कविमिव प्रचेतसं यं देवासो अध द्विता । नि मर्त्येषु आदधुः ॥ २ ॥ त्वं यविष्ठ दाशुषो नॄन् पाहि शृणुधी गिरः । रक्षा तोकम् उत त्मना ॥३॥ कया ते अग्ने अङ्गिरः ऊर्जो नपात् उपस्तुतिम् । वराय देव मन्यवे ॥४॥ दाशेम कस्य मनसा यज्ञस्य सहसो यहो । कदु वोचे इदं नमः ॥ ५ ॥ अधा त्वं हि नस् करो विश्वाः अस्मभ्यं सुक्षितिः । वाजद्रविणसो गिरः ॥ ६ ॥ कस्य नूनं परीणसो धियो जिन्वसि दम्पते । गोषाता यस्य ते गिरः ॥ ७ ॥ तं मर्जयन्त सुक्रतुं पुरो यावानम् आजिषु । स्वेषु क्षयेषु वाजिनम् ॥ ८ ॥ क्षेति क्षेमेभिः साधुभि-र्नकिं यं घ्नन्ति हन्ति यः । अग्ने सुवीर एधते ॥ ९ ॥

## सूक्त ७४

सत्यस्वरूप अश्वीहो, माझा धांवा ऐकून तुम्हीं उभयतां मधुर सोमरसाचें प्राशन करण्याकरितां आगमन करा १. —अश्वीहो, हें माझें स्तवन, ही माझी हांक ऐका, आणि मधुर सोमाच्या रसाचें प्राशन करण्याकरितां आगमन करा २. —सत्वाढ्यतेनें ऐश्वर्यसंपन्न असणाऱ्या अश्वीहो, हा मी कृष्ण नांवाचा भक्त तुमचा धांवा करीत आहे तर मधुर सोमाच्या रसाचे प्राशनासाठीं आगमन करा ३. —तुमचें संकीर्तन करणारा, तुमचें स्तवन करणारा जो मी कृष्ण त्याची हांक ऐका; हे वीरहो, मधुर सोमरसाच्या प्राशनासाठीं (प्रार्थना) श्रवण करा ४. —स्तवन करणाऱ्याला, स्तुतिप्रवीण भक्ताला, असें गृह द्या कीं ज्याचा कधींहि भंग होणार नाहीं, हे वीरानों, मधुर सोमरसाच्या प्राशनासाठीं हें करा ५. —हवि अर्पण करणाऱ्या आणि इतक्या तळमळीनें स्तवन करणाऱ्या भक्ताच्या गृहीं, हे अश्वीहो, तुम्हीं मधुर सोमाचा रस प्राशन करण्यासाठीं गमन करा ६. —तुमचा खिंकाळणारा अश्व, हे वीर्यधनाढ्य अश्वीहो, तुम्ही आपल्या मजबूत रथाला मधुर सोमरसाच्या प्राशनासाठीं जोडा ७. —तुम्हीं तीन कोनाच्या आणि तीन बैठकींच्या रथांत बसून, हे अश्वीहो, मधुर सोमाचा रस प्राशन करण्यासाठीं आगमन करा ८. —खरोखर, हे अश्वीहो, तुम्हीं उभयतां मधुर सोमाचा रस प्राशन करण्यासाठीं, माझी स्तवनवाणी प्रासादिक करा ९.

---

## सूक्तम् ७४

आंगिरसः कृष्णः अश्विनौ गायत्री

आ मे हवं नासत्या अश्विना गच्छतं युवम् । मध्वः सोमस्य पीतये ॥ १ ॥ इमं मे स्तोमम् अश्विना इदं मे श्रृणुतं हवम् । मध्वः सोमस्य पीतये ॥ २ ॥ अयं वां कृष्णो अश्विना हवते वाजिनीवसू । मध्वः सोमस्य पीतये ॥ ३ ॥ शृणुतं जरितु हवं कृष्णस्य स्तुवतो नरा । मध्वः सोमस्य पीतये ॥ ४ ॥ छर्दिं यन्तम् अदाभ्यं विप्राय स्तुवते नरा । मध्वः सोमस्य पीतये ॥ ५ ॥ गच्छतं दाशुषो गृहम् इत्था स्तुवतो अश्विना । मध्वः सोमस्य पीतये ॥ ६ ॥ युञ्जाथां रासभं रथे वीळ्वङ्गे वृषण्वसू । मध्वः सोमस्य पीतये ॥ ७ ॥ त्रिवन्धुरेण त्रिवृता रथेना–यातम् अश्विना । मध्वः सोमस्य पीतये ॥ ८ ॥ नू मे गिरो नासत्या अश्विना प्रावतं युवम् । मध्वः सोमस्य पीतये ॥ ९ ॥

## सूक्त ७५

तुम्हीं उभयतां अद्भुत पराक्रमी, तुम्हीं उभयतां अपूर्व वैद्य आणि भक्तकल्याणकारी आहांत. चतुर पुरुषांच्या स्तुति तुमच्याप्रीत्यर्थंच झाल्या; अशा तुम्हां उभयतांना तुमचा "विश्वक" भक्त स्वतःच्या रक्षणार्थ हांक मारीत आहे, तर तुम्हीं आपल्या मित्रत्वापासून आम्हांला दूर लोटूं नका, आम्हांला मुक्त करा १. —विमना ऋषीनें तुमचें स्तवन कोणत्या रीतीनें केलें कीं, त्यानें अत्युत्कृष्ट अभीष्ट प्राप्त करून घ्यावें अशी बुद्धि तुम्हीं त्याला दिलीत? म्हणून मी "विश्वक" तुमचा भक्त आत्मरक्षणार्थ तुम्हांला हांक मारीत आहे, तर आपल्या मित्रत्वापासून आम्हांला दूर लोटूं नका, आम्हांला मुक्त करा २. —सकलांचें संभरण करणाऱ्या अश्वीहो, विष्णापू भक्ताला, त्यानें अत्युत्कृष्ट अभीष्ट प्राप्त करून घ्यावें म्हणून त्याला हें असें समृद्धिकर वरदान दिलेंत; तर मी हा "विश्वक" भक्त आत्मरक्षणार्थ तुम्हांला हांक मारीत आहे, तर आपल्या मित्रत्वापासून आम्हांला दूर लोटूं नका, मुक्त करा ३. —आणखी, तो उत्तमोत्तम धन देणारा, सोमरसाचा भोक्ता जो वीर (इंद्र) तो जरी दूर असला तरी आम्हांवर त्यानें कृपा करावी म्हणून आम्हीं त्याला हांक मारतों. पित्याची बुद्धि जशी पुत्राविषयीं, तशीच त्याची आम्हांविषयींची सुबुद्धि अतिशय मधुर आहे. तर अश्वीहो, आपल्या मित्रत्वापासून आम्हांला दूर लोटूं नका. आम्हांला मुक्त करा ४. —जगताचा निर्माता सूर्य हा सनातन धर्मानें स्वस्थ निश्चल राहतो. सद्धर्माचें शिंग तो दूरवर ऐकूं जाईल असें फुंकतो, आणि (पातक्यांचें) सैन्य कितीहि असलें तरी सनातन सद्धर्मच त्याचा मोड करतो; तर आपल्या मित्रत्वापासून आम्हांला दूर धरूं नका, आमचा उद्धार करा ५.

## सूक्तम् ७५

विश्वकः अश्विनौ जगती

उभा हि दस्रा भिषजा मयोभुवा उभा दक्षस्य वचसा बभूवथुः । ता वां विश्वको हवते तनूकृथे मा नो वि यौष्टं सख्या मुमोचतम् ॥ १ ॥ कथा नूनं वां विमनाः उप स्तवत् युवं धियं ददथु र्वस्य इष्टये । ता वां विश्वको हवते तनूकृथे मा नो वि यौष्टं सख्या मुमोचतम् ॥ २ ॥ युवं हि ष्मा पुरुभुजे–मम् एधतुं विष्णाप्वे ददथु र्वस्य इष्टये । ता वां विश्वको हवते तनूकृथे० ॥ ३ ॥ उत त्यं वीरं धनसाम् ऋजीषिणं दूरे चित् सन्तम् अवसे हवामहे । यस्य स्वादिष्ठा सुमतिः पितु र्यथा मा नो वि यौष्टं सख्या मुमोचतम् ॥ ४ ॥ ऋतेन देवः सविता शमायते ऋतस्य शृङ्गम् उर्विया वि पप्रथे । ऋतं सासाह महि चित् पृतन्यतो मा नो वि यौष्टं सख्या मुमोचतम् ॥ ५ ॥

## सूक्त ७६

अश्वीहो, तुमचा तेजस्वी स्तव, कारंजें ज्याप्रमाणें तुषार सिंचन करतें त्याप्रमाणें, तेजस्वितेचे फ़वारे उडवितो; तर हे शूरानों ह्या मधुररसाकडे या. द्युलोकांत तुम्हांला तोच प्रिय आहे, तर तान्हेले गौरमृग जसे सरोवराचे कांठीं जातात, त्याप्रमाणें तुम्हीं ( येऊन सोम ) रस प्राशन करा. १. —अश्वीहो, ह्या घर्मपात्रांतील तीव्र परंतु मधुर असा रस प्राशन करा. हे शूरानों कुशासनावर आरोहण करा, आणि मानवी भक्ताच्या गृहीं हर्षनिर्भर होणारे तुम्हीं आपल्या ज्ञानानें त्याच्या जोमाचें रक्षण करा २. —प्रियमेधा ऋषीनें तुमच्या संरक्षकशक्तीसह तुम्हां उभयतांचा धांवा केला; तर स्वर्गप्रापक अशा सत्कर्मीतील संतोषप्रद यज्ञाकडे—कुशासन सिद्ध केलेल्या यज्ञमंडपाकडे—आगमन करा. ३. —अश्वीहो, हा मधुर सोमरस प्राशन करा, आणि कुशासनावर आनंदानें विराजमान व्हा. आनंदवर्धन असे तुम्हीं, गौरमृगाची जोडी सरोवराकडे जाते त्याप्रमाणें, या तुमच्या स्तुतीकडे दिव्यलोकांतून आगमन करा ४. —खरोखर या वेळेस अश्वीहो, तुमच्या तुळतुळीत तजेलेदार अश्वांसह येथें आगमन करा, आणि, हे अद्भुत कर्मकारी, हे सुवर्णरथ गामी देवानों, हे मंगलाधीशानों, हे सद्धर्माची अभिवृद्धि करणाऱ्या देवांनों, हा सोमरस प्राशन करा. ५. —वास्तविक आम्हीं भक्तिप्रेमी स्तोतृजन सत्वसामर्थ्याच्या प्राप्तीकरितां तुम्हां उभयतांचा धांवा करीत आहों. तर हे मनोहरानों, हे दर्शनीयांनो, हे अद्भुतपराक्रमी अश्वीहो, तुम्हीं आपल्या सद्बुद्धीनें तो धांवा ऐकून इकडे आगमन करा ६.

## सूक्तम् ७६

आंगिरसः कृष्णः अश्विनौ बृहती

द्युम्नी वां स्तोमो अश्विना क्रिविर् न सेक आ गतम् । मध्व सुतस्य स दिवि प्रियो नरा पातं गौरौ इवे-रिणे ॥ १ ॥ पिबतं घर्मं मधुमन्तम् अश्विना आ बर्हिः सीदतं नरा । ता मन्दसाना मनुषो दुरोण आ निपातं वेदसा वयः ॥ २ ॥ आ वां विश्वाभिर् ऊतिभिः प्रियमेधा अहूषत । ता वर्तिर् यातम् उप वृक्तबर्हिषो जुष्टं यज्ञं दिविष्टिषु ॥ ३ ॥ पिबतं सोमं मधुमन्तम् अश्विना आ बर्हिः सीदतं सुमत् । ता वावृधाना उप सुष्टुतिं दिवो गन्तं गौरौ इवेरिणम् ॥ ४ ॥ आ नूनं यातम् अश्विना अश्वेभिः प्रुषितप्सुभिः । दस्रा हिरण्यवर्तनी शुभस्पती पातं सोमम् ऋतावृधा ॥ ५ ॥ वयं हि वां हवामहे विपन्यवो विप्रासो वाजसातये । ता वल्गू दस्रा पुरुदंससा धिया अश्विना श्रुष्टी आ गतम् ॥ ६ ॥

## सूक्त ७७

पहा, तुमच्यासाठीं त्या अद्भुतदर्शन, अरिमर्दन आणि "वसू"च्या सोमपेयानें हर्ष-निर्भर झालेल्या इन्द्राप्रीत्यर्थ, धेनू आपल्या गोठ्यांत वत्साकरितां हंबरतात त्याप्रमाणें, स्तुतिवाणीनीं आम्हीं तारस्वरानें स्तवन करीत आहोंत. १.. —द्युलोकनिवासी, दातृश्रेष्ठ, आपल्या ज्वलत्दीप्तिनें व्याप्त, पर्वताप्रमाणें ( अचल ), प्रतापशाली, सर्वांचें संभरण करणारा, ( प्रकाश ) गोधनें शेंकडों नव्हे हजारों बाळगणारा, अशा इन्द्राची विनवणी आम्हीं तत्परतेनें करीत आहों. २. —पर्वत जरी प्रचंड आणि अभेद्य असले तरी हे इन्द्रा, ते जसे तुला कांहीं एक अडथळा करूं शकत नाहींत, तसें, मजसारख्या दीन भक्ताला दिव्यधनाचा ठेवा जरी तूं देऊं लागलास तरी तुझें त्याबद्दल कोणीं कांहींहि वांकडें करूं शकणार नाहीं ३. —तूं खरोखर योद्धाच आहेस; आणि आपल्या पराक्रमानें, उत्कटबलानें, अद्भुतकृतीनें, आणि आपल्या झळाळीनें हें सर्ववस्तुजात पराजित करून टाकलें आहेस. परंतु हा जो स्तोत्रघोष गोतमांनीं केला आहे, तो आमच्या सहायासाठीं तुजला इकडे वळवून आणीलच ४. —तूं आपल्या ओजस्वितेनें द्युलोकाच्या सीमेच्या पलीकडेहि भरून राहिला आहेस; हे इन्द्रा, पृथिवी आणि रजो लोक हे तुजला व्यापूं शकले नाहींत; तथापि तूं मात्र आपल्या स्वभावानुसार भक्ताकडे ओढला जातोस ५. —हे भगवंता, तूं जर भक्ताला देऊं लागशील तर तुझ्या वैभवाच्या देणगीला कोणीहि मोडता घालूं शकणार नाहीं, तर, आम्हीं सत्वसामर्थ्य मिळवावें म्हणून आमच्या सामस्तवनाचा अत्यंत महनीय असा प्रेरक हो. ६.

---

## सूक्तम् ७७

गौतमो नोधाः इन्द्रः प्रगाथा

तं वो दस्मम् ऋतीषहं वसो र्मन्दानम् अन्धसः अभि वत्सं न स्वसरेषु धेनव इन्द्रं गीर्भि र्नवामहे ॥ १ ॥ द्युक्षं सुदानुं तविषीभिर् आवृतं गिरिं न पुरु भोजसम् । क्षुमन्तं वाजं शतिनं सहस्रिणं मक्षू गोमन्तम् ईमहे ॥ २ ॥ न त्वा बृहन्तो अद्रयो वरन्त इन्द्र वीळवः । यत् दित्ससि स्तुवते मावते वसु नकि ष्टत् आ मिनाति ते ॥ ३ ॥ योद्धा असि क्रत्वा शवसो–त दंसना विश्वा जाता ऽभि मज्मना । आ त्वा ऽयम् अर्कः ऊतये ववर्तति यं गोतमा अजीजनन् ॥ ४ ॥ प्रहि रिरिक्षे ओजसा दिवो अन्तेभ्य स्परि । न त्वा विव्याच रज इन्द्र पार्थिवम् अनु स्वधां ववक्षिथ ॥ ५ ॥ नकिः परिष्टि र्मघवन् मघस्य ते यत् दाशुषे दशस्यसि । अस्माकं बोधि उचथस्य चोदिता मंहिष्ठो वाजसातये ॥ ६ ॥

## सूक्त ७८

मरुतांनों, वृत्राचा समूळ उच्छेद करविणाऱ्या "**बृहत्**" सामाचें तुम्हीं इन्द्राप्रीत्यर्थ गायन करा. तें "बृहत" सामाचें गायन ऐकून सद्धर्मांची अभिवृद्धि करणाऱ्या विभूतिंनीं (साधकांना) जागृत ठेवणारें दिव्यतेज देवासाठीं निर्माण केलें. १. —स्तवनपराङ्मुख नास्तिकांचा निःपात करणाऱ्या इन्द्रानें ( भक्तांना ) शिव्याशाप देणाऱ्या दुर्जनांना फुंकरासरशीं दूर उडवून दिलें आणि यशानें झळकूं लागला. म्हणून हे अपारतेजस्क, मरुत्-प्रभो, दिव्यविभूतिंनीं देखील तुझ्या मित्रत्वासाठीं फार परिश्रम केलेले आहेत. २. —तुमच्या श्रेष्ठ इन्द्राप्रीत्यर्थ हे मरुतांनो, तुम्हीं उत्कृष्ट ब्रह्मसूक्त मोठ्यानें म्हणा. कारण तो वृत्रनाशन, अनंतप्रज्ञ इन्द्र सहस्रावधि धारांच्या वज्रानें वृत्राचा नाशच करतो ३. —धाडसी अन्तःकरणाचा असा तूं आपल्या धडाडीनें यश हस्तगत कर. तें महत् यश तुझेंच असणार (हें खास); तुझ्या त्या धडक्यानें खुल्या झालेल्या उदक( रूप ) जननी धों धों वेगानें निरनिराळ्या मार्गांनीं वाहत राहतील. म्हणून तूं वृत्राला जिंक आणि त्या बरोबरच दिव्यप्रकाशहि जिंकून टाक ४. —हे अनादि भगवन्ता, वृत्राला ठार करण्यासाठीं जेव्हां तूं प्रकट झालास, त्याच वेळीं तूं पहिल्यानें पृथिवीचा विस्तार केलास आणि द्युलोक स्थिर केलास ५. —नंतर यज्ञविधि ठरला, नंतर अर्कस्तोत्र ( म्हणजे ऋचा ), आणि नंतर आनंदहास्य असें साम उत्पन्न झालें. याप्रमाणें जें जें उत्पन्न झालें आणि जें जें पुढें उत्पन्न होणार अशा सर्व विश्वाला तूं व्यापकरून टाकलें आहेस ६ —अपक्व ( म्हणजे लहान दिसणाऱ्या ) धेनूंच्या कांसेंत तूं पक्व दुग्ध निर्माण केलेंस, आणि सूर्याला आकाशांत उंच चढवून दिलेंस. तर भक्तांनों, घर्मपात्र तप्त करतात त्याप्रमाणें स्तवनप्रिय इन्द्राप्रीत्यर्थ सुंदर तालसुरावर तुम्हीं सामगायनाचें तप करा ७.

---

## सूक्तम् ७८

नृमेधपुरुमेधौ इन्द्रः प्रगाथः

बृहत् इन्द्राय गायत मरुतो वृत्रहन्तमम् । येन ज्योतिर् अजनयन् ऋतावृधो देवं देवाय जागृवि ॥ १ ॥ अपा–धमत् अभिशस्तीर् अशस्तिहाऽ थ इन्द्रो द्युम्नी आऽभवत् । देवास्ते इन्द्र सख्याय येमिरे बृहद्भानो मरुत्‌गण ॥२॥ प्र व इन्द्राय बृहते मरुतो ब्रह्म अर्चत । वृत्रं हनति वृत्रहा शतक्रतु र्वज्रेण शतपर्वणा ॥३॥ अभि प्र भर धृषता धृषन्मनः श्रव श्चित् ते असत् बृहत् । अर्षन्तु आपो जवसा वि मातरो हनो वृत्रं जय स्वः ॥४॥ यत् जायथाः अपूर्व्य मघवन् वृत्रहत्याय । तत् पृथिवीम् अप्रथयस् तत् अस्तभ्नाः उत द्याम् ॥ ५ ॥ तत् ते यज्ञो अजायत तत् अर्कः उत हस्कृतिः । तत् विश्वम् अभि भूर् असि यत् जातं यत् च जन्त्वम् ॥ ६ ॥ आमासु पक्वम् ऐरयः आ सूर्यं रोहयो दिवि । घर्मं न सामन् तपता सुवृक्तिभि र्जुष्टं गिर्वणसे बृहत् ॥ ७ ॥

## सूक्त ७९

सर्व युद्धप्रसंगीं आम्हांला इन्द्राचा धांवा करावासा वाटतो, तर तो वृत्रनाशन, अधिज्यधन्वा, ऋक्स्तोत्रप्रिय इन्द्र सन्निध राहून आमचीं सवनें आणि सूक्तें अलंकृत करो. १ —वरप्रसादींचा प्रथम दाता तूं आहेस, तूं सत्यस्वरूप आहेस, ( भक्ताला ) ईश्वर बनविणारा तूंच. तर तुझ्या अपार तेजोवैभवाला योग्य आणि महान् उत्कटबलाच्या पुत्राला योग्य अशीं वरदानें आम्हीं हात जोडून मागत आहों २. —स्तुतिप्रिया, इन्द्रा, आम्हीं तुझ्याप्रीत्यर्थ ब्रह्मसूक्तें म्हणत आहोंत; तीं अद्वितीय खरीं, पण तुझ्या वर्णनाला कोतींच पडतात; तरी हे हरिदश्वा इन्द्रा, त्यांची जी योजना आम्हीं मनन करून केली आहे ती तूं मान्य करून घे. ३. —भगवंता, खरोखरच तूं सत्यस्वरूप आहेस. तूं कोणापुढेंहि मान वांकवीत नाहींस, आणि दुर्जनवृत्र कितीहि असले तरी त्यांचा तू पार उच्छेद करून टाकतोस. तर हे उत्कटबलोत्तमा वज्रधरा, भक्तांच्या सन्निध तूं दिव्यैश्वर्य आण. ४. —इन्द्रा, तूं यशोरूप आहेस; हे उत्कटबलाच्या प्रभो, तूं सोमरसाचा भोक्ता आहेस. जे कोणाकडूनहि जिंकले गेले नाहींत, ( इतकेंच काय, पण ) ज्यांच्या समोरहि कोणी उभे राहिले नाहींत, त्या वृत्रांच्या समुदायाला तूं केवळ एकटा असतांहि चराचरांचें रक्षण करणाऱ्या आपल्या वज्रानें ठार मारून टाकतोस. ५. —तर आतां खरोखर, हे परमेश्वरा, तुज सर्वज्ञापाशीं आम्हीं वरदानाची याचना करतों. असें वरदान आमचा निश्चित वांटा आहे अशा बुद्धीनें मागतों. हे इन्द्रा, तुझी पृथ्वी हा आमचा आश्रय,–आमचें आच्छादनच आहे, ( म्हणून ) तुझे सुखानंद—आम्हांला प्राप्त होवोत ६.

---

## सूक्तम् ७९

नृमेध पुरुमेधौः इन्द्रः बृहती.

आ नो विश्वासु हव्यः इन्द्रः समत्सु भूषतु । उप ब्रह्माणि सवनानि वृत्रहा परमज्याः ऋचीषमः ॥ १ ॥ त्वं दाता प्रथमो राधसाम् असि सत्य ईशानकृत् । तुविद्युम्नस्य युज्या ऽऽ वृणीमहे पुत्रस्य शवसो महः ॥ २ ॥ ब्रह्मा त इन्द्र गिर्वणः क्रियन्ते अनतिद्भुता । इमा जुषस्व हर्यश्व योजना इन्द्र या ते अमन्महि ॥ ३ ॥ त्वं हि सत्यो मघवन् अनानतो भूरि वृत्रा नि ऋञ्जसे । स त्वं शविष्ठ वज्रहस्त दाशुषे अर्वाञ्चं रयिम् आ कृधि ॥ ४ ॥ त्वम् इन्द्र यशाः असि ऋजीषी शवसस्पते । त्वं वृत्राणि हंसि अप्रतीनि एक इत् अनुत्ता चर्षणिधृता ॥ ५ ॥ तम् उ त्वा नूनम् असुर प्रचेतसं राधो भागमिवे–महे । महीव कृत्तिः शरणा त इन्द्र प्र ते सुम्ना नः अश्नवन् ॥ ६ ॥

## सूक्त ८०

एक कुमारिका खालीं नदीवर चालली होती; तेथें तिला मार्गामध्यें सोम आढळला. तो घेऊन घरीं जातांना ती त्या सोमाला म्हणाली कीं "तुझा रस पिळून, इन्द्राला, त्या सर्वसमर्थ देवाला मी अर्पण करूं ना ?" १. —तूं जो बालवीर घरोघर शोध करीत पहात चालला आहेस, तो तूं हा सोमरस पिऊन टाक. तो मी आपल्या दातांनीं चावून चुरला आहे, त्यांत पीठ मिसळून त्याचा करंभ बनविला आहे, त्याच्याबरोबर अपूप (अनारसे) आहेत, आणि तो रस प्राशन करतांना उक्थ गायनहि चालूं असतें २. —तूं कोण आहेस ह्याचा तर आम्हीं शोध चालविला आहेच; पण तूं कोण आहेस हें आम्हांला अजून कळलें नाहीं. असो. चंद्राप्रमाणें आल्हादप्रद सोमरसा, आतां तूं पात्रांमध्यें इन्द्रासाठीं हळू हळू पाझरत रहा ३. —तो आम्हांला सशक्त करील ना ? सज्ज करील ना ? आम्हांला तारुण्यसंपन्न करील ना ? पतीला आमचा तिट्कारा उत्पन्न झाला आहे म्हणून आम्हीं निघून चाललों; आतां आम्हीं इन्द्राबरोबर सहवास करूं ४. —इन्द्रा हीं तीन स्थळें उत्तम स्थितीला आण. माझ्या पित्याचें मस्तक, त्याचें नांगरून पेरलेलें शेत, आणि माझें ओटीपोट ५. —आमचें जें नांगरून पेरलेलें शेत आहे, तें आणि माझें आंग, आणि माझ्या पित्याचें मस्तक या सर्वांना केशयुक्त कर ६. —( अशी प्रार्थना ऐकून ) तिला ( एकदां ) आपल्या रथाच्या पोकळींत, ( एकदां ) गाडीच्या घळींत, आणि हे अमितपराक्रमा इन्द्रा, ( एकदां ) जोखडाच्या रिकाम्या जागेंत, याप्रमाणें तीन वेळां त्या '**अपाला**' नामक कुमारिकेला पवित्र केलेंस, आणि तिचें आंग सूर्याप्रमाणें तेजःपुंज बनविलेंस ७.

---

## सूक्तम् ८०

अपाला इन्द्रः पंक्ति

कन्या वार् अवयती सोमम् अपि स्रुताऽविदत् । अस्तं भरन्ती अब्रवीत् इन्द्राय सुनवै त्वा शक्राय सुनवै त्वा ॥ १ ॥ असौ य एषि वीरको गृहंगृहं विचाकशत् । इमं जम्भसुतं पिब धानावन्तं करंभिणम् अपूपवन्तम् उक्थिनम् ॥ २ ॥ आ च न त्वा चिकित्सामोऽधि चन त्वा न इमसि । शनैरिव शनकैरिव इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ३ ॥ कुवित् शकत् कुवित् करत् कुवित् नो वस्यसः करत् । कुवित् पतिद्विषो यतीर् इन्द्रेण संगमामहे ॥ ४ ॥ इमानि त्रीणि विष्टपा तानि इन्द्र वि रोहय । शिरस् ततस्य उर्वराम् आदिदम् मे उपोदरे ॥ ५ ॥ असौ च या नः उर्वरा आत् इमां तन्वं मम । अथो ततस्य यत् शिरः सर्वा ता रोमशा कृधि ॥ ६ ॥ खे रथस्य खेऽनसः खे युगस्य शतक्रतो । अपालाम् इन्द्र त्रिष् पूत्वी अकृणोः सूर्यत्वचम् ॥७॥

## सूक्त ८१

ऋत्विजांनों, तुम्हींहि सोमपेय (प्रसाद म्हणून) प्राशन करा, आणि इन्द्राचें गुण-गायन करा. त्या विश्वविजयी, अपारकर्तृत्व, सर्वांत अत्युदार अशा इन्द्राप्रीत्यर्थ गायन करा १. —सर्व लोक ज्याचा धांवा करितात, सर्व लोक ज्याचें स्तवन करितात, सर्वांना जो कीर्तनयोग्य वाटतो, आणि अनादिकालापासून जो विख्यात आहे, असा कोण म्हणून जर विचारलें तर असा इन्द्रच आहे असें सांगा २. —रणभैरव इन्द्र हाच महा सत्व-सामर्थ्यांचा दाता होय. तो परमथोर देव आम्हीं गुडघे लववून प्रार्थना करीत असतां आमच्या सन्मुख येवो ३. —उत्तम शिरस्त्राण चढविलेल्या इन्द्रानें अत्यंत यज्ञोत्सुक अशा सुदक्ष ऋषीचा आल्हादप्रद सोमरस, आणि त्या ऋषीचें यवाशिरमिश्रित मधुरपेय प्राशन केलें ४. —इन्द्रानें तुमचा सोमरस प्राशन करावा म्हणून तुम्हीहि मोठ्यानें ऋक्स्तोत्रें म्हणा. त्याला आनंदपूर्ण करणारी गोष्ट तीच होय ५. —तल्लीन करणारा सोमरस प्राशन करून देवानें, आपल्या दैवीं ओजस्वितेच्या योगानें सर्व भुवनें पादाक्रांत करून सोडलीं आहेत ६. —म्हणून अखिल स्तुतिवाणींत ज्याचा महिमा ओमप्रोत भरला आहे अशा त्या नित्यविजयी देवाला तूं आपल्या सहायासाठीं हलवून सोडतोस. ७. —युद्धोत्सुक परंतु निर्मल, अपराजित आणि सोमप्रिय परंतु निश्चल, शूर आणि अप्रतिहतपराक्रमी, अशा देवाला हलवून सोड ८. —आम्हांला (अविनाशी) संपत्ति अलोट दे; इन्द्रा तूं सर्वज्ञच आहेस. हे स्तुतींनीं न आकळणाऱ्या देवा, ज्यांतून आम्हांला पार पडलेंच पाहिजे अशा ह्या युद्धप्रसंगीं आम्हांवर कृपा कर ९. —म्हणूनच इन्द्रा, तुझ्या त्या शतशः किंबहूना सहस्रशः सत्वसामर्थ्याढ्य उत्साहांसह आमच्या सन्निध ये १०. —आम्हीं ध्याननिरतभक्त ध्यानानें तुझ्याजवळ प्राप्त झालों आहोंत,

## सूक्तम् ८१

आङ्गिरसः श्रुतकक्षः इन्द्रः अनुष्टुप्, गायत्री

पान्तम् आ वो अन्धसः इन्द्रम् अभि प्र गायत। विश्वासाहं शतक्रतुं मंहिष्ठं चर्षणीनाम्॥ १॥ पुरुहूतं पुरुष्टुतं गाथान्यं सनश्रुतम्। इन्द्रः इति ब्रवीतन॥ २॥ इन्द्रः इत् नो महानां दाता वाजानां नृतुः। महाँ अभिज्ञु आ गमत्॥ ३॥ अपात् उ शिप्री अन्धसः सुदक्षस्य प्रहोषिणः। इन्दोर् इन्द्र यवाशिरः॥ ४॥ तम् ऊं अभि प्र अर्चत इन्द्रं सोमस्य पीतये। तत् इत् हि अस्य वर्धनम्॥ ५॥ अस्य पीत्वा मदानान् देवो देवस्य ओजसा। विश्वा ऽभि भुवना भुवत्॥ ६॥ त्यम् उ वः सत्रासहं विश्वासु गीर्षु आयतम्। आ च्यावयसि ऊतये॥ ७॥ युध्मं सन्तं अनर्वाणं सोमपाम् अनपच्युतम्। नरम् अवार्यक्रतुम्॥ ८॥ शिक्षा ण इन्द्र राय आ पुरु विद्वाँ ऋचीषम। अवा नः पार्ये धने॥ ९॥ अत श्चित् इन्द्र णः उप आ याहि शतवा-

तर आमच्या अश्वारूढ सैनिकांसह, हे सर्वसमर्था, प्रकाशाचा भेद करणाऱ्या आजच्या युद्धांत, हे वज्रधरा, आम्हीं विजयी होऊं असें कर ११. —धेनू तृणधान्याच्या प्रदेशांत रमतात त्याप्रमाणें, हे अमितकर्तृत्वा इन्द्रा, आम्हीं तुजला सामगायनामध्यें तल्लीन करून टाकतों १२. —( आम्ही मर्त्यच आहों तेव्हां ) मर्त्यस्वभावाप्रमाणें आम्ही वासनेच्या पाठीमागें लागणारच; पण हे वज्रधरा, त्या आमच्या सदाकांक्षांच्या पूर्णतेला आम्हीं पावूं १३. —हे प्रभाव-प्रभवा, पुष्कळ कामलोलुप जन तुजला शरण आले; परंतु हे इन्द्रा, कोणाचीहि इच्छा तुझ्या सामर्थ्याला पुरून उरली नाहीं १४. —तर हे मनोरथवर्षका वीरा, वरदायिनी परंतु भीषण, तडफदार परंतु धोरणी अशी जी तुझी बुद्धि तिच्यायोगानें तूं आमचें रक्षण कर. १५ —खरोखर हे अतुलप्रज्ञा जो तुझा हर्षावेग तुझ्या दिव्यैश्वर्यांची पराकाष्ठा दाखवितो, त्याच्यायोगानें त्या हर्षावेगांत तूं हर्षनिर्भर हो १६. —ज्या हर्षावेगाची प्रख्याति अतिशय पसरली आहे, ज्याच्या आवेशांत तूं वृत्राचा समूळ उच्छेद केलास, जो भक्तांना ओजस्विता आणतो ( त्या हर्षावेगांत तूं तल्लीन हो ) १७. —तुझ्याकडून जो वरप्रसाद मिळतो तो, हे वज्रधरा, आम्हीं जाणतों; हे सत्यस्वरूपा, सोमप्रिया, हे अद्भुतचारित्र्या, सर्व मनुष्यांमध्यें ( तुझ्या प्रसादाची महती ) आम्हीं जाणतों १८. —हर्षोन्मुख इन्द्राची महती आणि या सोमरसाची महती आमच्या स्तुति वर्णन करोत, कविजन त्याच्याप्रीत्यर्थ अर्क स्तोत्रें म्हणोत १९. —ज्या इन्द्राच्या ठायीं (जगतांतील) यच्चावत् शोभा रममाण होतात, ज्याचे ठिकाणीं सात भक्तजन तल्लीन होतात त्या इन्द्राला, सोमरस पिळून होतांच आम्हीं पाचारण करूं २०. " त्रिकद्रुक " सत्रामध्यें दिव्यविभूतिंनीं ज्ञान-यज्ञाला आरंभ केला, त्याच यज्ञाचें संवर्धन आमचीं स्तवनें करोत २१. —नद्या ज्याप्रमाणें समुद्राला मिळतात त्याप्रमाणें आल्हाद-

---

वाजया । इषा सहस्रवाजया ॥ १० ॥ अयाम धीवतो धियः अर्वद्भिः शक्र गोदरे । जयेम पृत्सु वाजीवः ॥ ११ ॥ वयम् उ त्वा शतक्रतो गावो न यवसेषु आ । उक्थेषु रणयामसि ॥ १२ ॥ विश्वा हि मर्त्यत्वना अनुकामा शतक्रतो । अगन्म वज्रिन् आशसः ॥ १३ ॥ ते सु पुत्र शवसो अवृत्रन् कामकातयः । न त्वाम् इन्द्रा-तिरिच्यते ॥ १४ ॥ स नो वृषन् सनिष्ठया सं घोरया द्रविल्न्वा । धिया विड्ढि पुरन्ध्या ॥ १५ ॥ यस् ते नूनं शतक्रतो इन्द्र द्युम्नितमो मदः । तेन नूनं मदे मदेः ॥ १६ ॥ यस् ते चित्रश्रवस्तमो य इन्द्र वृत्रहन्तमः । यः ओजोदातमो मदः ॥ १७ ॥ विद्म हि यस् ते अद्रिवस् त्वा दत्ता सत्य सोमपाः । विश्वासु दस्म कृष्टिषु ॥ १८ ॥ इन्द्राय मद्वने सुतं परिष्टोभन्तु नो गिरः । अर्कम् अर्चन्तु कारवः ॥ १९ ॥ यस्मिन् विश्वाः अधि श्रियो रणन्ति सप्त संसदः । इन्द्रं सुते हवामहे ॥ २० ॥ त्रिकद्रुकेषु चेतनं देवासो यज्ञम् अत्नत । तमित् वर्धन्तु नो गिरः ॥ २१ ॥ आ त्वा विशन्तु इन्दवः समुद्रम् इव सिन्धवः । न त्वाम् इन्द्रा-तिरिच्यते ॥ २२ ॥ विव्यक्थ महिना

प्रद सोमरस तुझ्या ठिकाणीं प्रवेश करोत. हे इन्द्रा, ते तुझ्याठायीं मावणार नाहींत असें होणारच नाहीं २२. —सोमाचा तो रस, हे वीरा, तूं आपल्या उदरांत गृहण करतोस तो, हे अखण्ड जागृत देवा इन्द्रा, तूं आपल्या महिम्यानें सर्वत्र पसरून देऊन पचवून टाकतोस २३. —म्हणून हा आमचा सोमरस हे वृत्रनाशना, तुझ्या उदरांत तृप्ति उत्पन्न करो; तुझें दैवी तेज तो पूर्णत्वानें प्रकट करो २४. —श्रुतकक्ष नांवाचा भक्त (चापल्यरूप) अश्वांसाठीं तुझें मनःपूर्वक गुणसंकीर्तन करीत आहे. प्रकाश-गोधनांसाठीं आणि इन्द्राचें दिव्यतेज प्रकट व्हावें यासाठीं, अगदीं पाहिजे तसें गायन करीत आहे २५. —हे इन्द्रा आमचा सोमरस पिळून सिद्ध होतांच तूं आमच्या सन्निध अगदीं संतोषानें येतोस, आणि हे सर्वसमर्था, आम्हांला यथायोग्य वरदान देतोस २६. —तूं जरी अत्युच्च लोकीं असलास तरी, हे अशनिधरा, तेथपर्यंत देखील आमच्या स्तुति जाऊन पोहोंचतील, आणि आम्हीहि तुझ्याच चरणीं तल्लीन होऊं २७. —ह्याप्रमाणें तुजला वीर्यशाली भक्तच आवडतात; तूंहि शूर आहेस आणि युद्धांत अगदीं ठाम निश्चल राहतोस, म्हणून तुझें चित्त अशानेंच प्रसन्न करावें लागतें २८. —म्हणूनच कर्मनिष्णात अशा सर्व भक्तांनीं आपआपली सेवा तुझ्या ठिकाणीं अर्पण केली आहे; तर हे इन्द्रा, (तूं प्रसन्न होऊन) माझ्यावरोवर रहा २९. —एखाद्या आळशी ऋत्विजाप्रमाणें स्वस्थ राहूं नको तर, हे सत्वसामर्थ्यांच्या प्रभो, (ज्ञान) गोधनप्रद अशा आमच्या सोमाच्या (आनंदांत) निमग्न हो ३०. —हे इन्द्रा, आम्हांवर रोख धरणारे प्रतिस्पर्धी, दिवसा किंवा रात्रीं, आम्हांस घेरून टाकतील असें करूं नको. इतकेंच नाहीं, तर तुझ्या सहायानें आम्हींच त्यांना ठोकून काढूं असें कर ३१. —हे इन्द्रा, तुझ्या सहायानें आम्हीं आमच्या प्रतिस्पर्ध्यांस उलट उत्तर देऊंच; कारण तूं आमचा आणि आम्हीं तुझे आहोंत ३२. —तुझ्यावर निष्ठा ठेवणारे, आणि तुझ्या मित्रत्वाला पावलेले भक्त वरंवार तुझेंच स्तवन प्रसिद्धपणें करणार; आणि हे इन्द्रा, तुलाच अनुसरणार ३३.

---

वृषन् भक्षं सोमस्य जागृवे । य इन्द्र जठरेषु ते ॥ २३ ॥ अरं ते इन्द्र कुक्षये सोमो भवतु वृत्रहन् । अरं धामभ्य इन्दवः ॥ २४ ॥ अरम् अश्वाय गायति श्रुतकक्षो अरं गवे । अरम् इन्द्रस्य धाम्ने ॥ २५ ॥ अरं हि ष्मा सुतेषु णः सोमेषु इन्द्र भूषसि । अरं ते शक्र दावने ॥ २६ ॥ पराकात्तात् चित् अद्रिवस् त्वां नक्षन्तु नो गिरः । अरं गमाम ते वयम् ॥२७॥ एवा हि असि वीरयुर् एवा शूर उत स्थिरः । एवा ते राध्यं मनः ॥ २८ ॥ एवा रातिस् तुवीमघ विश्वेभि र्धायि धातृभिः । अधा चित् इन्द्र मे सचा ॥२९॥मो षू ब्रह्मेव तन्द्रयु र्भुवो वाजानां पते । मत्स्वा सुतस्यगोमतः ॥ ३० ॥ मा नः इन्द्रा–भि आदिशः सूरो अक्तुषु आ यमन् । त्वा युजा वनेम तत् ॥ ३१ ॥ त्वये–त् इन्द्र युजा वयं प्रति ब्रुवीमहि स्पृधः । त्वम् अस्माकं तव स्मसि ॥ ३२ ॥ त्वाम् इत् हि त्वायवः । अनुनोनुवत श्चरान् । सखायः इन्द्र कारवः ॥ ३३ ॥

## सूक्त ८२

ज्याचें दातृत्व सर्वविश्रुत, जो वीराग्रणीं, ज्याचीं अखिल कृत्यें मानवहितकर, आणि जो स्वतः अनिरुद्ध संचारी, अशा (परमेश्वरा)च्या सन्मुख हे सूर्या तूं उदय पावतोस १. —ज्यानें आपल्या बाहुबलानें ( दुर्जनांचीं ) तटबंदीचीं नव्याण्णव नगरें उध्वस्त केलीं, आणि ज्या वृत्रनाशन देवानें अहि भुजंगास ठार केलें (त्या देवासन्मुख तूं उदय पावतोस) २. —तो इन्द्र आमचा कल्याणकारी सहायकर्ता आहे. अश्वसंपन्न, गोसंपन्न, आणि धनधान्यसंपन्न वरप्रसादांचें दुग्ध तो इतकें देतो कीं जणों उदकांचा प्रचंड लोंढाच ३. —आज ज्या ज्या वस्तूवर हे तमोनाशना, सूर्या, तूं उदय पावला आहेस, त्या त्या यच्चावत् वस्तु हे इन्द्रा तुझ्याच आधीन आहेत ४. —अथवा हे अत्यंतसमृद्धा, हे सज्जनप्रतिपालका देवा, "मी (तुझा भक्त) कधीं मरणार नाहींच" असें जरी तूं म्हणशील तरी देखील ते तुझे शब्द अगदीं ( अक्षरशः ) खरे ठरतील. ५. —जे जे सोमरस येथें किंवा दूरच्या देशांत भक्तजन सिद्ध करतात, त्या त्या ठिकाणीं ते रस प्राशन करण्याकरितां हे इन्द्रा, तूं गमन करतोस ६. —अशा त्या इन्द्राची, त्यानें प्रबल वत्राचा वध करण्यासाठीं आपलें सत्वसामर्थ्य प्रकट करावें म्हणून आम्हीं विनवणी करतों. तोच वीर्यशाली आमचा वीरनायक झाला आहे ७. —इन्द्र ( परमेश्वर ) म्हटला म्हणजे तो दातृत्वांत निमग्न असावयाचाच. तो अत्यंत ओजस्वी, आनंदमग्न, प्रतापदीप्तिमान, पुण्यश्लोक आणि सोमप्रिय असावयाचाच ८. —तो स्तुतींनीं ( प्रसन्न होऊन ) आपल्या वज्राप्रमाणेंच भरगच्च आणि प्रबल होतो. त्यानें एकदां ठाण मांडलें कीं कोणाच्यानेंहि हलणारा नव्हे. तो धीरोद्धत आणि अजिंक्य असा पुढें चालून जातो ९. —हे देवा ! तुझें संकीर्तन केलें आहे, तर आमच्यावर कोसळणाऱ्या संकटांतून आमचा

## सूक्तम् ८२

सुकक्षः इन्द्रः गायत्री

उत् घेद्-भि श्रुतामघं वृषभं नर्यापसम्। अस्तारम् एषि सूर्य ॥ १ ॥ नव यो नवतिं पुरो बिभेद बाहु ओजसा। अहिं च वृत्रहा ऽ वधीत् ॥ २ ॥ स नः इन्द्रः शिवः सखा अश्वावत् गोमत् यवमत्। उरुधारे-व दोहते ॥ ३ ॥ यत् अद्य कत् च वृत्रहन् उत् अगाः अभि सूर्य । सर्वं तदिन्द्र ते वशे ॥ ४ ॥ यत् वा प्रवृद्ध सत्पते न मरै इति मन्यसे। उतो तत् सत्यम् इत् तव॥५॥ ये सोमासः परावति ये अर्वावति सुन्विरे । सर्वान् तान् इन्द्र गच्छसि ॥ ६ ॥ तत् इन्द्रं वाजयामसि महे वृत्राय हन्तवे। स वृषा वृषभो भुवत् ॥ ७ ॥ इन्द्रः स दामने कृतः ओजिष्ठः स मदे हितः। द्युम्नी श्लोकी स सोम्यः ॥ ८ ॥ गिरा वज्रो न संभृतः सबलो अनपच्युतः। ववक्षे ऋष्वो अस्तृतः ॥ ९ ॥ दुर्गे चित् नः सुगं कृधि गृणान इन्द्र गिर्वणः । त्वंच मघवन्

मार्ग सुगम कर. हे स्तवनप्रिया इन्द्रा, हे भगवंता तूं मनावर घेच १०. —कारण पहा कीं, तुझी आज्ञा, विश्वावरील तुझी राजसत्ता, कोणीहि झुगारून देऊं शकत नाहीं; एखादा देवहि देऊं शकणार नाहीं, मग संकुचित सामर्थ्याचा मानव कोठून देईल ? ११. —शिवाय असें कीं, ज्याचा कोणीहि प्रतिकार करूं शकत नाहीं अशा प्रतापाची सेवा, हे सुंदरशिरस्त्राण धारण करणाऱ्या देवा, आकाश आणि पृथिवी हे दिव्य गोल निरंतर करीत आहेत १२. —कृष्णवर्ण, आरक्तवर्ण, ठिपकेदार किंवा कशीहि धेनू असो तिच्या कासेंत तूं जें दुग्ध उत्पन्न करतोस तें पांढरें तकतकीतच असतें १३. —आणखी असें कीं, जेव्हां अहि भुजंगाच्या त्वेषापासून सर्व दिव्यविबुध दूर निघून गेले, तेव्हां त्या जनावराची मुसंडी त्यांच्याहि अनुभवास आली होती १४. —त्या वेळीं माझा वृत्रनाशन इन्द्र हाच त्यांचा कैवारी रक्षणकर्ता झाला, आणि त्या अजात शत्रु अप्रतिहत देवानें आपलें पौरुष निदर्शनास आणलें १५. —जो वृत्राचा अगदीं पार धुव्वा उडवून देणारा, त्याचा सपाटा सर्व मनुष्यांमध्यें तुम्हीं ऐकलाच असेल; तर त्याचा श्रेष्ठप्रसाद प्राप्त व्हावा म्हणून त्याच्या ( पाया ) पाशीं मी आतां धरणें धरणार १६. —हे अनंतनामा, हे अनंतस्तवना देवा, ( ज्ञान)धेनू देणारी जी ही ध्यानस्तुति, तिच्यायोगानें प्रत्येक सोमार्पण प्रसंगीं तूं ( भक्तां )सन्निधच राहिला आहेस १७. —तर ज्याच्या प्रीत्यर्थ असंख्य भक्त सोमरस सिद्ध करतात, तो ( देव )आमचें हृद्गत ओळखो. तो आमच्या ( अज्ञान ) अन्धकाराचा नाशक, ( आमच्या शत्रूंचा नाशक) होवो. तो सर्वसमर्थ देव आमची विज्ञाप्ति ऐकून घेवो १८. —तूं आम्हांला असें कोणतें सहाय देणार कीं त्यामुळें तूं हर्षभरित झाला आहेस ? हे मनोरथ पूरका वीरा, तें कोणतें तें आम्हांला सांग. आणि स्तोतृजनासाठीं तें घेऊन ये १९. —सोमरस पिळून सिद्ध होतांच, तो वीराग्रणी, तो वृत्रनाशन, " नियुत् " अश्व जोडून कोणत्या भक्ताचा सोमरस प्राशन करण्यासाठीं आनंदित झाला ? २०. —हर्षनिर्भर होऊन आम्हांला दिव्यसंपत्ति सहस्रशः देणारा असा तूं, ह्या भक्ताला

---

वशः ॥ १० ॥ यस्य ते नू चित् आदिशं न मिनन्ति स्वराज्यम् । न देवो नाध्रिगु र्जनः ॥ ११ ॥ अधा ते अप्रतिष्कुतं देवी शुष्मं सपर्यतः । उभे सुशिप्र रोदसी ॥१२॥ त्वम् एतत् अधारयः कृष्णासु रोहिणीषु च । परुष्णीषु रुशत् पयः ॥ १३ ॥ वि यत् अहेर् अध त्विषो विश्वे देवासो अक्रमुः । विदत् मृगस्य ताँ अमः ॥१४ ॥ आत् उ मे निवरो भुवत् वृत्रहा ऽदिष्ट पौंस्यम् । अजातशत्रुर् अस्तृतः ॥१५॥ श्रुतं वो वृत्रहन्तमं प्र शर्धं चर्षणीनाम् । आ शुषे राधसे महे ॥ १६ ॥ अया धिया च गव्यया पुरुणामन् पुरुष्टुत । यत् सोमे सोम आऽभवः ॥ १७ ॥ बोधिन्मनाः इत् अस्तु नो वृत्रहाभूरि आसुतिः । शृणोतु शक्र आशिषम् ॥ १८ ॥ कया त्वं न ऊत्या अभि प्र मन्दसे वृषन् । कया स्तोतृभ्य आभर ॥ १९ ॥ कस्य वृषा सुते सचा नियुत्वान् वृषभो रणत् । वृत्रहा सोमपीतये ॥ २० ॥ अभी षु णस् त्वं रयिं मन्दसानः सहस्रिणम् ॥

वरद हो २१. —हे सोम सपत्नीक आहेत; त्यांचें प्राशन ( देवानें ) करावें म्हणून ते इतक्या तळमळीनें तिकडे जातात कीं त्यांचा जो चोथा राहतो तो सुद्धां तृप्ति देणारा असतो, म्हणून तोहि नदीच्या उदकांत ( नदींतील प्राण्यांनीं संतुष्ट व्हावें म्हणून ) जाऊन पडतो २२. —ज्या आहुति अर्पण झाल्या आणि अध्वरयागांत आनंदवर्धित झाल्या त्या आहुतींनीं इन्द्राला आपल्या तेजानें अवभृथ स्नान घालण्यास नेलें २३. —इन्द्राबरोबरच हर्षित होणारे सोन्याच्या अयाळाचे हरिद्वर्ण अश्व, आम्हीं समर्पण केलेल्या आहुतीकडे ( त्याला ) घेऊन येवोत २४. —हा सोमरस तुझ्यासाठीं आहे. हें कुशासनहि तेजोवैभवा अग्ने तुझ्याकरितां पसरलें आहे. तर भक्तजनाच्या इच्छेनुरूप तूं इन्द्राला येथें घेऊन ये २५. —तुझें चातुर्यबल ( असें आहे कीं ) त्यानें उत्तम रत्नें जीं नक्षत्रें तीं भक्ताकरितां आपल्या हातीं ठेविलीं आहेत तर त्या भक्तजनांसाठीं तूं इन्द्राप्रीत्यर्थ मोठ्यानें " अर्क " स्तोत्र म्हण २६. —तुझें ईश्वरीसामर्थ्य, हे अनंतप्रज्ञ देवा, मी सर्व उक्थस्तोत्रांमध्यें ( सांठवून ) ठेवतों; तर हे इन्द्रा, आम्हांवर दया कर २७. —हे इन्द्रा, जर तूं आम्हांवर कृपा करणार, तर जी जी गोष्ट कल्याणकारक आहे ती ती घेऊन ये; मनोत्साह, ऊर्जस्विता ( इत्यादि ) सर्व कांहीं, हे अपारकर्तृत्वा देवा, तूं घेऊन ये २८. —हे इन्द्रा जर तूं आम्हांवर कृपा करणार आहेस, तर हे अपारकर्तृत्वा देवा, हितप्रद अशा सर्व वस्तु तूं आम्हांसाठीं आण २९. —वृत्राचा समूळ संहार करणाऱ्या देवा, इन्द्रा, तूं आम्हांवर कृपा करतोस म्हणून तर आम्हीं सोमरस सिद्ध करून तुजला हांक मारीत आहोंत ३०. —हे आनंदाच्या नाथा, आमच्या सोमरसाकडे तूं आपल्या हरिद्वर्ण अश्वांसहित ये; आपल्या हरिश्वर्ण अश्वांसहि आमच्या सोमरसाकडे ये. ३१. —इन्द्र हा वृत्राचा अगदीं नायनाट करणारा आणि अनंतकर्तृत्वशाली अशा दोन्ही प्रकारांनीं पूर्वीपासूनच सर्वांना विदित आहे. तर हे देवा, तूं हरिद्वर्ण अश्वांसह आमच्या सोमरसाकडे आगमन कर ३२. —हे वृत्रनाशना, ह्या सोमरसाचें प्राशन करणारा

प्रयन्ता बोधि दाशुषे ॥ २१ ॥ पत्नीवन्तः सुता इमे उशन्तो यन्ति वीतये । अपां जग्मिर् नि चुम्पुणः ॥ २२ ॥ इष्टाः होत्राः असृक्षत इन्द्रं वृधासो अध्वरे । अच्छाऽवभृथम् ओजसा ॥ २३ ॥ इह त्या सधमाद्या हरी हिरण्यकेश्या । वोळ्हाम् अभि प्रयो हितम् ॥ २४ ॥ तुभ्यं सोमाः सुता इमे स्तीर्णं बर्हिर् विभावसो । स्तोतृभ्यः इन्द्रम् आ वह ॥ २५ ॥ आ ते दक्षं वि रोचना दधत् रत्ना वि दाशुषे । स्तोतृभ्य इन्द्रम् अर्चत ॥ २६ ॥ आ ते दधामि इन्द्रियम् उक्था विश्वा शतक्रतो । स्तोतृभ्यः इन्द्र मृळय ॥ २७ ॥ भद्रंभद्रं नः आभर इषम् ऊर्जं शतक्रतो । यत् इन्द्र मृळयासि नः ॥ २८ ॥ स नो विश्वानि आ भर सुवितानि शतक्रतो । यत् इन्द्र मृळयासि नः ॥ २९ ॥ त्वाम् इत् वृत्रहन्तम सुतावन्तो हवामहे । यत् इन्द्र मृळयासि नः ॥ ३० ॥ उप नो हरिभिः सुतं याहि मदानां पते । उप नो हरिभिः सुतम् ॥ ३१ ॥ द्विता यो

खरोखर तूंच आहेस, तर आपल्या हरिद्वर्ण अश्वांसह आमच्या सन्निध आगमन कर. ३३. —आम्हांमध्यें उत्साह संचरावा म्हणून ( देव ) आम्हांला 'ऋभुक्षण' ( कौशल-श्रेष्ठता ) देवो; ऋभु ( चातुर्य )युक्त वैभव देवो, सत्ववीर इन्द्र आम्हांला सत्वयुक्त ऐश्वर्य देवो. ३४.

## सूक्त ८३

दानशूर मरुतांची 'पृश्नि' नांवाची संकीर्तनोत्सुक धेनू भक्तांना आपलें दुग्ध पाजते; आणि ( इन्द्राच्या ) ती रथाला जोडली म्हणजे ता तो रथ ओढून ( भक्ताकडे ) नेते १. —जिच्याजवळ राहून सर्व दिव्यविबुध सृष्टिनियम बरोबर रीतीनें पाळतात; सूर्य आणि चंद्र हे देखील सर्व जगाला पाहतां यावें म्हणून प्रकाशत असतात २. —यासाठीं सर्व आर्यलोक आणि कविजन देखील मरुतांनीं सोमरस प्राशन करावा म्हणून त्यांचें परोपरीनें गुणवर्णन करितात ३. —हा येथें सोमरस पिळून ठेवला आहे, आणि मरुत्गण त्याचें प्राशन करीत आहेत, त्याप्रमाणेंच स्वयंप्रकाश अश्वीदेवहि प्राशन क रीत आहेत. ४. —गाळून ( ऊर्णावस्त्रांत ) छानून स्वच्छ केलेला आणि तीन पात्रांत निरनिराळा ठेवलेला सोमरस, प्रजावान् ( लोकपालक ) मित्र अर्यमा आणि वरुण हे प्राशन करीत असतात ५. —आणि इन्द्र देखील ह्या गोदुग्ध-मिश्रित सोमरसाचा आस्वाद घेतो आणि यज्ञसंपादक ( जो अग्नि ) त्याच्याप्रमाणें प्रातःकालीं ( रसप्राशनानें ) हर्षनिर्भर होतो ६. —आमचे धुरीण ( जे आदित्य देव ) त्यांनीं आपला तेजोभर केव्हां प्रकट केला ? ज्यांचें चातुर्यबल पवित्र आहे

वृत्रहन्तमो विदे इन्द्रः शतक्रतुः । उप नो हरिभिः सुतम् ॥ ३२ ॥ त्वं हि वृत्रहन् एषां । पाता सोमानाम् असि ॥ उप नो हरिभिः सुतम् ॥ ३३ ॥ इन्द्रः इषे ददातु नः ऋभुक्षणम् ऋभुं रयिम् । वाजी ददातु वाजिनम् ॥ ३४ ॥

## सूक्तम् ८३

बिन्दुः पूतदक्षो वा मरुतः गायत्री

गौ र्धयति मरुतां श्रवस्यु र्माता मघोनाम् । युक्ता वह्नी रथानाम् ॥ १ ॥ यस्याः देवाः उपस्थे व्रता विश्वे धारयन्ते । सूर्यामासा दृशे कम् ॥ २ ॥ तत्सु नो विश्वे अर्य आ सदा गृणन्ति कारवः ॥ मरुतः सोमपीतये ॥ ३ ॥ अस्ति सोमो अयं सुतः पिबन्ति अस्य मरुतः । उत स्वराजो अश्विना ॥ ४ ॥ पिबन्ति मित्रो अर्यमा तना पूतस्य वरुणः । त्रिषधस्थस्य जावतः ॥ ५ ॥ उतो नु अस्य जोषम् आ इन्द्रः सुतस्य गोमतः । प्रातर् होतेव मत्सति ॥ ६ ॥ कत् अत्विषन्त सूरयस् तिर आप

असे ते आदित्य पाण्यांतून पार जावें त्याप्रमाणें घातकी दुष्टांच्या समुदायांतून आमच्याकडे केव्हां वळणार ? १७. —तुम्हां परमथोर देवांच्या कोणत्या कृपेची आतां आम्ही याचना करावी ? ज्यांचा सणसणीतपणा आश्चर्यकारक आहे असे जे तुम्हीं, त्या तुमच्या कोणत्या कृपेची याचना आम्हीं होऊन करावी ? ८. —ज्या मरुतांनीं सोमरसप्राशनार्थ पृथ्वीवरील प्रदेशांचा आणि आकाशांतील नक्षत्रांचा विस्तार केला,—त्यांना, म्हणजे हे पवित्रबलशाली मरुतानों तुम्हीं द्युलोकांतून येऊन ह्या सोमरसाचें प्राशन करावें म्हणून तुम्हांला आतां आम्हीं त्वरेनें पाचारण करतों १०. —त्यांना म्हणजे ज्या मरुतांनीं भूलोक आणि द्युलोक असे दोन्ही आपआपल्या जागीं रोखून धरले आहेत त्या मरुतांना सोमरसप्राशनार्थ आम्हीं पाचारण करतों ११. —त्याला म्हणजे पर्वतनिवासी वृष्टिकर अशा मरुत्समुदायाला ह्या सोमरसाच्या प्राशनासाठीं पाचारण करितों १२.

## सूक्त ८४

सोमरस पिळून सिद्ध होतांच, आमच्या स्तुतिवाणी, हे स्तवनप्रिया देवा, सेनाधुरंधराप्रमाणें जो तूं त्या तुजपाशीं जाऊन उभ्या ठाकल्या; आणि हे इन्द्रा, धेनू वत्साकरितां हंबरतात त्याप्रमाणें त्या स्तुतींनीं तुजला अनुलक्षून मोठ्यानें स्तुतिघोष केला १. —( तूं अत्यंत अचल, पण) ह्या शुभ्रतेजकर सोमरसांनीं मात्र, हे स्तवनप्रिया इन्द्रा, तुजला हलविलें आहे. हें सोमपेय तुझ्याकरितां सर्व ठिकाणीं अगदीं सिद्ध असतें, तर ह्या सोमपेयाचें तूं प्राशन कर २. —श्येन पक्ष्यानें स्वर्लोकाहून आणलेल्या ह्या सोमवल्लीचा रस, हे इन्द्रा, तूं हर्षोत्फुल्ल होण्यासाठीं प्राशन कर. तूं यच्चावत् मनुष्यांचा प्रतिपालक आहेस, ह्या मानवी

इव स्रिधः । अर्षन्ति पूतदक्षसः ॥ ७ ॥ कत् वो अद्य महानां देवानाम् अवो वृणे । त्मना च दस्मवर्चसाम् ॥ ८ ॥ आ ये विश्वा पार्थिवानि पप्रथन् रोचना दिवः । मरुतः सोमपीतये ॥९॥ त्यान् पूतदक्षसो दिवो वो मरुतो हुवे । अस्य सोमस्य पीतये ॥१०॥ त्यान् नु ये वि रोदसी तस्तभु मरुतो हुवे । अस्य सोमस्य पीतये ॥ ११ ॥ त्यं नु मारुतं गणं गिरिष्ठां वृषणं हुवे । अस्य सोमस्य पीतये ॥ १२ ॥

## सूक्तम् ८४

तिरश्ची इन्द्रः अनुष्टुप्

आ त्वा गिरो रथीरिव अस्थुः सुतेषु गिर्वणः । अभि त्वा समनूषत इन्द्र वत्सं न मातरः ॥ १ ॥ आ त्वा शुक्राः अचुच्युवुः सुतासः इन्द्र गिर्वणः । पिबा तु अस्य अन्धसः इन्द्र विश्वासु ते हितम् ॥ २ ॥ पिबा सोमं मदाय कम् इन्द्र श्येनाभृतं

प्रजांचा राजा आहेस ३. —तिरश्वी ऋषि तुझी सेवा करीत असतो, तर हे इन्द्रा, त्याचा धांवा तूं ऐक; आणि उत्कृष्टशौर्य आणि (ज्ञान) गोधन यांनीं युक्त अशा ऐश्वर्यानें (त्याची इच्छा) पूर्ण कर. तूं परमथोर आहेस, तेव्हां हें तूं करशीलच ४. —हे इन्द्रा, ह्या तिरश्चीनें (तुझ्याप्रीत्यर्थ) एक अपूर्व आणि उल्हासकारक कवन केलें आहे; (इतकेंच नाहीं तर) जिच्या योगानें मनाला सारासार ज्ञान प्राप्त होतें, जी पुरातन आहे, जिच्यामुळें सनातन सद्धर्माचें होतें अशी ध्यानपद्धतीहि त्यानें योजिली आहे ५. —ज्या इन्द्राला सामगायनें हर्षभरानें वृद्धिंगत करतात त्या इन्द्राचें गुणानुवाद आपणहि गाऊं. त्याचे पराक्रम अगणित आहेत, त्या पराक्रमांचें अंशभागी आम्हीं व्हावें हीच आमची मनीषा आहे ६. —तर चला या; त्या निष्कलंक इन्द्राचें निर्दोष सामगायनानें स्तवन करूं; विशुद्ध सामसूक्तांनीं ज्याचें यश वृद्धिंगत होतें त्या इन्द्राचें गुणगायन करूं. निष्कलंक आणि (भक्तांना) आशीर्वाद देणारा इन्द्र तेणेंकरून हर्षनिर्भर होवो ७. —इन्द्रा तूं शुद्धस्वरूप आहेस, तर निष्कलंक असा तूं आपल्या सहायक शक्तींसह येथें आगमन कर. शुद्धस्वरूप असा तूं आम्हांला ऐश्वर्य दे. आणि सोमप्रिय आणि शुद्धस्वरूप असा तूं हर्षनिर्भर हो ८. —इन्द्रा, खरोखर तूं शुद्धस्वरूप म्हणूनच आम्हांला अविनाशी ऐश्वर्य देतोस; तूं शुद्धस्वरूप म्हणूनच (भक्तांना) उत्कृष्ट संपत्ति देतोस; तूं शुद्धस्वरूप म्हणूनच अज्ञानरूप शत्रूंचा नाश करतोस, आणि तूं शुद्धस्वरूप म्हणूनच (भक्ताला) सत्वसामर्थ्याचा अंशभागी करतोस ९.

## सूक्त ८५

ह्याच्यासाठीं उषादेवींनीं आपला प्रवास जरा लांबविला. याच्यासाठीं तमोमय रात्रींनीं (भक्तमुखांतून) रम्य शब्द वदविला. याच्या साठीं (लोक)जननी ज्या

---

सुतम् । त्वं हि शश्वतीनां पती राजा विशाम् असि ॥ ३ ॥ श्रुधी हवं तिरश्च्याः इन्द्र यस् त्वा सपर्यति । सुवीर्यस्य गोमतो राय–स्पूर्धि महाँ असि ॥ ४ ॥ इन्द्र य स्ते नवीयसीं गिरं मन्द्राम् अजीजनत् चिकित्वित्मनसं धियं प्रत्नाम् ऋतस्य पिप्युषीम् ॥ ५ ॥ तमु स्तवाम यं गिरः इन्द्रम् उक्थानि वावृधुः । पुरूणि अस्य पौंस्या सिषासन्तो वनामहे ॥ ६ ॥ एतो नु इन्द्रं स्तवाम शुद्धं शुद्धेन साम्ना । शुद्धैर् उक्थै वावृध्वांसं शुद्ध आशीर्वान् ममत्तु ॥ ७ ॥ इन्द्रः शुद्धो न आ गहि शुद्धः शुद्धाभिर् ऊतिभिः । शुद्धो रयिं नि धारय शुद्धो ममद्धि सोम्यः ॥ ८ ॥ इन्द्रः शुद्धो हि नो रयिं शुद्धो रत्नानि दाशुषे । शुद्धो वृत्राणि जिघ्नसे शुद्धो वाजं सिषाससि ॥ ९ ॥

## सूक्तम् ८५

द्युतानः  मरुतः  त्रिष्टुप्

अस्मै उषासः आऽतिरन्त यामम् इन्द्राय नक्तम् ऊर्म्याः सुवाचः । अस्मै आपो मातरः सप्त तस्थु र्नृभ्यस् तराय सिन्धवः सुपाराः॥१॥ अतिविद्धा विथुरेणा चित् अस्रा

सात महानद्या त्या स्वस्थ राहिल्या. आणि शूरसैनिकांना पार जातां यावें म्हणून समुद्र सुद्धां सहजरीतीनें तरतां येऊं लागले १. —तो जरी असहाय होता तरी त्यानें पर्वतांचीं एकवीस वळकट शिखरें आपल्या अस्त्रांनीं पार छिन्नभिन्न करून टाकलीं. ह्याप्रमाणें आवेश चढलेल्या त्या वीरपुंगवानें जे पराक्रम केले त्यांची सर देवांनाहि यावयाची नाहीं मग मनुष्यांना कसची येते ? ३. इन्द्राचें वज्र पोलादाचें, आणि घांसून झगझगीत केलेलें; इन्द्राच्या भुजदण्डांत अपार ओजस्विता सांठलेली; इन्द्राच्या मस्तकांत कर्तृत्वशक्तीची पराकाष्ठा झालेली; ह्या सर्व गोष्टींत तेथें यत्किंचित्‌हि कमीपणा नाहीं म्हणूनच (सर्वजण) त्याचा शब्द ऐकण्याकरितां त्याच्याजवळ धांवत जातात ३. —इन्द्रा, माझी भावनाच अशी कीं सर्व पवित्र आणि वन्दनीय विभूतींत तूं अत्यंतपूज्य आहेस; मला वाटतें अचलानांहि हलविणारा तूंच आहेस; मी समजतों कीं तूं सत्वसामर्थ्याचा ध्वजच आहेस; मला हें मान्य कीं, तूं सर्वमानवी प्रजांचा धुरीण आहेस ४. —मोठमोठ्या वीरांचा उन्माद-जिरविणारें वज्र, हे इन्द्रा, ज्या वेळीं तूं अहिभुजंगाला मारण्यासाठीं हातीं घेतलेंस, त्या वेळीं पर्वताकार मेघ तुझाच स्तुतिघोष करूं लागले ५. —आणि प्रकाशधेनू आणि ब्रह्मस्तोत्रज्ञ भक्त तुज इन्द्राची सेवा करूं लागले; म्हणून आजपर्यंत झालेलें यच्चावत् वस्तुजात ज्याच्यापासून निर्माण झालें आणि पुढें होणारें जगत्‌हि ज्याच्या पासूनच होणार त्या इन्द्राचें आपण स्तवन करूं. आपण स्तवनानें त्या इन्द्राला आपला मित्र करूं, आणि त्याला प्रणिपात करून त्या वीरनायकाच्या सन्निध जाऊन वसूं ६. —वृत्राच्या श्वासोच्छ्वासाच्या जोरानें, तुझे प्रियविबुध बाजूस हटून जाऊन त्यांनीं युद्धाचा त्याग केला; तरी, हे इन्द्रा, मरुतांनीं जें तुझ्याशीं सख्यत्व जोडलें तें दृढच राहणार आणि ह्या सर्व शत्रुसेनेवर तूं जयच मिळविणार ७. —तुझा हर्ष वृद्धिंगत करणारे त्रेसष्ट मरुत् प्रकाशाच्या राशीप्रमाणें तेजस्वी आणि यजनीय आहेत; आम्हींहि तुजला शरण आलों आहोंत; तर फोंफावणारें बल हाच आमच्या भाग्याच्या वांटा

---

त्रिः सप्त सानु संहिता गिरीणाम् । न तत् देवो न मर्त्यस् तुतुर्यात् यानि प्रवृद्धो वृषभ श्चकार ॥२॥ इन्द्रस्य वज्रः आयसो निमिश्लः इन्द्रस्य बाह्वो र्भूयिष्ठम् ओजः । शीर्षन् इन्द्रस्य क्रतवो निरेके आसन् एपन्त श्रुत्यै उपाके ॥३॥ मन्ये त्वा यज्ञियं यज्ञियानां मन्ये त्वा च्यवनम् अच्युतानाम् । मन्ये त्वा सत्वनाम् इन्द्र केतुं मन्ये त्वा वृषभं चर्षणीनाम् ॥४॥ आ यत् वज्रं बाह्वोर् इन्द्र धत्से मदच्युतम् अहये हन्तवा उ । प्र पर्वताः अनवन्त प्र गावः प्र ब्रह्माणो अभिनक्षन्त–इन्द्रम् ॥५॥ तमु स्तवाम य इमा जजान विश्वा जातानि अवराणि अस्मात् । इन्द्रेण मित्रं दिधिषेम गीर्भिर् उपो नमोभि र्वृषभं विशेम ॥ ६ ॥ वृत्रस्य त्वा श्वसथात् ईषमाणाः विश्वे देवाः अजहु र्ये सखायः । मरुद्भिर् इन्द्र सख्यं ते अस्तु अथेमाः विश्वाः पृतनाः जयासि ॥७॥ त्रिः षष्टिस् त्वा मरुतो वावृधानाः उस्राइव राशयो यज्ञियासः । उप त्वे–मः ( त्वा आ इमः ) कृधि

का ह्या हविर्भाग अर्पणानें आम्हीं तुझी सेवा करीत आहोंत. ८. —तुझें तीक्ष्ण शस्त्र, तुझें मरुतांचें सैन्य आणि तें तुझें वज्र यांचा तडाका, हे इन्द्रा, कोणाला बरें सहन करवेल ? प्रतिस्पर्धी असे आहेत कीं त्यांच्याजवळ हत्यार राहिलें नाहीं, ते असुरदेशीय आहेत, आणि देवाला न मानणारे आहेत. तर हे सोमप्रिया इन्द्रा तूं आपल्या चक्रानें त्यांना छाटून टाक ९. —परमथोर, शत्रूंना भयंकर, तीव्रआवेगी, परंतु प्राण्यांना अत्यंत कल्याणकर अशा देवाला सुंदर स्तोत्र अर्पण कर; त्या स्तवनार्ह इन्द्राच्या चरणीं स्तुतिरूप सेवा स्वतः भरपूर अर्पण कर म्हणजे ती सेवा तो जाणणार नाहीं असें कसें होईल ? १०. —उक्थस्तवनें ज्याच्याप्रीत्यर्थ म्हणतात, त्या विश्वव्यापक देवाकडे नौकेच्या योगानें नद्यांच्या पैलतीरास पोहोंचावें त्याप्रमाणें, ( स्तोत्रांच्या द्वारानें ) आपली मनोमय सेवा पाठवून दे; त्या सर्वश्रुत सर्वजनसेवित इन्द्राला आपल्या ध्यानानें स्पर्श कर; हें तो जाणणार नाहीं असें कसें होईल ११. —इन्द्र ज्याचा संतोषानें स्वीकार करील असें काय असतें तें ओळख. तें हेंच कीं, उत्तम सूक्तानें स्तवन कर आणि प्रणिपातरूप सेवा कर. हे भक्ता त्याच्या सन्निध रहा. उगीच आक्रोश करूं नको; तुझा धांवा त्याच्या कानीं जाऊं दे इतकें झाल्यावर ( तुझी सेवा ) तो जाणणार नाहीं असें कसें होईल १२. —कृष्णवर्ण द्रप्स हा अंशुमतीच्या तीरावर खालीं उतरला. त्याच्या सहायार्थ दहा हजार सैन्य होतें; तेव्हां फों फों करीत चाललेला द्रप्स आणि त्याची ती सशस्त्र सेना ह्या सर्वांना वीरवृत्ति इन्द्रानें आपल्या शक्तीनें बाजूस फेंकून दिलें १३. —त्या द्रप्साला अंशुमती नदीवरील एका अत्यंत गुप्त व अवघड जागीं हिंडतांना मी पाहिलें. काळ्याकुट्ट ढगाप्रमाणें मध्येंच आडवा आलेल्या त्या द्रप्सावर मी चाल करून जातों, आणि वीरहो, तुम्हीं आज रणांगणांत कसून युद्ध करा. १४. —नंतर अंशुमती नदीच्या जवळ, ( क्रोध ) ज्वालेनें धगधगणाऱ्या द्रप्यानें आपलें रूप प्रगट केलें, परंतु पुढें चाल करून

---

नो भागधेयं शुष्मं त एना हविषा विधेम ॥ ८ ॥ तिग्मम् आयुधं मरुताम् अनीकं क स्ते इन्द्र प्रति वज्रं दधर्ष । अनायुधासो असुरा अदेवा श्चक्रेण ताँ अप वप ऋजीषिन् ॥ ९ ॥ महे उग्राय तवसे सुवृक्तिं प्र ईरय शिवतमाय पश्वः । गिर्वाहसे गिर इन्द्राय पूर्वी र्धेहि तन्वे कुवित् अङ्ग वेदत् ॥ १० ॥ उक्थवाहसे विभ्वे मनीषां द्रुणा न पारम् ईरय नदीनाम् । नि स्पृश धिया तन्वि श्रुतस्य जुष्टतरस्य कुवित् अङ्ग वेदत् ॥ ११ ॥ तत् विविड्ढि यत् त इन्द्रो जुजोषत् स्तुहि सुष्टुतिं नमसा ऽऽ विवास । उप भूष जरित र्मा रुवण्यः श्रावय वाचं कुवित् अंग वेदत् ॥ १२ ॥ अव द्रप्सो अंशुमतीम् अतिष्ठत् इयानः कृष्णो दशभिः सहस्रैः । आवत् तम् इन्द्रः शच्या धमन्तम् अप स्नेहिती र्नृमणाः अधत्त ॥ १३ ॥ द्रप्सम् अपश्यं विषुणे चरन्तम् उपह्वरे नद्यो अंशमत्याः । नभो न कृष्णम् अवतस्थिवांसम् इष्यामि वो वृषणो युध्यता—जौ ॥ १४ ॥ अध द्रप्सो अंशुमत्याः उपस्थे अधारयत् तन्वं तित्विषाणः ।

येणाऱ्या देवविन्मुख सैन्याचा इन्द्रानें बृहस्पतीचें रूप घेऊन पार फडशा उडवून दिला १५. —त्या सात राक्षसांना कोणी शत्रूच उरला नव्हता; पण हे इन्द्रा, तूं प्रकट होतां क्षणींच त्यांचा शत्रू अर्थात् मारक झालास. द्युलोक आणि भूलोक हे (अंधारानें) झांकून गेले होते त्यांना तूं बाहेर आणलेंस आणि (आकाशांत) सर्वत्र पसरलेल्या भुवनांना आनंदी-आनंद केलेंस १६. —एवंच, ज्याला कोठेंहि तोड नव्हती अशा त्या (शत्रु) तेजाला हे वज्रधरा, तूं आपल्या वज्रानें धडक्यासरशीं नष्ट करून टाकलेंस. आपल्या आयुधानें शुष्णाची रग तूं जिरवलीस, आणि हे इन्द्रा आपल्या दिव्य शक्तिनें प्रकाश-धेनूंना शोधून काढलेंस १७. —त्याचप्रमाणें, हे प्राणिमात्राच्या वीर्यशाली नायका, तूं अंधकाररूपी शत्रूच्या धडाडीचा चुराडा उडविलास; अडविलेल्या (ज्ञान) सरितांना तूं बंधमुक्त केलेंस, आणि ते दुरात्मे ज्यांचे धनी होऊन बसले होते अशीं उदकें तूं जिंकून परत आणलींस १८. —जो इन्द्र महत्कृत्यकुशल, जो सोमरसास्वादांत रममाण होणारा, ज्याच्या क्रोधापुढें कोणाचाहि टिकाव लागत नाहीं; जो सूर्याप्रमाणें तेजोवैभवसंपन्न, जो एकच (देव असून) मानवहितकर अशीं कृत्यें करतो, तोच (इन्द्र) वृत्राचा नाश करतो. दुसऱ्या कोणालाहि तो भारीच आहे असेंच (सर्व) म्हणतात. १९. —तो वृत्रनाशक इन्द्र चराचरांचा पोषक आहे; त्याचा धांवा करणें उचित म्हणूनच त्याला उत्कृष्ट स्तवनानें आम्हीं आळवांत आहों. तोच भगवान् आमचा संरक्षक आहे, तोच आमचें सांत्वन करणारा आणि तोच सर्वविश्रुत सत्वसामर्थ्याचा दाता आहे २०. —तो वृत्रनाशन इन्द्र ऋभूंचा पाठिराखा झाला; तो आविर्भूत होतांच त्याचा धांवा भक्तजन करूं लागले. मानवांना हितकर अशीं असंख्य कृत्यें त्यानें केलीं. सोमरसाप्रमाणें (अन्तःकरणद्वारा) त्याचें प्राशन भक्तांनीं केलें म्हणून आपल्या मित्रबान्धवांसाठीं त्यालाच हविर्भाग अर्पण केला पाहिजे २१.

---

विशो अदेवीर् अभि आचरन्ती बृहस्पतिना युजा इन्द्रः ससाहे ॥ १५ ॥ त्वं ह त्यत् सप्तभ्यो जायमानो अशत्रुभ्यो अभवः शत्रुर् इन्द्र । गूळ्हे द्यावापृथिवी अन्वविन्दो विभुमद्भ्यो भुवनेभ्यो रणं धाः ॥ १६ ॥ त्वं ह त्यत् अप्रतिमानम् ओजो वज्रेण वज्रिन् धृषितो जघन्थ । त्वं शुष्णस्य अवातिरो वधत्रैस् त्वं गा इन्द्र शच्ये-त् अविन्दः ॥ १७ ॥ त्वं ह त्यत् वृषभ चर्षणीनाम् घनो वृत्राणां तविषो बभूव । बभूथ त्वं सिन्धूँ असृजस् तस्तभानान् त्वम् अपो अजयो दासपत्नीः ॥ १८ ॥ स सुक्रतू रणिता यः सुतेषु अनुत्तमन्यु यं अहेव रेवान् । यं एक इत् नरि अपांसि कर्ता स वृत्रहा प्रति इत् अन्यम् आहुः ॥ १९ ॥ स वृत्रहा इन्द्र श्चर्षणीधृत् तं सुष्टुत्या हव्यं हुवेम । स प्राविता मघवा नोऽधिवक्ता स वाजस्य श्रवस्यस्य दाता ॥ २० ॥ स वृत्रहा इन्द्रो ऋभुक्षाः सद्यो जज्ञानो हव्यो बभूव । कृण्वन् अपांसि नर्या पुरूणि सोमो न पीतो हव्यः सखिभ्यः ॥ २१ ॥

---

## सूक्त ८६

हे इन्द्रा तूं दिव्यतेजोमण्डित देवानें आपल्या ओजस्वितेच्या योगानें मायावी आणि बलाढ्य राक्षसांपासून उपभोग्य वस्तु हिसकावून घेऊन भक्तांना दिल्यास; तर हे भगवंता, त्यांची आतां उन्नति कर, आणि ज्यांनीं तुझ्यासाठीं कुशासन सिद्ध केलें त्यांचाहि उत्कर्ष कर १. —इन्द्रा तुझ्याजवळ जो ( चापल्यरूप )अश्व, आणि (प्रकाशरूप) धेनू यांचा अक्षय सांठा आहे तो सोमार्पणनिरत आणि दानशील भक्ताच्या ठिकाणीं ठेव. शठ आणि कंजूष ह्यांच्या ठिकाणीं ठेऊं नको २. —इन्द्रा तुझ्या आज्ञेप्रमाणें न वागणारा, आणि देवाला न मानणारा जो दुर्जन खुशाल एकसारखा निजून राहतो, तो त्याच्याच कर्मांनें मरून जाईल; परंतु सर्वांचें पोषण करणारें जें ऐश्वर्य आहे तें तूं सोमार्पण करणाऱ्या भक्ताच्या ठिकाणीं ठेव ३. —तूं सर्वसमर्थ देव दूरच्या ( स्वर्लोकीं ) किंवा जवळच्या ह्या भूलोकीं जरी असलास, तरी हे वृत्रनाशना, आणि आपल्या रश्मिरूप अश्वांसह द्युलोकांत संचार करणाऱ्या इन्द्रा, हा सोमरस अर्पण करणारा भक्त तुझी उपासना सूक्तांनीं करीत आहे ४. —(म्हणून) जरी तूं द्युलोकाच्या प्रकाशमय स्थानांत असलास, किंवा समुद्राच्या अंतर्भागांत किंवा भूमीवरील एखाद्या मन्दिरांत अथवा अन्तरिक्षांत असलास, तरी वृत्राचा समूळ उच्छेद करणाऱ्या देवा, तूं आमच्याकडे आगमन कर ५. —हे सोमप्रिया, हे उत्कटबलाच्या प्रभो, तूं असा आहेस तर आमच्या (भक्तिरूप)सोमरसानें तूं आनंदमग्न हो; आणि हे इन्द्रा, ज्याच्या योगानें मधुर वाणींची स्फूर्ति होते आणि जो ( स्वतः ) परिपूर्ण असतो त्या तुझ्या दिव्यप्रसादाच्या ऐश्वर्यांनें, हे इन्द्रा, आम्हांसहि हर्षनिर्भर कर ६. —हे इन्द्रा, तूं आम्हांला दूर लोटून देऊं नकोस; तूं आम्हां भक्तांबरोबरच हर्ष-निर्भर हो; आमचें सहाय तूं; आमचा आप्तहि तूंच आहेस, तर हे इन्द्रा आम्हांला दूर ढक-

## सूक्तम् ८६

काश्यपो रेभः इन्द्रः बृहती

याः इन्द्र भुजः आ भरः स्वर्वाँ असुरेभ्यः । स्तोतारम् इत् मघवन् अस्य वर्धय ये च त्वे वृक्तबर्हिषः ॥ १ ॥ यम् इन्द्र दधिषे त्वम् अश्वं गां भागम् अव्ययम् । यजमाने सुन्वति दक्षिणावति तस्मिन् तं धेहि मा पणौ ॥२॥ यः इन्द्र सस्ति अव्रतो अनुस्वापम् अदेवयुः । स्वैः स एवैः मुमुरत् पोष्यं रयिं सनुत धेहि तं ततः ॥ ३ ॥ यत् शक्र-असि परावति यत् अर्वावति वृत्रहन् । अतस् त्वा गीर्भि द्युगत् इन्द्र केशिभिः सुतावाँ आ विवासति ॥ ४ ॥ यत् वाऽसि रोचने दिवः समुद्रस्या-धि विष्टपि । यत् पार्थिवे सदने वृत्रहन्तम यत् अन्तरिक्ष आ गहि ॥ ५ ॥ स नः सोमेषु सोमपाः सुतेषु शवसस्पते । मादयस्व राधसा सूनृतावता इन्द्र राया परीणसा ॥६॥ मा नः इन्द्र परा वृणक् भवा नः सधमाद्यः । त्वं नः ऊती त्वम् इत् नः आप्यं मा

लून जाऊं नको ७. —हे इंद्रा सोमरस सिद्ध होतांच तो मधुर रस प्राशन करण्यासाठीं ह्या आसनावर अधिष्ठित हो. हे भगवंता, आपल्या स्तोतृजनांवर (तुझी) महत्कृपा असूं दे. हे इन्द्रा, आम्हीं सोमरस सिद्ध केल्यावरोबर (तूं प्रसन्न हो) ८. —तुझा अन्तपार देवांना लागला नाहीं. हे वज्रधरा, मनुष्यांनाहि लागला नाहीं. तूं आपल्या उत्कटबलानें (सकल) विश्व पादाक्रांत केलें आहेस, म्हणूनच देवांनाहि तुझा अन्त लागत नाहीं ९. —यच्चावत् शत्रुसैन्याची पार धुळधाण उडवून देणारा वीराग्रणी जो इन्द्र त्याला जगतीतलावर राज्य करण्यासाठीं (दिव्यविबुधांनीं) एकविचारानें मान्य केलें आणि (भक्तहृदयांत) प्रकट केलें. पराक्रमानें सर्वश्रेष्ठ, वर देण्यांत अमोघ, (शत्रूंना) भयंकर, ओजस्वी, आणि तीव्र-आवेगी अशा इंद्राला (प्रकट केलें) १०. —दिव्यप्रकाशाचा प्रभु जो इन्द्र त्याला सोमप्राशनार्थ वन्दिजनांनीं उच्च स्वरानें पाचारण केलें; भक्तांची अभिवृद्धि व्हावी म्हणून (हांक मारली); असा तो आपल्या ओजस्वितेनें आणि सहायक शक्तिनीं आपल्या आज्ञांचें परिपालन करवितो ११. —(तपानें) तळपणारे, कोणाचा द्वेष न करणारे आणि आवेशी असे ज्ञानीभक्त त्या मेषरूपधारी अजाला नेत्रानें अवलोकन करून आपलें मस्तक नम्र करितात; आणि (सर्वांच्या) कर्णपथांत येईल अशा रीतीनें ऋक्स्तोत्रांनीं (त्याचें) उच्चस्वरानें स्तवन करतात १२. —(शत्रूंना) भयंकर, निरंतर उत्कट-बल अंगीं राखणारा आणि अप्रतिहत अशा भगवान् इन्द्राचा धांवा मीं पुनः पुनः करीत आहे. तो अत्यंत पूज्य आहे. तो यजनीय देव आमच्या स्तुतींनीं आमच्याकडे वळो, आणि आम्हांला (अविनाशी) संपत्तीकडे वळवो; तो वज्रधर देव आम्हांला सर्व मार्ग सुगम करो १३. —इन्द्रा, ह्या शत्रूंच्या नगरांचा आपल्या ओजस्वितेनें कसा नाश करावा तें, हे अत्युत्कटबलाढ्या, हे सर्वसमर्थ देवा, तूं चांगलें जाणतोस. परंतु हे वज्रधरा, हीं सर्व भुवनें, हा द्युलोक आणि पृथिवी, हे मात्र सर्व तुझ्या भीतीनें थरथर कांपतात १४.

---

नः इन्द्र परा वृणक् ॥ ७ ॥ अस्मे इन्द्र सचा सुते निषदा पीतये मधु । कृधी जरित्रे मघवन् अवो महत् अस्मे इन्द्र सचा सुते ॥ ८ ॥ न त्वा देवासः आशत न मर्त्यासो अद्रिवः । विश्वा जातानि शवसाऽभिभूर् असि न त्वा देवास आशत ॥ ९ ॥ विश्वाः पृतनाः अभिभूतरं नरं । सजूस् ततक्षुर् इन्द्रं जजनुश्च राजसे ॥ क्रत्वा वरिष्ठं वर आमुरिम् उत । उग्रम् ओजिष्ठं तवसं तरस्विनम् ॥ १० ॥ सम् ईं रेभासो अस्वरन् इन्द्रं सोमस्य पीतये । स्वर्पतिं यत् ईम् वृधे । धृतव्रतो हि ओजसा सम् ऊतिभिः ॥ ११ ॥ नेमिं नमन्ति चक्षसा मेषं विप्राः अभिस्वरा । सुदीतयो वो अद्रुहोऽपि कर्णे तरस्विनः सम् ऋक्वभिः ॥ १२ ॥ तम् इन्द्रं जोहवीमि मघवानम् उग्रं । सत्रा दधानम् अप्रतिष्कुतं शवांसि ॥ मंहिष्ठो गीर्भिर् आ च यज्ञियो ववर्तत् । राये नो विश्वा सुपथा कृणोतु वज्री ॥ १३ ॥ त्वं पुर इन्द्र चिकित् एनाः वि ओजसा शविष्ठ शक्र नाशयध्यै । त्वत् विश्वा भुवनानि वज्रिन् द्यावा रेजेत पृथिवी च भीषा ॥

—तर हे इन्द्रा, हे शूरा, हे अद्भुता, सत्‌धर्म हा माझें तारण करो; हे वज्रधरा, पाण्यांतून पार नेल्याप्रमाणें आम्हांला पातकांतून पार ने. हे इन्द्रा, हे जगद्राजा, विश्वाला व्यापून टाकणारें आणि अत्यंत स्पृहणीय असें जें ऐश्वर्य तें तूं आम्हांस केव्हां देशील (तें सांग) १५.

अध्याय सहावा समाप्त

---

## अध्याय सातवा

## सूक्त ८७

स्तवनप्रबोधक, श्रेष्ठ, सद्धर्मस्थापक, तत्त्वविवेकी आणि स्तुतियोग्य अशा इन्द्रा-प्रीत्यर्थ "बृहत्" सामाचें गायन करा १, —इन्द्रा, तूं सकल विश्व आक्रमण करणारा आहेस, सूर्याला तूंच प्रकाशमान करतोस. तूं परमथोर, विश्वाचा कर्ता, विश्वाचा देव आहेस २. —आपल्या दीप्तिनें तूं स्वर्लोकाला प्रकाशित करून द्युलोकाच्या तेजोमय प्रदेशांत गमन केलेंस. हे इंद्रा, दिव्यविबुध देखील तुझें सख्य जोडूं पाहतात ३. —हे इन्द्रा आम्हाला प्रिय असा तूं आमच्याकडे ये. तूं सदैव विजयी आहेस. तूं कोणा-कडूनहि लपविला जाणारा नव्हेस. पर्वताप्रमाणें तूं सर्व बाजूंनीं विशाल आणि द्युलोकाचाहि अधिपति आहेस. ४ —हे सत्यस्वरूपा, भूलोक आणि स्वर्लोक ह्या उभय-तांनाहि हे सोमप्रिया देवा, तूं व्यापून राहिलास. हे इन्द्रा, तूं सोमार्पण करणाऱ्या भक्ताची

---

॥ १४ ॥ तत् मा ऋतम् इन्द्र शूर चित्र । पातु अपो न वज्रिन् दुरिताऽति पर्षि भूरि ॥ कदा नः इन्द्र राय आ दशस्ये र्विश्वप्स्न्यस्य स्पृहयाय्यस्य राजन् ॥ १५ ॥

इति षष्ठे षष्ठोऽध्यायः

---

अथ सप्तमोऽध्यायः

## सूक्तम् ८७

आङ्गिरसो नृमेधः इन्द्रः उष्णिक्

इन्द्राय साम गायत विप्राय बृहते बृहत् । धर्मकृते विपश्चिते पनस्यवे ॥ १ ॥
त्वम् इन्द्र अभिभूर् असि त्वं सूर्यम् अरोचयः । विश्वकर्मा विश्वदेवो महाँ असि ॥ २ ॥
विभ्राजन् ज्योतिषा स्वर् अगच्छो रोचनं दिवः । देवास् ते इन्द्र सख्याय येमिरे ॥ ३ ॥
आ इन्द्र नो गधि प्रियः सत्राजित् अगोह्यः । गिरिर् न विश्वतस् पृथुः पति र्दिवः ॥ ४ ॥
अभि हि सत्य सोमपाः उभे बभूथ रोदसी । इन्द्रासि सुन्वतो वृधः पति र्दिवः

अभिवृद्धि करणारा आणि द्युलोकाचा प्रभु झालास ५. —खरोखर हे इन्द्रा, तूं दुर्जनांच्या कितीतरी नगरदुर्गांचा विध्वंस करणारा, अधार्मिक दुष्टांचा नाश करणारा, सज्जनांच्या मनाचा विकास करणारा, आणि द्युलोकाचा स्वामी आहेस ६. —स्तुतिप्रसन्ना इन्द्रा, जलमार्गांनें जाणारे लोक पाण्याच्या योगानेंच आराम पावतात, त्याप्रमाणें आम्हीं देखील आमच्या प्रबल वासनांना तुझ्या ठिकाणीं आणून सोडून स्वस्थ राहतों ७. —उदकप्रवाहांनीं जलाशय भरून जातो त्याप्रमाणें हे वीरा, ब्रह्मसूक्तें तुजला आनंदानें भरून टाकतात. हे वज्रधरा, तूं प्रतिदिनीं वृद्धिंगतच होणारा जरी आहेस, तरी (तुजला तीं सूक्तें हर्षनिर्भर करतात) ८. —तुझ्या प्रचंड रथाच्या प्रचंड जुवाला हां हां म्हणतां क्षणींच जोडले जाणारे आणि तुज इन्द्राला घेऊन येणारे तुझे हरिद्वर्ण अश्व उत्सुक भक्ताच्या "**गाथा**" स्तवनानेंहि तत्काळ जोडले जातात ९. —वीराला साजेल असें तेज, हे इन्द्रा, हे अमितकर्तृत्वा, हे सर्वदर्शी देवा, तूं आम्हांला दे; आणि शत्रुसैन्याचा पराभव करणारा असा सेनाधुरीण वीरहि दे १० —हे दिव्यनिधाना आमचा पिता तूं, हे अमितकर्तृत्वा आमची माताहि तूंच आहेस, म्हणून शान्तिसुखाची याचना आम्ही तुझ्याजवळच करतों ११. —हे प्रचंडबला, सर्वजनस्तुता, तूं सत्वसामर्थ्ये गाजविणारा म्हणूनच तुझीच आम्हीं याचना करतों; तर हे अपारप्रज्ञा, तूं आमच्या आंगीं उत्कृष्ट शौर्य बाणेल असें कर १२.

## सूक्त ८८

आज काय आणि उद्यां काय, सर्वच वेळीं त्वरेनें कार्य करणारे शूरभक्त, हे वज्रधरा, आपल्या भक्तीनें तुजला परिपूर्ण भरून सोडतात. तर हे इन्द्रा, स्तोत्रसंकीर्तन करणारांची

॥ ५ ॥ त्वं हि शश्वतीनाम् इन्द्र दर्ता पुराम् असि। हन्ता दस्यो र्मनो वृधः पति र्दिवः ॥ ६ ॥ अधा हि इन्द्र गिर्वणः उप त्वा कामान् महः ससृज्महे। उदाइव यन्त उदभिः ॥ ७ ॥ वा र्ण त्वा यव्याभि र्वर्धन्ति शूर ब्रह्माणि। वावृध्वांसं चित् अद्रिवो दिवेदिवे ॥ ८ ॥ युजन्ति हरी इषिरस्य गाथया उरौ रथे उरुयुगे। इन्द्रवाहा वचोयुजा ॥ ९ ॥ त्वं न इन्द्र आ भरँ ओजो नृम्णं शतक्रतो विचर्षणे। आ वीरं पृतनाषहम् ॥ १० ॥ त्वं हि नः पिता वसो त्वं माता शतक्रतो बभूविथ। अधा ते सुम्नम् ईमहे ॥ ११ ॥ त्वां शुष्मिन् पुरुहूत वाजयन्तम् उपब्रुवे शतक्रतो। स नो रास्व सुवीर्यम् ॥ १२ ॥

## सूक्तम् ८८

नृमेधः इन्द्रः बृहती

त्वाम् इदा ह्यो नरो अपीप्यन् वज्रिन् भूर्णयः। स इन्द्र स्तोमवाहसाम् इह श्रुधि। उप स्वसरम् आ गहि ॥ १ ॥ मत्स्वा सुशिप्र हरिवस् तत् ईमहे। त्वे आ

हांक ऐक आणि त्यांच्या गृहाकडे आगमन कर १. —हे रुचिरमुकुटधरा हरिदश्वा, तूं हर्षनिर्भर हो–हेंच आमचें तुजपाशीं मागणें आहे. हे स्तवनार्ह इन्द्रा, तुझी कीर्ति निरुपम आहे, सोमरसार्पणप्रसंगीं ती (कीर्ति) भक्तजन उक्थ स्तोत्रांनीं गातात २. —सूर्याचा आश्रय करणाऱ्या (चंद्रा)प्रमाणें इन्द्रानें दिलेल्या (सुखाच्या) सर्व ठेव्याचा तुम्हीं उपभोग घ्या. जें कांहीं पूर्वीं झालें आणि पुढें होईल त्यांत आम्हीं (इन्द्राच्या) ओजस्वितेच्या बळावर आमचा भाग राखून ठेवितों ३. —ज्याच्या वरदानानें कधींहि हानि होत नाहीं, त्या दिव्यनिधीच्या दात्याचें गुणसंकीर्तन कर. इन्द्राचे वर कल्याणकारकच असतात. जो त्याच्या इच्छेनुरूप चालतो, त्याच्यावर त्याचा कधीं रोष होत नाहीं, त्या (भक्ता)ला वरदान देण्यासाठीं त्याचें मन उत्सुकच असतें ४. —इन्द्रा, युद्धांत तूं सर्व प्रतिपक्षीयांचा पराजय करून टाकलास. तूं सर्व शापांचें निवारण करणारा आहेस, तूं जगत्पिता आहेस; तूं (बळानें) सर्वांपेक्षां वरिष्ठ आहेस, इतका कीं, तुझ्या अंगावर धांवून येणाऱ्या कोणाहि शत्रूला तूं तावडतोव लोळवितोसच ५. —तुझा स्फुरण पावणारा जोम पाहिला म्हणजे आकाश आणि भूमि हे दोन्हीं लोक, आईनें बालकामागें धांवावें त्याप्रमाणें, तुझ्यामागें धांवतात. इन्द्रा, जेव्हां तूं वृत्रावर चाल करून गेलास तेव्हां तुझा क्रोध पाहून प्रतिस्पर्धी गर्भगलितच होऊन गेले ६. —येथूनच रक्षणासाठीं (त्याचा धांवा करा). ज्याला वार्धक्य स्पर्शहि करूं शकत नाहीं, जो एकदम घुसून पुढें जातो, ज्याच्या धडाक्यापुढें कोणींच टिकत नाहीं, जो शत्रूंना हां हां म्हणतां जिंकतो, जो सैनिकांना पुढें नेतो, जो उत्कृष्ट वीर आहे, जो अपराजित आहे, ज्यानें तुग्राला उत्कर्षाला चढविलें, ज्याच्यामुळें सर्वांला शोभा येते, पण ज्याला कोणीहि शोभा आणूं शकत नाहीं, जो धडाडीनें कार्य करतो, जो अनंतायुध, अमितप्रज्ञ, अन्नाच्छादन देणारा, (भक्तांना) दिव्यनिधीविषयीं प्रेरणा करणारा आणि सर्वांना एकसारखें वागविणारा आहे, असा जो इंद्र, त्याच्या कृपालाभासाठीं आम्हीं त्याचा धांवा करतों ७. ८.

---

भूषन्ति वेधसः ॥ तव श्रवांसि उपमानि उक्थ्या सुतेषु इन्द्र गिर्वणः ॥ २ ॥ श्रायन्त इव सूर्यं विश्वेत् इन्द्रस्य भक्षत । वसूनि जाते जनमान ओजसा प्रति भागं न दीधिम ॥ ३ ॥ अनर्शरातिं वसुदाम् उप स्तुहि भद्रा इन्द्रस्य रातयः । सो अस्य कामं विधतो न रोषति मनो दानाय चोदयन् ॥ ४ ॥ त्वम् इन्द्र प्रतूर्तिषु अभि विश्वाः असि स्पृधः । अशस्तिहा जनिता विश्वतूर् असि त्वं तूर्य तरुष्यतः ॥ ५ ॥ अनु ते शुष्मं तुर यन्तम् ईयतुः क्षोणी शिशुं न मातरा । विश्वास् ते स्पृधः श्नथयन्त मन्यवे वृत्रं यत् इन्द्र तूर्वसि ॥ ६ ॥ इत ऊती वो अजरं प्रहेतारम् अप्रहितम् । आशुं जेतारं हेतारं रथीतमम् अतूर्तं तुग्र्यावृधम् ॥ ७ ॥ इष्कर्तारम् अनिष्कृतं सहस्कृतं शतमूतिं शतक्रतुम् । समानम् इन्द्रम् अवसे हवामहे वसवानं वसूजुवम् ॥ ८ ॥

## सूक्त ८९

"मीं स्वतः तुझ्या पुढें चालत आहे, सर्व दिव्यविभूति माझ्या पाठीमागून येत आहेत" —( असें म्हणून ) जेव्हां माझा भाग तूं माझ्या वांट्याला घातलास, तेव्हां हे इन्द्रा, तूं माझ्या हातून पराक्रमाचीं कृत्यें करविलींस १. —मी तुजपुढें सोमरसाचें मधुर पेय ठेविलें आहे. तुझ्या पुढें ठेविलेला हा सोमरस तुझा भाग होवो. तूं माझा पाठिराखा म्हणून तूं माझ्या उजवीकडे ऐस; आणि मग दुर्जन शत्रू किती कां असेनात, आपण दोघे त्यांचा पार निःपात करून टाकूं २. —तुम्हीं सत्वसामर्थ्याची मनीषा धरणारे ( आहांत, म्हणून, ) जगांत जर सत्य म्हणून कांहीं वस्तु असेल तर इन्द्राप्रीत्यर्थ त्याच्या सत्यस्वरूपानेंच सूक्त म्हणा. "इन्द्र हा मुळीं नाहींच; त्याला कोणीं तरी पाहिला आहे काय ? उगीच स्तोत्र कोणाचें करावयाचें ?" असेंहि कोणी एखादा म्हणेल; [पण, प्रत्यक्ष देवच असें सांगतो कीं, ]—३. —"अरे स्तोत्रकर्त्या मीं येथेंच आहे, मजकडे पहा. मी आपल्या महिम्यानें यच्चावत् वस्तुमात्राला आक्रमण करून टाकलें आहे. जे सनातन धर्मांचे भोक्ते आहेत ते माझी महती गातात; आणि मीहि विवेचक ( असल्यानें ) हीं सर्व भुवनें एकमेकांपासून अलग ठेवतों ४. —मला प्रिय असलेल्या सनातनसत्यरूप आकाशाच्या पृष्ठभागीं मी एकटाच विराजमान असतां, माझे प्रेमळ भक्त तेथपर्यंत वर चढून आले. त्या वेळीं माझें मन हृदयांतल्या हृदयांत म्हणालें कीं, "आहा ! अरे हे तर माझे कुटुंबवत्सल भक्तच मोठ्यानें ओरडून माझा धांवा करीत आहेत" ५. —भगवंता, इन्द्रा, तूं भक्तासाठीं जीं जीं महत्कृत्यें केलींस तीं तुझीं सर्वच कृत्यें सोमसवनप्रसंगीं कीर्तन करण्यास अगदीं योग्य आहेत. एक अगदीं साधारण ऋषि जो शरभ त्याला देखील पारलौकिक धनाचा सांठा तूं उघडून दिलास ६. —तुम्हीं निरनिराळ्या वाटांनीं त्वरित

## सूक्तम् ८९

नेमः इन्द्रः त्रिष्टुप्

अयं त एमि तन्वा पुरस्तात् विश्वे देवाः अभि मा यन्ति पश्चात्। यदा मह्यं दीधरं भागम् इन्द्र आत् इत् मया कृणवो वीर्याणि ॥ १ ॥ दधामि ते मधुनो भक्षम् अग्रे हितस् ते भागः सुत अस्तु सोमः। अस श्च त्वं दक्षिणतः सखा मे अधा वृत्राणि जङ्घनाव भूरि ॥ २ ॥ प्र सु स्तोमं भरत वाजयन्त इन्द्राय सत्यं यदि सत्यम् अस्ति नेन्द्रो अस्तीति नेम उ त्व आह क ईं ददर्श कम् अभि ष्टवाम ॥ ३ ॥ अयम् अस्मि पश्य मे—ह विश्वा जातानि अभि अस्मि मह्ना। ऋतस्य मा प्रदिशो वर्धयन्ति आदर्दिरो भुवना दर्दरीमि ॥ ४ ॥ आ यत् मा वेनाः अरुहन् ऋतस्य एकम् आसीनं हर्यतस्य पृष्ठे। मन श्चित् मे हृद आ प्रत्यवोचत् अचिक्रदन् शिशुमन्तः सखायः ॥ ५ ॥ विश्वेत् ता ते सवनेषु प्रवाच्या या चकर्थ मघवन् इन्द्र सुन्वते। पारावतं यत पुरुसं-

धांवत जा, तुम्हांला आजपर्यंत ज्यानें विरोध केला तो आतां येथें नाहीं, कारण त्या दुष्टवृत्राच्या मर्मस्थानींच इन्द्रानें आपल्या वज्राचा प्रहार केला आहे ७. —मनोवेगानें उडणारा सुपर्ण हा लोखंडाचा ( जणों ) किल्लाच ( असा जो ) द्युलोक, त्यांत शिरला. आणि त्यानें वज्रधर इन्द्रासाठीं सोमवल्ली आणली. ८. —इन्द्राचें वज्र समुद्राच्या आंत उदकांनीं झांकून जाऊन तेथेंच पडून राहिलें. तेव्हां पूर्वी कोंडलेल्या ( पण वृत्रवधामुळें ) मुक्त झाल्यानें धों धों वाहणाऱ्या नद्यांनीं आपला उदकरूप नजराणा ( त्या वज्राच्या ) पुढें ठेवला ९. —देवांची महाराज्ञी जी दिव्यवाणी, ती जेव्हां कोणालाही न उकलणारे शब्द बोलून आपल्या ठिकाणीं आनंदानें वसली, तेव्हां तिनें चारहि (दिशांकडे) उर्जस्विता आणि दुग्ध यांचा वर्षाव केला. मग आतांच तिचें तें श्रेष्ठसामर्थ्य कोठें गेलें असें होईल कीं काय ? १०. —त्या दिव्यवाणीला देवांनींच प्रकट केलें. कोणत्याहि स्वरूपाचा प्राणी असो तो वाचा बोलतोच. (मग शब्द स्पष्ट उमटो वा न उमटो). ती उल्लसित दिव्यवाणी एक धेनूच होय. ती उत्साह आणि ओजस्विता यांचें दुग्ध भरपूर देते; तर अशी ती मनःपूर्वक स्तविलेली दिव्यवाणी आमच्या सन्निध आगमन करो ११. —(भक्ताच्या) प्रियसखा विष्णु, तूं वेगानें दूरवर पाऊल टाक, आणि आपला पराक्रम गाजीव. हे द्युलोका, विद्युत्वज्राचा मारा करण्याला अवसर दे. तुम्हीं आम्हीं दोघें मिळून वृत्राचा नाश करूं आणि तुंबलेल्या नद्यांना मुक्त करूं, म्हणजे त्या मोकळेपणानें इन्द्राच्या प्रेरणेला अनुसरून वाहतील १२.

## सूक्त ९०

वास्तविक तोच मनुष्य देवसेवेसाठीं खरोखर कष्टी झाला, कीं ज्यानें मित्रावरुणांना आपल्या इच्छेनुरूप हविर्भाग देण्याकरितां तत्काळ वळवून आपल्याकडे आणलें १.

---

भृतं वसु अपावृणोः शरभाय ऋषिबन्धवे ॥ ६ ॥ प्र नूनं धावता पृथक् ने ह यो वो अवावरीत्। नि षीम् वृत्रस्य मर्मणि वज्रम् इन्द्रो अपीपतत् ॥ ७ ॥ मनोजवाः अयमान आयसीम् अतरत् पुरम्। दिवं सुपर्णो गत्वाय सोमं वज्रिण आ भरत् ॥ ८ ॥ समुद्रे अन्तः शयते उद्ना वज्रो अभीवृतः। भरन्ति अस्मै संयतः पुरः प्रस्रवणाः बलिम् ॥ ९ ॥ यत् वाग् वदन्ति अविचेतनानि राष्ट्री देवानां नि षसाद मन्द्रा। चतस्र ऊर्जं दुदुहे पयांसि क्व स्वित् अस्याः परमं जगाम ॥ १० ॥ देवीं वाचम् अजनयन्त देवास् तां विश्वरूपाः पशवो वदन्ति। सा नो मन्द्रा इषम् ऊर्जं दुहाना धेनुर्वाग् अस्मान् उप सुष्टुतैतु ॥ ११ ॥ सखे विष्णो वितरं विक्रमस्व द्यौ र्देहि लोकं वज्राय विष्कभे। हनाव वृत्रं ऋणचाव सिन्धून् इन्द्रस्य यन्तु प्रसवे विसृष्टाः ॥ १२ ॥

## सूक्तम् ९०

भार्गवो जमदग्निः मित्रावरुणौ बृहती

ऋधग् इत्था स मर्त्यः शशमे देवतातये। यो नूनं मित्रावरुणौ अभिष्टये आचक्रे हव्यदातये ॥ १ ॥ वर्षिष्ठक्षत्रा उरुचक्षसा नरा राजाना दीर्घश्रुत्तमा। ता

ज्यांची राजसत्ता अत्युत्कृष्ट; जे दीर्घदर्शी शूर, जे ( जगताचे ) राजे आणि ज्यांची कीर्ति अतिशय दूरवर पसरलेली, असे ते आहेत. सूर्यकिरणांच्या योगानें ते जणों काय आपल्या बाहूंनींच, आपले आश्चर्यकारक चमत्कार झटपट घडवून आणतात २. —मित्रा-वरुणांनों तो जो तुमचा शीघ्रगति दूत धांवत पुढें जातो त्याचें मस्तक पोलादी ( शिर-स्त्राणानें भूषित ) आहे आणि त्याला सोमरसाचा आवेश लवकर चढतो ३. —ज्याला कांहीं एक विचारण्याची सोय नाहीं, ज्याला हवन करणें आवडत नाहीं, ज्याला संभाषण रुचत नाहीं, अशा ( दुष्टांची गांठ पडण्या )च्या पातकापासून आज आम्हांस मुक्त करा. आपल्या बाहूंनीं आम्हांस पूर्ण मुक्त करा ४. —देवभक्ता, सद्धर्म हेंच तुझें धन आहे तर, मित्राप्रीत्यर्थ, अर्यमाप्रीत्यर्थ एक सेवास्तोत्र, आणि वरुणाप्रीत्यर्थ संरक्षणाची याचना करणारें एक छंदस्तोत्र कर; याप्रमाणें ( आदित्य )राजांप्रीत्यर्थ तुम्हीं स्तुतिस्तोत्रांचें गायन करा ५. —जो अरुण विजयाचा ठेवाच आहे, जो तिघींचा एकच पुत्र आहे, त्याला आदित्यांनीं पुढें पाठविलें, आणि ते अप्रतारणीय अमरदेव आम्हां मानवांच्या स्थानांकडे लक्षपूर्वक निरीक्षण करूं लागले ६. —मला स्तोत्रें स्फुरूं लागलीं आणि ( तुमचीं ) अत्यंत तेजस्वी कृत्येंहि सिद्ध झालीं, तर हे सत्यस्वरूप प्रेमळ अश्वीहो, तुम्हीं आमचे हविर्भाग गृहण करण्याकरितां इकडे या ७. —राक्षसांच्या उपद्रवास दाद न देणारें असें तुमचें जें वरदान आहे तें हे सत्वसामर्थ्यसंपन्न देवांनों, आम्हीं तुम्हांजवळ मागत आहों; तर मी तुम्हांपुढें केलेल्या हविर्भागाचा स्वीकार करून, आणि हे वीरांनो, जमदग्नीच्या स्तवनानें ( प्रसन्न होऊन ) इकडे आगमन करा ८. —जो आमचा यज्ञ द्युलोकापर्यंत जाऊन पोहोंचतो अशा यज्ञाला, हे वायुदेवा, आमच्या अत्यंत मननीय स्तवनांनीं संतुष्ट होऊंन ये. स्वच्छ पवित्रांतून गाळलेला हा ( दुग्ध )मिश्रित सोमरस मीं तुजपुढें ठेवींत आहे ९, —जसा अध्वर्यू तसा ( तो पहा ) वायु अगदीं सरळ मार्गांनीं आमच्या हविर्भागांचा स्वीकार करण्याकरितां येत आहे. तर, हे ' नियुत् ' अश्व रथाला जोडणाऱ्या

---

बाहुता न दंसना रथर्यतः साकं सूर्यस्य रश्मिभिः ॥ २ ॥ प्र यो वां मित्रावरुणा ऽजिरो दूतो अद्रवत् । अयःशीर्षा मदे रघुः ॥ ३ ॥ न यः संपृच्छे न पुन–र्हवीतवे न संवादाय रमते । तस्मात् नो अद्य समृतेर् उरुष्यतं बाहुभ्यां नः उरुष्यतम् ॥ ४ ॥ प्र मित्राय प्र अर्यम्णे सचथ्यम् ऋतावसो । वरूथ्यं वरुणे छन्द्यं वचः स्तोत्रं राजसु गायत ॥ ५ ॥ ते हिन्विरे अरुणं जेन्यं वसु एकं पुत्रं तिसृणाम् । ते धामानि अमृताः मर्त्यानाम् अदब्धाः अभि चक्षते ॥ ६ ॥ आ मे वचांसि उद्यता द्युमत्तमानि कर्त्वा । उभा यातं नासत्या सजोषसा प्रति हव्यानि वीतये ॥ ७ ॥ रातिं यत् वाम् अरक्षसं हवामहे युवाभ्यां वाजिनीवसू । प्राचीं होत्रां प्रतिरन्तौ इतं नरा गृणाना जमद-ग्निना ॥ ८ ॥ आ नो यज्ञं दिविस्पृशं वायो याहि सुमन्मभिः । अन्तः पवित्रे उपरि श्रीणानः अयं शुक्रो अयामि ते ॥ ९ ॥ वेति अध्वर्युः पथिभी रजिष्ठैः प्रति हव्यानि

वायुदेवा, आम्हीं सिद्ध केलेला सोमरस आणि धेनूचें आटींव दुग्ध असे दोन्हीं हविर्भाग तूं प्राशन कर १०. —खरोखरच सूर्या, तूं सर्वश्रेष्ठ आहेस. हे आदित्या, तूं परमथोर आहेस. तूं जो परमथोर सद्रूप त्या तुझा महिमा सर्वतोमुखीं आहे; आणि देवा खचित्च तूं थोर आहेस ११. —प्रख्यातींतहि हे सूर्या,तूं खचित् श्रेष्ठ आहेस. सत्य सांगतों कीं,हे देवा, तूं श्रेष्ठच आहेस. आपल्या महिम्यानें तूं दिव्यविभूतींचा तेजोमय पुरोहित आहेस. आणि तुझें तेज सर्वव्यापक आणि अप्रतिहत आहे १२. ही जी खालीं लवलेली आणि सूर्याप्रमाणें तेजस्वी आणि आरक्त किरणांनीं नटलेली रूपवती तरुणी, ही चित्रविचित्र वस्त्रांनीं मण्डित असल्याप्रमाणें दिसणारी उषा, ती तुझ्या दहा बाहूंनीं आलिंगिलेली उषा दृग्गोचर होत आहे १३. —आजपर्यंत तीन प्रकारच्या प्रजा होऊन गेल्या. आतां दुसऱ्याच ( लोकांनीं त्या सूर्याचा ) आश्रय केला आहे. याप्रमाणें तो महान् देव या सर्व भुवनांच्या अन्तर्भागीं प्रविष्ट झाला आणि त्याचा पावन महिमा सर्व दिशा ( सर्व वनस्पति यांच्या )मध्यें ओतप्रोत भरून राहिला १४. —ही रुद्रांची माता, वसूंची कन्या, आदित्यांची भगिनी आणि अमृताचा गाभा आहे; म्हणूनच मी विवेकी मनुष्यांना निक्षून सांगतों कीं, अशा निरपराध अदितिरूप धेनूचा तुम्हीं वध करूं नका १५. —उत्तम कवनांचें मर्म जाणणारी, उत्तम वाणी उच्चारणारी, सर्व प्रकारच्या सद्बुद्धींसहच उपस्थित होणारी, आणि देवांकरितांच ह्या लोकीं आगमन करणारी अशी जी मी दिव्य धेनू त्या माझा त्याग मूढमति मनुष्यमात्र करतो ( दुसरा कोणी करीत नाहीं ). १६.

---

वीतये । अधा नियुत्वः उभयस्य नः पिब शुचिं सोमं गवाशिरम् ॥ १० ॥ बट् महाँ असि सूर्य बळ् आदित्य महाँ असि । मह स्ते सतो महिमा पनस्यते अद्धा देव महाँ असि ॥ ११ ॥ बट् सूर्य श्रवसा महाँ असि सत्रा देव महाँ असि । मह्ना देवानाम् असुर्यः पुरोहितो विभु ज्योतिर् अदाभ्यम् ॥ १२ ॥ इयं या नीची अर्किणी रूपा रोहिण्या कृता । चित्रेव प्रति अदर्शि आयती अन्तो दशसु बाहुषु ॥ १३ ॥ प्रजाः ह तिस्रो अति आयम् ईयु र्नि अन्याः अर्कम् अभितो विविश्रे । बृहत् ह तस्थौ भुवनेषु अन्तः पवमानो हरित आ विवेश ॥ १४ ॥ माता रुद्राणां दुहिता वसूनां स्वसाऽऽदित्यानाम् अमृतस्य नाभिः । प्र नु वोचं चिकितुषे जनाय मा गाम् अनागाम् अदितिं वधिष्ट ॥ १५ ॥ वचोविदं वाचम् उदीरयन्तीं विश्वाभि र्धीभिर् उपतिष्ठमानाम् । देवीं देवेभ्यः परि एयुषीं गाम् आ मा ऽ वृक्त मर्त्यो दभ्रचेताः ॥ १६ ॥

---

## सूक्त ९१

हे अग्निदेवा, तूं भक्तां( ना देण्या )साठीं तारुण्याचा जोम आपल्यापाशीं ठेवतोस; तूं कवि, यज्ञगृहाचा स्वामी आणि यौवनाढ्य आहेस १. —तर आमच्या हविर्भागयुक्त आणि भक्तिप्रेरित स्तवनांच्या योगानें, हे तेजोमूर्ते ज्ञानवान् अग्निदेवा, दिव्यविबुधांना येथें घेऊन ये २. —सर्व प्रेरकांमध्यें श्रेष्ठ, आणि अत्यंत तरुण असा तूं आमचा सहाकारी असल्यावर आम्हीं सत्वसामर्थ्याला योग्य होऊंच होऊं ३. —समुद्राचें ( किंवा आकाशाचें ) वस्त्र जो परिधान करतो अशा पवित्र अग्नीचा—और्वभृगूप्रमाणें, अप्नवानाप्रमाणें मीहि धांवा करितों ४. —वाऱ्याच्या सोसाट्याप्रमाणें शब्द करणारा, पर्जन्याप्रमाणें गर्जना करणारा, काव्यस्फूर्ति देणारा,आणि आकाशरूप वस्त्र परिधान करणारा जो अग्नि, त्याचा मी धांवा करितों ५. —जगत्प्रसव सवित्याची सृष्टि,किंवा सद्भाग्यदात्या देवाचा प्रसाद,असें समजूनच आम्हीं समुद्ररूपवस्त्र परिधान करणाऱ्या अग्नीला पाचारण करतों ६. —(यशानें) वर्धमान होणाऱ्या अध्वरयागांत वरिष्ठ, आणि दर्पदमन–सामर्थ्याचा संरक्षक असा जो अग्नि, त्याला शरण जा ७. —जो जो आकार घडवावयाचा असेल त्याच्याकडे कामकरी जसा पूर्ण लक्ष लावतो त्याप्रमाणें हा अग्नि आमच्याकडे सर्व लक्ष ठेवतो. त्याच्याच कर्तृत्वानें आम्हीं यशस्वी होणार ८. —दिव्यविभूतिमध्यें अग्नि हा सर्वप्रकारच्या शोभेचा अधिपति आहे. तो आपल्या सत्वसामर्थ्यासह आमच्याकडे येवो ९. —यच्चावत् यज्ञसंपादकांमध्यें अत्यंत प्रख्यात आणि यशस्वी, यज्ञामध्यें अग्रपूजेचा ज्याचा मान, त्या अग्नीचें येथें स्तवन कर १०. —तीक्ष्णतेजस्क, परंतु पवित्रज्वाल अशा अग्नीचें स्तवन कर. तो श्रेष्ठ, तो अपारकीर्ति अग्नि यज्ञशाळांमध्यें प्रदीप्त झाला आहे ११. —चपल तुरगारूढ वीराप्रमाणें विजयदायक अग्नीचें गुणगायन कर. हे स्तोत्या, त्या महाप्रतापी, आणि

## सूक्तम् ९१

भार्गवः प्रयोगः अग्निः गायत्री

त्वम् अग्ने बृहत् वयो दधासि देव दाशुषे। कवि र्गृहपति र्युवा ॥ १ ॥ स न ईळानया सह देवाँ अग्ने दुवस्युवा। चिकित् विभानो आ वह ॥ २ ॥ त्वया ह स्वित् युजा वयं चोदिष्ठेन यविष्ठ्य। अभि ष्मो वाजसातये ॥ ३ ॥ और्वभृगुवत् शुचिम् अप्नवानवत् आ हुवे। अग्निं समुद्रवाससम् ॥ ४ ॥ हुवे वातस्वनं कविं पर्जन्यक्रन्द्यं सहः। अग्निं समुद्रवाससम् ॥ ५ ॥ आ सवं सवितु र्यथा भगस्येव भुजिं हुवे। अग्निं समुद्रवाससम् ॥ ६ ॥ अग्निं वो वृधन्तम् अध्वराणां पुरूतमम्। अच्छा नप्त्रे सहस्वते ॥ ७ ॥ अयं यथा न आभुवत् त्वष्टा रूपेव तक्ष्या। अस्य क्रत्वा यशस्वतः ॥ ८ ॥ अयं विश्वाः अभि श्रियः अग्नि र्देवेषु पत्यते। आ वाजैर् उप नो गमत् ॥ ९ ॥ विश्वेषाम् इह स्तुहि होतॄणां यशस्तमम्। अग्निं यज्ञेषु पूर्व्यम् ॥ १० ॥ शीरं पावकशोचिषं ज्येष्ठो यो दमेषु आ। दीदाय दीर्घश्रुत्तमः ॥ ११ ॥ तम् अर्वन्तं

लोकांना आपआपल्या कार्यांस प्रवृत्त करणाऱ्या अग्नीचें स्तवन कर १२. —हविर्दात्या भक्ताला आपल्या आप्तप्रमाणें वाटणाऱ्या अशा ज्या स्तुति त्या तुझ्याकडे वळून वायूच्या झोतामध्यें स्थिर राहिल्या आहेत १३. —त्याचें कुशासन तीन पदरी आहे, त्याला आच्छादन नाहीं, तें बांधूनहि ठेवलें नाहीं ( तर पसरून दिलेलें आहे ), आणि त्याच्या ठिकाणीं उदकांनीं आपल्याकरितां जागा मिळविली आहे १४. —मनोरथांची वृष्टि करणाऱ्या त्या देवाचें स्थान अनिरुद्ध अशा सहायकशक्तींनीं कल्याणमय झालेलें असतें. त्याप्रमाणें त्याचें दर्शनहि सूर्याप्रमाणेंच संतोषदायक असतें १५. —हे अग्निदेवा, तूं घृताहुतींच्या योगानें आपल्या प्रखरदीप्तिनें प्रज्वलित होऊन दिव्यविभूतिंना येथें आण, आणि त्यांचा सत्कार कर १६. —तुज कवीला, ( दिव्य विभूतिंना ) हविर्भाग पोहोंचविणाऱ्या तुज अमर देवाला, हे अंगिरा अग्ने, अरणि मातांनीं जन्म दिला १७. —चिद्रूप, सर्वोत्कृष्ट आणि प्रतिभादायक अग्निदेवा, हविर्भाग पोहोंचविणारा ( आणि दिव्यविभूतींचा ) प्रतिनिधि अशा तुजला ( ऋत्विजांनीं ) वेदीवर स्थापन केलें आहे १८. —मजजवळ यज्ञधेनू नाहीं; किंवा समिधा तोडावयास कुऱ्हाडहि नाहीं. पण मजजवळ जें ( भक्तिपूर्ण मन ) आहे तेंच मीं तुझ्या पायावर वाहतों १९. —(समिधांच्या अभावीं) हे अग्निदेवा, आम्हीं जीं दुसऱ्या प्रकारचीं काष्ठें तुझ्या ठायीं अर्पण करूं, त्यांचा हे तारुण्यमूर्त्ते देवा, तूं प्रेमानें स्वीकार कर २० —तसें एखादें काष्ठ वाळवीनें खाल्लें असलें, किंवा किड्यानें कोरलें असलें तरी तें सर्व तूं घृताप्रमाणें प्रिय मानून घे. २१. —अग्नि प्रज्वलित होत असतां मर्त्य भक्तानें मनःपूर्वक आपली बुद्धि त्याच्याकडे लावावी अशाच रीतीनें मी ऋत्विजांसह अग्नीला प्रज्वलित करतों. २२.

---

न सानसिं गृणीहि विप्र शुष्मिणम्। मित्रं न यातयज्जनम् ॥ १२ ॥ उप त्वा जामयो गिर देदिशती र्हविष्कृतः। वायोर् अनीके अस्थिरन् ॥ १३ ॥ यस्य त्रिधातु अवृतं बर्हिस् तस्थौ असंदितम्। आप श्चित् नि दधा पदम् ॥ १४ ॥ पदं देवस्य मीळ्हुषो अनाधृष्टाभिर् ऊतिभिः। भद्रा सूर्य इवो-पदृक् ॥ १५ ॥ अग्ने घृतस्य धीतिभिस् तेपानो देव शोचिषा। आ देवान् वक्षि यक्षि च ॥ १६ ॥ तं त्वाऽजनन्त मातरः कविं देवासो अङ्गिरः। हव्यवाहम् अमर्त्यम् ॥ १७ ॥ प्रचेतसं त्वा कवे अग्ने दूतं वरेण्यम् हव्यवाहं नि षेदिरे ॥ १८ ॥ नहि मे अस्ति अघ्न्या न स्वधिति र्वनन्वति। अथै-तादृक् भरामि ते ॥ १९ ॥ यत् अग्ने कानि कानि चित् आ ते दारूणि दध्मसि। ता जुषस्व यविष्ठ्य ॥ २० ॥ यत् अत्ति उपजिह्विका यत् वम्रो अति सर्पति। सर्वं तत् अस्तु ते घृतम् ॥ २१ ॥ अग्निम् इन्धानो मनसा धियं सचेत मर्त्यः। अग्निम् ईधे विवस्वभिः ॥ २२ ॥

---



## सूक्त ९२

सन्मार्गदर्शकांत श्रेष्ठ असा अग्नि दृग्गोचर झाला आहे, त्याच्या ठिकाणीं आपलीं सर्व धर्मकृत्यें लोक अर्पण करीत असतात. उत्तम रीतीनें प्रकट झालेला आणि आर्यलोकांचा उत्कर्षच अशा अग्नीकडे आमच्या स्तुति जाऊन पोहोंचल्या देखील १. —दिवोदासानें प्रज्वलित केलेला अग्नि, देवांच्या इच्छेनुरूपच कीं काय, आपल्या धगधगीत तेजानें पृथ्वी-मातेला आच्छादनविरहित ठेवीत नाहीं, आणि आपणहि आकाशाच्या शिखरावर आरूढ झालेला असतो. २. —जो अग्नि अद्भुतपराक्रम करूं लागला कीं, त्याच्यापुढें ( पातकी ) लोक चळचळां कांपतात, जो हजारों लाभ प्राप्त करून देतो त्या अग्नीची सेवा हा ध्यानबुद्धीला एकप्रकारचा लाभच असें समजून मनःपूर्वक करा ३. —ज्या मर्त्यजनाला तूं वैभवाकडे नेतोस, जो भक्त, हे दिव्यनिधे देवा, तुजला हवि अर्पण करतो, त्याला उक्थनिपुण, ( विद्वान् ) आणि हजारों लोकांचें पोषण करण्यास समर्थ असा वीर्यवान् पुत्र प्राप्त होतो. ४. —प्रसंग कितीहि कठीण असो, अश्वारूढ सैनिकाच्या सहायानें तो ( भक्त ) विजयश्री जिंकून आपलीशी करतो, आणि अक्षय्य कीर्ति संपादन करतो. तूं दिव्यविबुधांत निरंतर असतोस म्हणून, हे अपारनिधे देवा, सर्व प्रकारचीं अभिलषणीय धनें तुझ्या ठिकाणीं आम्हीं ध्यानानें पाहतों ५. —जो सर्व प्रकारचें धन देतो, जो मानवांचा आनंदमग्न यज्ञसंपादक आहे, अशा अग्नीकडे, मधानें परिपूर्ण पात्रांप्रमाणें आमच्या कर्णमधुर स्तुति सर्वांच्या अगोदर जातात ६. हवि अर्पण करण्यांत तत्पर जे भक्त ते अग्नीला अश्वारूढ वीराप्रमाणें स्तवनांनीं प्रसन्न करितात. हे मनुष्याच्या प्रभो, आमच्या पुत्रपौत्रांच्या दोन्ही पिढ्यांत तूं दानशू-

---

## सूक्तम् ९२

काण्वः सोभरिः अग्निः बृहती

अदर्शि गातुवित्तमो यस्मिन् व्रतानि आ दधुः । उपो षु जातम् आर्यस्य वर्धनम् अग्निं नक्षन्त नो गिरः ॥ १ ॥ प्र दैवोदासो अग्निः देवान् अच्छा न मज्मना । अनु मातरं पृथिवीं वि वावृते । तस्थौ नाकस्य सानवि ॥ २ ॥ यस्मात् रेजन्त कृष्टय श्चर्कृत्यानि कृण्वतः । सहस्रसां मेधसातौ इव त्मना अग्निं धीभिः सपर्यत ॥ ३ ॥ प्र यं राये निनीषसि मर्तो यस् ते वसो दाशत् । स वीरं धत्ते अग्न उक्थशंसिनं त्मना सहस्रपोषिणम् ॥ ४ ॥ स दळ्हे चित् अभि तृणत्ति वाजम् अर्वता स धत्ते अक्षिति श्रवः ॥ त्वे देवत्रा सदा पुरूवसो विश्वा वामानि धीमहि ॥ ५ ॥ यो विश्वा दयते वसु होता मन्द्रो जनानाम् । मधो र्न पात्रा प्रथमानि अस्मै । प्र स्तोमाः यन्ति अग्नये ॥६॥ अश्वं न गीर्भी रथ्यं सुदानवो

रांचें दातृत्व ठेव ७. —श्रेष्ठतम, सद्धर्मप्रिय, थोर, प्रदीप्ततेजस्क, अशा अग्नीप्रीत्यर्थ, हे स्तोतृजनहो, तुम्हीं गुणगायन करा ८. —दिव्यतेजस्क, भगवान् अग्नीला प्रज्वलित करून त्याला आहुति दिली असतां वीराला शोभेल असें यश तो प्राप्त करून देतो; तर त्याची प्रेमळ आणि स्तुत्य अशी वात्सल्यबुद्धि सत्वसामर्थ्यासह आमच्याकडे येणार नाहीं काय ? ९. —प्रियवस्तूंत अत्यंत प्रिय, मानवांचा अतिथि, रथारूढ सैनिकांचा नियन्ता असा जो अग्नि त्याचें स्तवन, हे सोमसवन करणाऱ्या भक्ता, तूं भक्तीनें कर १०. —प्रत्यक्ष दिसणारा आणि दृष्टीला **अगोचर** असा ठेवा, तो सर्वज्ञ आणि परमपूज्य अग्नि भक्ताकडे आणतो; धवधव्याच्या प्रवाहांतील लाटा जशा दुस्तर, त्याप्रमाणें ध्यानानें सत्वसामर्थ्य प्राप्त करून देणाऱ्या अग्नीच्या लीला अगम्य होत ११. —मानवांचा अतिथि, ( दिव्य )निधि असा अग्नि आम्हांवर रोष न करो; उत्तम होता आणि अध्वरयागसंपादक जो अग्नि तोच सर्व मानवांना स्तवनीय होय १२. —जे कोणत्याहि प्रकारांनीं, पण उत्तम सूक्तांच्या योगानें तुझें गुणसंकीर्तन करतात, त्यांना हे दिव्यनिधे अग्नि, कसलाहि घातपात न होवो. तूं भक्ताचा मध्यस्थ व्हावास म्हणून तुजला हवि अर्पण करून आणि अध्वरयाग साङ्ग संपादून, ( भक्तजन ) तुझें स्तवन करात असतो १३. —हे अग्निदेवा, तूं मरुतांचा सखा आहेस, तर रुद्रांसह सोमप्राशनासाठीं मज सोभरीच्या उत्तम स्तुतीकडे आगमन कर, आणि ह्या दिव्यलोकप्रद यज्ञामध्यें हर्षनिर्भर हो १४.

**आठवें मण्डल समाप्त.**

---

मर्मृज्यन्ते देवयवः । उभे तोके तनये दस्म विश्पते पर्षि राधो मघोनाम् ॥ ७ ॥ प्र मंहिष्ठाय गायत ऋतान्ने बृहते शुक्रशोचिषे । उप स्तुतासो अग्नये ॥ ८ ॥ आ वंसते मघवा वीरवत् यशः समिद्धो द्युम्नी आहुतः । कुवित् नो अस्य सुमतिं नवीयसी अच्छा वाजेभिर् आगमत् ॥ ९ ॥ प्रेष्ठम् उ प्रियाणां स्तुहि आसाव अतिथिम् । अग्निं रथानां यमम् ॥ १० ॥ उदिता यो निदिता वेदिता वसु आ यज्ञियो ववर्तति । दुष्टराः यस्य प्रवणे न ऊर्मयो धिया वाजं सिषासतः ॥ ११ ॥ मा नो हृणीताम् अतिथि र्वसुर् अग्निः पुरु प्रशस्त एषः । यः सुहोता सु अध्वरः ॥ १२ ॥ मो ते रिषन् ये अच्छोक्तिभि र्वसो । अग्ने केभि श्चित् एवैः ॥ कीरि श्चित् हि त्वाम् ईट्टे दूत्याय रातहव्यः सुअध्वरः ॥ १३ ॥ अग्ने याहि मरुत्सखा रुद्रेभिः सोमपीतये । सोभर्याः उप सुष्टुतिं मादयस्व स्वर्णरे ॥ १४ ॥

**इति अष्टमं मण्डलम्**

# मण्डल नववें

## अष्टक ६ अध्याय ७ वर्ग १६

## सूक्त १

अत्यंत रुचकर, अत्यंत मधुर जशा धारेनें, हे सोमरसा, तूं स्वच्छ प्रवाहानें वहात रहा. इन्द्रानें प्राशन करावा म्हणून तुझा रसा पिळला आहे १. —राक्षसांचा नाश करणारा, सर्वदर्शी सोम, (सुवर्णाच्या अथवा) लोहाच्या वस्त्यानें किंवा काष्टानें जेथें कुटतात अशा आपल्या गृहांत ( अथवा खलांत ) अधिष्ठित झाला आहे २. —तूं इच्छिताची प्राप्ति उत्कृष्टरीतीनें करून देणारा, अत्यंत दानशील आणि अज्ञानाचा समूळ नाश करणारा हो; दानशूर यजमानांची देणगी तूंच इकडे आणतोस ३. —श्रेष्ठ असे जे दिव्यविबुध त्यांच्या यज्ञाकडे आपल्या पेयाच्या योगानें वहात रहा. आणि सत्यबल आणि सत्कीर्ति यांना आमच्याकडे वहात आण ४. —आम्हीं तुझ्याच सेवेंत व्यापृत आहोंत. प्रतिदिवशीं तें आमचें कर्तव्यच आहे. हे आल्हादप्रद रसा, आमच्या आकांक्षा तुझ्या ठायीं एकवटल्या आहेत ५. —( पात्रांत ) पाझरलेल्या सोमरसाला सूर्याची कन्या ( श्रद्धादेवी ) ही अभंग आणि विस्तृत अशा पवित्रांतून गाळून स्वच्छ करते ६. —अंगुलीरूप दहा तरुणी ( परस्परांच्या ) भगिनी त्या ( सोमा )ला अभिषव पात्रांत ( यज्ञाच्या ) शेवटच्या दिवसापर्यंत जपून ठेवतात ७. —त्या ललना त्याला ( पात्रांत ) खळखळ ओततात, नंतर ( रस भरण्यासाठीं ) एक फुगीर भोत फुंकून फुगवितात, आणि सोमाचें तीन प्रकारचें दुःखहारक मधुरपेय (बनवितात) ८. —मग इन्द्रानें (रस) प्राशन.

---

## अथ नवमं मण्डलम्

## सूक्तम् १

मधुच्छन्दाः पवमानसोमः गायत्री

स्वादिष्ठया मदिष्ठया पवस्व सोम धारया । इन्द्राय पातवे सुतः ॥ १ ॥ रक्षोहा विश्वचर्षणिर् अभि योनिम् अयोहतम् । द्रुणा सधस्थम् आसदत् ॥२॥ वरिवोधातमो भव मंहिष्ठो वृत्रहन्तमः । पर्षि राधो मघोनाम् ॥ ३ ॥ अभि अर्ष महानां देवानां वीतिम् अन्धसा । अभि वाजम् उत श्रवः ॥ ४ ॥ त्वाम् अच्छा चरामसि तदित् अर्थं दिवे दिवे । इन्दो त्वे नः आशसः ॥ ५ ॥ पुनाति ते परि स्रुतम् सोमं सूर्यस्य दुहिता । वारेण शश्वता तना ॥ ६ ॥ तम् ईम् अण्वीः समर्ये आ गृभ्णन्ति योषणो दश । स्वसारः पार्ये दिवि ॥ ७ ॥ तम् ईम् हिन्वन्ति अग्रुवो धमन्ति बाकुरं दृतिम् । त्रिधातु वारणं मधु ॥ ८ ॥ अभी–मम् अघ्न्याः उत श्रीणन्ति धेनवः शिशुम् ॥

करावा म्हणून ( निर्दोष अशा धेनू ) सोमरूप वत्साला दुग्धाशीं मिश्रित करतात ९. —म्हणजे त्याच्या ( प्राशनानें होणाऱ्या ) हर्षावेगांत इन्द्र हा सर्व तमोरूप शत्रूंचा समूळ नाश करतो; आणि भक्तांना तो शूर देव वरदानें अर्पण करतो १०.

## सूक्त २

सोमा तूं देवसेवोत्सुक आहेस म्हणून या स्वच्छ पवित्रांतून वेगानें वहा. हे आल्हादप्रद रसा वीर्यशाली असा तूं इन्द्राच्या ठिकाणीं प्रवेश कर १. —वीर्यशाली रसा, तुझा उत्तमोत्तम प्रसाद आम्हांस दे. हे आल्हादप्रदा, तूं अत्यंत तेजस्वी आणि लोकधारक असा स्वस्थानीं अधिष्ठित हो २. आनंदोत्पादक सोमरसाच्या धारेनें प्रिय आणि मधुर असें पेय वनविलें; पहा त्या सत्कर्मप्रवर्तक सोमानें (वसतीवरी) उदकांना आच्छादून टाकलें ३. —जेव्हां दुग्धासह (म्हणजे दुग्धमिश्रित होऊन) तूं एकत्र राहतोस, तेव्हां श्रेष्ठ जो तूं त्या तुझ्याकडे श्रेष्ठ नद्याहि वहात येतात ४. —( हर्षांचा ) समुद्र, [ भूलोकाचा ] स्तंभ, द्युलोकाचा धारणकर्ता, आणि आम्हांला प्रिय असा सोमरसहि पवित्रांतून पाझरून उदकांत जाऊन मिसळतो ५. —हरिद्वर्ण, श्रेष्ठ, आणि मित्राप्रमाणें दर्शनीय अशा सोमरूपी वृषभानें गर्जना केली आहे. सूर्यावरोवर तोहि तेजानें तळपत आहे ६. —आल्हादप्रदा, आमच्या सत्कर्मोत्सुक वाणी तुझ्या तेजानें अलंकृत होतात; आणि (इन्द्राला) हर्ष व्हावा म्हणून त्या प्रार्थनांनीं तूंहि सुशोभित होतोस ७. —तर ( देवानें ) हर्षोत्फुल्ल व्हावें, ( त्यानें ) शत्रूंचा दर्प चिरडून टाकावा म्हणून तुज ( पाप )विमोचकाची विनवणी आम्हीं करीत आहों, खरोखर तुझी प्रशंसा तशीच श्रेष्ठ आहे ८ —आल्हादप्रद

सोमम् इन्द्राय पातवे ॥ ९ ॥ अस्येत् इन्द्रो मदेषु आ विश्वा वृत्राणि जिघ्नते । शूरो मघा च मंहते ॥ १० ॥

## सूक्तम् २

मेधातिथिः पवमानसोमः गायत्री

पवस्व देववीर् अति पवित्रं सोम रंह्या । इन्द्रम् इन्दो वृषा ऽऽ विश ॥ १ ॥ आ वच्यस्व महि प्सरो वृषेन्दो द्युम्नवत्तमः । आ योनिं धर्णसिः सदः ॥ २ ॥ अधुक्षत प्रियं मधु धारा सुतस्य वेधसः । अपो वसिष्ट सुक्रतुः ॥ ३ ॥ महान्तं त्वा महीर् अनु आपो अर्षन्ति सिन्धवः । यत् गोभि र्वासयिष्यसे ॥ ४ ॥ समुद्रो अप्सु मामृजे विष्टम्भो धरुणो दिवः । सोमः पवित्रे अस्मयुः ॥ ५ ॥ अचिक्रदत् वृषा हरिः महान् मित्रो न दर्शतः । सं सूर्येण रोचते ॥ ६ ॥ गिरस् ते इन्दो ओजसा मर्मृज्यन्ते अपस्युवः । याभि र्मदाय शुंभसे ॥ ७ ॥ तं त्वा मदाय घृष्वये उ लोक-

रसा, इन्द्राच्या भेटीसाठीं उत्सुक झालेला असा तूं उदकवृष्टि करणाऱ्या पर्जन्याप्रमाणें आमच्यासाठीं मधुर धारेनें वहात रहा ९. —आल्हादप्रद रसा, तूं धेनू प्राप्त करून देणारा, शूर सैनिक मिळवून देणारा, अश्व मिळवून देणारा आणि सत्वसामर्थ्य उपलब्ध करून देणारा आहेस. तसाच यज्ञाचा पुरातन आत्माहि तूंच आहेस १०.

## सूक्त ३

पहा, हा मृत्युरहित दिव्यसोम द्रोणकलशांत अधिष्ठित होण्यासाठीं त्या कलशाकडे पक्ष्याप्रमाणें उड्डान करून जात आहे १. —हा दिव्यरस, मुखानें स्तुतिघोष करीत असतां पिळून सिद्ध केलेला हा अजिंक्य रस, आपल्या पवित्र प्रवाहानें वहात वहात कपटी शत्रूवर धांवून जातो २. —हा दिव्यरस, सद्धर्मप्रेमी स्तोतृजनांनीं सत्वसामर्थ्यप्राप्तिसाठीं अलंकृत केला आहे; ३. —हा पवित्रप्रवाही रस, सत्ववलांनीं युक्त होऊन गमन करणाऱ्या वीराप्रमाणें यच्चावत् अभिलषणीय वस्तु जिंकून आणतो ४. —हा दिव्यसोम महारथ्याप्रमाणें वेगानें पुढें जातो. हा पवित्रप्रवाही रस इच्छित देतो आणि “ वर माग ” अशी स्पष्टपणें गर्जना करतो ५, —स्तवनज्ञभक्तांनीं स्तविलेला हा सोमदेव, भक्तांना रत्नसंपत्ति देऊन उदकांत निमज्जन करतो ६. —आपल्या धारेनें पवित्रपणें वाहणारा हा रस गर्जना करीत रजोलोकाच्याहि पार निघून द्युलोकापर्यंत धांवत जातो ७. —हा अप्रतिहत, पवित्रप्रवाही, आणि अध्वरयागांना साङ्ग करणारा सोमरस रजोलोकांतून पार जाऊन द्युलोकापर्यंत पसरतो ८. —हा दिव्यरस, दिव्यविभूतिसाठीं पिळलेला हरिद्वर्ण रस, आपल्या पुरातन, जन्मानें निर्दोष, अशा पवित्रांतून

क्रत्नुम् ईमहे । तव प्रशस्तयो महीः ॥ ८ ॥ अस्मभ्यम् इन्दो इन्द्रयु-र्मध्वः पवस्व धारया । पर्जन्यो वृष्टिमान् इव ॥९॥ गोषाः इन्दो नृषाः असि अश्वसा वाजसा उत । आत्मा यज्ञस्य पूर्व्यः ॥ १० ॥

## सूक्तम् ३

शुनःशेपः पवमानसोमः गायत्री

एष देवो अमर्त्यः पर्णवीर् अव दीयति । अभि द्रोणानि आ सदन् ॥ १ ॥ एष देवो विपा कृतः अति ह्वरांसि धावति । पवमानो अदाभ्यः ॥ २ ॥ एष देवो विपन्युभिः पवमान ऋतायुभिः । हरि वाजाय मृज्यते ॥ ३ ॥ एष विश्वानि वार्या शूरो यन् इव सत्वभिः । पवमानः सिषासति ॥ ४ ॥ एष देवो रथर्यति पवमानो दशस्यति । आविष् कृणोति वग्वनुम् ॥ ५ ॥ एषो विप्रैर् अभिष्टुतः अपो देवो वि गाहते । दधत् रत्नानि दाशुषे ॥ ६ ॥ एष दिवं वि धावति तिरो रजांसि धारया । पवमानः कनिक्रदत् ॥७॥ एष दिवं वि आऽसरत् तिरो रजांसि अस्पृतः । पवमानः

वहात आहे ९. —असा तो अनेक धर्माचरणांचा प्रणेता ( सोम ), स्वतः प्रकट होऊन ( भक्तांमध्यें ) उत्साह उत्पन्न करून पिळला गेला म्हणजे आपल्या धारेनें पवित्र-प्रवाहानें वहात रहातो १०.

## सूक्त ४

सोमा, तूं आम्हांस वरदान दे. हे पावना, तूं आमच्यासाठीं महत्कीर्ति जिंकून आण; आणि आम्हांला श्रेयःप्राप्तिविषयीं उत्सुक कर १. —आम्हांला प्रकाश दे; दिव्यतेज दे; हे सोमा, यच्चावत् मंगलें आमच्या आधीन कर; आणि आम्हांला श्रेयःप्राप्तिविषयीं उत्सुक कर २. —चातुर्यबल दे; कर्तृत्व दे; हे सोमा, आम्हांवर हल्ला करणाऱ्यांना दूर हांकून देऊन ठार कर; आणि आम्हांला श्रेयःप्राप्तिविषयीं उत्सुक कर. ३. —सोम-रस गाळून स्वच्छ करणारांनो, तो रस इन्द्राला प्राशन करावयाचा आहे म्हणून तो गाळून स्वच्छ करा. आणि ( हे सोमा ) तूं आम्हांला श्रेयः प्राप्तिविषयीं उत्सुक कर ४. —सूर्य प्रकाशित झाला असतां त्या प्रकाशांत तुझ्या कर्तृत्वानें, आणि तुझ्या सहायशक्तींनीं, आमचा भाग राहील असें कर, आणि आम्हांला श्रेयसोत्सुक कर ५. —तुझ्या कर्तृत्वानें आणि तुझ्या सहायांनीं सूर्यप्रकाश निरंतर पाहूं असे घडीव, आणि आम्हांस श्रेयसोत्सुक कर ६. —हे उत्तम आयुधधारी सोमा, **उभयलोकांतील** ऐश्वर्य आमच्याकडे वहात आण, आणि आम्हांस श्रेयसोत्सुक कर ७. —तूं अपराजित आणि समरांत शत्रूंना चिरडून टाकणारा आहेस, तर आमच्याकडे ( अढळ )ऐश्वर्य वहात आण आणि आम्हांला श्रेयसोत्सुक कर ८. —नानाप्रकारचे धर्माचार आहेत तरी भक्तांनीं यज्ञद्वाराच तुझें

---

सु अध्वरः॥ ८ ॥ एष प्रत्नेन मन्मना देवो देवेभ्यः सुतः। हरिर्हंविन्त्रे अर्षति ॥ ९ ॥ एप उ स्य पुरुव्रतो जज्ञानो जनयन् इषः। धारया पवते सुतः ॥ १० ॥

## सूक्तम् ४

हिरण्यस्तूपः पवमानसोमः गायत्री

सना च सोम जेषि च पवमान महि श्रवः। अथा नो वस्यसस् कृधि ॥१॥ सना ज्योतिः सना स्व विश्वा च सोम सौभगा। अथा नो वस्यसस् कृधि ॥ २ ॥ सना दक्षम् उत क्रतुम् अप सोम मृधो जहि। अथा नो वस्यसस् कृधि ॥ ३ ॥ पवितारः पुनीतन सोमम् इन्द्राय पातवे। अथा नो वस्यसस् कृधि ॥ ४ ॥ त्वं सूर्ये न आ भज तव क्रत्वा तवोतिभिः। अथा नो वस्यसस् कृधि ॥ ५ ॥ तव क्रत्वा तवोतिभि ज्योंक् पश्येम सूर्यम्। अथा नो वस्यसस् कृधि ॥ ६ ॥ अभि अर्प सु आयुध सोम द्विबर्हसं रयिम्। अथा नो वस्यसस् कृधि ॥ ७ ॥ अभि अर्पा-अनपच्युतो रयिं समत्सु सासहिः अथा नो वस्यसस् कृधि ॥ ८ ॥ त्वां यज्ञैर् अवीवृधन् पवमान विधर्मणि। अथा नो

महात्म्य वाढविलें आहे तर आम्हांस श्रेयसोत्सुक कर ९. —हे आल्हादप्रदा, आम्हांला अद्भुत, अश्वसमृद्ध, आणि सर्वांना जीवन देणारें ( सर्वात्मभावाचें ) ऐश्वर्य दे. अर्थात् आम्हांला श्रेयसोत्सुक कर १०.

## सूक्त ५

हा देदीप्यमान, सर्वाधिपति, भक्तपावन, वीर्यशाली सोम प्रसन्नान्तःकरणानें मोठ्यानें गर्जना करीतच येथें विराजमान झाला आहे १. —भक्तरक्षक, पतितपावन, ( सोम ) अन्तरिक्षांत सुप्रकाशित होऊन आपलीं (पल्लवरूप ) शिंगें पाजळीत यज्ञमंडपाकडे येतो २. —तो स्तवनीय, पावन, अभीष्टदाता, महाद्युति सोम आपल्या ओजस्वितेनें मधुररसाच्या धारांनीं सुप्रकाशित होतो ३. —दर्भाचीं अग्रें पूर्वेकडे करून ( कुशासन ) पसरावयास लावून तो हरिद्वर्ण आणि आपल्या ओजस्वितेनें पावन करणारा दिव्यसोम, दिव्यविभूति-मध्यें गमन करतो ४, —सोन्याच्या पत्र्यांनीं मढविलेलीं यज्ञमण्डपाचीं देदीप्यमान महाद्वारें पतितपावन सोमानें स्तुति करतांच सर्व बाजूंनीं एकदम उघडतात ५, —लावण्यवती, श्रेष्ठ, आणि परमथोर अशा ज्या रात्र आणि उषादेवी त्यांना पाहून सुस्वरूप युवतींनाच पाहिल्याप्रमाणें पतित पावन सोम आतुर होतो ६. —सर्व मानवांना पाहणारे दिव्यलोकींचे यज्ञपुरोहित जे उभयतां देव त्यांना मी पाचारण करतों. पावन सोम आणि इन्द्र हे ते देव होत ७. —भारतीं, सरस्वती आणि इळा ह्या तीन श्रेष्ठ आणि दर्शनीय देवी आमच्या पवमानसोमाच्या यज्ञप्रसंगीं प्राप्त झाल्या ८. —सर्वांच्या अगोदर प्रकट झालेला, सर्वांचें संरक्षण करणारा, सर्वांचा अग्रेसर, जो त्वष्टा त्याला मी

---

वस्यसस् कृधि ॥ ९ ॥ रयिं न श्चित्रम् अश्विनम् इन्दो विश्वायुम् आभर । अथा नो वस्यसस् कृधि ॥ १० ॥

## सूक्तम् ५

असितो देवलः पवमानसोमः गायत्री

समिद्धो विश्वतस् पतिः पवमानो विराजति । प्रीणन् विश्वा कनिक्रदत् ॥ १ ॥ तनूनपात् पवमानः शृङ्गे शिशानो अर्षति । अन्तरिक्षेण रारजत् ॥ २ ॥ ईळेन्यः पवमानो रयि र्वि राजति द्युमान् । मधो र्धाराभिर् ओजसा ॥ ३ ॥ बर्हिः प्राचीनम् ओजसा पवमानः स्तृणन् हरिः । देवेषु देव ईयते ॥ ४ ॥ उत् आतै र्जिहते बृहत् द्वारो देवी र्हिरण्ययीः । पवमानेन सुष्टुता ॥ ५ ॥ सुशिल्पे बृहती मही पवमानो वृषण्यति । नक्तोषासा न दर्शते ॥ ६ ॥ उभा देवा नृचक्षसा होतारा दैव्या हुवे । पवमानः इन्द्रो वृषा ॥ ७ ॥ भारती पवमानस्य सरस्वती इळा मही । इमं नो यज्ञम् आ गमन् तिस्रो देवीः सुपेशसः ॥ ८ ॥ त्वष्टारम् अग्रजां गोपां पुरो यावानम्

पाचारण करतों, तोच इन्दु, तोच वीर इन्द्र, तोच हरि, तोच पावन सोम, आणि तोच प्रजापति होय ९, —पावना सोमा, सहस्रावधि शाखांचा, हरिद्वर्ण, परंतु सोन्याप्रमाणें चकचकीत असा जो यूप त्याला आपल्या धारेनें आर्द्र कर १० —सकल दिव्य-विबुधांनों, आम्हीं पावन अशा सोमरसाची आहुति देत आहों, तर ह्या प्रसंगीं तुम्हीं सर्वजण आगमन करा. वायु, बृहस्पति, सूर्य, अग्नि, आणि इन्द्र, हे सर्व तुम्ही अगदीं एकसारखेच भक्तवत्सल आहांत ११.

## सूक्त ६

हे सोमा, तुजला ऊर्णावस्त्राच्या गाळणीवर ठेवला आहे; तूं वीर्यशाली, देवोत्सुक, आणि आम्हांविषयीं प्रेम बाळगणारा आहेस, तर आपल्या धारेनें स्वच्छ प्रवाहानें वहा १. —तूंच इन्द्र म्हणून आपला अपूर्व, हर्षवर्धन, आणि अत्युल्लासकर रस वहावयास लाव. आमच्या सत्वधीर वीरांसाठीं, अश्वारूढ सैनिकांसाठीं, रसधारा वहावयास लाव २. —तुजला पिळून पवित्रावर ठेवला असतांना पूर्वीचाच उत्तेजक हर्ष उत्थापित कर. सत्वधैर्याला अनुलक्षून, आणि सत्कीर्तीला अनुलक्षून वहात रहा ३. —सरसर ठिबकणारे सोमबिन्दु सखल जागयाकडे धांवणाऱ्या उदकाप्रमाणें झराझर वहात राहिले, आणि ( भक्तांना ) पावन करून इन्द्रापर्यंत जाऊन पोहोंचले ४. —सत्वाढ्य आणि अश्वारूढ वीराला युवतीजन स्नान घालून स्वच्छ करतात, त्याप्रमाणें वनांमध्यें क्रीडा करणाऱ्या सोमाला दहा युवती लोंकरीच्या पवित्रांतून गाळून स्वच्छ करतात ५. —हर्षोत्कर्ष व्हावा, देवांनीं स्वीकार करावा, आणि संग्रामाकरितां सैनिक सिद्ध व्हावे म्हणून त्या वीर्यशाली रसाला गोदुग्धाशीं मिश्रित कर ६. —इन्द्रदेवासाठीं पिळलेला हा दिव्य

---

आ हुवे । इन्दुर् इन्द्रो वृषा हरिः पवमानः प्रजापतिः ॥ ९ ॥ वनस्पतिं पवमान मध्वा सम् अङ्धि धारया । सहस्रवल्शं हरितं भ्राजमानं हिरण्ययम् ॥ १० ॥ विश्वे-देवाः स्वाहा कृतिं पवमानस्य आ गत । वायु र्बृहस्पतिः सूर्यः अग्निर् इन्द्रः सजोषसः ॥ ११ ॥

## सूक्तम् ६

असितो देवलः पवमानसोमः गायत्री

मन्द्रया सोम धारया वृषा पवस्व देवयुः । अव्यो वारेषु अस्मयुः ॥ १ ॥ अभि त्यं मद्यं मदम् इन्दो इन्द्र इति क्षर । अभि वाजिनो अर्वतः ॥ २ ॥ अभि त्यं पूर्व्यं मदं सुवानो अर्ष पवित्र आ। अभि वाजम् उत श्रवः ॥ ३ ॥ अनु द्रप्सास इन्दवः आपो न प्रवता ऽ सरन् । पुनानाः इन्द्रम् आशत ॥ ४ ॥ यम् अत्यमिव वाजिनं मृजन्ति योषणो दश। वने क्रीळन्तम् अत्यविम् ॥ ५ ॥ तं गोभि

सोम आपल्या पवित्र धारेनें वहात आहे. पहा, त्याच्या दुग्धानें इन्द्राला हर्षोत्फुल्ल केलें आहे ७. —यज्ञाचा आत्मा असा हा सोम उत्तम रीतीनें पिळला असतां जोरानें रसप्रवाह सोडतो, आणि प्राचीन कवनांचें रक्षण करतो ८. —याप्रमाणें हे अत्युत्तेजक रसा, गाळून स्वच्छ झालेला आणि आपला स्वीकार व्हावा म्हणून इन्द्राला भेटण्यास उत्सुक झालेला असा तूं काव्यस्फूर्तीचे शब्द ( भक्ताच्या ) हृदयांत गुप्त ठेवतोस ९.

## सूक्त ७

हे आल्हादप्रद आणि सुशोभित सोमविन्दु इन्द्राचें धोरण जाणून धर्मकार्यांत सनातन धर्मांच्या मार्गांनेंच पुढें सरसावतात १. —मधुररसाची धारा श्रेष्ठ होय; विस्तृत नदीप्रवाहांत ती बुडी मारते. सर्व हविर्भागांमध्यें महनीय हवि हाच होय २. —श्रेष्ठ आणि कामनावर्षक सोमानें ज्याला अभिमुख होऊन वनामध्यें यथायोग्य शब्द मोठ्यानें उच्चारले तोच अध्वरयाग सत्य होय ३. —पौरुषवस्त्रानें मण्डित आणि प्रतिभाशाली सोम काव्यस्फूर्ति देतो, तेव्हांच सत्वपराक्रमी भक्त स्वर्गीय प्रकाश जिंकतो ४. ( भक्त )पावन सोम, प्रतिस्पर्ध्यांच्या छातीवर आपल्या सैनिकांत राजाप्रमाणें विराजमान होतो; आणि अशा वेळेस ( स्फूर्तीनें ) कवन रचणारे भक्त त्याच्या सेवेस सादर असतात ५. —[ देवाला ] प्रिय असा हरिद्वर्ण सोम लोंकरीच्या पवित्रावर अधिष्ठित झाला आहे. परंतु त्यापूर्वी त्याचा वास वनांत असतो, आणि तेथें स्तोता हा त्याला मननानें आपलासा करतो ६. —" आनंदित हो " असें आपल्या मनानें भक्ताला जो म्हणतो, तो सोम स्वतःहि वायु, इन्द्र आणि अश्वीदेव ह्यांच्याकडे हर्षभरानें गमन करतो ७.

वृषणं रसं मदाय देववीतये। सुतं भराय सं सृज ॥ ६ ॥ देवो देवाय धारय इन्द्राय पवते सुतः। पयो यत् अस्य पीपयत् ॥ ७ ॥ आत्मा यज्ञस्य रंह्या सुष्वाणः पवते सुतः। प्रत्नं निपाति काव्यम् ॥ ८ ॥ एवा पुनानः इन्द्रयु मंदं मदिष्ठ वीतये। गुहा चित् दधिषे गिरः ॥ ९ ॥

## सूक्तम् ७

### पूर्ववत्

असृग्रम् इन्दवः पथा धर्मन् ऋतस्य सुश्रियः। विदाना अस्य योजनम् ॥ १ ॥ प्र धारा मध्वो अग्रियो महीर् अपो वि गाहते। हवि र्हविष्षु वन्द्यः ॥ २ ॥ प्र युजो वाचो अग्रियो वृषा ऽव चक्रदत् वने। सद्माभि सत्यो अध्वरः ॥ ३ परि यत् काव्या कवि र्नृम्णा वसानो अर्षति। स्व-र्वाजी सिषासति ॥ ४ ॥ पवमानो अभि स्पृधो विशो राजेव सीदति। यत् ईम् ऋण्वन्ति वेधसः ॥ ५ ॥ अव्यो वारे परि प्रियो हरि र्वनेषु सीदति। रेभो वनुष्यते मती ॥ ६ ॥ स वायुम् इन्द्रम् अश्विना

—त्या मधुररसाच्या लाटा, मित्र वरुण, आणि भग यांना आपल्या शक्तींनीं ओळखून काढून त्यांच्याकडे वहात जातात ८. —हे द्यावापृथिवीनों, आम्हांला सत्वबलाचा लाभ व्हावा म्हणून तुम्हीं मधुररसाचें ऐश्वर्य, सत्कीर्ति, आणि वैभव हीं जिंकून आणा. ९.

## सूक्त ८

ह्या सोमबिन्दूंनीं इन्द्राच्या पौरुषाचा व्याप वृद्धिंगत करून त्याच्या इच्छेनुरूप रसप्रवाह वहात सोडला आहे १, —चमूपात्रांत अधिष्ठित होणारे भक्तपावन सोमबिन्दु, वायु आणि अश्वीदेव यांच्यापर्यंत जाऊन पोहोंचणारे सोमरस, आम्हांमध्यें उत्कृष्ट वीर्य प्रकट करोत २. —हे सोम, देवप्रसादाचा लाभ व्हावा ह्यासाठीं ( आमच्या ) हृदयांत पवित्र भावना उत्पन्न करून, सद्धर्माचें आद्यस्थान जी वेदी तेथें आरोहण करण्यासाठीं तूं इन्द्राला आग्रह कर ३. —दहा अङ्गुली तुजला पिळून स्वच्छ करीत आहेत; सातांची ध्यानप्रवीणता तुजला पात्रांत ठेऊन ढेलकावे देत आहे, आणि ह्या सर्वांला अनुसरून स्तोतृजन तुझ्या सहवासानें हर्षनिर्भर झाले आहेत ४. —दिव्यविबुधांसाठीं, त्यांच्या हर्षोत्कर्षासाठीं, उदक मिसळून आणि लोंकरीच्या वस्त्रांतून गाळून तुजला आम्हीं गोदुग्धानें आच्छादित करतों ५. —तुज भक्तपावनाला कलशांत ठेवला असतांना तुझा हरिद्वर्ण फारच चकचकीत दिसतो; आणि अशा स्थितींत तूं गोदुग्धाचें वस्त्र परिधान करतोस ६. —आमच्या यजमानांसाठीं तुझा पवित्र प्रवाह वाहूं दे. सर्व द्वेष्ट्यांना दूर हांकून देऊन ठार कर; आणि हे आल्हादप्रदा सोमा, आपला प्राणमित्र जो इन्द्र त्याच्या मुखांत प्रवेश कर ७. —आकाशांतून पर्जन्याची वृष्टि कर; पृथिवीवर तेजाची वृष्टि कर;

---

साकं मदेन गच्छति । रणा यो अस्य धर्मभिः ॥ ७ ॥ आ मित्रावरुणा भगं मध्वः पवन्त ऊर्मयः । विदानाः अस्य शक्मभिः ॥ ८ ॥ अस्मभ्यं रोदसी रयिं मध्वो बाजस्य सातये । श्रवो वसूनि सं जितम् ॥ ९ ॥

## सूक्तम् ८

### पूर्ववत्

एते सोमाः अभि प्रियम् इन्द्रस्य कामम् अक्षरन् । वर्धन्तो अस्य वीर्यम् ॥१॥ पुनानास श्चमूषदो गच्छन्तो वायुम् अश्विना । ते नो धान्तु सुवीर्यम् ॥ २ ॥ इन्द्रस्य सोम राधसे पुनानो हार्दि चोदय । ऋतस्य योनिम् आ सदम् ॥ ३ ॥ मृजन्ति त्वा दश क्षिपो हिन्वन्ति सप्त धीतयः । अनु विप्राः अमादिषु ॥ ४ ॥ देवभ्य स्त्वा मदाय कं सृजानम् अति मेष्यः । सं गोभि र्वासयामसि ॥ ५ ॥ पुनानः कलशेषु आ वस्त्राणि अरुषो हरिः । परि गव्यानि अव्यत ॥ ६ ॥ मघोन आ पवस्व नो जहि विश्वाः अप द्विषः । इन्दो सखायम् आ विश ॥ ७ ॥ वृष्टिं दिवः परिस्रव द्युम्नं

हे सोमा, युद्धप्रसंगीं आमच्यामध्यें शत्रुदमनसामर्थ्य प्रकट कर ८. —सकल मानवांना पाहणारा, इन्द्रानें प्राशन केलेला, स्वर्गीय प्रकाश देणारा, असा जो तूं त्याला आम्हीं गृहण करून पुत्रपौत्र आणि उत्साह ह्यांचा लाभ मिळवूं असें कर ९.

## सूक्त ९

दिव्य स्फूर्तिदाता सोम, अभिषवण फलकांमध्यें ठेवून पिळला म्हणजे तो प्रतिभादायक सोम, त्याला प्रिय अशा यौवनसंपन्न मित्रांकडे जातो १. —[ तूं तेथें ] वास करावा म्हणून, आणि द्रोह न करणारा मित्र लाभावा म्हणून, पूर्वीं आम्हीं तुझी वाखाणणी केली आणि आतांहि करतों; तर देवांनीं ( तुजला ) प्राशन करावें यासाठीं तूं अत्यंत मधुर धारेनें वहा २. —त्या महा पवित्र पुत्रानें उत्पन्न होतांच, जगताच्या श्रेष्ठ जननी आणि सद्धर्माची उन्नति करणाऱ्या माता ज्या द्यावापृथिवी, त्यांना प्रकाशित केलें ३. —सात प्रकारच्या ध्यानपद्धतींनीं आपोदेवींना प्रोत्साहन दिलें, तेव्हां त्या नद्यांनींहि त्यांचा एकच अक्षय्य नेत्र जो सोम त्याला ( आनंदानें ) वृद्धिंगत केलें ४. —सत्प्रवृत्त, अप्रतिहत, आणि यौवनसंपन्न अशा सोमाला, हे इन्द्रा, तुझ्याप्रीत्यर्थ करावयाच्या महत्कार्यांतच त्यांनीं व्यापृत केलें ५. —यज्ञधुरीण आणि अमर असा कार्यवाह जो सोम त्यानें सप्तसिन्धूंना पाहिलें, तेव्हां ( रस )भरलेल्या तडागानें त्याही देवींना त्यानें तृप्त केलें. ६. —धर्मकार्यांत आम्हांला सहाय कर. हे सोमा ( अज्ञानरूप ) अन्धकाराशीं आम्हांस झगडलेंच पाहिजे, तर हे पवित्र सोमा, त्यांचा पुरा निःपात कर ७. —खरोखर नूतन आणि अपूर्व अशीं कवनें करण्याचा मार्ग सुगम कर, आणि पुरातन-

---

पृथिव्याः अधि । सहो नः सोम पृत्सु धाः ॥ ८ ॥ नृचक्षसं त्वा वयम् इन्द्र पीतं स्वर्विदम् । भक्षीमहि प्रजाम् इषम् ॥ ९ ॥

## सूक्तम् ९

ऋषिः पूर्ववत् पवमानः गायत्री

परि प्रिया दिवः कवि र्वयांसि नप्त्यो र्हितः । सुवानो याति कविक्रतुः ॥१॥ प्रप्र क्षयाय पन्यसे जनाय जुष्टो अद्रुहे । वीती अर्ष चनिष्ठया ॥ २ ॥ स सूनु र्मातरा शुचि र्जातो जाते अरोचयत् । महान् मही ऋतावृधा ॥ ३ ॥ स सप्त धीतिभि र्हितो नद्यो अजिन्वत् अद्रुहः । याः एकम् अक्षि वावृधुः ॥ ४ ॥ ताः अभि सन्तम् अस्तृतं महे युवानम् आ दधुः ॥ इन्दुम् इन्द्र तव व्रते ॥ ५ ॥ अभि वह्निर् अमर्त्यः सप्त पश्यति वावहिः । क्रिवि र्देवीर् अतर्पयत् ॥ ६ ॥ अवा कल्पेषु नः पुम स्तमांसि सोम योध्या । तानि पुनान जङ्घनः ॥ ७ ॥ नू नव्यसे नवीयसे सूक्ताय साधया पथः ।

कालाप्रमाणेंच आपलें तेज प्रकट कर ८. —भक्तपावन सोमा, धेनू अश्व आणि वीर्यशाली लोकांनीं मंडित अशी उच्च कीर्ति तूं आम्हांस दे; तीव्रबुद्धि अर्पण कर आणि **स्वर्गीय** प्रकाशहि अर्पण कर ९.

## सूक्त १०

रथाप्रमाणें ध्वनि करणारे आणि अश्ववीरांप्रमाणें सत्कीर्तिविषयीं लालस असे सोमबिन्दु दिव्यैश्वर्यांकडे चालले आहेत १. —रथाप्रमाणें झपाट्यानें पुढें सरसावलेले सोमपल्लव हे कर्मकारी लोकांच्या हातांतील कार्यभाराप्रमाणें, ( ऋत्विजांनीं आपल्या ) दोन्हीं हातांत धरलेले आहेत २. —राजे जसे ( वन्दिजनांच्या ) स्तुतींनीं, यज्ञ जसा सप्तहोत्यांच्या कर्मांनीं, तसेच हे सोमरस गोदुग्धांनीं अलंकृत झाले आहेत ३. —आल्हादप्रद सोमबिन्दु आवेशपूर्ण स्तोत्रवाणीच्या निनादांत हर्षोत्कर्षासाठीं पिळले जातात; आणि ते याप्रमाणें पिळले गेले म्हणजे धाराप्रवाहानें चोहोंकडे पसरतात ४. —विवस्वताचें तृप्तिकर पेय असे जे सोमरस ते प्रभातकाल प्रकट करतात, भाग्याधिपतीचें दर्शन करवितात, आणि सूर्याप्रमाणें आपलें सूक्ष्म ( किरणजाल ) चोहोंकडे विखरून देतात ५. —पुरातन पद्धतीला अनुसरणारे कवि आपल्या प्रतिभेचीं द्वारें उघडतात, ( अशा वेळीं ) ऋत्विक्जन वीर्यशाली सोम ( वनांतून ) घेऊन येण्याकरितां सज्ज होतात ६. —एकमेकांचे बन्धूच असे जे सप्त होते ते एकविचारानें प्रेरित होऊन, आणि एक( च परमेश्वरा )चें स्थान ( भक्तीनें ) भरून सोडून तेथें अधिष्ठित होतात ७. —अशा वेळीं आमचा नाभि आम्हीं दिव्यनाभिमध्यें ठेवतों, आमचा नेत्र सूर्यामध्यें स्थापन करतों; आणि कवीचें

---

**प्रत्नवत् रोचया रुचः ॥ ८ ॥ पवमान महिश्रवो गाम् अश्वं रासि वीरवत् । सना मेधां सना स्वः ॥ ९ ॥**

## सूक्तम् १०

**ऋषिः पूर्ववत्** **पवमानसोमः** **गायत्री**

**प्र स्वानासो रथाइव अर्वन्तो न श्रवस्यवः । सोमासो राये अक्रमुः ॥ १ ॥ हिन्वानासो रथाइव दधन्विरे गभस्त्योः । भरासः कारिणाम् इव ॥ २ ॥ राजानो न प्रशस्तिभिः सोमासो गोभिर् अञ्जते । यज्ञो न सप्त धातृभिः ॥ ३ ॥ परि सुवानास इन्दवो मदाय बर्हणा गिरा । सुताः अर्षन्ति धारया ॥ ४ ॥ आपानासो विवस्वतो जनन्तो उषसो भगम् । सूराः अण्वं वि तन्वते ॥ ५ ॥ अप द्वारा मतीनां प्रत्ना ऋण्वन्ति कारवः । वृष्णो हरसे आयवः ॥ ६ ॥ समीचीनास आसते होतारः सप्त-**

अपत्य ( जी प्रतिभा ) तिचें दोहन करितों ८ —प्रिय वस्तु आणि द्युलोकाचें स्थान हें अध्वर्यूंनीं ( आपल्या हृदय )कपाटांत गुप्त ठेविलेलें असतें, त्याला सूर्य आपल्या नेत्रांनीं निरखून पाहतो. ९

## सूक्त ११

वीरांनों, देवांचें यजन करण्यास प्रवृत्त झालेल्या, आणि पवित्र रसाची धारा सोडणाऱ्या ह्या सोमाप्रीत्यर्थ सूक्तगायन करा १. —दिव्य आणि देवोत्सुक असें दुग्ध देवसेवेकरितां "अथर्व" ऋत्विजांनीं मधुर रसाशीं एकत्र मिसळून दिलें २. —हे सोमा तू आमच्या धेनूंना सुख होईल अशा रीतीनें वहा, आमच्या मित्रांवर सुखप्रवाह लोट, आमच्या अश्वांना सुखकारक हो, आणि आमच्या ओषधिसाठीं सुखाचा प्रवाह वाहूं दे ३. —विचित्रवर्ण, स्वतःच्या बलावर अवलंबून राहणारा, द्युलोकापर्यंत जाऊन भिडणारा, आणि आरक्त अशा सोमाप्रीत्यर्थ उच्चस्वरानें स्तवन कर ४. —ऋत्विजानों, हातांनीं हलणाऱ्या ग्राव्यांनीं पिळलेला सोमरस तुम्हीं गाळून स्वच्छ करा; आणि त्या मधुर रसांत मध मिसळा. ५. —देवाला प्रणिपात करूनच त्या [ सोमा ]जवळ बसा, त्यांत घट्ट दुग्ध मिसळा, आणि तो आल्हादप्रद रस इन्द्रापुढें ठेवा. ६. —तूं शत्रुनाशन सर्वद्रष्टा आहेस; हे सोमा, आमच्या धेनूंना सुखांत ठेव; तूं दिव्यविभूतींच्याहि इच्छा तृप्त करतोस ७. —हे सोमा, इन्द्रासाठीं, त्यानें तुला प्राशन करावें ह्यासाठीं, त्याच्या हर्षोत्कर्षासाठीं, तूं पिळला जातोस. तूं भक्तांचें चित्त आहेत; तूंच त्यांच्या चित्ताचा

---

जामयः । पदम् एकस्य पिप्रतः ॥ ७ ॥ नाभा नाभिं नः आ ददे चक्षुश्चित् सूर्ये सचा । कवेर् अपत्यम् आ दुहे ॥ ८ ॥ अभि प्रिया दिवः पदम् अध्वर्युभिर् गुहा हितम् । सूरः पश्यति चक्षसा ॥ ९ ॥

## सूक्तम् ११

### ऋष्याद्याः पूर्ववत्

उपा-स्मै गायता नरः पवमानाय इन्दवे । अभि देवाँ इयक्षते ॥ १ ॥ अभि ते मधुना पयः अथर्वाणो अशिश्रयुः । देवं देवाय देवयु ॥ २ ॥ स नः पवस्व शं गवे शं जनाय शम् अर्वते । शं राजन् ओषधीभ्यः ॥ ३ ॥ बभ्रवे नु स्वतवसे अरुणाय दिविस्पृशे । सोमाय गाथम् अर्चत ॥ ४ ॥ हस्तच्युतेभिर् अद्रिभिः सुतं सोमं पुनीतन । मधो आ धावता मधु ॥ ५ ॥ नमसे-त् उप सीदत दध्ने-त् अभि श्रीणितन । इन्दुम् इन्द्रे दधातन ॥ ६ ॥ अमित्रहा विचर्षणिः पवस्व सोम शं गवे । देवेभ्यो

स्वामी आहेस ८. —तर हे पावनप्रवाहा सोमा, हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राशीं संयुक्त होऊन आम्हांला उत्तम वीरप्रचुर असें ऐश्वर्य अर्पण कर ९.

## सूक्त १२

हे आल्हादप्रद सोमबिन्दु, (रुचीला) अत्यंत मधुर लागणारे बिन्दु, सनातन धर्माच्या मन्दिरांत इन्द्राप्रीत्यर्थ पिळून सिद्ध केलेले आहेत १. —माता धेनू जशी वत्साला (कळवळ्यानें हांक मारते), त्याप्रमाणें स्तवनज्ञ भक्तांनीं इन्द्राला सोमप्राशनार्थ मोठ्या आर्जवानें हांक मारिली आहे २. —हर्षस्रावी, ज्ञानप्रद सोम, आपल्या सदनांत म्हणजे नदीच्या कल्लोळांत अधिष्ठित असतो; तो आतां ( भक्तांच्या वाणींमध्यें अधिष्ठित झाला आहे ३. —अत्यंत सूक्ष्मदृष्टि सोम, द्युलोकाच्या मध्यभागीं म्हणजे ऊर्णावस्त्राच्या गाळण्यांतून गाळला जात आहे, तो हा सोम सत्कार्यप्रेरक कवि होय ४. —पवित्रावर ठेवलेला जो हा सोमरस पाझरून कलशाच्या आंत सांचला आहे त्याला प्रत्यक्ष चन्द्रच कडकडून भेटतो ( कीं काय असें वाटतें ) ५ —हा सोमरस, अन्तरिक्षरूप समुद्राच्या अन्तरंगांत मधानें ओथंबलेला जो सांठा आहे, तो सांठा हलवून ओतून देऊन, काव्यमय वाणीची प्रेरणा करतो ६. —हा नित्य स्तविलेला वृक्षराज जो सोम तो बुद्धीच्या आंत काव्यामृत ओततो; आणि याप्रमाणें मानवांच्या पिढया न् पिढया त्याचें कार्य चालतें ७. —ज्ञानी स्तोत्याला प्रिय अशीं द्युलोकाचीं जीं स्थानें, त्यांच्यापर्यंत, हा काव्यस्फूर्तिदाता सोमरस, हलविला असतां, आपल्या धारेनें जाऊन पोहोंचतो ८. —तर हे पावन-

अनुकामकृत् ॥ ७ ॥ इन्द्राय सोमपीतये मदाय परिषिच्यसे । मन श्चित् मनसस् पतिः ॥ ८ ॥ पवमान सुवीर्यं रयिं सोम रिरीहि नः । इन्दो इन्द्रेण नो युजा ॥ ९ ॥

## सूक्तम् १२

### ऋष्याद्याः पूर्ववत्

सोमाः असृग्रम् इन्दवः सुताः ऋतस्य सादने । इन्द्राय मधुमत्तमाः ॥ १ ॥ अभि विप्राः अनूषत गावो वत्सं न मातरः । इन्द्रं सोमस्य पीतये ॥ २ ॥ मदच्युत् क्षेति सादने सिन्धोर् ऊर्मा विपश्चित् । सोमो गौरी अधि श्रितः ॥ ३ ॥ दिवो नाभा विचक्षणः अव्यो वारे महीयते । सोमो यः सुक्रतुः कविः ॥ ४ ॥ यः सोमः कलशेषु आँ अन्तः पवित्र आहितः । तम् इन्दुः परि षस्वजे ॥ ५ ॥ प्र वाचम् इन्दुर् इष्यति समुद्रस्या–धि विष्टपि । जिन्वन् कोशं मधुश्च्युतम् ॥ ६ ॥ नित्यस्तोत्रो वनस्पति र्धीनाम् अन्तः सबर्दुघः । हिन्वानो मानुषा युगा ॥ ७ ॥ अभि प्रिया दिवः पदा

प्रवाहा सोमरसा, तूं अलोट ओजस्विता आणि व्यापकबलयुक्त असें ऐश्वर्य आमच्या ठिकाणीं ठेव ९.

सातवा अध्याय समाप्त.

---

## अध्याय आठवा

## सूक्त १३

सहस्रधारांनीं वहाणारा हा पावन सोमरस लोंकरीच्या पवित्रांतून, वायु आणि इन्द्र यांच्या स्थानाकडे वहात आहे १. —प्रसादोत्सुक भक्तांनों, भक्तपावन, स्तवनस्फूर्ति देणारा, आणि मधुर नाद करणारा सोमरस देवानें प्राशन करावा म्हणून त्याची प्रशंसा करा २. —सत्वसामर्थ्याच्या लाभासाठीं अलोट ओजस्वी सोमरस आपल्या पवित्र प्रवाहानें वहात आहेत. आणि देवांनीं स्वीकार करावा म्हणून सोमरसाची प्रशंसाहि चालली आहे ३. —तर आम्हांला सत्वबलाचा लाभ व्हावा म्हणून, श्रेष्ठ उत्साह, आणि उत्कृष्ट तेजस्वी शौर्य यांचा, हे आल्हादप्रदा रसा, तूं प्रवाह सोड ४. —हे आल्हादप्रद सोमविन्दु पिळले जात असतां सहस्रावधि वीरांनीं युक्त अशा ऐश्वर्याचा प्रवाह आम्हांकडे लोटून देवोत ५. —अश्ववीरांनीं दौडत चालविलेल्या चपळ अश्वांप्रमाणें शीघ्रप्रवाही सोमरस, आम्हांला सत्वाढ्यतेचा लाभ व्हावा म्हणून, लोंकरीच्या पवित्रांतून पाझरत आहेत ६. —धेनू वत्साकरितां हंबारतात त्याप्रमाणें सोमरसाचे विन्दू खळखळ शब्द करीत वहातात. ते आतां ह्या हातांतून त्या हातांतील पात्रांत ओतलेले आहेत ७. —तुझी

---

सोमो हिन्वान अर्षति । विप्रस्य धारया कविः ॥ ८ ॥ आ पवमान धारय रयिं सहस्रवर्चसम् । अस्मे इन्दो सु आभुवम् ॥ ९ ॥

इति षष्ठे सप्तमोऽध्यायः

---

## सूक्तम् १३

### अथ अष्टमोऽध्यायः

असितो देवलः पवमानसोमः गायत्री

सोमः पुनानो अर्षति सहस्रधारो अत्यविः । वायोर् इन्द्रस्य निष्कृतम् ॥ १ ॥ पवमानम् अवस्यवो विप्रम् अभि प्र गायत । सुष्वाणं देववीतये ॥ २ ॥ पवन्ते वाजसातये सोमाः सहस्रपाजसः । गृणानाः देववीतये ॥ ३ ॥ उत नो वाजसातये पवस्व बृहतीर् इषः । द्युमत् इन्दो सुवीर्यम् ॥ ४ ॥ ते नः सहस्रिणं रयिं पवन्ताम् आ सुवीर्यम् । सुवानाः देवास इन्दवः ॥ ५ ॥ अत्याः हियानाः न हेतृभिर् असृग्रं वाजसातये । वि वारम् अव्यम् आशवः ॥ ६ ॥ वाश्राः अर्षन्ति इन्दवः अभि वत्सं न

प्रशंसा केली म्हणजे तूं इन्द्राला हर्षोत्सुक करतोस; तर पवित्रप्रवाही सोमा, तूं गर्जना करून धर्मद्वेष्ट्यांना दूर हांकून देऊन त्यांचा नाश कर ८. —दानधर्म न करणाऱ्यांना ठार करणाऱ्या आणि ( भक्तांना ) स्वर्गीय प्रकाश देणाऱ्या पावन सोमरसांनो, तुम्हीं सद्धर्माच्या आसनावर विराजमान व्हा ९.

## सूक्त १४

काव्यस्फूर्तिदाता सोमरस चोहों बाजूंनीं खालीं वाहूं लागला; आणि सर्वांना प्रिय असें कार्य आंगावर घेऊन सिन्धूच्या कल्लोलांत तो विलीन झाला १. —बन्धुत्वाचें ज्यांचें नातें असे पांचहि ज्ञातीचे संघ कर्तव्यतत्पर होऊन जर ह्या जगद्धारक सोमाला स्तुतींनीं अलंकृत करतील; २. —महाबलाढ्य सोमाच्या रसांत, त्या रसाला गोदुग्धानें आच्छादन करतील, तर सर्व दिव्यविभूति हर्षनिर्भर झाल्याच म्हणून समजा ३. —( पवित्राच्या ) तन्तुमय जाळींतून पाझरणारा रस ( पहा कसा ) खालीं धांवत वहातो आणि आपला प्राणमित्र ( जो इन्द्र ) त्याच्या बरोबर ( हविर्भागांचा ) सुवास घेतो ४. --तेजस्वी पुरोहिताच्या अंगुलींनीं, हा शुभ्र सोमरस, एखादा युवक ( युवतींकडून ) अलंकृत व्हावा, त्याप्रमाणें स्वच्छ होऊन आपलें स्वरूप गो( दुग्धा )प्रमाणें शुभ्र करतो ५. --(अभिषव पात्रांत) गोदुग्धाशीं मिश्र होण्याकरितां हा (सोम) आडव्या ठेवलेल्या पवित्रांतून पाझरत आहे, आणि हस्तांगुलीवरून पात्रांत पडतांना ऐकूं येईल असा निवाद करीत आहे ६. --( ऋत्विजाच्या ) हस्तांगुली, त्या उत्साहाच्या प्रभूला ( सोमाला ) स्वच्छ

---

धेनवः । दधन्विरे गभस्त्योः ॥ ७ ॥ जुष्टः इन्द्राय मत्सरः पवमानं कनिक्रदत् । विश्वाः अप द्विषो जहि ॥ ८ ॥ अपघ्नन्तो अराव्णः पवमानाः स्वर्दृशः । योनौ ऋतस्य सीदत ॥ ९ ॥

## सूक्तम् १४

ऋषिः पूर्ववत् पवमानसोमः गायत्री

परि प्रा-सिष्यदत् कविः सिन्धोर् ऊर्मौ अधि श्रितः । कारं बिभ्रत् पुरुस्पृहम् ॥ १ ॥ गिरा यदी सबन्धवः पञ्च व्राताः अपस्यवः । परिष्कृण्वन्ति धर्णसिम् ॥ २ ॥ आत् अस्य शुष्मिणो रसे विश्वे देवा अमत्सत । यदी गोभिर्वसायते ॥ ३ ॥ निरिणानो वि धावति जहत् शर्याणि तान्वा । अत्रा सं जिघ्रते युजा ॥ ४ ॥ नप्तीभि र्यो विवस्वतः शुभ्रो न ममृजे युवा । गाः कृण्वानो न निर्णिजम् ॥ ५ ॥ अति श्रिती तिरश्चता गव्या जिगाति अण्व्या । वग्नुम् इयर्ति यं विदे ॥ ६ ॥ अभि क्षिपः सम् अग्मत मर्जयन्तीर् इषस् पतिम् । पृष्ठा गृभ्णत

करून त्याच्या सन्निध जातात आणि त्या सत्ववीराचा–त्या वृक्षराजाचा–पल्लवरूप पृष्ठभाग हातीं धरतात ७. ––ह्याप्रमाणें दिव्य आणि ऐहिक अशा सकल ऐश्वर्यांचा परामर्श घेऊन, हे सोमा, आमच्याविषयीं वात्सल्य बाळगणारा तूं आम्हांकडे आगमन कर ८.

## सूक्त १५

हा शूर ( सोम ) ध्यानस्तुतींनीं आणि हस्तांगुलीनीं ( प्रेरित होऊन ) शीघ्रगामी रथांसह इन्द्राच्या निवासस्थानाकडे त्वरेनें जात आहे १. —हा येथें देवयज्ञांसाठीं–ज्यांत अमर विभूति विराजमान होतात त्या महायज्ञांसाठीं–अगदीं ध्यान लावून राहिला आहे २. —हा येथें ठेवलेला सोमरस, जर झटपट कार्य करणारे भक्त नेटानें प्रयत्न करतील तर शुभ्र ( निष्कलंक ) मार्गानें आंत ( देवाकडे ) खचित् नेला जाईल. ३. —समुदायातील ( जणों ) वृषभच असा हा ( सोम ) आपलीं अणकुचीदार शिंगें हलवितो आणि ओजस्वितेनें आपलें पौरुष गाजवितो ४. —हा सत्वबलाढ्य (सोम)वीर लकलकणाऱ्या शुभ्र किरणांनीं मण्डित होऊन नद्यांचा प्रभु म्हणून पुढें सरसावतो ५. —आणि मोहक वस्तु आणि कठोर घोरकर्में ह्या दोहोंनाहि न जुमानतां ( भक्तांकडे )येऊन तो त्यांच्या यज्ञपात्रांत अधिष्ठित होतो ६. —धुवून स्वच्छ करण्यायोग्य आणि उच्चप्रतीचा उत्साह उत्पन्न करणाऱ्या ह्या सोमाला भक्तजन द्रोणपात्रांत ओतून स्वच्छ करतात ७. —अशा त्या सोमपल्लवांना दहा अंगुली आणि सात ध्यानप्रवण “होते” जाळून स्वच्छ करतात. उत्तम आयुधांनीं युक्त आणि हर्षोत्पादक अशा सोमाला स्वच्छ करतात ८.

---

वाजिनः ॥ ७ ॥ परि दिव्यानि मर्मृशत् विश्वानि सोम पर्थिवा । वसूनि याहि अस्मयुः ॥ ८ ॥

## सूक्तम् १५

### ऋष्याद्याः पूर्ववत्

एष धिया याति अण्व्या शूरो रथेभिर् आशुभिः । गच्छन् इन्द्रस्य निष्कृतम् ॥ १ ॥ एष पुरू धियायते बृहते देवतातये । यत्रा–मृतास आसते ॥ २ ॥ एष हितो वि नीयते अन्तः शुभ्रवता पथा । यदी तुञ्जन्ति भूर्णयः ॥ ३ ॥ एष शृङ्गाणि दोधुवत् शिशीते यूथ्यो वृषा । नृम्णा दधान ओजसा ॥ ४ ॥ एष रुक्मिभिर् ईयते वाजी शुभ्रेभिर् अंशुभिः । पतिः सिन्धूनां भवन् ॥ ५ ॥ एष वसूनि पिब्दना परुषा ययिवान् अति । अव शादेषु गच्छति ॥ ६ ॥ एतं मृजन्ति मर्ज्यम् उप द्रोणेषु आयवः । प्र चक्राणं महीर् इषः ॥ ७ ॥ एतम् उ त्यं दश क्षिपो मृजन्ति सप्त धीतयः । सु आयुधं मदिन्तमम् ॥ ८ ॥

## सूक्त १६

द्यावापृथिवीपासून ज्याप्रमाणें पर्जन्य त्याप्रमाणें दर्पदलन आवेश उत्पन्न होण्यासाठीं रस पिळणारे भक्त, अश्वाप्रमाणें जोरानें उडणाऱ्या सोमाची धार (अभिषवण फलकांतून) पात्रांत सोडीत आहेत १. —चातुर्यबलाचा धुरीण, आणि माधुर्यानें उदकांना आच्छादित करणारा असा जो सोमरस त्याला आम्ही कौशल्यानें आपल्या अंजलीमध्यें धारण करूं २. —(दोषांपासून) अलिप्त आणि दुष्प्राप्य अशा सोमरसाला उदकांमध्यें ओतून दे, आणि इन्द्रानें प्राशन करावा म्हणून पवित्रावर ठेऊन स्वच्छ कर ३. —गाळून स्वच्छ करणाऱ्या भक्ताच्या भावनेनें सोमरस हा पवित्रांतून वाहतो, आणि कौशल्यानें स्वच्छ होऊन पात्रांत स्थित होतो ४. —आल्हादप्रद सोमविन्दू, कार्यकुशल सोमरस, हे इन्द्रा, तुजला महा युद्धाला सज्ज करण्यासाठीं (भक्तांनीं) प्रणिपातपूर्वक पात्रांत ओतले आहेत ५. —लोंकरीच्या वस्त्रांतून स्वच्छ होणारा आणि यच्चावत् शोभांचें अधिष्ठान असा सोम हा योद्धयाप्रमाणें गोसमूहामध्यें उभा रहातो ६. —पिळलेल्या सोमरसाची धार द्युलोकाच्या शिखराप्रमाणें फुगून उचंबळणारी जरी असली तरी ती या पवित्रावर सहज ओतली जाते ७ —सोमा, तूं तन्तुवस्त्रानें स्वच्छ होऊन, आणि मानवांमध्यें जो प्राज्ञ असेल त्याला पवित्र करून ह्या लोंकरीच्या वस्त्रांतून खालीं पात्रांत धांवत वहात जातोस ८.

## सूक्त १७

नद्या सखल प्रदेशाकडे धांव घेतात त्याप्रमाणें हे खळखळणारे तीव्रवेगी सोमरस अज्ञानाचा विध्वंस करीत वहात जात आहेत १. —पर्जन्य भूलोकावर वर्षाव करतात

---

## सूक्तम् १६

ऋषिः पूर्ववत् पवमानसोमः गायत्री

प्र ते सोतार ओण्योः रसं मदाय घृष्वये । सर्गो न तक्ति एतशः ॥ १ ॥ क्रत्वा दक्षस्य रथ्यं अपो वसानम् अन्धसा । गोषाम् अण्वेषु सश्चिम ॥ २ ॥ अनप्तम् अप्सु दुष्टरं सोमं पवित्रे आ सृज । पुनीही–न्द्राय पातवे ॥ ३ ॥ प्र पुनानस्य चेतसा सोमः पवित्रे अर्षति । क्रत्वा सधस्थम् आऽसदत् ॥ ४ ॥ प्र त्वा नमोभिर् इन्दवः इन्द्र सोमाः असृक्षत । महे भराय कारिणः ॥ ५ ॥ पुनानो रूपे अव्यये विश्वाः अर्षन् अभि श्रियः । शूरो न गोषु तिष्ठति ॥ ६ ॥ दिवो न सानु पिप्युषी धारा सुतस्य वेधसः । वृथा पवित्रे अर्षति ॥ ७ ॥ त्वं सोम विपश्चितं तना पुनानः आयुषु । अव्यो वारं विधावसि ॥ ८ ॥

त्याप्रमाणें सोमपल्लव पिळले जात असतां त्यांनीं इन्द्राप्रीत्यर्थ रसधारांचा प्रवाह सोडला २. अतिशय उचंबळणारा, हर्षनिर्भर करणारा उत्तेजक सोमरस, देवाकरितां आतुर झालेला हा रस, राक्षसांना ठार मारून टाकून पवित्रांतून खालीं पाझरत आहे. ३. —हा रस वहात वहात कलशांमध्यें धांवतो, स्वच्छ होण्यासाठीं पवित्रावर ओतला जातो, आणि नंतर यज्ञांमध्यें उक्थगायनानें वृद्धिंगत होतो ४. —सोमा, तिन्ही तेजस्वी लोक जणों काय भेदून जाऊन आणि द्युलोकावर आरोहण करून तूं तळपत आहेस, आणि आकाशांत संचार करून तूंच जणों सूर्याला प्रेरणा करीत आहेस ५. —स्तवनकुशल आणि कार्यकुशल स्तोते यज्ञाच्या ऐन रंगांत तुझ्या मनोहर स्वरूपाला दृष्टीपुढें ठेऊन तुझी प्रशंसा करतात ६. —तसेंच शूर, स्तोत्रप्रवीण, आणि रक्षणेच्छु स्तोतृजन, आपल्या ध्यानबलानें तुज सत्वबलाढ्य सोमाला देवाप्रीत्यर्थ आरंभिलेल्या यज्ञांत (गाळून) स्वच्छ करतात ७. —तर तूं आपल्या मधुररसाची धारा वहात राहील असें कर. तीक्ष्ण परंतु स्वादिष्ट असा तूं, सनातन धर्माच्या अभिवृद्धिसाठीं आणि [ दिव्यजनांनीं ] प्राशन करावें म्हणून द्रोणकलशांत अधिष्ठित झाला आहेत ८.

## सूक्त १८

पर्वतावर राहणारा सोमपल्लव पिळला असतां पवित्रांतून स्वच्छ होऊन (पात्रांत) वहात राहिला. हे सोमा, आपल्या तल्लीनतेंत तूं सकल अभीष्टांचा निधीच झाला आहेस १.

---

## सूक्तम् १७

### ऋष्याद्याः पूर्ववत्

प्र निम्नेनेव सिन्धवो घ्नन्तो वृत्राणि भूर्णयः । सोमाः असृग्रम् आशवः ॥१॥ अभि सुवानास इन्दवः वृष्टयः पृथिवीम् इव । इन्द्रम् सोमास अक्षरन् ॥ २ ॥ अत्यूर्मि र्मत्सरो मदः सोमः पवित्रे अर्षति । विघ्नन् रक्षांसि देवयुः ॥३॥ आ कलशेषु धावति पवित्रे परि षिच्यते । उक्थै र्यज्ञेषु वर्धते ॥४॥ अति त्री सोम रोचना रोहन् न भ्राजसे दिवम् । इष्णन् सूर्यं न चोदयः ॥ ५ ॥ अभि विप्राः अनूषत मूर्धन् यज्ञस्य कारवः । दधाना श्चक्षसि प्रियम् ॥ ६ ॥ तमु त्वा वाजिनं नराः धीभि र्विप्राः अवस्यवः । मृजन्ति देवतातये ॥ ७ ॥ मधो र्धाराम् अनु क्षर तीव्रः सधस्थम् आ सदः । चारु र्ऋताय पीतये ॥ ८ ॥

## सूक्तम् १८

### ऋष्याद्याः पूर्ववत्

परि सुवानो गिरिष्ठाः पवित्रे सोमो अक्षाः । मदेषु सर्वधाः असि ॥१॥ त्वं विप्रस् त्वं कवि र्मधु प्र जातम् अन्धसः । मदेषु सर्वधाः असि ॥ २ ॥ तव विश्वे सजोषसो

—तूं स्तवनप्रेरक आहेस; तूं काव्यस्फूर्तिदाता आहेस; सर्व पेयांपासून उत्पन्न झालेलें मधुर पेय तूं आहेस म्हणून तुझ्या हर्षोत्कर्षात तूं सकल अभीष्टाचा निधीच झाला आहेस २. —एक विचाराचे प्रेमळ देव तुजला प्राशन करतात, कारण तुझ्या तल्लीनतेंत तूं सकल अभीष्टांचा निधीच आहेस ३. —जो यच्चावत् उत्तमोत्तम वस्तु आपल्या हातांत ठेवितो तो तूं आपल्या हर्षोत्कर्षात सकल अभीष्टांचा निधीच आहेस ४. —ह्या जननीप्रमाणें परम थोर द्यावापृथिवींचें जो दोहन करतो तो तूं आपल्या हर्षोत्कर्षात सकल अभीष्टांचा निधीच आहेस ५. —जो उभयतां द्यावा पृथिवींना आपल्या सामर्थ्यांनीं व्यापून टाकतो तो तूं हर्षोत्कर्षात सकल अभीष्टांचा निधीच आहेस ६. —तो हा महाप्रतापी सोमरस स्वच्छ गाळला जात असतां द्रोणकलशांमध्यें मोठी गर्जना करतो; तथापि ( हे सोमा ) तूं आपल्या तल्लीनतेंत असतांना सकल अभीष्टांचें निधान असतोस ७.

## सूक्त १९

हे सोमा, अद्भुत प्रशंसनीय असें जें दिव्य आणि ऐहिक उत्कृष्ट धन आहे तें तूं गाळला जात असतांना आम्हांकडे घेऊन ये १. —हे सोमा, इन्द्र आणि तूं असे दोघे दिव्य-प्रकाशाचे अधिपति आहांत, आणि ( ज्ञान ) धेनूंचेहि अधिपति आहांत. तर हे जगन्नाय-कांनों, आमच्या ध्यानवुद्धींना विकसित करा २. —वीर्यशाली सोम हा स्वच्छ गाळला जात असतां भक्तसमुदायांमध्यें यज्ञमंडपांत गर्जना करतो, आणि आपल्या कुशासनावर विराजमान होतो ३. —पुत्राच्या, वत्साच्या, जननीच्या ध्यानस्तुति, सोमवृषभ वीर्यभरांत असतांना त्याला अवलोकन करून मोठ्यानें हंवरतात ४. —वीरपुंगवाच्या सहवा-साची इच्छा करणाऱ्या ज्या " **वसतीवरी** " त्यांच्यासह स्वच्छ गाळला जात असतां

देवासः पीतिम् आशत मदेषु सर्वधाः असि ॥ ३ ॥ आ यो विश्वानि वार्या वसूनि हस्तयो दधे । मदेषु सर्वधाः असि ॥ ४ ॥ यः इमे रोदसी मही सं मातरेव दोहते । मदेषु सर्वधाः असि ॥५॥ परि यो रोदसी उभे सद्यो वाजेभिर् अर्षति । मदेषु सर्वधाः असि ॥ ६ ॥ स शुष्मी कलशेषु आ पुनानो अचिक्रदत् । मदेषु सर्वधाः असि ॥ ७ ॥

## सूक्तम् १९

### ऋष्याद्याः पूर्ववत्

यत् सोम चित्रम् उक्थ्यं दिव्यं पार्थिवं वसु । तत् नः पुनान आभर ॥ १ ॥ युवं हि स्थः स्वर्पती इन्द्रश्च सोम गोपती । ईशाना पिप्यतं धियः ॥ २ ॥ वृषा पुनानः आयुषु स्तनयन् अधि बर्हिषि । हरिः सन् योनिम् आऽसदत् ॥३॥ अवाव-शन्त धीतयो वृषभस्या–धि रेतसि । सूनो र्वत्सस्य मातरः ॥ ४ ॥ कुवित् वृषण्य-

ह्यानें रसरूप गर्भ ठेवला कीं काय ? कारण पहा त्या "**वसतीवरी**" पांढरें शुभ्र दुग्ध देऊं लागल्या ५. —जे दूर उभे आहेत त्यांना आमच्याजवळ घेऊन ये; आणि आमच्या शत्रूंच्या हृदयांत धडकी भरूं दे. हे पावनप्रवाहा, विजयश्री देणारा तूंच आहेस ६. —हे सोमा, (धर्माच्या) शत्रूंचें वीर्य नष्ट कर. त्यांचा प्रताप नाहींसा कर, त्यांची उमेद चिरडून टाक; मग ते शत्रू आम्हांपासून दूर असोत किंवा जवळ असोत ७.

## सूक्त २०

हा काव्यस्फूर्तिदाता (सोम), देवसेवेसाठीं, ऊर्णावस्त्रांतून स्वच्छ होऊन पात्रांत सांठतो. हा सर्व प्रतिस्पर्ध्यांची रग जिरवितो १. —तोच हा, कीं जो स्वच्छ प्रवाहानें वहात असतां स्तोत्रगायकांना सहस्रावधि गोधनांनीं युक्त असें सत्वबल अर्पण करतो. २. —जो तूं सकलांचा परामर्श आपल्या अन्तःकरणानें घेतोस, जो तूं आमच्या मननांनीं पवित्रांतून स्वच्छ प्रवाहानें वहातोस, तो तूं हे सोमा, आम्हांस सत्कीर्ति अर्पण कर ३. —उत्कृष्ट कीर्ति आणि अढळ ऐश्वर्य यांचा प्रवाह दानशील यजमानावर लोट; आणि स्तोत्रकर्त्याला मनोत्साह आण ४. —तूं न्यायानुवर्ती राजाप्रमाणें आहेस. हे सोमा, हे अद्भुता हविर्वाहका, तूं स्वच्छ होतांना भक्तांच्या स्तवनांत मुरून जातोस ५. —उदकांतील प्रखर अग्नि तो सोमच होय. तो (भक्तांच्या) हस्तांनीं स्वच्छ गाळला जाऊन चमूपात्रांत स्थिर होतो ६. —हे सोमा तूं क्रीडाशील आहेस, यज्ञाप्रमाणें इच्छा पूर्ण करणारा आहेस. तूं स्तोत्रकर्त्यांत उत्कृष्ट शौर्य प्रकट करीत पवित्राकडे गमन करतोस ७.

---

तीभ्यः पुनानो गर्भम् आ दधत् । याः शुक्रम् दुहते पयः ॥ ५ ॥ उप शिक्षा—पतस्थुषो भियसम् आधेहि चक्षुषु । पवमान विदा रयिम् ॥ ६ ॥ नि शत्रोः सोम वृष्ण्यं नि शुष्मं नि वय स्तिर । दूरे वा सतो अन्ति वा ॥ ७ ॥

## सूक्तम् २०

### ऋष्याद्याः पूर्ववत्

प्र कवि र्देववीतये अव्यो वारेभिर् अर्षति । साह्वान् विश्वा अभि स्पृधः ॥ १ ॥ स हि ष्मा जरितृभ्य आ वाजं गोमन्तम् इन्वति । पवमानः सहस्रिणम् ॥ २ ॥ परि विश्वानि चेतसा मृशसे पवसे मती । स नः सोम श्रवो विदः ॥३॥ अभि अर्ष बृहत् यशो मघवद्भ्यो ध्रुवं रयिम् । इषं स्तोतृभ्य आ भर ॥ ४ ॥ त्वं राजेव सुव्रतो गिरः सोमा विवेशिथ । पुनानो वह्ने अद्भुत ॥ ५ ॥ स वह्निर् अप्सु दुष्टरो मृज्यमानो गभस्त्योः । सोम श्चमूषु सीदति ॥ ६ ॥ क्रीळु र्मखो न मंहयुः पवित्रं सोम गच्छसि । दधत् स्तोत्रे सुवीर्यम् ॥ ७ ॥

## सूक्त २१

(शत्रूला) घांसून टाकणारे हे आल्हादप्रद सोमविन्दु इन्द्राकडे धांवतच जात आहेत. ते आवेश उत्पन्न करितात आणि दिव्यप्रकाशाचा लाभ घडवितात १. —प्रतिस्पर्ध्यांना ते घेरून टाकतात. जो उत्तम रीतीनें रस पिळतो त्याला पाहिजे तें उत्तम वरदान देतात, आणि आपण होऊन स्तोत्रकर्त्यांच्या ठिकाणीं तारुण्याचा जोम उत्पन्न करतात २. —सहजगत्या क्रीडा करीत करीत सोमविन्दू हे आपलें एकच (नियमित) स्थान म्हणजे नदीप्रवाहाच्या लहरी त्यांत वहात गेले ३. —ह्या पावन सोमरसांनीं रथाला जोडलेल्या अश्वांप्रमाणें (भक्तांना) सकल उत्तमोत्तम वस्तूंचा लाभ करून दिला ४. —आल्हादप्रद विन्दूनों, योग्य मार्ग लागावा म्हणून ह्या (आमच्या यज्ञकर्त्या) जवळ मनोहर केशरी रंगाचें सुवर्ण ठेवा. कारण तो आम्हांला आतां कांहींच देणगी देऊं शकत नाहीं ५. —रथी ज्याप्रमाणें नवीन अश्वाला शिकवितो त्याप्रमाणें योग्य मार्ग लागावा म्हणून ह्या (यज्ञकर्त्यांच्या) ठिकाणीं नवीन धोरण उत्पन्न करा; आणि तेजःपुंज असे तुम्हीं रसकल्लोळ उडवीत कुशपवित्रांतून स्वच्छ प्रवाहानें वहा ६. —नंतर ह्या सोमरसांनीं खळखळ शब्द केला; सत्वसंपन्न सोमरसांनीं आपलें निवासस्थान निश्चित केलें, आणि सद्भक्तांमध्यें उत्तम वुद्धि उत्पन्न केली ७.

## सूक्त २२

पहा हे सोमरस कसे शीघ्रव्यापक आहेत. रथाला जोडलेल्या झुंजार अश्वांप्रमाणें त्यांना भरवेगानें सोडल्याबरोवर ते खिंकाळतच गेले १. —हे वायुप्रमाणें प्रभंजन, पर्ज-

---

## सूक्तम् २१

### ऋष्याद्याः पूर्ववत्

एते धावन्ति इन्दवः सोमाः इन्द्राय घृष्वयः। मत्सरासः स्वर्विदः ॥ १ ॥ प्र वृण्वन्तो अभियुजः सुष्वये वरिवोविदः। स्वयं स्तोत्रे वयस्कृतः ॥ २ ॥ वृथा क्रीळन्त इन्दवः सधस्थम् अभि एकम् इत्। सिन्धोर् ऊर्मा वि अक्षरन् ॥ ३ ॥ एते विश्वानि वार्या पवमानास आशत। हिता न सप्तयो रथे ॥ ४ ॥ आऽस्मिन् पिशङ्गम् इन्दवो दधाता वेनम् आ दिशे। यो अस्मभ्यम् अरावा ॥ ५ ॥ ऋभुर् नं रथ्यं नवं दधाता केतम् आदिशे। शुक्राः पवध्वम् अर्णसा ॥ ६ ॥ एते उ त्ये अवीवशन् काष्ठां वाजिनो अक्रत। सतः प्रा-साविषु र्मतिम् ॥ ७ ॥

## सूक्तम् २२

### ऋष्याद्याः पूर्ववत्

एते सोमास आशवो रथा इव प्रवाजिनः। सर्गाः सृष्टाः अहेषत ॥ १ ॥ एते वाताइवो-रवः पर्जन्यस्येव वृष्टयः। अग्नेर् इव भ्रमाः वृथा ॥ २ ॥ एते पूताः विप-

न्याच्या वृष्टिप्रमाणें वर्षणशील, आणि अग्नीच्या सहज उडणाऱ्या ठिणग्यांप्रमाणें तेजस्वी आहेत २. —घट्ट दुधाशीं मिश्रित झालेल्या ह्या पवित्र आणि ज्ञानशील, सोमरसांनीं स्तुतींच्या योगानें ( भक्तांच्या ) बुद्धींना व्याप्त करून टाकलें ३. —हे स्वच्छ झालेले अमर रस, रजोलोकाचा मार्ग यज्ञानें खुला करणारे हे रसप्रवाह वहात असतांना कधीं दमत नाहींत, एकसारखे वहात असतात. ४. —हे नानाप्रकारानीं वेगानें वहाणारे सोमरस द्यावापृथ्वींच्या पृष्ठभागालाहि व्यापून राहिले, आणि तेथून त्यांनीं अत्युच्च रजोलोकहि व्याप्त करून टाकला ५. —ते खालीं वहात जातात–आणि उत्कृष्ट जो ( यज्ञरूप ) तन्तु तो कांतून त्याचा शेवट गोड करतात. हेंच त्यांचें उत्तमांतील उत्तम कार्य होय ६. —हे सोमा जे कंजूष आहेत ( जे दान करीत नाहींत ), त्यांच्याकडून गोधन आणि द्रव्य हिसकावून घेऊन आपल्यापाशीं ठेव; ( यज्ञरूप ) तन्तु कांतला जाऊन तो पुरा झाला अशी तूंच गर्जना केली नाहींस काय ? ७.

## सूक्त २३

शीघ्रव्यापक सोमरस आवेश उत्पन्न करणाऱ्या मधुररसाच्या धारेनें सर्व प्रकारच्या काव्यस्फूर्तींचा आदर करून ( पात्रांत ) ओतले जातात १. —पुरातन आणि आयुष्यवर्धक सोमरसांनीं नवीन वसतिस्थान आक्रमून टाकलें, आणि सूर्यानें प्रकाशित व्हावें म्हणून त्याला प्रकट केलें २. —हे पावनप्रवाहा रसा, तूं आमचा प्रभु आहेस; तर दानपराङ्मुख दुष्टाचा प्रदेश आमच्या स्वाधीन कर आणि ( आमच्या ) प्रजेच्या योगानें आमचा उत्साह अलंकृत कर ३. —आयुष्यवर्धक सोमपल्लव आवेश उत्पन्न करण्याऱ्या आपल्या मधुररसाचा प्रवाह मधानें ओथंबलेल्या एका मोठ्या पात्रांत सोडून देतात ४.

श्रिताः सोमासो दधिआशिरः । विपा वि आनशु र्धियः ॥ ३ ॥ एते मृष्टाः अमर्त्याः ससृवांसो न शश्रमुः । इयक्षन्तः पथो रजः ॥ ४ ॥ एते पृष्ठानि रोदसो र्विप्रयन्तो आनशुः । उते-दम् उत्तमं रजः ॥ ५ ॥ तन्तुं तन्वानम् उत्तमम् अनु प्रवत आशत । उते-दम् उत्तमाय्यम् ॥ ६ ॥ त्वं सोम पणिभ्य आ वसु गव्यानि धारयः । ततं तन्तुम् अचिक्रदः ॥ ७ ॥

## सूक्तम् २३

### ऋष्याद्याः पूर्ववत्

सोमाः असृग्रम् आशवो मधो र्मदस्य धारया । अभि विश्वानि काव्या ॥ १ ॥ अनु प्रत्नास आयवः पदं नवीय अक्रमुः । रुचे जनन्त सूर्यम् ॥ २ ॥ आ पवमान नो भर अर्यो अदाशुषो गयम् । कृधि प्रजावतीर् इषः ॥ ३ ॥ अभि सोमास आयवः

—जगद्धारक सोमपल्लव हा इन्द्रियांना तरतरी आणणारा जो रस त्याच्यामध्यें असतो तो बाहेर सोडतो; असा हा सोमपल्लव वीर्यशाली आणि अनिष्टनिवारक आहे ५. —हे सोमा, सर्वांना तूं एकदम आवेश उत्पन्न करतोस; तूं इन्द्राप्रीत्यर्थ, दिव्यविबुधांप्रीत्यर्थ रस-प्रवाह सोडतोस; आणि हे आल्हादप्रदा, सत्वसामर्थ्यांचा लाभ ( भक्तांना ) घडवितोस ६. —ह्या सोमपल्लवाचा हर्षकारक रस प्राशन करून इन्द्रानें धडाक्यासरशीं वृत्राला ठार केलें आणि पुढेंहि ( कारण पडेल त्या वेळीं ) असेंच ठार करील ७.

## सूक्त २४

पवित्रप्रवाही आल्हादप्रद सोमरसबिन्दु उचंबळून राहिले आहेत; आणि ( दुग्ध ) मिश्रित होऊन ( वसतीवरी ) उदकांत स्वच्छ धुतलेले आहेत १ —उतरत्या जागे-कडे उदकें वेगानें वहातात त्याप्रमाणें सोमरसाकडे गोदुग्ध उसळून वहात गेलें आणि सोमरसाला अलंकृत करून इन्द्राच्या ठिकाणीं जाऊन पोहोंचलें २. —पावनप्रवाहा सोमा, इन्द्रानें ( तुजला ) प्राशन करावें म्हणून तूं उचंबळून वहातोस आणि म्हणूनच शूर ऋत्विजांकडून तूं त्याच्याकडे नेला जातोस ३. —सोमा, तूं शूरांना आवेश चढविणारा आहेस. हे चराचरांना पादाक्रांत करणाऱ्या रसा, तूं वहात रहा. असा तूं वरद आहेस, आणि प्रशंसनीय आहेस ४. —आल्हादप्रदा सोमा, ग्राव्यांनीं तुझा रस पिळतांच तूं कुशपवित्राकडे धांवत जातोस, आणि इन्द्राच्या तेजस्वितेला अनु-रूपता आणतोस ५. —वृत्राचा समूळ नाश करणाऱ्या रसा, तुझी स्तुति उक्थ

पवन्ते मद्यं मदम् । अभि कोशं मधु श्चुतम् ॥ ४ ॥ सोमो अर्षति धर्णसि र्दधानः इन्द्रियं रसम् । सुवीरो अभिशस्तिपाः ॥ ५ ॥ इन्द्राय सोम पवसे देवेभ्यः सध-माद्यः ॥ इन्दो वाजं सिषाससि ॥ ६ ॥ अस्य पीत्वा मदानाम् इन्द्रो वृत्राणि अप्रति । जघान जघनत् च नु ॥ ७ ॥

## सूक्तम् २४

### ऋष्याद्याः पूर्ववत्

प्र सोमासो अधन्विषुः पवमानास इन्दवः । श्रीणानाः अप्सु मृञ्जत ॥ १ ॥ अभि गावो अधन्विषुर् आपो न प्रवता यतीः । पुनानाः इन्द्रम् आशत ॥ २ ॥ प्र पवमान धन्वसि सोम इन्द्राय पातवे । नृभि र्यतो वि नीयसे ॥ ३ ॥ त्वं सोम नृमादनः पवस्व चर्षणीसहे । सस्नि र्यो अनुमाद्यः ॥ ४ ॥ इन्द्रो यत् अद्रिभिः सुतः पवित्रं परि धावसि । अरम् इन्द्रस्य धाम्ने ॥ ५ ॥ पवस्व वृत्रहन्तम उक्थे-

स्तोत्रांनीं करणें योग्यच आहे. तूं स्वतः शुद्ध, दुसऱ्यालाहि पवित्र करणारा, आणि अद्भुत-रूप आहेस ६. —पिळलेल्या मधुर पल्लवाचा तो शुद्ध, पावन सोमरस, देवाला प्रसन्न करणारा आणि पापनाशन आहे हेंच सर्वजण सांगतात ७.

## सूक्त २५

हे चातुर्यबलाच्या साधना, हरिद्वर्णी सोमा, दिव्यविबुधांनीं (तुला) प्राशन करावें म्हणून तुझा पवित्रप्रवाह वाहूं दे. तूं मरुतांना आणि वायूलाहि हर्षप्रद होतोस १. —पावनप्रवाहा, (भक्तांनीं) ध्यानपूर्वक तुला वेदीवर ठेवला म्हणजे तूं गर्जना करतोस, तर आपल्या स्वभावधर्मानुरूप तूं वायूमध्यें प्रवेश कर २. —दिव्यविभूतिंसह हा वीर-पुंगव सोम फार खुलून दिसतो. वेदीवर अधिष्ठित होणारा, सर्वांना प्रिय असा हा काव्य-प्रेरक सोमरस (अज्ञानरूप) वृत्राचा नाश करणारा, आणि देवाला पूर्णपणें प्रसन्न करणारा आहे ३. —तो सर्वप्रिय सोमरस प्रसन्न होऊन, सर्वांच्या शरीरांत भिनून, ज्या ठिकाणीं अमरविभूति वास करतात तेथें गमन करतो ४. —तेजस्वी आणि काव्यस्फूर्ति देणारा सोम, मानवांचें हित करण्यासाठीं इन्द्राकडे जाणारा हा अत्यंत प्रतिभावान् सोम, पहा कसा वहात आहे. ५. —हे अत्यंत हर्षप्रदा, हे काव्यप्रेरका, सूर्याचें स्थान (जो द्युलोक) तेथें अधिष्ठित होण्याकरितां पवित्रांतून धाराप्रवानें एकसारखा वहात रहा ६.

भिर् अनुमाद्यः । शुचिः पावको अद्भुतः ॥ ६ ॥ शुचिः पावक उच्यते सोमः सुतस्य मध्वः । देवावीर् अघशंस हा ॥ ७ ॥

## सूक्तम् २५

दृळ्हच्युतः पवमानसोमः गायत्री

पवस्व दक्षसाधनो देवेभ्यः पीतये हरे । मरुद्भ्यो वायवे मदः ॥ १ ॥ पवमान धिया हितो अभि योनिं कनिक्रदत् । धर्मणा वायुम् आ विश ॥ २ ॥ सं देवैः शोभते वृषा कवि र्योनौ अधि प्रियः । वृत्रहा देववीतमः ॥ ३ ॥ विश्वा रूपाणि आ विशन् पुनानो याति हर्यतः । यत्रा–मृतास आसते ॥ ४ ॥ अरुषो जनयन् गिरः सोमः पवते आयुषक् । इन्द्रं गच्छन् कविक्रतुः ॥ ५ ॥ आ पवस्व मदिन्तम पवित्रं धारया कवे । अर्कस्य योनिम् आ सदम् ॥ ६ ॥

## सूक्त २६

त्या सत्वधीर सोमाला अदितीच्या अंकावर ( बसवून भाविक ) स्तोत्यांनीं आपल्या सूक्ष्मदर्शी बुद्धिमत्तेनें स्वच्छ केलें १. —सहस्रावधि धारा सोडणारा, अक्षय्य, आणि द्युलोकाचा धारक जो सोम त्याचें धेनूंनींहि उच्चस्वरानें स्तवन केलें २. —रचना-कुशल, पवित्रप्रवाही, ( जगत् )धारक, आणि सर्वपोषक अशा सोमाला ( ऋत्विजांनीं ) आपल्या भक्तिभावनेनें द्युलोकीं पाठविलें ३. —विवस्वानासह एकत्र राहणारा, वाणीचा अप्रतिहत प्रेरक जो सोम, त्याला काव्यप्रसू बुद्धिमत्तेनें रसप्रवाह वाहावयास लाविलें ४. —त्या हरिद्वर्ण, सर्वप्रिय, सकलदर्शी सोमाला ( भक्तांच्या ) हस्ताङ्गुली ग्राव्यांच्या योगानें पिळून उच्च शिखरावर ठेवून तेथून हेलावून देतात ५. ——म्हणूनच हे पावना, हे आल्हादप्रदा, स्तुतींनीं वृद्धिंगत होणारा आणि हृष्टचित्त करणारा जो तूं त्याला काव्योत्कर्षी भक्त, इन्द्राकडे पोहोंचवून देतात ६.

## सूक्त २७

हा काव्यप्रेरक सोम, ( देवाचें ) गुणवर्णन केलें म्हणजे अधार्मिकांचा अगदीं निःपात करून कुशपवित्राकडे वेगानें खळाळत जातो १. —हा चातुर्यबलदाता, दिव्यप्रकाशाचा जेता सोम, इन्द्राप्रीत्यर्थ, वायूप्रीत्यर्थ कुशपवित्रावर ओतला जातो २. —हा वीराग्रणी आणि मूळचा वनामध्यें राहणारा सर्वज्ञ आणि वीर्यशाली सोम पिळल्यावर शूर ऋत्विजांकडून द्युलोकाच्या शिखरावर सन्मानानें नेला जातो ३. —ह्या धेनुदानोत्सुक,

## सूक्तम् २६

### ऋष्याद्याः पूर्ववत्

तम् अमृक्षन्त वाजिनम् उपस्थे अदितेर् अधि । विप्रासो अण्व्या धिया ॥ १ ॥ तं गावो अभ्यनूषत सहस्रधारम् अक्षितम् । इन्दुं धर्तारम् आ दिवः ॥ २ ॥ तं वेधां मेधयाऽह्यन् पवमानम् अधि द्यवि । धर्णसिं भूरिधायसम् ॥ ३ ॥ तम् अह्यन् भुरिजोर् धिया सं वसानं विवस्वतः । पतिं वाचो अदाभ्यम् ॥ ४ ॥ तं सानौ अधि जामयो हरिं हिन्वन्ति अद्रिभिः । हर्यतं भूरि चक्षसम् ॥ ५ ॥ तं त्वा हिन्वन्ति वेधसः पवमान गिरावृधम् । इन्दो इन्द्राय मत्सरम् ॥ ६ ॥

## सूक्तम् २७

आङ्गिरसो नृमेधः पवमानसोमः गायत्री

एष कविर् अभिष्टुतः पवित्रे अधि शतोते । पुनानो घ्नन् अप स्रिधः ॥ १ ॥ एष इन्द्राय वायवे स्वर्जित् परि षिच्यते । पवित्रे दक्षसाधनः ॥ २ ॥ एष नृभि र्वि

सुवर्ण दानोत्सुक, आल्हादप्रद, सदा विजयी आणि अपराजित अशा सोमानें ( पवित्रावर ) स्वच्छ होतांना गर्जना केली ४. —हा आवेश उत्पन्न करणारा, हर्षवर्धन आणि कुशपवित्रावर स्वच्छ होणारा सोम सूर्यानेंच आकाशांतून सोडून दिला आहे कीं काय असें वाटतें ५. —अशा ह्या प्रतापी, वीराग्रणी, हरिद्वर्ण आणि आल्हादप्रद सोमानें पवित्रांतून स्वच्छ होऊन अंतरिक्षांत इन्द्रासन्मुख आपल्या रसाचा वर्षाव केला ६.

## सूक्त २८

हा सत्ववीर, सर्वज्ञ, सर्वांचीं मनें मुठींत ठेवणारा सोम, शूर ऋत्विजांनीं लोंकरीच्या वस्त्रावर ठेवला म्हणजे निरनिराळ्या वाटांनीं धावूं लागतो १. —हा दिव्यविभूतिसाठीं पिळलेला सोमरस तेजोमय स्थानांत प्रवेश करीत करीत पवित्रांतून कलशांत वाहूं लागला आहे २. —हा दिव्यसोम वेदीवर ( कसा ) सुशोभित दिसत आहे ! तो वृत्राचा नाश करतो, तो अमर आहे आणि देवाला अत्यंत प्रिय आहे ३. —हा वीरपुंगव रस, ( अंगुलीरूप ) दहा भगिनींनीं स्वच्छ केल्यावरोवर गर्जना करतो आणि द्रोणकलशाकडे धांवतो ४. —भक्तपावन आणि अत्यंत सूक्ष्मदर्शी सोमानें सूर्याला दीप्तिमान् केलें; तसेंच सर्व भवनांनाहि प्रकाशित केलें ५. —हा प्रतापी, अजिंक्य सोमरस स्वच्छ होऊन वहात आहे. तसाच तो देवाला प्रसन्न करणारा आणि पातकी विचारांचा नाश करणारा आहे ६.

---

नीयते दिवो मूर्धा वृषा सुतः । सोमो वनेषु विश्ववित् ॥ ३ ॥ एष गव्युर् अचिक्रदत् पवमानो हिरण्ययुः । इन्दुः सत्राजित् अस्तृतः ॥ ४ ॥ एष सूर्येण हासते पवमानो अधि द्यवि । पवित्रे मत्सरो मदः ॥ ५ ॥ एष शुष्मी असिष्यदत् अन्तरिक्षे वृषा हरिः । पुनानः इन्दुर् इन्द्रम् आ ॥ ६ ॥

## सूक्तम् २८

प्रियमेधः पवमानसोमः गायत्री

एष वाजी हितो नृभि र्विश्ववित् मनसस् पतिः । अव्यो वारं वि धावति॥१॥ एष पवित्रे अक्षरत् सोमो देवेभ्यः सुतः । विश्वा धामानि आ विशन् ॥ २ ॥ एष देवः शुभायते अधि योनौ अमर्त्यः । वृत्रहा देववीतमः ॥ ३ ॥ एष वृषा कनिक्रदत् दशभि र्जामिभि र्यतः । अभि द्रोणानि धावत ॥ ४ ॥ एष सूर्यम् अरोचयत् पवमानो विचर्षणिः । विश्वा धामानि विश्ववित् ॥ ५ ॥ एष शुष्मी अदाभ्यः सोमः पुनानो अर्षति । देवावीर् अघशंसहा ॥ ६ ॥

## सूक्त २९

पहा ह्या पिळून ठेवलेल्या, सोमाच्या, कामनावर्षक आणि दिव्यविबुधांच्या सहवासांत राहणाऱ्या ह्या सोमाच्या धारा आपल्या ओजस्वितेनें वाहून राहिल्या आहेत १. —सर्वसंचारी अशा सोमरूप अश्वाला, सूक्तें करणारे आणि संकीर्तन करणारे भक्तजन आपल्या वाणींनीं अलंकृत करतात; दिव्यप्रकाश प्रकट करणाऱ्या प्रशंसनीय सोमाचें स्तवन करून त्याला स्वच्छ करतात २. —हे सोमा, तुझी ती तेजस्विता खरोखर रमणीय असते. हे अपार-ऐश्वर्या सोमा, तुजला गाळून स्वच्छ करणाऱ्या भक्ताचा प्रशंसनीय हर्षोदधि तूं ओतप्रोत भरून सोड ३. —हे सोमा, यच्चावत् उत्कृष्ट वस्तु (भक्तांच्या) हस्तगत करून देऊन, आणि द्वेष्टयांची द्वेषबुद्धि तत्काल विलयास नेऊन तूं स्वच्छ धाराप्रवाहानें वहात रहा ४. —अधार्मिकांच्या वडवडीपासून आणि तसल्याच सर्व लोकांच्या निन्देपासून आमचा बचाव कर, म्हणजे त्या वावटळींत राहिलों तरी आम्हीं मोकळेच राहूं ५. —हे आल्हादप्रदा सोमा, इहलोकींच्या आणि दिव्यलोकींच्या अशा दोन्ही प्रकारच्या ऐश्वर्यांचा प्रवाह आम्हांवर वाहूं दे, आणि तेजानें तळपणारा असा प्रताप भक्तामध्यें ठेव ६.

## सूक्त ३०

ह्या प्रतापी सोमरसाच्या धारा पवित्रांतून सहज लीलेनें वहात राहिल्या आहेत. तो वाणीला पवित्र करून प्रेरणाहि करितो १. —रस पिळणाऱ्या भक्तजनांनीं स्वच्छ करून त्याला पात्रांत ओतला म्हणजे तो आल्हादप्रद रस गर्जना करितो आणि इन्द्रविष-

## सूक्तम् २९

आङ्गिरसो नृमेधः पवमानसोमः गायत्री

प्र अस्य धाराः अक्षरन् वृष्णः सुतस्य ओजसा । देवान् अनु प्रभूषतः ॥ १ ॥ सप्तिं मृजन्ति वेधसो गृणन्तः कारवो गिरा । ज्योति र्जज्ञानम् उक्थ्यम् ॥ २ ॥ सुषहा सोम तानि ते पुनानाय प्रभूवसो । वर्धा समुद्रम् उक्थ्यम् ॥ ३ ॥ विश्वा वसूनि संजयन् पवस्व सोम धारया । इनु द्वेषांसि सध्र्यक् ॥ ४ ॥ रक्षा सु नो अररुषः स्वनात् समस्य कस्यचित् । निदो यत्र मुमुच्महे ॥ ५ ॥ आ इन्दो पार्थिवं रयिं दिव्यं पवस्व धारया । द्युमन्तं शुष्मम् आ भर ॥ ६ ॥

## सूक्तम् ३०

आङ्गिरसो बिन्दुः पवमानसोमः गायत्री

प्र धाराः अस्य शुष्मिणो वृथा पवित्रे अक्षरन् । पुनानो वाचम् इष्यति ॥ १ ॥ इन्दु र्हियानः सोतृभि र्मृज्यमानः कनिक्रदत् । इयर्ति वग्नुम् इन्द्रियम् ॥ २ ॥

यक भजन करण्याचीहि प्रेरणा करितो. २. —तर शूरांनीं आक्रमण करण्याला योग्य, वीरांनीं युक्त, आणि सर्वांना स्पृहणीय असें प्रतापी ऐश्वर्य,हे सोमा, तूं आपल्या पवित्र धारेनें आम्हांकडे वहात आण ३. —पहा, हा सोमरस द्रोणपात्रांत अधिष्ठित होण्याकरितां स्वच्छ होऊन धारेनें वहात राहिला आहे ४. —तुला, अत्यंत मधुर अशा हरिद्वर्ण वनस्पतीला ग्राव्यांनीं पिळून, हे आल्हादप्रदरसा, तुजला इन्द्रानें प्राशन करावें यासाठीं ( वसतीवरी ) उदकांत मिसळून देतात ५. —तर हे भक्तानों, मधुरांत अत्यंत मधुर, मनोहर आणि आवेश उत्पन्न करणारा असा सोमरस, तुम्हीं वज्रधर इन्द्रासाठीं पिळून सिद्ध ठेवा ६.

## सूक्त ३१

जे उत्तम रीतीनें ध्यानसेवा करवितात, ज्या पवित्रप्रवाह सोमरसांनीं कलशांचें आक्रमण केलें, तेच ( सोम ) ज्ञानरूप ऐश्वर्य देतात १. —द्युलोक आणि पृथिवी यांच्या ठिकाणीं हे सोमा, तूं तेजस्वितेची अभिवृद्धि करणारा हो. तूं सत्वसामर्थ्याचा प्रभु हो २. —सर्वप्रिय वायुदेव तुजकडे वहातो; सरिताहि तुझ्याचकडे वहातात. हे सोमा, सर्वजण तुझेंच महत्त्व वृद्धिंगत करतात. ३. —तूं सर्व प्रकारांनीं वृद्धिंगत हो. हे सोमा, चोहोंकडून तुझ्या ठिकाणीं वीर्यशालित्व एकवट होऊं दे. आणि सत्व-परीक्षेच्या धकाधकींत तुझें अधिष्ठान आम्हांस लाभूं दे ४. —विचित्रवर्णा सोमा, अत्यंत श्रेष्ठ अशा ( भक्तीच्या ) शिखरावर धेनू तुझ्यासाठीं घृत आणि दुग्ध यांचा अक्षय्य प्रवाह सोडतात ५. —आल्हादप्रदा सोमा, हे भुवनपाला, तूं उत्तम आयुधांनीं सज्ज आहेस; तूं सद्रूप आहेस. म्हणूनच तुझ्या मैत्रीची आम्ही लालसा धरली आहे ६.

---

आ नः शुष्मम् नृषाह्यं वीरवन्तं पुरुस्पृहम्। पवस्व सोम धारया ॥ ३ ॥ प्र सोमो अति धारया पवमानो असिष्यदत्। अभि द्रोणानि आ सदम् ॥ ४ ॥ अप्सु त्वा मधुमत्तमं हरिं हिन्वन्ति अद्रिभिः। इन्दो इन्द्राय पीतये ॥ ५ ॥ सुनोता मधुमत्तमं सोमम् इन्द्राय वज्रिणे। चारुं शर्धाय मत्सरम् ॥ ६ ॥

## सूक्तम् ३१

राहूगणो गोतमः पवमानसोमः गायत्री

प्र सोमासः सुआध्यः पवमानासो अक्रमुः। रयिं कृण्वन्ति चेतनम् ॥ १ ॥ दिवस् पृथिव्याः अधि भवे-न्दो द्युम्नवर्धनः। भवा वाजानां पतिः ॥ २ ॥ तुभ्यं वाताः अभि प्रियस् तुभ्यम् अर्षन्ति सिन्धवः। सोम वर्धन्ति ते महः ॥ ३ ॥ आ प्यायस्व सम् एतु ते विश्वतः सोम वृष्ण्यम्। भवा वाजस्य सङ्गथे ॥ ४ ॥ तुभ्यं गावो घृतं पयो बभ्रो दुदुह्रे अक्षितम्। वर्षिष्ठे अधि सानवि ॥ ५॥ सु आयुधस्य ते सतो भुवनस्य पते वयम्। इन्दो सखित्वम् उश्मसि ॥ ६ ॥

## सूक्त ३२

हर्षप्रवाह जणों सांडून देणारे आणि यज्ञमंडपांत पिळून सिद्ध केलेले सोमरस आमच्या यज्ञकर्त्या यजमानाच्या सकीर्तिसाठीं पुढें सरसावून गेले १. —म्हणूनच त्रिताच्या तरुण स्त्रिया ह्या हरिद्वर्ण सोमाचा आल्हादप्रद रस इन्द्रानें प्राशन करावा यासाठीं ग्राव्यांच्या योगानें जोरानें पिळीत आहेत २. —ह्यासाठींच हा सोम हंसाप्रमाणें आपल्या सर्व गणांकडून ( देवाचें ) मननीय स्तोत्र मोठ्यानें म्हणवितो, आणि तीव्रवेगी शूराप्रमाणें गोदुग्धानें स्नान करतो ३. —उभय लोकांकडे दृष्टि फेंकून हे सोमा, तूं तेजस्वी मृगाप्रमाणें सत्धर्मांच्या उद्गमस्थानीं ( वेदीवर ) आरूढ होऊन तेथून प्रवाह सोडतोस ४. —तरुणी आपल्या प्रियकराकरितां उत्कंठित होते त्याप्रमाणें तुझ्याकडे पाहून ( स्तुति ) धेनू मोठ्यानें हंबारल्या; तेव्हां न्याय्य किंवा हितकर अशा संग्रामाला शूर जातो त्याप्रमाणें सोम हा पुढें सरसावला ५. —आमचे यज्ञकर्ते यजमान आणि मीं अशा उभयतांमध्यें उज्ज्वल यश ठेव; तसेंच विजयश्री, सत्बुद्धि आणि सत्कीर्तिहि ठेव ६.

---

## सूक्त ३३

सूक्ष्मविज्ञानी सोमरस उदकाच्या तरंगाप्रमाणें, किंवा वनाकडे धांवणाऱ्या महिषांप्रमाणें ( द्रोणपात्राकडे ) धांवतात १. —विचित्रवर्ण परंतु शुभ्रतेजस्क सोमरस सद्धर्मांच्या धाराप्रवाहानें सत्वसामर्थ्य आणि ( ज्ञान ) गोधनांचा ओघ लोटून द्रोणपात्रा-

---

## सूक्तम् ३२

आत्रेयः श्यावाश्वः पवमानसोमः गायत्री

प्र सोमासो मदच्युतः श्रवसे नो मघोनः। सुताः विदथे अक्रमुः ॥ १ ॥
आत् ईं त्रितस्य योषणो हरिं हिन्वन्ति अद्रिभिः। इन्दुम् इन्द्राय पीतये ॥ २ ॥
आत् ईं हंसो यथा गणं विश्वस्या–वीवशत् मतिम्। अत्यो न गोभिर् अज्यते ॥ ३ ॥
उभे सोमा–वचाकशत् मृगो न तक्तो अर्षसि। सीदन् ऋतस्य योनिम् आ ॥ ४ ॥
अभि गावो अनूषत योषा जारम् इव प्रियम्। अगन् आजिं यथा हितम् ॥५॥ अस्मे धेहि द्युमत् यशो मघवद्भ्य श्च मह्यं च। सनिं मेधाम् उत श्रवः ॥ ६ ॥

---

## सूक्तम् ३३

त्रितः पवमानसोमः गायत्री

प्र सोमासो विपश्चितः अपां न यन्ति ऊर्मयः। वनानि महिषाः इव ॥ १ ॥
अभि द्रोणानि बभ्रवः शुक्राः ऋतस्य धारया। वाजं गोमन्तम् अक्षरन् ॥ २ ॥ सुताः

कडे वहात जाऊं लागतात २. —पिळून सिद्ध केलेले सोमरस इन्द्राप्रीत्यर्थ, वायूप्रीत्यर्थ, वरुणाप्रीत्यर्थ, मरुतांप्रीत्यर्थ ( आणि ) विष्णूप्रीत्यर्थ वहात आहेत ३. —तीन प्रकारची वाणी ( ऋत्विज ) उच्चारतो, ( तेव्हां ) धेनू हंबरतात आणि सोमहि गर्जना करीत गमन करतो ४. —ब्रह्मस्तुतींनीं ( देवाची ) महती गायिली, ( त्यामुळें ) सत्यधर्मांच्या प्रभावशाली जननी, द्युलोकाच्या त्या बाळकाला (सोमाला) पुनः पुनः पुसून स्वच्छ करतात. ५. हे सोमा, संपत्तीचे चार समुद्र ( किंवा चारच काय पण ) सहस्रावधि समुद्र चोहोंकडून आमच्याकडे वहात आण ६.

## सूक्त ३४

आल्हादकर सोमरस पिळला जात असतां संतत धारेनें वेगानें पुढें सरसावून आपल्या ओजस्वितेनें ( शत्रूंचे ) कठीण दुर्ग फोडून टाकून वहात जातो १. —तो पिळून सिद्ध झाला म्हणजे इन्द्राप्रीत्यर्थ, वायूप्रीत्यर्थ, वरुणाप्रीत्यर्थ, मरुतांप्रीत्यर्थ अथवा विष्णूप्रीत्यर्थ वहात राहतो २. —वीर्यशाली (ऋत्विजांनीं) वेष्टित अशा वीर्यशाली सोमाला ग्राव्यांनीं जोरानें चुरून त्यांतून ( रसरूप ) पेयाचें दोहन भक्त करतात ३. —त्रिताच्या (हातानें) तो स्वच्छ करण्याला योग्य झाला, इन्द्राप्रीत्यर्थ तो हर्षोत्पादन योग्य ठरला; असा तो हरिद्वर्ण सोम नाना रूपांनीं दृग्गोचर होतो ४. —हा जो सद्धर्माचरणाचें अधिष्ठान आहे त्याच्यापासून प्रश्निपुत्र मरुत् सुंदर आणि सर्वप्रिय असें ( रसरूप ) हव्य पिळून घेतात ५. —निर्व्याज आणि झरझर वाहणाऱ्या ह्या स्तवनवाणी सोमाला एकदम घेरून टाकतात; तेव्हां तोहि ( स्तुतिरूप ) धेनूंना पाहून गर्जना करतो ६.

---

इन्द्राय वायवे वरुणाय मरुद्भ्यः । सोमाः अर्षन्ति विष्णवे ॥३॥ तिस्रो वाचः उत् ईरते गावो मिमन्ति धेनवः । हरिर् एति कनिक्रदत् ॥ ४ ॥ अभि ब्रह्मीर् अनूषत यह्वी ऋतस्य मातरः । मर्मृज्यन्ते दिवः शिशुम् ॥ ५ ॥ रायः समुद्राँ श्चतुरो अस्मभ्यं सोम विश्वतः । आ पवस्व सहस्रिणः ॥ ६ ॥

## सूक्तम् ३४

### ऋष्याद्याः पूर्ववत्

प्र सुवानो धारया तना इन्दु र्हिन्वानो अर्षति । रुजत् दृळ्हा वि ओजसा ॥१॥ सुतः इन्द्राय वायवे वरुणाय मरुद्भ्यः । सोमो अर्षति विष्णवे ॥ २ ॥ वृषाणं वृषभि र्हितं सुन्वन्ति सोमम् अद्रिभिः । दुहन्ति शक्मना पयः ॥ ३ ॥ भुवत् त्रितस्य मर्ज्यो भुवत् इन्द्राय मत्सरः । सं रूपैर् अज्यते हरिः ॥ ४ ॥ अभीम् ऋतस्य विष्टपं दुहते पृश्निमातरः । चारु प्रियतरं हविः ॥ ५॥ सम् एनम् अह्रुताः इमाः गिरो अर्षन्ति सस्रुतः । धेनू र्वाश्रो अवीवशत् ॥ ६ ॥

## सूक्त ३५

आपल्या धारेनें, हे पवित्रप्रवाहा सोमा, आम्हांकडे अपार ऐश्वर्य वहात आण; ज्या धारेनें तूं आम्हांला प्रकाशाचा लाभ करून दिलास (त्या धारेनें आण) १. —आल्हादप्रदा सोमा, समुद्र उचंबळून सोड, वहात रहा, सारें जग हलवून टाक; आणि तूं आमच्यासाठीं दिव्यऐश्वर्यांचा धारक हो २. —हे वीरोत्कृष्टा, तुज वीराच्या अग्रेसरत्वानें आम्हीं शौर्य गाजविणारे भक्त शत्रुसैन्यावर जय मिळवूं; तर आमचें जें उत्कृष्ट ध्येय त्याच्याकडे तूं वहात रहा ३. —आल्हादप्रद सोमरस (भक्तांना) लाभ करून द्यावा म्हणून सत्वबलाची इच्छा करतो, तेव्हां त्याचींच व्रतरूप आयुधें हातीं घेऊन ऋषि सत्वबलाढ्य होतो ४. —म्हणून, जनांचा धुरीण, वाणीला स्फूर्ति देणारा, आणि प्रभावशाली अशा सोमाला आम्हीं स्तुतींनीं आच्छादन करतों ५. —ज्या धर्मप्रतिपालकाच्या, ज्या भक्तपावनाच्या, आणि ज्या अपार-ऐश्वर्य प्रभूच्या नियमपालनानेंच हा अखिल जनसमाज धारण केला गेला आहे, त्या सोमाची महती वर्णन करा ६.

## सूक्त ३६

चमूपात्रांत पिळलेला सोमरस एखाद्या महारथ्याप्रमाणें पवित्रांतून वहात सुटला आहे; (पहा) तो अश्वारूढ वीर विजयतोरणाकडे धांवत गेला आहे १. —हे सोमा असा तूं हविर्वाहक, जागरूक, आणि देवप्रिय आहेस. तर मधानें ओथंबलेल्या पात्रांत पवित्रांमधून वहात जा २. —हे आप्या, हे पवित्रप्रवाहा, तूं नक्षत्रें सुप्रकाशिक कर;

## सूक्तम् ३५

प्रभूवसुः पवमानसोमः गायत्री

आनः पवस्व धारया पवमान रयिं पृथुम् । यया ज्योति र्विदासि नः ॥ १ ॥ इन्द्रो समुद्रम् ईङ्खय पवस्व विश्वम्एजय । रायो धर्ता नः ओजसा ॥ २ ॥ त्वया वीरेण वीरवो अभि ष्याम पृतन्यतः । •क्षरा नो अभि वार्यम् ॥ ३ ॥ प्र वाजम् इन्दुर् इष्यति सिपासन् वाजसाः ऋषिः । व्रता विदान आयुधा ॥ ४ ॥ तं गीर्भि र्वाचम् ईङ्खयं पुनानं वासयामसि । सोमं जनस्य गोपतिम् ॥ ५ ॥ विश्वो यस्य व्रते जनो दाधार धर्मणस्पते । पुनानस्य प्रभूवसोः ॥ ६ ॥

## सूक्तम् ३६

ऋष्याद्याः पूर्ववत्

असर्जि रथ्यो यथा पवित्रे चम्वोः सुतः । कार्ष्मन् वाजी निरक्रमीत् ॥ १ ॥ स वह्निः सोम जागृविः पवस्व देववीर् अति । अभि कोशम् मधुश्चुतम् ॥ २ ॥ स

आणि सत्कर्तृत्वाकडे, चातुर्यबलाकडे आम्हांला प्रवृत्त कर ३. —सद्धर्माचरणी ऋत्विजां-कडून अलंकृत होऊन त्यांच्या हातांनीं ऊर्णावस्त्राच्या पवित्रांतून स्वच्छ होऊन जो वहात रहातों ४. —असा सोम, दिव्य, ऐहिक, आणि अन्तरिक्षांतील सर्व वैभव दानशाली भक्तांकडे वहात आणो ५. —द्युलोकाच्या शिखरावर हे सोमा, तूं विराजमान होतोस; हे प्रतापी प्रभो, तूं अश्वप्रेमी, गोधनप्रेमी आणि वीरप्रेमी आहेस ६.

## सूक्त ३७

प्राशनासाठीं पिळलेला, देवोत्सुक आणि वीर्यशाली सोमरस राक्षसांना ठार करून कुशपवित्रांतून वहात जातो १ —तो सूक्ष्मविज्ञानी, हरिद्वर्ण, आणि सर्वाधार सोम, पवित्रांतून वहातो आणि स्वस्थानांत ( म्हणजे द्रोणपात्रांत ) पडतांना गर्जना करतो २. —तो सत्ववीर, पवित्रप्रवाह, राक्षसान्तक सोम द्युलोकाचा देदीप्यमान प्रदेश आणि ऊर्णावस्त्राचें गालनपात्र ह्यांच्याकडे निरनिराळ्या प्रकारांनीं धांवत जातो ३. —त्रिताच्या अत्युच्च शिखरांवर तो सोमरस पवित्रप्रवाहानें वाहून ( अङ्गुलीरूप ) भगिनींसह सूर्यासहवर्तमान प्रकाशूं लागला ४. —तो वृत्रनाशक, वीर्यशाली, उत्कृष्टलाभप्रद, अजिंक्य सोमरस सत्वपरीक्षेच्या युद्धाकडेच जणों वाहूं लागला ५. —कवीनें ज्याला प्रोत्साहन दिलें तो आल्हादकर दिव्य सोमरस इन्द्रासाठीं आणि ( भक्ताला ) वरदान देण्यासाठीं द्रोणकलशाकडे धांवला ६.

---

नो ज्योतींषि पूर्व्य पवमान वि रोचय । क्रत्वे दक्षाय नो हिनु ॥ ३ ॥ शुम्भमानो ऋतायुभि र्मृज्यमानो गभस्त्योः । पवते वारे अव्यये ॥ ४ ॥ स विश्वा दाशुषे वसु सोमो दिव्यानि पार्थिवा । पवताम् आ ऽन्तरिक्ष्या ॥ ५ ॥ आ दिवः पृष्ठम् अश्वयु र्गव्ययुः सोम रोहसि । वीरयुः शवसस् पते ॥ ६ ॥

## सूक्तम् ३७

रहूगणः पवमानसोमः गायत्री

स सुतः पीतये वृषा सोमः पवित्रे अर्षति । विघ्नन् रक्षांसि देवयुः ॥ १ ॥ सः पवित्रे विचक्षणो हरिर् अर्षति धर्णसिः । अभि योनिं कनिक्रदत् ॥ २ ॥ स वाजी रोचना दिवः पवमानो वि धावति । रक्षोहा वारम् अव्ययम् ॥ ३ ॥ स त्रितस्या-धि सानवि पवमानो अरोचयत् । जामिभिः सूर्यं सह ॥ ४ ॥ स वृत्रहा वृषा सुतो वरिवोवित् अदाभ्यः । सोमो वाजम् इवा-सरत् ॥ ५ ॥ स देवः कविने-षितः अभि द्रोणानि धावति । इन्दुर् इन्द्राय मंहना ॥ ६ ॥

## सूक्त ३८

हा रथाप्रमाणें वेगवान् आणि वीर्यशाली सोम उर्णावस्त्राच्या पवित्रांतून सहस्रावधि सत्वसामर्थ्यांकडे गमन करीत (देवाकडे) वहात जातो १. —ह्या हरिद्वर्ण आल्हादप्रद सोमाला इन्द्रानें प्राशन करावें म्हणून त्रिताच्या स्त्रिया ग्राव्यांनीं चुरीत आहेत २. — त्या ह्या वनस्पतीला यज्ञकर्मोत्सुक दहा जणी स्वच्छ करीत आहेत. त्याच्यामुळेंच तो (देवाला) हर्षनिर्भर करण्यास समर्थ होतो ३. —तोच हा सोम मानवी प्रजांमध्यें श्येनपक्ष्याप्रमाणें वास करतो; आपल्या वल्लभेकडे जाणाऱ्या तरुणाप्रमाणें (भूलोकीं राहतो) ४. —हाच तो आवेश उत्पन्न करणारा, द्युलोकाचा बालक, आल्हादप्रद रस, द्युलोकांतून खालीं अवलोकन करतो आणि ऊर्णावस्त्राच्या पवित्रांत प्रवेश करतो ५. —तो हा रस (देवाच्या) प्राशनासाठीं पिळला आहे. सर्वांचा आधार असा हा हरिद्वर्ण रस गर्जना करून आपल्या आवडत्या स्थानाकडे (द्रोणकलशाकडे) वहात जात आहे ६.

## सूक्त ३९

थोर अन्तःकरणाच्या सोमा, तूं शीघ्रगती आहेस; तर आपल्या भक्तप्रिय अशा तेजोवलयांसह, जेथें देव तेथें मीं असें म्हणून वाहूं लाग १. —अपूर्ण असेल तें परिपूर्ण आणि अलंकृत करून, आणि जनतेला कार्यप्रवृत्त करून तूं आकाशांतून पर्जन्यवर्षाव कर २. —हा पिळलेला सोमरस आपल्या तेजस्वितेनें (इतरांमध्येंहि)

## सूक्तम् ३८

### ऋष्याद्याः पूर्ववत्

एष उ स्य वृषा रथः अव्यो वारेभिर् अर्षति । गच्छन् वाजं सहस्रिणम् ॥१॥ एतं त्रितस्य योषणो हरिं हिन्वन्ति अद्रिभिः । इन्दुम् इन्द्राय पीतये ॥ २ ॥ एतं त्यं हरितो दश मर्मृज्यन्ते अपस्युवः । याभि र्मदाय शुम्भते ॥ ३ ॥ एष स्य मानुषीषु आ श्येनो न विक्षु सीदति । गच्छन् जारो न योषितम् ॥ ४ ॥ एष स्य मद्यो रसः अव चष्टे दिवः शिशुः । य इन्दु र्वारम् ।-आऽ विशत् ॥ ५ ॥ एष स्य पीतये सुतो हरिर् अर्षति धर्णसिः । क्रन्दन् योनिम् अभि प्रियम् ॥ ६ ॥

## सूक्तम् ३९

बृहन्मतिः पवमानसोमः गायत्री

आशुर् अर्ष बृहन्मते परि प्रियेण धाम्ना । यत्र देवाः इति ब्रवन् ॥ १ ॥ परिष्कृण्वन् अनिष्कृतम् जनाय यातयन् इषः । वृष्टिं दिवः परि स्रव ॥ २ ॥ सुतः एति

झळाळी उत्पन्न करणारा आहे. तो सूक्ष्मावलोकनी सोम ( जगताला ) नाना प्रकारांनीं प्रकाशित करणारा आहे ३. —तोच हा, कीं जो द्युलोकाच्या भोंवतीं झपाट्यानें वाहणाऱ्या आकाशसिन्धूच्या ज्या लहरी त्यांच्यांत मिसळून, पवित्रांतून ( पात्रांत ) वहात चालला आहे ४. —अतिशय दूरचा स्वर्लोक, तसेंच हा जवळचा भूलोक ह्या दोहोंनाहि आच्छादून टाकणारा हा सोमरस आम्हीं पिळला आहे. हें मधुरपेय आम्हीं इन्द्राप्रीत्यर्थ पिळून सिद्ध केलें आहे ५. —ज्या सर्व ( भक्तां )नीं एकत्र मिळून मोठ्यानें स्तुतिघोष केला, तेच भक्त हरिद्वर्ण सोमाला ग्राव्यांनीं पिळून वहाण्यास लावतात. ह्यामुळेंच तो सनातन धर्माच्या उद्गमस्थानीं अधिष्ठित झाला आहे ६.

## सूक्त ४०

भक्तपावन सर्वविज्ञानी सोमानें यच्चावत् शत्रुसैन्याला पादाक्रान्त केलें ( म्हणून ) त्या ज्ञानरूपाला भक्तजन एकाग्र स्तुतींनीं अलंकृत करतात १. —तो आरक्तवर्ण सोम स्वस्थानीं अधिष्ठित झाला. तो वीर्यशाली रस इन्द्राकडे गेला, आणि आपल्या अढळ स्थानींहि ( द्रोणकलशांत ) विराजमान झाला २. —म्हणून हे आल्हाददायका सोमा, आम्हांकडे तूं चोहोंकडून हजारों प्रकारचें महदैश्वर्य वहावयास लाव ३. —हे पावनप्रवाहा सोमा, हे आल्हादप्रदा, सर्व प्रकारचीं देदीप्यमान धनें आमच्याकडे आण. हजारों प्रकारची उत्साहसंपत्ति आम्हांस प्राप्त करून दे ४. —असा तूं सोम, स्तोत्रकर्त्याला ऐश्वर्य आणि उत्साहशौर्य दे. आणि गुणगायकाच्या स्तुतिवाणी वृद्धिंगत कर ५. —आल्हादप्रदा सोमा, भक्तपावन असा तूं उभय लोकींचें ऐश्वर्य आम्हांकडे आण. हे आल्हादप्रदा वीरा जें जें प्रशंसनीय आहे तें तें घेऊन ये ६.

---

पवित्र आ-त्विषिं दधान ओजसा । विचक्षाणो विरोचयन् ॥ ३ ॥ अयं स यो दिवस् परि रघुयामा पवित्र आ । सिन्धोर् ऊर्मा वि अक्षरन् ॥ ४ ॥ आ विवासन् परावतो अथो अर्वावतः सुतः । इन्द्राय सिच्यते मधु ॥ ५ ॥ समीचीनाः अनूषत हरिं हिन्वन्ति अद्रिभिः । योनौ ऋतस्य सीदत ॥ ६ ॥

## सूक्तम् ४०

### ऋष्याद्याः पूर्ववत्

पुनानो अक्रमीत् अभि विश्वाः मृधो विचर्षणिः । शुंभन्ति विप्रं धीतिभिः॥१॥ आ योनिं अरुणो रुहत् गमत् इन्द्रं वृषा सुतः । ध्रुवे सदसि सीदति ॥ २ ॥ नू नो रयिं महाम् इन्दोऽस्मभ्यं सोम विश्वतः । आ पवस्व सहस्रिणम् ॥ ३ ॥ विश्वा सोम पवमान द्युम्नानि इन्दो आ भर । विदाः सहस्रिणोर् इषः ॥ ४ ॥ स नः पुनान आ भर रयिं स्तोत्रे सवीर्यम् । जरितु वर्धया गिरः ॥ ५ ॥ पुनान इन्दो आ भर सोम द्विबर्हसं रयिम् । वृषन् इन्द्रो न उक्थ्यम् ॥ ६ ॥

## सूक्त ४१

धेनूप्रमाणें जे चपल असतात त्या सोमांच्या शीघ्रगति दीप्तिनें सर्व कांहीं आक्रमण करून टाकलें. परंतु असें करतांना त्यांनीं कृष्णवर्ण दुष्टांना ( =तमोमयपटलांना ) दूर घालवून देऊन त्यांचा विध्वंस केला १. —मंगलाचा ( जणों ) सेतूच अशा सोमाचें आम्हीं चिन्तन करतों ( त्यामुळें ) धर्महीन आणि दुष्टबुद्धि पाखांडी लोकांना आम्हीं रगडून टाकतों २. —मेघवृष्टिप्रमाणें पावनप्रवाह सोमाच्या ( वृष्टीचा ) ध्वनि ऐकूं येत आहे आणि आकाशांत विद्युल्लताहि चमकत आहेत. ३. —आतां तूं पिळला गेला आहेस, तर उच्च मनोत्साहाचा प्रवाह, आणि हे आल्हादप्रदा सोमा, गोधनयुक्त, सुवर्णयुक्त, अश्वयुक्त आणि सत्वसामर्थ्ययुक्त प्रवाह तूं आम्हांवर लोट ४. —हे सर्वत्रसंचारी सोमा, तूं ह्या विस्तीर्ण द्यावापृथिवींना उषा किंवा सूर्य जसें आपल्या किरणांनीं भरून टाकतात तसा वृष्टिरसानें भरून टाक ५. —आणि कल्याणकर आश्रय देणारी जी तुझी धारा तिनें हे सोमा, ( जगत्‌रूप ? ) रसानदी स्वस्थानाला वेढते त्याप्रमाणें आम्हांस वेढून टाक ६.

## सूक्त ४२

द्युलोकांतील तेजःपुंज नक्षत्रें प्रकट करून, ( आकाशांतील ) उदकांत सूर्य उत्पन्न करून हरिद्वर्ण सोमानें ( प्रकाश ) धेनू आणि उदकें ह्यांना आच्छादन करून टाकलें १. —हा दिव्यरस **पुरातन** आणि मननीय स्तवनानें दिव्यविभूतिंसाठीं पिळला जाऊन

---

## सूक्तम्

मेध्यातिथिः पवमानसोमः गायत्री

प्र ये गावो न भूर्णयस् त्वेषा अयासो अक्रमुः । घ्नन्तः कृष्णाम् अप त्वचम् ॥ १ ॥ सुवितस्य मनामहे अति सेतुं दुराव्यम् । साह्वांसो दस्युम् अव्रतम् ॥२॥ शृण्वे वृष्टेर् इव स्वनः पवमानस्य शुष्मिणः । चरन्ति विद्युतो दिवि ॥३॥ आ पवस्व महीम् इषं गोमत् इन्दो हिरण्यवत् । अश्वावत् वाजवत् सुतः ॥ ४ ॥ स पवस्व विचर्षणे आ मही रोदसी पृण । उषाः सूर्यो न रश्मिभिः ॥ ५ ॥ परि णः शर्मयन्त्या धारया सोम विश्वतः । सरा रसेव विष्टपम् ॥ ६ ॥

## सूक्तम् ४२

ऋष्याद्याः पूर्ववत्

जनयन् रोचना दिवो जनयन् अप्सु सूर्यम् । वसानो गा अपो हरिः ॥ १ ॥ एष प्रत्नेन मन्मना देवो देवेभ्यस् परि । धारया पवते सुतः ॥ २ ॥ वावृधानाय

आपल्या धारेनें पवित्र प्रवाह सोडतो २. —(कीर्तीनें) वृद्धिंगत होणारा आणि दुष्टांना झपाट्यासरशीं ठार करून टाकणारा (जो इन्द्र) त्याच्यासाठीं, आणि भक्तांना सत्वसामर्थ्याचा लाभ देण्यासाठीं, हे सहस्रतेजोबलाचे सोमरस वहात आहेत ३. —पूर्वीच्याच पेयाचें दोहन करणारा सोमरस पवित्रावर ओतला गेला, तेव्हां त्यानें गर्जना करून दिव्यविबुधांना प्रकट केलें ४. —यच्चावत् अभिलषणीय वस्तु आणि सत्यधर्माचा उत्कर्ष करणाऱ्या दिव्यविभूति ह्यांच्याकडेच हा पावन सोमरस वहात जातो ५. —तर हे सोमा, तुझा रस पिळला म्हणजे तूं, गोधनयुक्त, वीरपुरुषयुक्त, अश्वयुक्त आणि सत्वसामर्थ्ययुक्त अशा उच्च मनोत्साहाचा प्रवाह आमच्यावर लोट ६.

## सूक्त ४३

तीव्रवेगी वीराप्रमाणें आवेश उत्पन्न व्हावा म्हणून जो गोदुग्धानें माखला जातो, त्या सर्वप्रिय सोमाला आम्हीं स्तुतिरूप वस्त्रांनीं आच्छादित करतों १. —कृपाप्रसादाची वाञ्छा धरणाऱ्या आमच्या सकल स्तुति, त्या आल्हादप्रद रसाला इन्द्रानें प्राशन करावें म्हणून **पूर्वपद्धतीस** अनुसरून अलंकृत करीत आहेत २. —सर्वप्रिय, भक्तपावन सोम हा स्तुतींनीं अलंकृत होऊन भक्तिज्ञानशील उपासक जो मेध्यातिथि त्याच्या (यज्ञा)कडे जात आहे ३. —पावनप्रवाहा सोमा, जें अत्यंत भूषणास्पद, जें हजारों प्रकारच्या ऊर्जस्वितेनें युक्त, तें वैभव हे आल्हादप्रदा सोमा, तूं आम्हांला प्राप्त करून दे ४. —संग्रामाकडे तडक निघालेला तीव्रवेगी सैनिक गर्जना करतो त्याप्रमाणें आल्हादप्रद सोसरस जेव्हां पवित्रांतून पाझरतो तेव्हां अशीच गर्जना करतो ५.

---

तूर्वंये पवन्ते वाजसातये । सोमाः सहस्रपाजसः ॥ ३ ॥ दुहानः प्रत्नम् इत् पयः पवित्रे परि षिच्यते । क्रन्दन् देवाँ अजीजनत् ॥४॥ अभि विश्वानि वार्या अभि देवाँ ऋतावृधाः । सोमः पुनानो अर्षति ॥ ५ ॥ गोमत् नः सोम वीरवत् अश्वावत् वाजवत् सुतः । पवस्व बृहतीर् इषः ॥ ६ ॥

## सूक्तम् ४३

### ऋष्याद्याः पूर्ववत्

यो अत्यइव मृज्यते गोभि मंदाय हर्यतः । तं गीर्भि र्वासयामसि ॥ १ ॥ तत् नो विश्वाः अवस्युवो गिरः शुंभन्ति पूर्वथा । इन्दुम् इन्द्राय पीतये ॥ २ ॥ पुनानो याति हर्यतः सोमो गीर्भिः परिष्कृतः । विप्रस्य मेध्यातिथेः ॥ ३ ॥ पवमान विदा रयिम् अस्मभ्यं सोम सुश्रियम् । इन्द्रो सहस्रवर्चसम् ॥ ४ ॥ इन्दुर् अत्यो न वाजसृत्

—तर स्तुतिमर्मज्ञ अशा स्तवनकर्त्यांच्या सत्वविजयासाठीं आणि त्याच्या उत्कर्षासाठीं तूं वहात रहा. हे सोमा, त्याला उच्चप्रतीचें शौर्य अर्पण कर ६.

अध्याय आठवा समाप्त, सहावें अष्टक समाप्त.

## मण्डल ९

# सूक्त ४४

( अष्टक ७ अध्याय १

आल्हादप्रदा सोमा, आमच्या महासत्रासाठीं अविश्रान्त जो तूं, तो दिव्यविभूतिंकडे तरंगाकुल जलौघाप्रमाणेंच कीं काय वहात जातोस १. —( भक्तांनीं ) मननपूर्वक ज्याची सेवा केली, ज्यांनीं एकाग्रबुद्धीनें त्याला [ हृदयांत ] ठेवला असा तो स्फूर्तिदायक सोम ज्ञानी भक्तांनीं ओतलेल्या नुसत्या धारेनेंच दूरच्या दिव्यलोकाकडे गेला २. —हा जागरूक सोम पिळल्यावर दिव्यविबुधांकडे गमन करतो. तो विज्ञानशाली रस पवित्रांतून वाहत तिकडे जातो ३. —सात्विकतेचा भुकेला आणि आमचा मनोरम अध्वरयाग सिद्धीस नेणारा असा तूं आमच्यासाठीं वहात रहा. ( पहा हा ) यज्ञोत्सुक ऋत्विज् तुझी सेवा करीत आहे ४. —तो हा **ज्ञानवीर** आणि सदासमृद्ध सोम आमच्या भाग्योदयासाठीं आणि दिव्यविभूतिंमध्यें वायुदेवासाठीं [ हवीचें ] नियमन करो ५.

---

कनिक्रन्ति पवित्रे आ । यत् अक्षार् अति देवयुः ॥ ५ ॥ पवस्व वाजसातये विप्रस्य गृणतो वृधे । सोम रास्व सुवीर्यम् ॥ ६ ॥

इति षष्ठे अष्टमोऽध्यायः

अथ सप्तमोऽष्टकः

प्रथमोऽध्यायः

# सूक्तम् ४४

आङ्गिरसो अयास्यः पवमानसोमः गायत्री

ॐ प्र ण इन्द्रो महे तने ऊर्मिं न बिभ्रत् अर्षसि । अभि देवाँ अयास्यः ॥ १ ॥ मती जुष्टो धिया हितः सोमो हिन्वे परावति । विप्रस्य धारया कविः ॥ २ ॥ अयं देवेषु जागृविः सुत एति पवित्रे आ । सोमो याति विचर्षणिः ॥ ३ ॥ स नः पवस्व वाजयु श्चक्राण श्चारुम् अध्वरम् । बर्हिष्माँ आ विवासति ॥ ४ ॥ स नो भगाय वायवे

—सत्कृत्यप्रेरक आणि सन्मार्गांवरील अत्युत्तम नेता असा तूं आम्हांला ( अक्षय्य ) धन मिळावें म्हणून सत्वाढयता आणि सत्कीर्ति हीं ( प्रथम ) जिंकून दे ६.

## सूक्त ४५

मानवांचें निरीक्षण करणारा असा तूं ( दिव्यजनांनीं ) उल्लसित व्हावें, त्यांची सेवा ( आम्हांला ) घडावी आणि इन्द्रानें तुजला प्राशन करावें, म्हणून सुखरूपपणें वहात रहा १. —तुझ्याकडे जें दूतकार्य आहे त्याच्या सिद्धिसाठीं तूं वहात रहा. इन्द्राप्रीत्यर्थ तुजला चुरून पिळलेला आहे तर मित्रांपेक्षांहि अधिक प्रेमानें तूं दिव्यविबुधांकडे वहात जा. २. —आरक्तवर्ण अशा तुला आम्हीं हर्षनिर्भर होण्यासाठीं गोदुग्धाशीं मिश्रित करतों. आम्हांला ( अढळ ) धन मिळावें म्हणून त्याचीं द्वारें तूं लीलेनें उघडून दे ३. —युद्धोत्सुक अश्व धुरेशी जोडला जाऊन मार्गावर धांवतो, त्याप्रमाणें सत्वाढय सोमरस पवित्रांतून झरझर वहातो; तो आल्हादकर रस दिव्यविबुधांमध्यें जाऊन पडतो ४. —वनांमध्यें डुलत राहणाऱ्या सोमाप्रीत्यर्थ आमच्या ऋत्विज मित्रांनीं मोठ्यानें गुणसंकीर्तन केलें आहे. ऊर्णावस्त्रांतून पाझरणाऱ्या त्या इंदूचें ( स्वतः ) स्तुतीनींच स्तवन केलें आहे ५. —तुजला प्राशन केलें असतां ज्या धारेनें, हे आल्हादप्रदा, सूक्ष्मबुद्धि अशा भक्ताच्या ठिकाणीं तूं उत्तम शौर्य उत्पन्न करतोस, त्या धारेनें तूं वहात रहा ६.

---

विप्रवीरः सदावृधः । सोमो देवेषु आ यमत् ॥ ५ ॥ स नो अद्य वसुत्तये क्रतुवित् गातुवित्तमः । वाजं जेषि श्रवो बृहत् ॥ ६ ॥

## सूक्तम् ४५

### पूर्ववत्

स पवस्व मदाय कं नृचक्षाः देववीतये । इन्द्रो इन्द्राय पीतये ॥ १ ॥ स नो अर्षा–भि दूत्यं त्वम् इन्द्राय तोशसे । देवान् सखिभ्य आ वरम् ॥ २ ॥ उत त्वाम् अरुणं वयं गोभिर् अज्मो मदाय कम् । वि नो राये दुरो वृधि ॥ ३ ॥ अति ऊ पवित्रम् अक्रमीत् वाजी धुरं न यामनि । इन्दु देवेषु पत्यते ॥४॥सम् ईं सखायो अस्वरन् वने क्रीळन्तम् अति अविम् । इन्दुं नावाः अनूषत ॥ ५ ॥ तया पवस्व धारया यया पीतो वि चक्षसे । इन्दो स्तोत्रे सुवीर्यम् ॥ ६ ॥

## सूक्त ४६

देवाच्या यज्ञासाठीं, पर्वतावर वाढणारे तीक्ष्ण सोमपल्लव, कर्तृत्वशाली तीव्र वीराप्रमाणें झराझर वहात आहेत १. —पित्यानें दिलेल्या भूषणांनीं अलंकृत झालेल्या तरुणीप्रमाणें ( वसतीवरीला ) सुशोभित करून सोमरसांनीं वायुदेवाकडे गमन केलें २. —आल्हादप्रद आणि चमूपात्रांत पिळलेले भक्तप्रेमी सोमरसविन्दु भक्ताच्या यज्ञकर्मांनींच इन्द्राचा महिमा वृद्धिंगत करितात ३. —पिळदार भुजदंडाच्या ऋत्विजांनों, या आणि ह्या तेजस्वी रसाला मन्थिपात्रांत ओतून ठेवा. ह्या उल्लासप्रद सोमरसाला गोदुग्धाशीं मिश्र करा ४. —यशोधन जिंकणाऱ्या सोमा, तूं उत्तमोत्तम वरदानांचा नियन्ता आहेस. तुझा रसप्रवाह यथेच्छ वाहूं दे. हे सोमा, तूं आम्हांला सन्मार्गाचा मार्गदर्शक झाला आहेस ५. —( दुग्धानें ) अलंकृत करण्यास योग्य अशा ह्या पावन रसाला दहा भगिनी अलंकृत करीत आहेत; ह्या हर्षकर आनंदरूप पेयाला इन्द्राप्रीत्यर्थ सुरुचिर करीत आहेत ६.

## सूक्त ४७

अशा सत्कृत्याच्या योगानें सोमानें मोठयांनाहि महत्त्वास चढविलें; असा हा हर्षोत्फुल्ल रस आपलें वीर्य प्रकट करीत आहे. १. —जे जे पराक्रम गाजवावयाचे होते, ते ते यानें गाजविले. ह्यानें केलेला पाखांडी लोकांचा नायनाट तर

---

## सूक्तम् ४६

### ऋष्याद्याः पूर्ववत्

असृग्रन् देववीतये अत्यासः कृत्व्या इव । क्षयन्तः पर्वतावृधः ॥ १ ॥ परिष्कृतास इन्दवो योषेव पित्र्यावती । वायुं सोमाः असृक्षत ॥ २ ॥ एते सोमास इन्दवः प्रयस्वन्त श्चमूसुताः । इन्द्रं वर्धन्ति कर्मभिः ॥ ३ ॥ आ धावता सुहस्त्यः शुक्रा गृभ्णीत मन्थिना । गोभिः श्रीणीत मत्सरम् ॥ ४ ॥ स पवस्व धनञ्जय प्रयन्ता राधसो महः । अस्मभ्यं सोम गातुवित् ॥ ५ ॥ एतं मृजन्ति मर्ज्यं पवमानं दश क्षिपः । इन्द्राय मत्सरं मदं ॥ ६ ॥

## सूक्तम् ४७

कविः पवमानसोमः गायत्री

अया सोम सुकृत्यया मह श्चित् अभ्य-वर्धत । मन्दान उत् वृषायते ॥ १ ॥ कृतानी-त् अस्य कर्त्वा चेतन्ते दस्युतर्हणा । ऋणा च धृष्णु श्चयते ॥ २ ॥ आत्

ढळढळीत दिसत आहे. हा धडाडीचा वीर ( भक्तांचें ) ऋण फेडतोच २. —इन्द्राला प्रिय असा हा रस सहस्रावधि वेळां विजयी झालेलें ( जणों ) वज्रच बनून गेला आहे, आणि म्हणूनच याचें स्तवन (भक्तजन) करतात ३. —जर भक्त आपल्या ध्यानबुद्धि वारंवार स्वच्छ ठेवील तर स्फूर्तिदायक सोमरस विश्वाधार ( इन्द्राच्या ) अधिष्ठानांत त्या ज्ञानप्रेमी भक्तासाठीं अमोल रत्नाची देणगी मागून घेईल ४. —( अचल ) धनाच्या लाभासाठीं प्रयत्न करणाऱ्याचा, आणि सात्विक युद्धांत अश्वारूढ वीराचा जसा तूं सहाकारी असतोस, तसाच संग्रामांमध्यें विजयेच्छु वीराचाहि असतोस ५.

## सूक्त ४८

वीरोचित असे अनेक पराक्रम प्रकट करणारा जो तूं मनोरम विभूति, त्याला, अत्युच्च आकाशाच्या मन्दिरांत वास करणाऱ्या सोमाला, आह्मीं सत्कर्मांनींच आळवीत आहों १ ––धाडसानें अंगावर चालून येणाऱ्या शत्रूंना छाटून टाकणारा, प्रशंसनीय, मोठ्यांत मोठी सत्ता चालविणारा आणि शत्रूंच्या शेंकडों नगरांचा विध्वंस करणारा असा जो हर्षकर सोम त्याची आम्ही विनवणी करतों २. म्हणूनच तुज दिव्यधनाच्या राजाला, हे सत्कार्यशीला, ज्याला केव्हांहि व्यथा होत नाहीं अशा तुला सुपर्णांनें द्युलोकांतून भूलोकीं आणलें ३. —तुजला विश्वानें पहावें म्हणूनच, समतेनें वागविणारा, रजोलोकांतून त्वरेनें धांवणारा आणि सनातन सद्धर्मांचा संरक्षक जो तूं, त्या तुज सोमाला, सुपर्णांनें स्वर्गांतून खालीं आणलें ४. —इकडे ( पात्रांत एकसारखा ) हलविला गेल्यानें त्या (सोमा)ला इन्द्राजवळ अतिशय महत्त्व प्राप्त झालें आणि त्यायोगानेंच तो भक्तसहाय्यक आणि सर्वसंचारी झाला ५.

सोमः इन्द्रियो रसो वज्रः सहस्रसाः भुवत्। उक्थं यत् अस्य जायते ॥ ३ ॥ स्वयं कवि र्विधर्तरि विप्राय रत्नम् इच्छति। यदी मर्मृज्यते धियः ॥ ४ ॥ सिषासतू रयीणां वाजेषु अर्वताम् इव। भरेषु जिग्युषाम् असि ॥ ५ ॥

## सूक्तम् ४८

### ऋष्याद्याः पूर्ववत्

तं त्वा नृम्णानि बिभ्रतं सधस्थेषु महो दिवः। चारुं सुकृत्यये–महे ॥ १ ॥ संवृक्तधृष्णुम् उक्थ्यं महामहिव्रतं मदम्। शतं पुरो रुरुक्षणिम् ॥ २ ॥ अत स्त्वा रयिम् अभि राजानं सुक्रतो दिवः। सुपर्णो अव्यथि र्भरन् ॥ ३ ॥ विश्वस्मै इत् स्वर्दृशे साधारणं रजस्तुरम्। गोपाम् ऋतस्य वि र्भरत् ॥ ४ ॥ अधा हिन्वान इन्द्रियं ज्यायो महित्वम् आनशे। अभिष्टिकृत् विचर्षणिः ॥ ५ ॥

## सूक्त ४९

तूं ( रसाची ) वृष्टि कर; द्युलोकांतील उदकांच्या तरंगाप्रमाणें तुझा प्रवाह वाहूं दे. क्षयरोगाचा नाश करणारा जो तुझा श्रेष्ठ उत्साह त्याचाहि प्रवाह वाहूं दे १. —ज्या तुझ्या धाराप्रवाहानें धेनू इकडे आल्या; जिच्या योगानें जनहितकारी धेनू आमच्या गृहांकडे आल्या अशा धारेनें वहात रहा २. —यज्ञांत आपल्या धारेनें घृताचा प्रवाह वाहूं दे. आणि देवाला अत्यंत प्रिय असा तूं आमच्यासाठीं पर्जन्यवृष्टि कर ३. —आमच्या ओजस्वितेसाठीं ह्या ऊर्णावस्त्राच्या गाळणींतून तूं धाराप्रवाहानें धांवत वहा. तुझ्या प्रवाहाचा निनाद दिव्यविबुध मजेनें ऐकत आहेत ४. —यज्ञपावन सोमरस, राक्षसांची धुळधाण करून प्राचीन पद्धतीप्रमाणें आपल्या कान्ति उजळून वहात राहिला आहे ५.

## सूक्त ५०

पहा तुझा दणदणाट समुद्राच्या लाटेच्या निर्घोषाप्रमाणें कानावर पडत आहे, आतां आपल्या बाणाचें वज्रास्त्र तूं शत्रूंवर फेंक १. —ज्या वेळीं तूं लोंकरीच्या पवित्राच्या शिखरावर आरोहण करतोस आणि तुझा रस पिळला जातो, त्या वेळीं तीन प्रकारच्या यज्ञोचित स्तुति ( ऋत्विजांच्या मुखावाटे ) निघतात २. —देवप्रिय, हरिद्वर्ण, पावन आणि मधुररसस्रावी सोमाला ग्राव्यांनीं चुरून लोंकरीच्या गाळण्यावर ठेऊन हालवितात ३. —अत्यंत आवेश उत्पन्न करणाऱ्या सोमा, हे स्फूर्तिप्रदा, अर्कस्तोत्राच्या मूलस्थानीं आरोहण करण्यासाठीं तूं धाराप्रवाहानें पवित्रांतून वहात रहा ४.— पूर्ण तल्लीनता

---

## सूक्तम् ४९

### ऋष्याद्याः पूर्ववत्

पवस्व वृष्टिम् आ सु नो अपाम् ऊर्मिं दिवस्परि । अयक्ष्माः बृहतीर् इषः ॥१॥ तया पवस्व धारया यया गाव इहा–गमन् । जन्यास उप नो गृहम् ॥ २ ॥ घृतं पवस्व धारया यज्ञेषु देववीतमः । अस्मभ्यं वृष्टिम् आ पव ॥ ३ ॥ स नः ऊर्जे वि अव्ययं पवित्रं धाव धारया । देवासः शृणवन् हि कम् ॥ ४ ॥ पवमानो असिष्यदत् रक्षांसि अपजङ्घनत् । प्रत्नवत् रोचयन् रुचः ॥ ५ ॥

## सूक्तम ५०

उचथ्यः पूर्ववत् पूर्ववत्

उत् ते शुष्मास ईरते सिन्धोर् उर्मेरिव स्वनः । वाणस्य चोदया पविम् ॥ १ ॥ प्रसवे ते उदीरते तिस्रो वाचो मखस्युवः । यत् अव्ये एषि सानवि ॥ २ ॥ अव्यो वारे परि प्रियं हरिं हिन्वन्ति अद्रिभिः । पवमानं मधुश्चुतम् ॥ ३ ॥ आ पवस्व

आणणाऱ्या रसा, तुझ्याशीं अगदीं सहज मिसळून जाणाऱ्या गोदुग्धानें तूं संपृक्त झाला आहेस, तर हे आल्हादप्रदा, इन्द्रानें प्राशन करावें म्हणून तुझा रसप्रवाह वाहूं दे ५.

## सूक्त ५१

हे अध्वर्यू, ग्राव्यांनीं चुरलेल्या सोमाला पवित्रावर ठेव, आणि इन्द्रानें प्राशन करावा म्हणून तो गाळून घे १. —द्युलोकांतील उत्कृष्ट अमृत जो सोम, अत्यंत मधुर जो सोम, तो वज्रधर इन्द्राप्रीत्यर्थ पिळून सिद्ध कर २. —आल्हादप्रद सोमा, तुझें गाळलेलें मधुर पेय, दिव्यविबुध जे मरुत्‌गण ते प्राशन करीत असतात ३. —हे सोमा, तूं आपलें महात्म्य वाढविणारा आणि आपलें वीर्य गाजविणारा ( आहेस म्हणून ) हर्षोत्कर्षासाठीं, सर्वत्र चळवळ व्हावी यासाठीं, आणि स्तोतृजनांच्या रक्षणासाठीं, तुजला पिळून सिद्ध केला आहे ४. —सूक्ष्मदृष्टि सोमा, तुला चुरून ठेवला म्हणजे सत्वाढयता आणि कीर्ति यांची प्राप्ति व्हावी म्हणून पवित्रांतून तुझा रसप्रवाह वाहूं दे ५.

## सूक्त ५२

आकाशनिवासी ( अक्षय ) धनदाता जो तूं त्यानें आपल्या पेयानें आम्हांमध्यें सत्वाढयता आणली आहे, तर तुला चुरून सिद्ध करतांना तूं पवित्रांतून वहात रहा १.

---

मदिन्तम पवित्रं धारया कवे । अर्कस्य योनिम् आ सदम् ॥ ४ ॥ स पवस्व मदिन्तम गोभिर् अञ्जानो अक्तुभिः । इन्दो इन्द्राय पीतये ॥ ५ ॥

## सूक्तम् ५१

उचथ्यः पवमानसोमः गायत्री

अध्वर्यो अद्रिभिः सुतं सोमं पवित्रे आ सृज । पुनीहीन्द्राय पातवे ॥ १ ॥ दिवः पीयूषम् उत्तमं सोमम् इन्द्राय वज्रिणे । सुनोता मधुमत्तमम् ॥ २ ॥ तव त्ये इन्दो अन्धसो देवा मधो र्वि अश्नते । पवमानस्य मरुतः ॥ ३ ॥ त्वं हि सोम वर्धयन् सुतो मदाय भूर्णये । वृषन् स्तोतारम् ऊतये ॥ ४ ॥ अभि अर्ष विचक्षण पवित्रं धारया सुतः । अभि वाजम् उत श्रवः ॥ ५ ॥

## सूक्तम् ५२

पूर्ववत्

परि द्युक्षः सनत् रयि भरत् वाजं न अन्धसा । सुवानो अर्ष पवित्र आ ॥ १ ॥ तव प्रत्नेभिर् अध्वभिर् अव्यो वारे परि प्रियाः । सहस्र धारो यात् तना ॥ २ ॥

—ओहो, देवप्रिय असा तूं आपल्या पुरातन मार्गांनीं लोंकरीच्या गाळण्यांतून सहस्रधारांनीं एकसारखा वाहूं लागलासच २. —जो भाताच्या गुबगुबीत मुदीप्रमाणें स्वस्थ आहे त्याला गदगदां हलव, पण आपलें वरदान झुगारून देऊं नको. हे शत्रुनाशना, आपल्या मारक शस्त्रानें ( शत्रूला ) उलथून टाक ३. —आल्हादप्रदा रसा, हे अखिलजनसेव्या, त्या ( प्रतिस्पर्ध्यां )पैकीं जो धुमाकूळ घालतो, आणि आम्हांला हुकमाची भाषा बोलतो त्याचा निःपात कर ४. —हे आल्हादप्रदा रसा, पवित्र अशा शेंकडोंच काय, पण हजारों सहाय्यक शक्तींनीं तुझा रसप्रवाह वाहूं दे. कारण तूं ( अक्षय )धनाचा दाता आहेस ५.

## सूक्त ५३

तुझे तडाके बसूं लागले आणि राक्षसांचा चुराडा उडूं लागला; तर आतां हे अभिषवप्रिया, आमचा जे मत्सर करतात त्यांना हांकलून दे १. —अशा रीतीनें तूं आपल्या ओजस्वितेनें शत्रूंचा धुव्वा उडवून देतोस म्हणून रथाशीं रथ थडकले, झुंजाला तोंड लागलें, तरी निर्भय अन्तःकरणानें मी तुझें स्तवन करणार २. —ह्या भक्तपावन सोमाचे अतर्क्य नियम मोडण्याची कोणाचीहि प्राज्ञा नाहीं. हे सोमा, सैन्यासह जो कोणी तुझ्यावर चालून येईल त्याला तूं भोंसकून टाक ३. —हर्षानें ओथंबलेला, हरिद्वर्ण, सत्वाढ्य, आणि हर्षोफुल्ल करणारा जो आल्हादप्रद सोम त्याला ( भक्तजन ) नदीप्रवाहांमध्यें [ धुवून ] इन्द्राला अर्पण करतात ४.

## सूक्त ५४

ह्याच्या पुरातन दीप्तीला साजेल असें जें त्याचें ( रसरूप ) तेजस्वी दुग्ध, सरस्रावधि देणग्या देणारा जो त्याचा रस तो ( ऋत्विज हे ) पिळून सिद्ध करितात १.

---

षरु र्न य स्तम् ईङ्खय इन्दो न दानम् ईङ्खय । वधै र्वधस्नो ईङ्खय ॥ ३ ॥ नि शुष्मम् इन्दो एषां पुरुहूत जनानाम् । यो अस्माँ आ दिदेशति ॥ ४ ॥ शतं न इन्दो ऊतिभिः सहस्रं वा शुचीनाम् । पवस्व मंहयत् रयिः ॥ ५ ॥

## सूक्तम् ५३

काश्यपोऽवत्सारः सोमः गायत्री

उत् ते शुष्मासो अस्थू रक्षो भिन्दन्तो अद्रिवः । नुदस्व याः परिस्पृधः ॥ १ ॥ अया निजघ्निर् ओजसा रथसङ्गे धने हिते । स्तवै अबिभ्युषा हृदा ॥ २ ॥ अस्य व्रतानि आधृषे पवमानस्य दूढ्या । रुज यस् त्वा पृतन्यति ॥ ३ ॥ तं हिन्वन्ति मदच्युतं हरिं नदीषु वाजिनम् । इन्दुम् इन्द्राय मत्सरम् ॥ ४ ॥

—हा सूर्याप्रमाणें तेजस्वी आहे, हा सरोवराप्रमाणें विस्तीर्ण अशा द्रोणपात्राकडे धांवतो, आणि आकाशाला जाऊन भिडतील असे सात रसप्रवाह सोडतो २. —हा शुद्धप्रवाह सोम देदीप्यमान सूर्याप्रमाणें सकल भुवनाच्यावर (उच्च स्थानीं) जाऊन राहिला आहे ३. —देवसेवेसाठीं आमच्याकडे सत्वप्रचुर असा गोधनांचा प्रवाह तूं चोहोंकडून वहावण्यास लावतोस, आणि हे पावनप्रवाहा, हे आल्हादप्रदा, इन्द्राच्या भेटीसाठीं तूं उत्सुक असतोस ४.

## सूक्त ५५

तूं आपल्या पेयाच्या योगानें प्रत्येक धान्य, प्रत्येक प्रकारची पुष्टि, आणि हे सोमा सर्व प्रकारची भाग्यें, यांचा ओघ आमच्याकडे वाहून दे १. —आल्हादप्रदा सोमा, जशी तुझी स्तुति (उत्कृष्ट), जशा तुझ्या पेयाची उत्पत्ति (उत्तम), त्याचप्रमाणें हें तुझें प्रिय आसन आहे, तर त्याच्यावर आरोहण कर २. —आणि हे सोमा, गोधनदाता, अश्वधनदाता, असा तूं झरझर निघून जाणाऱ्या प्रत्येक दिवसांगणिक आमच्यासाठीं पेयरूपानें (तुझ्या रसाचा) प्रवाह वहावयास लाव. ३ —जो शत्रूंना जिंकतो, पण स्वतः कधींहि जिंकला जात नाहीं, जो शत्रूवर तुटून पडून त्याला ठार करतो, आणि हजारों शत्रूंना पादाक्रांत करतो, तो तूं सोम आपल्या रसाचा प्रवाह वहावयास लाव ४.

---

## सूक्तम् ५४

### ऋष्याद्याः पूर्ववत्

अस्य प्रत्नाम् अनु द्युतम् शुक्रं दुदुह्रे अह्रयः । पयः सहस्रसाम् ऋषिम् ॥ १ ॥ अयं सूर्य इवोपदृक् अयं सरांसि धावति । सप्त प्रवतम् आ दिवम् ॥२॥ अयं विश्वानि तिष्ठति पुनानो भुवनोपरि । सोमो देवो न सूर्यः ॥ ३ ॥ परि णो देववीतये वाजाँ अर्षसि गोमतः । पुनान इन्दो इन्द्रयुः ॥ ४ ॥

## सूक्तम् ५५

कश्यपपावत्सारः पवमानसोमः गायत्री

यवंयवं नो अन्धसा पुष्टंपुष्टं परिस्रव । सोमं विश्वा च सौभगा ॥ १ ॥ इन्दो यथा तव स्तवो यथा ते जातम् अन्धसः । नि बर्हिषि प्रिये सद ॥ २ ॥ उत नो गोवित् अश्ववित् पवस्व सोम अन्धसा । मक्षूतमेभिर् अहभिः ॥ ३ ॥ यो जिनाति न जीयते हन्ति शत्रुम् अभीत्य । स पवस्व सहस्रजित् ॥ ४ ॥

## सूक्त ५६

आंगांत त्वरित भिनणारा सोम, पवित्रांतून श्रेष्ठ अशा सनातन सद्धर्माचा प्रवाह सोडतो, तो राक्षसांचा निःपात करून देवासाठीं उत्सुक झालेला असतो १. —ज्या वेळीं सोम हा सत्वाढ्यतेचा प्रवाह सोडतो, त्या वेळेस त्याच्या कर्मोत्सुक अशा शेंकडों धारांनीं इन्द्राचें मित्रत्व जोडलेलें असतें २. —कुमारी ज्याप्रमाणें आपल्या प्रियकराचेंच गुणवर्णन करीत सुटते, त्याप्रमाणें ( अंगुलीरूप ) दहा स्त्रिया तुझीच प्रशंसा करतात; (पण) हे सोमा, देवाची प्राप्ति व्हावी म्हणून ( तुलाहि ) गाळून स्वच्छ करावा लागतो ३. —इन्द्रासाठीं आणि विष्णूसाठीं, हे आल्हादप्रदा रसा, तूं वहात रहा, आणि शूर ऋत्विजांचें आणि स्तोतृजनांचें पातकांपासून रक्षण कर ४.

## सूक्त ५७

सतत वहात राहणाच्या तुझ्या धारा आकाशांतून पडणाऱ्या पर्जन्यवृष्टिप्रमाणें हजारों प्रकारचें सत्वसामर्थ्य अर्पण करतात १. —तो हरिद्वर्ण सोम नानाप्रकारच्या चित्तवेधक कवनांचा परामर्श घेत घेत आणि आपलीं शस्त्रास्त्रें पाजळीत यज्ञाकडे येतो २. —भक्ताकडून तो अलंकृत होतो त्या वेळीं तो सत्क्रियाप्रेरक सोम एखाद्या गजराजाप्रमाणें आणि एखाद्या पुण्यशील राजाप्रमाणें शोभतो, आणि श्येनपक्ष्याप्रमाणें उच्चस्थानीं अधिष्ठित होतो ३. —हे आल्हादप्रद रसा, तूं गाळून स्वच्छ झालास म्हणजे दिव्यलोकांतील आणि पृथ्वीवरील यच्चावत् उत्कृष्ट वस्तु आमच्यासाठीं घेऊन ये ४.

## सूक्तम् ५६

### पूर्ववत्

परि सोम ऋतं बृहत् आशुः पवित्रे अर्षति । विघ्नन् रक्षांसि देवयुः ॥ १ ॥ यत् सोमो वाजम् अर्षति शतं धाराः अपस्युवः । इन्द्रस्य सख्यम् आ विशन् ॥ २ ॥ अभि त्वा योषणो दश जारं न कन्याऽनूषत । मृज्यसे सोम सातये ॥ ३ ॥ त्वम् इन्द्राय विष्णवे स्वादुर् इन्द्रो परि स्रव । नॄन् सोतृन् पाहि अंहसः ॥ ४ ॥

## सूक्तम् ५७

### पूर्ववत्

प्र ते धाराः असश्चतो दिवो न यन्ति वृष्टयः । अच्छा वाजं सहस्रिणम् ॥ १ ॥ अभि प्रियाणि काव्या विश्वा चक्षाणो अर्षति । हरिस् तुञ्जान आयुधा ॥ २ ॥ स मर्मृजानः आयुभिर् इभो राजेव सुव्रतः । श्येनो न वंसु सीदति ॥ ३ ॥ स नो विश्वा दिवो वसु उतो पृथिव्याः अधि । पुनानः इन्दो आ भर ॥ ४ ॥

## सूक्त ५८

तो तीक्ष्ण आणि हर्षोत्फुल्ल करणारा सोमरस धांव घेत आहे; त्याच्या रसाच्या पेयाची धाराहि धांवत आहे. पहा, तो तीव्र आणि हर्षोत्फुल्ल होणारा रस कसा त्वरेनें धांवत आहे १. —उषारूप धेनू ही सर्व उत्कृष्ट वस्तूंना जाणते; त्या देवीला मर्त्यमानवांच्या रक्षणाची काळजी असते; म्हणूनच तो तीव्र आणि हर्षोत्फुल्ल होणारा (इन्द्र) त्वरेनें धांवत येतो २.—ध्वस्नांपासून आणि पुरुषन्तीपासून हजारों वस्तूंचा आम्हीं स्वीकार करीत असतों, तोंच तो तीव्र आणि ( देवाला ) हर्षोत्फुल्ल करणारा सोमरसहि धांव घेतो ३. —आम्हीं त्या दोघांपासून तीनशेंच काय, पण हजारों प्रकारचीं धनें सतत घेतों (म्हणून) तो तीव्र आणि ( देवाला ) हर्षोत्फुल्ल करणारा सोमरस धांव घेत वहातो ४.

## सूक्त ५९

सोमरसा तुझा पुण्यप्रवाह वाहूं दे; तूं प्रकाश धेनू जिंकणारा, ( मनोरूप ) अश्व जिंकणारा आहेस, इतकेंच काय, पण विश्वहि जिंकणारा आहेस. अर्थात् सर्व रमणीय वस्तंचाहि जेता आहेस. तर संततियुक्त असें उत्कृष्ट ऐश्वर्य आमच्याकडे आण १. —तूं आपला प्रवाह उदकांतून वहात ठेव; तूं अप्रतिहत–सामर्थ्य आहेस; तुझा पुण्यप्रवाह वाहूं दे. तूं औषधिपासून पाझरत रहा; अधिषवण फलकांपासूनहि पाझरत रहा २. —सोमा, तूं प्रवाह वाहवितांना सर्व प्रकारचीं संकटें दूर कर. तूं काव्यस्फूर्ति देणारा आहेस. तूं ह्या कुशासनावर आरोहण कर. ३. —हे पावना, स्वर्गीय प्रकाशाचा दाता असा तूं उत्पन्न होतांच श्रेष्ठ झालास. हे आल्हादप्रदा, तूं सकल विश्वाला पुरून उरलास ४.

## सूक्तम् ५८

### पूर्ववत्

तरत् स मन्दी धावति धारा सुतस्य अन्धसः । तरत् स मन्दी धावति ॥ १ ॥ उस्रा वेद वसूनां मर्त्यस्य–देवी अवसः । तरत् स मन्दी धावति ॥ २ ॥ ध्वस्रयोः पुरुषन्त्योर् आ सहस्राणि दद्महे । तरत् स मन्दी धावति ॥ ३ ॥ आ ययोस् त्रिंशतं तना सहस्राणि च दद्महे । तरत् स मन्दी धावति ॥ ४ ॥

## सूक्तम् ५९

### पूर्ववत्

पवस्व गोजित् अश्वजित् विश्वजित् सोम रण्यजित् । प्रजावत् रत्नम् आ भर ॥ १ ॥ पवस्व अद्भ्यो अदाभ्यः पवस्व ओषधीभ्यः । पवस्व धिषणाभ्यः ॥ २ ॥

## सूक्त ६०

पावन आणि सूक्ष्मदृष्टि सोमाप्रीत्यर्थ, आल्हादप्रद आणि सहस्रनेत्र सोमाप्रीत्यर्थ, गायत्राचें गायन करा १. —तुज सहस्रनेत्राला, सहस्रावधि लोकांचा भार वाहणाऱ्याला, ऋत्विजांनीं ऊर्णावस्त्रांतून गाळून स्वच्छ केलें आहे २. —तुझा रस स्वच्छ होतांना लोंकरीच्या वस्त्रांतून कलशांत पाझरला, आणि (आतां) इन्द्राच्या हृदयांत शिरण्याच्या इच्छेनें तो द्रोणपात्राकडे धांवत आहे ३. —आमच्यावर इन्द्राची कृपा व्हावी म्हणून, हे विश्वदर्शी सोमा, तूं सुखरूप वहात रहा; आणि संततिप्रद वीर्यशालित्व (भक्तांमध्यें) भरपूर असूं दे ४.

## सूक्त ६१

अशा रीतीनें यज्ञाकरितां वहात रहा; आल्हादप्रदा सोमा, तूं असा आहेस कीं तुझ्या हर्षभरांत इन्द्रानें नव्याण्णव नगरदुर्गांना जमीनदोस्त केलें १. —सत्यबुद्धि बाळगणाऱ्या दिवोदासाकरितां दुष्टांचीं नगरें त्यानें तत्काळ फोडलीं, आणि शंबर, तुर्वश आणि यदु हे त्याच्यापाशीं नमून राहतील असें केलें २. —तूं अश्वसंपत्ति देणारा आहेस, तर अश्वसंपन्न, गोसंपन्न आणि सुवर्णसंपन्न अशा सहस्रावधि मनोत्साहांचा प्रवाह आम्हांसाठीं वहात ठेव ३. —आपला पावनप्रवाह वहात ठेऊन पवित्र चिंब भिजवून टाकणारा जो तूं, त्या तुझ्या

---

त्वं सोम पवमान विश्वानि दुरिता तिर । कविः सीद नि बर्हिषि ॥ ३ ॥ पवमानः स्वर्विदो जायमानो ऽभवो महान् । इन्दो विश्वाँ अभीत् असि ॥ ४ ॥

## सूक्तम् ६०

काश्यपावत्सारः पवमानसोमः गायत्री

प्र गायत्रेण गायत पवमानं विचर्षणिम् । इन्दुं सहस्रचक्षसम् ॥ १ ॥ तं त्वा सहस्रचक्षसम् अथो सहस्रभर्णसम् । अति वारम् अपाविषुः ॥ २ ॥ अति वारान् पवमानो असिष्यदत् कलशाँ अभि धावति । इन्द्रस्य हार्दि आ विशन् ॥ ३ ॥ इन्द्रस्य सोम राधसे शं पवस्व विचर्षणे प्रजावत् रेतः आ भर ॥ ४ ॥

## सूक्तम् ६१

महीयुः पवमानसोमः गायत्री

अया वीती परि स्रव यस् ते इन्दो मदेषु आ । अवा-हन् नवती र्नव ॥ १ ॥ पुरः सद्यः इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् । अध त्यं तुर्वशं यदुम् ॥ २ ॥ परि णो

मित्रत्वाची आम्हीं याचना करीत आहों ४. —तुझे जे तरंग एकसारख्या धारेनें पवित्रांतून खालीं वाहतात, त्यांच्या योगानें हे सोमा, तूं आम्हांवर अनुग्रह कर ५. —तूं भक्तपावन सोम आम्हांला ( अक्षय )धन आणि वीरसंपन्न उत्साह दे. हे सोमा, सर्वतोपरि (संपत्तींचा) अधिपति तूं आहेस ६. —ह्या नदीमातृक सोमाला (ऋत्विजांच्या) दहा अंगुलि पिळून स्वच्छ करतात, नंतर तो आदित्यांसह दृग्गोचर होतो ७. —मग पवित्रांतून गाळला गेल्यावर इन्द्रासह, आणि वायूच्यासह गमन करतो, किंवा आदित्यांच्या किरणांशीं संलग्न होतो ८. —माधुर्ययुक्त आणि मनोहर असा तूं, भाग्याधिपतिप्रीत्यर्थ, वायूप्रीत्यर्थ, पूषाप्रीत्यर्थ, आपला पावनप्रवाह सोड; मित्रावरुणाप्रीत्यर्थहि प्रवाह सोड ९. —तुझ्या पेयाचें जन्मस्थान उच्च आहे; तें आकाशांत असूनहि त्यानें भूमि, तसेच तिचे तेजस्वी आणि कल्याणप्रद प्रदेश, आणि महत् यज्ञ, ह्या सर्वांना आपल्या स्वाधीन ठेवलें आहे १०. —ह्या प्रभूपाशीं मानवांना योग्य अशा सर्व उज्ज्वल धनांची आम्हीं आकांक्षा धरून तीं (धनें) आपल्या हस्तगत करून घेतों ११. —पूज्य इन्द्राप्रीत्यर्थ, वरुणाप्रीत्यर्थ, आणि मरुतांप्रीत्यर्थ कल्याणप्रद असा तूं आपला प्रवाह वहात ठेव १२. —उत्तमरीतीनें पिळलेला, उदकांकडे धांव घेणारा, शत्रुभंजक, आणि गोदुग्धमिश्रित अशा सोमरसाजवळ दिव्यविबुध प्राप्त झाले १३. —आमच्या स्तुतिवाणी, पान्हवलेल्या गाई ज्याप्रमाणें वांसराला ( पुष्ट करतात ), त्याप्रमाणें तुझा महिमा वृद्धिंगत करोत. इन्द्राचें अंतःकरण तूंच स्वाधीन करून घेऊं शकतोस १४. —हे सोमा आमच्या धेनूंसाठीं सुखरूपपणें वाहणारा असा तूं उचंबळून सोडणारी उत्साहशक्ति (आमच्या ठिकाणीं) धडाडत राहील असें कर १५. —पावनप्रवाह सोमानें आकाशाच्या अद्भुत निनादाप्रमाणें गर्जना केली, आणि सर्व प्रजेला हितकर असें तेजहि प्रकट केलें १६. —तूं जो

---

अश्वम् अश्ववित् गोमत् इन्दो हिरण्यवत्। क्षरा सहस्रिणीर् इषः ॥ ३ ॥ पवमानस्य ते वयं पवित्रम् अभिउन्दतः। सखित्वम् आ वृणीमहे ॥ ४ ॥ ये ते पवित्रम् ऊर्मयः अभि क्षरन्ति धारया। तेभि र्नः सोम मृळय ॥ ५ ॥ स नः पुनान आ भर रयिं वीरवतीम् इषम्। ईशानः सोम विश्वतः ॥ ६ ॥ एतम् उ त्यं दश क्षिपो मृजन्ति सिन्धुमातरम्। सम् आदित्येभिर् अख्यत ॥७॥ सम् इन्द्रेणो–त वायुना सुतः एति पवित्रे आ। सं सूर्यस्य रश्मिभिः ॥ ८ ॥ स नो भगाय वायवे पूष्णे पवस्व मधुमान्। चारु मित्रे वरुणे च ॥ ९ ॥ उच्चा ते जातम् अन्धसो दिविषत् भूमिर् आ ददे। उग्रं शर्म महि श्रवः ॥ १० ॥ एना विश्वानि अर्यः आ द्युम्नानि मानुषाणाम्। सिषासन्तो वनामहे ॥११॥ स न इन्द्राय यज्यवे वरुणाय मरुद्भ्यः। वरिवोवित् परि स्रव ॥१२॥ उपो षु जातम् असुरं गोभि र्भंगं परिष्कृतम्। इन्दुं देवाः अयासिषुः ॥ १३ ॥ तम् इत् वर्धन्तु तो गिरो वत्सं संशिश्वरी रिव। य इन्द्रस्य हृदंसनिः ॥ १४ ॥ अर्षाणः सोम शंगवे धुक्षस्व पिप्युषीम् इषम्। वर्धा समुद्रम् उक्थ्यम् ॥१५॥ पवमानो अजी–

पुण्यप्रवाह, त्या तुझा रस, हे सोमराजा, तुझा हर्षकर आणि अश्राप रस लोंकरीच्या पवित्रांतून ( सतत ) वाहतो १७ —हे पावना, तुझा चातुर्यबलप्रद रस दीप्तिमान होऊन, त्याचें अखिल तेज, त्याचा स्वर्गीयप्रकाश सर्वांनीं पहावा म्हणून तो राजाप्रमाणें (लोकांत) मिरवत असतो १८. —तुझा जो सर्वोत्कृष्ट हर्ष, त्या हर्षरूप पेयासह आपला प्रवाह वाहूं दे. तूं देवप्रिय आहेस, तूं पापनाशन आहेस. १९. —तूं वृत्ररूप शत्रूचा नाश करणारा, (भक्तांना) प्रत्यहीं सत्वसामर्थ्याचा लाभ करून देणारा, धेनू प्राप्त करून देणारा आणि अश्व प्राप्त करून देणारा आहेस २०. —तूं आरक्तपल्लव आहेस. तूं जवळ असलेल्या धेनूच्या ( दुग्धरूप ) तेजाशीं मिसळून जा. तूं आपल्या स्थानीं श्येनाप्रमाणें ऐटीनें राहतोस २१ —श्रेष्ठ अशीं उदकें अडवून धरणारा जो वृत्र त्याच्या वधाकरितां तूं इन्द्राचें सहाय केलेंस; असा तूं आपला प्रवाह वहात ठेव २२. —आम्हीं शूर सैनिकांनीं युक्त होऊन, हे कामनावर्षका सोमा, विजयधनें जिंकून आणूं. आणि तूंहि स्वच्छ प्रवाहानें वाहून आमच्या कवनशक्तीची अभिवृद्धि कर २३. —तूं संरक्षण केल्यानें आणि तुझ्या कृपेनें आम्हीं युद्धांत विजय मिळवून ( शत्रूंचा ) फडशा उडवून देऊं असें कर. हे सोमा, आपल्या व्रीदाला जागृत रहा.२४ —शत्रूंचा फन्ना उडवून आणि दानविमुखाचा निःपात करून सोम हा इन्द्रलोकीं गमन करून पावनप्रवाहानें वहातो २५. —उच्चप्रतीचें वैभव आमच्याकडे आण; हे पावनप्रवाहा, शत्रूंचा वध कर; आणि हे आल्हाददायका, आम्हांला वीरोचित असें यश दे २६. —तूं आम्हांला कृपादान देण्याचें मनांत आणशील तर ( मार्गांत ) अडथळे शेकडों असले तरी सुद्धां ते तुजला विघ्न करूं शकणार नाहींत. कारण, शुद्धप्रवाहानें वाहून तूं आमच्या यज्ञाविषयीं उत्सुकता दाखवीत असतोस २७. —हे आल्हादप्रदा तूं वीर आहेस. तूं पिळला जाऊन शुद्धप्रवाहानें वहात रहा;

जनत् दिव श्चित्रं न तन्यतुम् । ज्योति र्वैश्वानरं बृहत् ॥ १६ ॥ पवमानस्य ते रसो मदो राजन् अदुच्छुनः । वि वारम् अव्यम् अर्षति ॥ १७ ॥ पवमान रस स्तव दक्षो वि राजति द्युमान् । ज्योति र्विश्वं स्वर्दृशे ॥ १८ ॥ य स्ते मदो वरेण्यस् तेना पवस्व अन्धसा । देवावीर् अघशंसहा ॥१९॥ जघ्नि र्मित्रम् अमित्रियं सस्नि र्वाजं दिवेदिवे । गोषा उ अश्वसाः असि ॥ २० ॥ संमिश्लो अरुषो भव सूपस्थाभि र्न धेनुभिः । सीदन् श्येनो न योनिम् आ ॥ २१ ॥ स पवस्व य आविथ इन्द्रं वृत्राय हन्तवे । वव्रिवांसं महीर् अपः ॥ २२ ॥ सुवीरासो वयं धना जयेम सोम मीढ्वः । पुनानो वर्धनो गिरः ॥ २३ ॥ त्वाऊतासस् तवा–वसा स्याम वन्वन्त आमुरः । सोम व्रतेषु जागृहि ॥ २४ ॥ अप घ्नन् पवते मृधः अप सोमो अराव्णः । गच्छन् इन्द्रस्य निष्कृतम् ॥ २५ ॥ महो नो राय आ भर पवमान जही मृधः । रास्वे–न्दो वीरवत् यशः ॥ २६ ॥ न त्वा शतं चन ह्रुतो राधो दित्सन्तम् आ मिनन् । यत् पुनानो मखस्यसे ॥ २७ ॥ पवस्वे–न्दो वृषा सुतः कृधी नो यशसो जने । विश्वाः अप द्विषो

आम्हांला यशस्वी कर, आणि लोकांत जे आमचा द्वेष करीत असतील त्यांना अगदीं ठार कर २८. —हे आल्हादरूपा अशा तुझ्या मैत्रीमध्यें, तुझ्या तेजस्वितेमध्यें राहून आम्हीं आमच्यावर हल्ला करणाऱ्या शत्रूंना जेरीस आणूंच आणूं २९. —तुझीं जीं भीषण आणि तीक्ष्ण शस्त्रास्त्रें शत्रुवधार्थ जय्यत आहेत, त्यांच्या योगानें सर्वांच्या निन्देपासून आमचें रक्षण कर. ३०.

## सूक्त ६२

हे शीघ्रप्रवाही सोमबिन्दु, सर्व भाग्यप्रद वस्तूंना अनुलक्षूनच आम्हीं पवित्रांतून गाळून ( पात्रांत ) ओतले आहेत १. —( ते सोमरस ) असंख्य संकटांचा चुराडा करून सत्वाढ्य भक्ताच्या संततिसाठीं सर्व मार्ग सुकर करतात, आणि अश्वारूढ वीराकरितां ( यशाची ) परंपरा राखतात २. —धेनूसाठीं विस्तीर्ण प्रदेश मोकळा करून आणि आम्हांकडे संयमरूप समृद्धीचा प्रवाह लोटून ( सोमरस ) आमच्या ईशस्तुतींकडे धांवत येतात ३. —चातुर्यबलाढ्य, परंतु पर्वतनिवासी सोमाचा पल्लव उदकांत चुरून हर्षोत्कर्षासाठीं ज्याचा रस काढिला, तो सोमरूप श्येन आपल्या स्थानीं सुखानें विराजमान झाला आहे ४. —देवाला प्रिय असें जें सोमपेय तें शुभ्र असतें; नंतर ऋत्विजांनीं सोमपल्लव पाण्यांत कोळून स्वच्छ केल्यानंतर त्याचा रस काढला, आणि तो रस धेनूंनीं आपल्या दुग्धानें मधुर केला. ५. —अश्वाला दौडत नेणारे लोक त्याला भूषणांनीं नटवितात त्याप्रमाणें यज्ञामध्यें ऋत्विजांनीं मधुर सोमरसाला अमृतप्राप्तिसाठीं दुग्धानें अलंकृत केलें ६. —माधुर्यानें ओथंबलेल्या तुझ्या ज्या धारा ओतल्या आहेत, त्या धारांसह, हे आल्हादरूपा, तूं भक्तरक्षणासाठीं त्या पवित्रावर आरूढ हो ७. —ऊर्णावस्त्राच्या

जहि ॥ २८ ॥ अस्य ते सख्ये वयं तवेन्दो द्युम्न उत्तमे । सासह्याम पृतन्यतः ॥ २९ ॥ या ते भीमानि आयुधा तिग्मानि सन्ति धूर्वणे । रक्षा समस्य नो निदः ॥ ३० ॥

## सूक्तम् ६२

भार्गवो जमदग्निः पवमानसोमाः गायत्री

एते असृग्रम् इन्दवस् तिरः पवित्रम् आशवः । विश्वानि अभि सौभगा ॥१॥ विघ्नन्तो दुरिता पुरु सुगा तोकाय वाजिनः । तना कृण्वन्तो अर्वते ॥ २ ॥ कृण्वन्त वरिवो गवे अभि अर्षन्ति सुष्टुतिम् । इळाम् अस्मभ्यं संयतम् ॥ ३ ॥ असावि अंशु मदाय अप्सु दक्षो गिरिष्ठाः । श्येनो न योनिम् आऽसदत् ॥४॥ शुभ्रम् अन्धो देववातम् अप्सु धूतो नृभि सुतः । स्वदन्ति गावः पयोभिः ॥५॥ आत् ईम् अश्वं न हेतारो अशूशुभन् अमृताय । मध्वो रसं सधमादे ॥ ६ ॥ या स्ते धाराः मधुश्चुतः असृग्रम् इन्दो ऊतये । ताभिः पवित्रम् आ सदः ॥ ७ ॥ सो अर्षेन्द्राय पीतये तिरो रोमाणि

गाळण्यांतून पाझरून आणि द्रोणपात्रांत स्वस्थानीं अधिष्ठित होऊन तूं इन्द्राच्या प्राशनासाठीं स्वच्छप्रवाह सोड ८ —आल्हादप्रदा सोमा, अत्यंत मधुर असा तूं, महासुखदायक घृत आणि दुग्ध यांचा प्रवाह अंगिरांसाठीं वहात ठेव ९. —हा जो विश्वदर्शी आणि भक्तपावन सोम येथें पात्रांत ठेवला आहे, तो आपल्या कनवाळूपणानें हलून जाऊन पहा कसा आपलें सचेतनत्व निदर्शनास आणीत आहे ? १० —वीर्यशाली, आपल्या वीरोचित व्रीदाला जागणारा, आणि शापसंहारक, अशा ह्या सोमरसानें स्वच्छ प्रवाहानें वहात राहून सर्व उत्कृष्ट वस्तु भक्तासाठीं उत्पन्न केल्या आहेत ११. —गोसंपन्न, अश्वसंपन्न, सर्वांल्हाददायक, आणि सर्वांना हवेंसें वाटणारें जें धन आहे त्याचा प्रवाह तूं हजारों प्रकारांनीं वहात ठेव १२. —तो हा सोम, तो हा विस्तृताक्रमी, आणि काव्य-स्फुर्तिदाता सोम ऋत्विजांच्या हातून स्वच्छ होऊन पात्रांत ओतला आहे १३. —सहस्रावधि आयुधें धारण करणारा, शतावधि वरदानें देणारा, रजोलोकाला मापून टाकणारा आणि काव्यप्रेरक, हर्षकर सोम इन्द्राप्रीत्यर्थ वहात आहे १४. —( भक्तांच्या ) वाणीनें प्रकट होणारा, परंतु ( भक्तांकडूनच ) स्तविला जाणारा हा सोम, पक्षी आपल्या घरट्यांत वसतो त्याप्रमाणें, हा आल्हादप्रद रस इन्द्राप्रीत्यर्थ पात्रांत ठेवला जात आहे १५. पावनप्रवाही सोम शूर ऋत्विजांनीं पिळला म्हणजे चमूपात्रांत अधिष्ठित होण्यासाठीं, वीर रणांगणावर जातो त्याप्रमाणें, जोरानें पुढें सरतो १६. —तीन पृष्ठभागांच्या आणि तीन धुरा असलेल्या रथांत वसून जाण्यासाठीं सात ऋषींच्या ध्यानस्तुतींशीं सोमाचा संयोग करून देतात १७. —रस पिळणाऱ्या ऋत्विजानों, ( दिव्य )धन जिंकणारा आणि त्वरितगति अशा हरिद्वर्ण सोम वीराला, सत्वसामर्थ्याची प्राप्ति होण्यासाठीं (देवाकडे) पाठवून द्या १८. पिळल्यावर द्रोणकलशांत प्रवेश करणारा सोमरस, शूरसैनिक जसा युद्धाच्या गर्दींत निःशंक उभा राहतो त्याप्रमाणें सर्व प्रकारच्या शोभेला आपलीशी करून ठाम राहतो. १९.

---

अव्यया । सीदन् योनः वनेषु आ ॥ ८ ॥ त्वम् इन्दो परि स्रव स्वादिष्ठो अङ्गिरोभ्यः । वरिवोवित् घृतं पयः ॥ ९ ॥ अयं विचर्षणि र्हितः पवमानः स चेतति । हिन्वान–आप्यं बृहत् ॥१०॥ एष वृषा वृषव्रतः पवमानो अशस्तिहा । करत् वसूनि दाशुषे ॥ ११ ॥ आ पवस्व सहस्रिणं रयिं गोमन्तम् अश्विनम् । पुरुश्चन्द्रं पुरुस्पृहम् ॥ १२ ॥ एष स्य परिषिच्यते मर्मृज्यमान आयुभिः । उरुगायः कविक्रतुः ॥१३॥ सहस्रोतिः शतामघो विमानो रजसः कविः । इन्द्राय पवते मदः ॥ १४ ॥ गिरा जातः इह स्तुतः इन्दुर् इन्द्राय धीयते । वि र्योना वसतौ इव ॥ १५ ॥ पवमानः सुतो नृभिः सोमो वाजमिवा–सरत् । चमूषु शक्मना ऽऽसदम् ॥ १६ ॥ तं त्रिपृष्ठे त्रिवन्धुरे रथे युञ्जन्ति यातवे । ऋषीणां सप्त धीतिभिः ॥ १७ ॥ तं सोतारो धनस्पृतम् आशुं वाजाय यातवे । हरिं हिनोत वाजिनम् ॥ १८ ॥ आविशन् कलशं सुतो विश्वाः अर्षन् अभिश्रियः । शूरो न गोषु तिष्ठति ॥ १९ ॥ आ ते इन्दो मदाय कं पयो

—आल्हादप्रद सोमा, तुझ्या रसरूप दुग्धाचें दोहन हर्षनिर्भर होण्यासाठीं ऋत्विज करितात, आणि दिव्यगणहि दिव्य विबुधांसाठीं त्याच्यापासून मधुर रस बनवितात २०. —आमचा अत्यंत मधुर सोम, दिव्यविभूतिंमध्यें अत्यंत विख्यात असा सोम, दिव्यविभूतिंसाठींच पवित्रावर ओता २१. —हे सोमरस, जे (ऋत्विजांनीं) वाखाणले आहेत त्यांची त्यापेक्षांहि प्रख्याति व्हावी म्हणून, त्या अति हर्षकर पेयाला साजेल अशा (प्रशस्त) धारेनें पात्रांत ओतले आहेत २२. —यज्ञासाठीं गोदुग्धाशीं मिसळून जाऊन आपल्या पौरुषानें तूं पावनप्रवाह असा (देवाप्रीत्यर्थ) वहातोस, तर सत्वाढयता प्राप्त करून देणारा तूं असाच पाझरत रहा २३. —गोसंपन्न करणारा तूं, आमचा उत्साह आणि सर्व प्रकारच्या प्रशंसा यांना अनुलक्षून वहात रहा. जमदग्नीनें तुझें स्तवन केलेंच आहे. २४. —तूं स्तुतींचा अग्रणी म्हणून हे सोमा, आमचीं परोपरींचीं कवनें श्रवण करून आपल्या अद्भुत संरक्षकशक्तींनीं वहात रहा २५. —समुद्राला मिळणाऱ्या नद्या आणि स्तुति यांना चालना देणारा तूं अग्रणी आहेस; तर जग हलवून सोडणाऱ्या सोमा, तूं पावन-प्रवाहानें वहा २६. —हे काव्यस्फूर्तिदात्या सोमा, हीं सर्व भुवनें तुझ्या महिम्यासाठीं आपआपल्या ठिकाणीं स्थिरावलीं, (म्हणूनच) मोठमोठया नद्या तुझ्याचकडे वहात जातात २७. —आकाशापासून जशा वृष्टि त्याप्रमाणें तुझ्या सतत वाहणाऱ्या धारा शुभ्रतेजस्क लोंकरीच्या पवित्रावर पडत असतात २८. —चातुर्यबलाचें साधन जो इन्द्र त्याच्याप्रीत्यर्थ तो आल्हादप्रद, तीव्र, अधिपत्यशाली आणि यज्ञसेवातत्पर असा सोमरस गाळून स्वच्छ करा २९. —पावनप्रवाह, सत्यस्वरूप, काव्यप्रेरक आणि भक्तांना उत्कृष्टशौर्यशाली संतति देणारा असा सोम पवित्रावर अधिष्ठित झाला आहे ३०.

---

दुहन्ति आयवः। देवाः देवेभ्यो मधु ॥ २० ॥ आ नः सोमं पवित्रे आ सृजता मधु-मत्तमम्। देवेभ्यो देवश्रुत्तमम् ॥ २१ ॥ एते सोमाः असृक्षत गृणानाः शवसे महे। मन्दिन्तमस्य धारया ॥ २२ ॥ अभि गव्यानि वीतये नृम्णा पुनानो अर्षसि। सनत् वाजःपरि स्रव ॥२३॥ उत नो गोमतीर् इषो विश्वाः अर्ष परिष्टुभः। गृणानो जमद-ग्निना ॥ २४ ॥ पवस्व वाचो अग्रियः सोम चित्राभिर् ऊतिभिः। अभि विश्वानि काव्या ॥ २५ ॥ त्वं समुद्रिया अपः अग्रियो वाच ईरयन्। पवस्व विश्वम् एजय ॥२६॥ तुभ्येमा भुवना कवे महिम्ने सोम तस्थिरे। तुभ्यम् अर्षन्ति सिन्धवः ॥ २७ ॥ प्र ते दिवो न वृष्टयो धाराः यन्ति असश्चतः। अभि शुक्राम् उपस्तिरम् ॥ २८ ॥ इन्द्रायेन्दुं पुनीतन उग्रं दक्षाय साधनम्। ईशानं वीतिराधसम् ॥ २९ ॥ पवमानः ऋतः कविः सोमः पवित्रम् आऽसदत्। दधत् स्तोत्रे सुवीर्यम् ॥ ३० ॥

## सूक्त ६३

तूं स्वच्छ होऊन हे सोमा, हजारों प्रकारचें ऐश्वर्य, उत्तम शौर्य, आणि सुकीर्ति यांचा आम्हांस लाभ दे १. —उत्साह, आणि ऊर्जस्विता ह्यांच्या प्रवाहानें तूं इन्द्राप्रीत्यर्थ तुडुंब भरून जातोस; आणि दिव्यजनांस अत्यंत तल्लीन करणाऱ्या रसा तूं चमूपात्रांत अधिष्ठित होतोस २. —इन्द्राप्रीत्यर्थ, विष्णूप्रीत्यर्थ, पिळलेला हा रस कलशांत पाझरला आहे. तो वायुदेवालाहि मधुर लागो ३. —हे शीघ्रव्यापी हरिद्वर्ण सोमबिन्दु सत्यधर्माच्या धारेनेंच जणों सर्व कपटजालांतून पार नेतात ४. —हे सोमरस, इन्द्राचें महात्म्य वाढविणारे, त्वरेनें कार्य करणारे, सर्व जगत् आर्यधर्मीय करून टाकणारे आणि कंजूष दुष्टांचें उच्चाटन करणारे आहेत ५. —हे पिळलेले हरिद्वर्ण रस, हे इन्द्राकडे पोहोंचणारे आल्हादप्रद रस, आपल्या स्वभावानुरूप रजोलोकांकडे वहात जातात ६. —जिच्या योगानें तूं सूर्याला तेजस्वी केलेंस, जिच्या योगानें तूं मानवी सत्कार्याला उत्तेजन देतोस, त्या धारेनें तूं वहात रहा ७. —( तुझ्या संपर्कानें ) पवित्र होऊन सूर्यानें अन्तरिक्षांतून मानवांमध्यें येण्यासाठीं "एतश" नांवाचा अश्व रथाला जोडला ८. —तसेंच पहा, त्या दशदिशांकडे गमन करण्यासाठीं आल्हादप्रद सोम हा "इन्द्रच आहे" असें बोलून सूर्यानें आपले अश्व रथास जोडले ९. —म्हणून वायूप्रीत्यर्थ ( अथवा ) इन्द्राप्रीत्यर्थ पिळलेल्या त्या हर्षकारी रसाला, हे माझ्या स्तवनवाणीनों, तुम्ही ऊर्णावस्त्रावर ओता १०. —पावनप्रवाहा सोमा, जें धन दुष्प्राप्य आहे, जें हल्ला करणाऱ्या सैनिकालाहि जिंकतां येत नाहीं तें धन आम्हांस अर्पण कर ११. —गोयुक्त आणि अश्वयुक्त असें धन आमच्याकडे सहस्रशः वाहात आण; तसेंच सत्वबल आणि यशस्विता हींहि

## सूक्तम् ६३

काश्यपो निध्रुवः पवमानसोमः गायत्री

आ पवस्व सहस्रिणं रयिं सोम सुवीर्यम् । अस्मे श्रवांसि धारय ॥ १ ॥ इषम् ऊर्जं च पिन्वसे इन्द्राय मत्सरिन्तमः । चमूषु आ नि षीदसि ॥ २ ॥ सुतः इन्द्राय विष्णवे सोमः कलशे अक्षरन् । मधुमाँ अस्तु वायवे ॥ ३ ॥ एते असृग्रम् आशवः अति ह्वरांसि बभ्रवः । सोमाः ऋतस्य धारया ॥ ४ ॥ इन्द्रं वर्धन्तो अप्तुरः कृण्वन्तो विश्वम् आर्यम् । अप घ्नन्तो अराव्णः ॥ ५ ॥ सुताः अनु स्वम् आ रजः अभि अर्षन्ति बभ्रवः । इन्द्रं गच्छन्त इन्दवः ॥ ६ ॥ अया पवस्व धारया यया सूर्यम् अरोचयः । हिन्वानो मानुषीर् अपः ॥ ७ ॥ अयुक्त सूरः एतशं पवमानो मनौ अधि । अन्तरिक्षेण यातवे ॥ ८ ॥ उत त्याः हरितो दश सूरो अयुक्त यातवे । इन्दुर् इन्द्रः इति ब्रुवन् ॥ ९ ॥ परीतो वायवे सुतं गिरः इन्द्राय मत्सरम् । अव्यो वारेषु सिञ्चत ॥१०॥ पवमान विदा रयिम् अस्मभ्यं सोम दुष्टरम् । यो दुर्णशो वनुष्यता ॥ ११ ॥ अभि

घेऊन ये १२. —सूर्याप्रमाणें देदिप्यमान असा सोमरस ग्राव्यांनीं पिळला आणि कलशांत ठेवला म्हणजे स्वच्छ प्रवाहानें वाहतो १३. —आर्यजनांना योग्य अशीं तेजस्वीं स्थानें, आणि गोधनयुक्त सत्ववल अशी देणगी ह्या शुभ्र सोमरसांनीं सत्यधर्माच्या प्रवाहानें वहात आणलीं १४. —आणि वज्रधर इन्द्राप्रीत्यर्थ पिळलेले दधिमिश्रित सोमरस पवित्रांतून पाझरत राहिले १५. —हे सोमा तुझा अत्यंत मधुर आणि हर्षकर रस आम्हांला ( दिव्य )धन देण्याकरितां तू पवित्रांतून वहात ठेव; तो रस देवसेवेविषयीं अत्यंत आसक्त आहे १६. —लढाऊ घोड्याला नदींत धुवून स्वच्छ करतात त्याप्रमाणें ऋत्विक्जन इन्द्राप्रीत्यर्थ हर्षकारी सोमरसाला धुवून स्वच्छ करतात १७. —हे सोमा, तूं पुण्यप्रवाहानें वहा, आणि सुवर्णप्रचुर, अश्वप्रपूरित, वीरयुक्त आणि गोधनयुक्त असें वैभव आम्हांकडे आण १८. —युद्धोत्सुक अश्वाला संग्रामांत दौडत न्यावा, त्याप्रमाणें मधुरतम आणि सत्वोत्सुक सोमाला ऊर्णापवित्रांतून पात्रांत ओता १९. —अलंकृतियोग्य आणि काव्यस्फूर्ति देणाऱ्या सोमाला रक्षणेच्छु भक्तजन ध्यानस्तुतींनीं अलंकृत करतात, तेव्हां वीर्यशाली सोम गर्जना करीत धांवत वहातो २०. —वीर्यशाली आणि कार्यतत्पर सोमाचें स्तवन सत्यधर्माच्या धारेनें, ध्यानांनीं आणि मननीय स्तुतींनीं, ज्ञानी भक्त उच्चस्वरानें करीत असतात. २१. —देदीप्यमान सोमा, तुझा स्वच्छप्रवाह एकसारखा वाहूं दे. तुझा हर्षकारी रस इन्द्राकडे जाऊंदे; आणि तूं आपल्या स्वभावधर्माप्रमाणें वायूच्या आंगांत भिनून वहात रहा २२. —हे शुद्धप्रवाहा, तूं स्वतःला पिळून घेऊन परमविख्यात धनाचा प्रवाह वहात सोडतोस; तर देवप्रिय असा तूं समुद्रांत प्रवेश कर २३. —सत्कर्में जाणणारा, आणि हर्षोत्कर्ष करणारा असा, हे सोमा, तूं शत्रूंचा वध करून आपला स्वच्छप्रवाह वाहूं देतोस, तर देवविमुख पातक्यांचाहि नाश कर

अर्ष सहस्रिणं रयिं गोमन्तम् अश्विनम् । अभि वाजम् उत श्रवः ॥ १२ ॥ सोमो देवो न सूर्यो अद्रिभिः पवते सुतः । दधानः कलशे रसम् ॥ १३ ॥ एते धामानि आर्या शुक्राः ऋतस्य धारया । वाजं गोमन्तम् अक्षरन् ॥ १४ ॥ सुताः इन्द्राय वज्रिणे सोमासो दध्याशिरः । पवित्रम् अति अक्षरन् ॥ १५ ॥ प्र सोम मधुमत्तमो राये अर्ष पवित्रे आ । मदो यो देववीतमः ॥ १६ ॥ तमी मृजन्ति आयवो हरिं नदीषु वाजिनम् । इन्दुम् इन्द्राय मत्सरम् ॥१७॥ आ पवस्व हिरण्यवत् अश्ववत् सोम वीरवत् । वाजं गोमन्तम् आ भर ॥ १८ ॥ परि वाजे न वाजयुम् अव्यो वारेषु सिञ्चत । इन्द्राय मधुमत्तमम् ॥ १९ ॥ कविं मृजन्ति मर्ज्यं धीभि विप्राः अवस्यवः । वृषा कनिक्रत् अर्षति ॥ २० ॥ वृषणं धीभिर् अप्तुरं सोमं ऋतस्य धारया । मती विप्राः सम् अस्वरन् ॥ २१ ॥ पवस्व देव आयुषक् इन्द्रं गच्छन्तु ते मदः । वायुम् आ रोह धर्मणा ॥ २२ ॥ पवमान नि तोशसे रयिं सोम श्रवाय्यम् । प्रियः समुद्रम् आ विश ॥ २३ ॥ अपघ्नन् पवसे मृधः क्रतुवित् सोम मत्सरः । नुदस्वा–देवयुं

२४. —स्वच्छ प्रवाहानें वहाणारे, शुभ्रवर्ण, आल्हादकर सोम सर्व प्रकारच्या काव्य-स्फूर्तीला अनुलक्षून झराझर वहात राहिले २५. —स्वच्छप्रवाही, शीघ्रव्यापी, शुभ्रवर्ण आणि आल्हादकर असे सोम एकंदर द्वेष्ट्यांचा निःपात करून द्रोणपात्रांत वहात गेले २६. —स्वच्छ प्रवाही सोमरस द्युलोकांपासून, अन्तरिक्षापासून, चोहोंकडून (पहा ह्या) पृथिवीच्या उच्चशिखरावर पाझरले आहेत २७. —हे पावना सोमा, हे आल्हादप्रदा, तूं यच्चावत् घातकी दुष्टांना पार उधळून लाव; हे महापराक्रमा सोमा, राक्षसांना ठार कर २८. —राक्षसांचा निःपात करून हे सोमा, तूं गर्जना करीत (असतां) तेजस्वी आणि उत्कृष्ट अशी धडाडी तुझ्या प्रवाहानें आम्हाकडे आण २९. —आम्हांजवळ, हे सोमा, दिव्यलोकच्या तशाच भूलोकच्या सर्व उत्कृष्ट वस्तु, हे आल्हादप्रदा, सर्व अभिलषणीय वस्तु ठेव. ३०

## सूक्त ६४

हे सोमा तूं वीर्यशाली तेजःपुंज आहेस; हे देवा, तूं वीरालायोग्य अशीं महत्कृत्यें करणारा वीर आहेस; तूं वीर्यशालीविभूति धर्मनियमांचें संरक्षण करतोस १. —तुझें वीराचें उत्कटबल वीराला साजेसेंच आहे; तूं राहतोस तें अरण्य वीर्यप्रद, तुझा हर्ष वीर्यप्रद असतो; हे वीरा, खरोखरच तूं वीर शोभतोस २. —तूं वीर, अश्वाप्रमाणें गरजलास. हे आल्हादप्रदा, तूं धेनू देणारा आहेस, अश्वसैनिक देणारा आहेस. तर आम्हांला (दिव्य) धन प्राप्त व्हावें म्हणून त्याचीं द्वारें उघडून दे ३. —सत्वाढ्य

---

जनम् ॥ २४ ॥ पवमानाः असृक्षत सोमाः शुक्रासः इन्दवः । अभि विश्वानि काव्या ॥ २५ ॥ पवमान सः आशवः शुभ्राः असृग्रम् इन्दवः । घ्नन्तो विश्वाः अप द्विषः ॥ २६ ॥ पवमानाः दिवस् परि अन्तरिक्षात् असृक्षत । पृथिव्याः अधि सानवि ॥ २७ ॥ पुनानः सोम धारया इन्दो विश्वाः अप स्त्रिधः । जहि रक्षांसि सुक्रतो ॥ २८ ॥ अप घ्नन् सोम रक्षसः अभि अर्ष कनिक्रदत् । द्युमन्तं शुष्मम् उत्तमम् ॥ २९ ॥ अस्मे वसूनि धारय सोम दिव्यानि पार्थिवा । इन्दो विश्वानि वार्या ॥ ३० ॥

## सूक्तम् ६४

मारीचः कश्यपः पवमानसोमः गायत्री

वृषा सोम द्युमाँ असि वृषा देव वृषव्रतः । वृषा धर्माणि दधिषे ॥ १ ॥ वृष्ण्यस् ते वृष्ण्यं शवो वृषा वनं वृषा मदः । सत्यं वृष-न् वृषेत् असि ॥ २ ॥ अश्वो न चक्रदो वृषा सं गाः इन्दो सम् अर्वतः । वि नो राये दुरो वृधि ॥ ३ ॥ असृक्ष

शुभ्रतेजस्क आणि शीघ्रव्यापी असे सोमरस, ऋत्विजानीं, धेनू, आणि वीरसैनिक मिळविण्याच्या उद्देशानें पात्रांत ओतले आहेत ४. —सद्धर्मरत ऋत्विजांनीं आपल्या दोन्ही हातांनीं चुरून रुचिकर बनविलेले सोमबिन्दु ऊर्णावस्त्राच्या गाळण्यांतून वहात आहेत ५. —असे ते सोमबिन्दु भक्ताकडे सर्व प्रकारचें धन (अर्थात्) -द्युलोकांतील, पृथ्वीवरील आणि अन्तरिक्षांतील निवडक संपत्तीचा प्रवाह लोटोत ६. —हे सर्वज्ञा, स्वच्छ प्रवाह वाहविणारा तूं, त्या तुझ्या रसाच्या धारा सूर्याच्या किरणाप्रमाणें चोहोंकडे पसरतात ७. —द्युलोकाच्यावर आपले ध्वज फडकावत ठेऊन सर्व प्रकारच्या साकार वस्तु तूं वहात आणतोस, आणि हे सोमा समुद्र (देखील) ओतप्रोत भरून टाकतोस. ८. —ह्याप्रमाणें तुला हलवून सोडला म्हणजे, हे पावनप्रवाहा, देदीप्यमान सूर्य जसा अन्तराळीं मार्ग आक्रमण करतो, त्याप्रमाणें विविधभावनांच्या चित्तांत तूं स्तुतीची प्रेरणा करतोस ९. —चित्तचालक आणि सर्वप्रिय अशा आल्हादप्रद सोमानें, सारथि जसा अश्वाला दौडत नेतो त्याप्रमाणें, कविप्रतिभेला प्रेरणा केली १०. —तुझा देवसेवोत्सुकाचा रसकल्लोल पवित्रांतन पाझरला, तो सद्धर्माच्या स्थानीं अधिष्ठित होऊनच पाझरला ११. —तुझा जो हर्षकर आणि देवाविषयीं अत्यंत उत्सुक असा रस पवित्रावर ठेवला आहे तो हे आल्हादकरा सोमा, इन्द्रानें प्राशन करावा म्हणून आमच्यासाठीं वहात राहूं दे १२. —(भक्तांच्या) उत्साहवृद्धिसाठीं स्वच्छ धारेनें वहात रहा. हे आल्हादप्रद रसा, सुकृतकारी भक्तांनीं अलंकृत कलेला तूं आपल्या तेजोरसाने आमच्या धेनूंकडे आगमन कर १३ —भक्तपावन तूं भक्तजनासाठीं सुखाची खाण निर्माण कर; हे स्तवनप्रिया हरिद्वर्णा, रसदुग्ध उत्पन्न करणारा तूं भक्तांना ऊर्जस्विता दे १४. —देवसेवेसाठीं स्वच्छ होणारा, आपल्या तेजानें चमकणारा, आणि सत्वाढय ऋत्विजांनीं आवरून धरलेला असा तूं इन्द्राच्या लोकीं गमन कर १५. —पुष्कळ वेळ हलविल्यानें ते शीघ्रव्यापी सोमबिन्दु भक्ताच्या

प्र वाजिनो गव्या सोमासो अश्वया । शुक्रासो वीरयाऽऽशवः ॥ ४ ॥ शुम्भमानाः ऋतायुभि मृंज्यमाना गभस्त्योः । पवन्ते वारे अव्यये ॥ ५ ॥ ते विश्वा दाशुषे वसु सोमाः दिव्यानि पार्थिवा । पवन्ताम् आऽन्तरिक्ष्या ॥ ६ ॥ पवमानस्य विश्ववित् प्र ते सर्गाः असृक्षत । सूर्यस्येव न रश्मयः ॥ ७ ॥ केतुं कृण्वन् दिव स्परि विश्वा रूपाऽभि अर्षसि । समुद्रः सोम पिन्वसे ॥ ८ ॥ हिन्वानो वाचम् इष्यसि पवमान विधर्मणि । अक्रान् देवो न सूर्यः ॥ ९ ॥ इन्दुः पविष्ट चेतनः प्रियः कवीनाम् मती । सृजत् अश्वं रथीरिव ॥ १० ॥ ऊर्मि र्यं स्ते पवित्र आ देवावीः परि अक्षरत् । सीदन् ऋतस्य योनिम् आ ॥ ११ ॥ स नो अर्ष पवित्र आ मदो यो देववीतमः । इन्दो इन्द्राय पीतये ॥ १२ ॥ इषे पवस्व धारया मृज्यमानो मनीषिभिः । इन्दो रुचाऽभि गाः इहि ॥ १३ ॥ पुनानो वरिवस् कृधि ऊर्जं जनाय गिर्वणः । हरेः सृजानः आशिरम् ॥ १४ पुनानो देववीतये इन्द्रस्य याहि निष्कृतम् । द्युतानो वाजिभि र्यतः ॥१५॥

ध्यानबुद्धीनें प्रेरित होऊन समुद्राकडे धांवत गेले १६. —पिळून स्वच्छ केलेले पातळ सोमरस समुद्राकडे, सत्यधर्माच्या स्थानाकडे सहज लीलेनें धांवत चालले १७. —तूं आमच्याविषयीं प्रेमभाव वाळगणारा आहेस, म्हणून आमच्या अखिल संपत्तीच्या भोंवतीं रहा, आणि आपल्या ओजानें आमच्या वीरसैनिकांनींयुक्त अशा स्थानांचें रक्षण कर १८. —दिव्यजनांना घेऊन येणारा, ऋक्स्तोत्रपठनाच्या आवाजाप्रमाणें पावलें टाकणारा, हा सोमरूप एतश समुद्रांत ठेवला असतां मोठ्यानें गर्जना करितो १९. —तसेंच, जेव्हां तो सद्धर्मांच्या सुवर्णमय ( अविनाशी ) स्थानीं अधिष्ठित होतो तेव्हां अविवेकी लोकांचा तो त्यागच करितो २०. —मनोहरस्तोत्र म्हणणारे भक्त त्याचें स्तवन करतात, आणि महाज्ञानी भक्त यजन करण्याची आकाङ्क्षा वाळगतात, परंतु अविवेकी मूढ मात्र ( पातकांतच ) गटांगळ्या खात राहतात २१. —मरुतांनी सेवित अशा इन्द्राप्रीत्यर्थ, हे आल्हादरूपा सोमा तूं वहात रहा; अत्यंत मधुर असा तूं सत्य धर्मांच्या स्थानीं अधिष्ठित होण्यासाठीं वहात रहा २२. —ज्ञानशाली, स्तवन प्रवीण आणि कल्पक असे भक्त तुजला विभूषित करतात; तसेंच सामान्यजनहि तुजला अलंकृत करतात २३.—स्वच्छ प्रवाहानें वहाणारा जो तूं, त्या तुझा रस, हे स्फूर्तिदात्या सोमा, मित्र, अर्यमा, वरुण आणि मरुत हे प्राशन करतात २४. —सोमा तूं स्वच्छ झालास म्हणजे ज्ञानपूर्ण वाणीची स्फूर्ति देतोस; हे आल्हादरूपा, हजारों अन्तःकरणें भरून सोडणाऱ्या वाणीला स्फूर्ति देतोस २५. —म्हणून सहस्रावधि अन्तःकरणें भरुन सोडणारीं, आणि यज्ञाची इच्छा उत्पन्न करणारी वाणी, हे पावना, हे सोमा, तूं आम्हांमध्यें आण २६. —हे सोमरसा तूं स्वच्छ प्रवाहानें वाहून, हे असंख्यजन स्तुता, ह्या लोकांना प्रिय होऊन तूं समुद्रांत प्रवेश कर २७. —आपल्या घवघवीत कान्तीनें, आणि जिचा

---

प्र हिन्वानास इन्दवः अच्छा समुद्रम् आशवः । धिया जूताः असृक्षत ॥ १६ ॥ मर्मृजानास आयवो वृथा समुद्रम् इन्दवः । अग्मन् ऋतस्य योनिम् आ ॥ १७ ॥ परि णो याहि अस्मयु विश्वा वसूनि ओजसा । पाहि नः शर्म वीरवत् ॥ १८ ॥ मिमाति वह्निर् एतशः पदं युजान ऋक्वभिः । प्र यत् समुद्रे आ हितः ॥ १९ ॥ आ यत् योनिं हिरण्ययं आशु ऋतस्य सीदति । जहाति अप्रचेतसः ॥ २० ॥ अभि वेनाः अनूपत इयक्षन्ति प्रचेतसः । मज्जन्ति अविचेतसः ॥ २१ ॥ इन्द्राये-न्दो मरुत्वते पवस्व मधुमत्तमः । ऋतस्य योनिम् आ सदम् ॥ २२ ॥ तं त्वा विप्राः वचोविदः परिष्कृण्वन्ति वेधसः । सम् त्वा मृजन्ति आयवः ॥ २३ ॥ रसं ते मित्रो अर्यमा पिबन्ति वरुणः कवे । पवमानस्य मरुतः ॥ २४ ॥ त्वं सोम विपश्चितं पुनानो वाचम् इष्यसि । इन्दो सहस्रभर्णसम् ॥ २५ ॥ उतो सहस्रभर्णसं वाचं सोम मखस्युवम् पुनानः इन्दो आ भर ॥ २६ ॥ पुनानः इन्दो एषां पुरुहूत जनानाम् । प्रियः समुद्रम् आविश ॥ २७ ॥ दविद्युतत्या रुचा परिष्टोभन्त्या कृपा । सोमाः शुक्राः गवा-

सर्वत्र स्तुतिघोष चालतो अशा कृपालहरींनें हे शुभ्र सोमरस दुग्धमिश्रित झाले २८. पुढें सरसावून जाणारा, परंतु प्रोत्साहन देणाऱ्या भक्तांनीं आवरून धरलेला सत्वाढ्य सोम, विजयेच्छु वीर रणांगणावर जातो त्याप्रमाणें ऐटीनें वहात गेला २९. —आणि खरो-खरच हे सोमा, तूं आमच्या कल्याणासाठीं आमच्याशीं सहवास करणारा, पण दिव्यलोकींचा काव्यप्रेरक आहेस, तर आम्हीं सूर्याला पुष्कळ वर्षें पहावें म्हणून आपला पावनप्रवाह वहात ठेव ३०.

अध्याय पहिला समाप्त

## सूक्त ६५

## अष्टक ७ अध्याय २

एकमेकीच्या भगिनी आणि आप्त अशा ज्या प्रभाशालिनी ( अरुणकान्ति ), त्या श्रेष्ठ-पणा मिळविण्याच्या इच्छेनें आपल्या परमथोर सोमरूप पतीला हलवून जागृत करतात १. —पावन प्रवाहा, देदीप्यमान असा तूं आपल्या परोपरीच्या तेजस्वितेनें दिव्यविबुधां-साठीं सर्व प्रकारच्या उत्कृष्ट वस्तूंत प्रविष्ट हो २. —हे पावनप्रवाहा, तूं दिव्यविभूति-साठीं आणि आमच्या मनोत्साहासाठीं सुविरचित स्तुति, यथाकाल पर्जन्यवृष्टि, आणि नियमित उपासना ह्यांचा ओघ वहावयास लाव ३. —तूं वीर्यशाली आहेस, तूं आपल्या कांतीनें चमकणारा आहेस, म्हणून हे पावना, आम्हीं ध्यानशील भक्त तुजला पाचारण करीत आहोंत ४. —तूं हर्ष उत्पन्न करून वीर्यशालित्वाचा प्रवाह वाहूं दे; हे उत्तमा-युधा, आल्हादरूपा इकडे वहात ये ५. —जेव्हां उदकांसह ( आमच्या ) दोन्ही

---

शिरः ॥ २८ ॥ हिन्वानो हेतृभि र्यतः आ वाजं वाजी अक्रमीत् । सीदन्तो वनुषो यथा ॥ २९ ॥ ऋधक् सोम स्वस्तये संजग्मानो दिवः कविः । पवस्व सूर्यो दृशे ॥ ३० ॥

इति सप्तमे प्रथमोऽध्यायः

अथ द्वितीयोऽध्यायः

## सूक्तम् ६५

वारुणि र्भृगुः पवमानसोमः गायत्री

हिन्वन्ति सूरम् उस्रयः स्वसारो जामयः पतिम् । महाम् इन्दुं महीयुवः ॥१॥ पवमान रुचा रुचा देवो देवेभ्यस् परि । विश्वा वसूनि आ विश ॥ २ ॥ आ पवमान सुष्टुतिं वृष्टिं देवेभ्यो दुवः । इषे पवस्व संयतम् ॥३॥ वृषा हि असि भानुना द्युमन्तं त्वा हवामहे । पवमान सु आध्यः ॥ ४ ॥ आ पवस्व सुवीर्यं मन्दमानः सु आयुध ।

हातांनीं पिळून आणि धुवून ( जाऊन ) तूं पात्रांत ओतला जातोस, तेव्हां काष्ठा ( च्या अभिषवण फलका )नें तूं आपलें नियतस्थान प्राप्त करून घेतोस ६. —भक्तपावन आणि सहस्रदृष्टि अशा श्रेष्ठ सोमाप्रीत्यर्थ व्यश्वाप्रमाणें तुम्हीहि गायन करा ७. —माधुर्यानें ओथंबलेल्या ज्या हरिद्वर्ण सोमाचा आल्हाददायी रस, इन्द्रानें प्राशन करावा म्हणून ( ऋत्विज् ) पाषाणांनीं चुरून हलवितात, त्या सत्वप्रभावी सोमापाशीं आम्हीं सर्व प्रकारच्या धनांची, त्या विजयशाली सोमापाशीं, त्याच्या मित्रत्वाची याचना करतों ८-९. —वीर्यशाली, हर्षकारी आणि ओजस्वितेनें सकल वस्तुमात्र आपल्या स्वाधीन ठेवणारा असा तूं आपल्या धारेनें स्वच्छ प्रवाह वहात ठेव १०. —हे पावनप्रवाहा, उभयतां द्यावापृथिवींचा धारक, दिव्यप्रकाश दृष्टीस पाडणारा; आणि सत्वप्राप्तीच्या झुंजांत सत्ववीर म्हणून गाजणारा अशा तुजला मी हलवून सोडतों ११. —अशा रीतीनें तुझें चिन्तन केलें म्हणजे तूं हरिद्वर्ण सोम ह्या ( माझ्या ) अंगुलीनें पिळला जाऊन वहात रहा, आणि आपल्या धारेनें आपल्या मित्राला सत्व प्राप्तीच्या प्रयत्नांत प्रोत्साहन दे १२. —हे आल्हादप्रदा, उच्चप्रतीचा मनोत्साह आमच्याकडे वहात आण; हे विश्वदर्शी सोमा, तूं आम्हांला सन्मार्गबोधक झाला आहेस १३. —द्रोणकलश जणों काय आपल्या निनादानें (देवाची) स्तुति करूं लागले आहेत; तर हे आल्हाददायका, इन्द्रानें प्राशन करावें म्हणून तूं आपल्या धारेंनें—आपल्या ओजस्वितेनें त्यांत प्रवेश कर १४. —ज्या तुझा हर्षकारक तीव्र रस ( अध्वर्यू हे ) ग्राव्यांनीं चुरून दोहन करतात, तो तूं शत्रुनाशन सोम, आपला प्रवाह वहावयास लाव १५. —मानवी समाजामध्यें अन्तरिक्षमार्गानें गमन करानें म्हणून प्रतिभाप्रयुक्त कवनांनीं सोमराजाची विनवणी (भक्त) करीत आहेत १६. —हे आल्हादप्रदा सोमा, शेंकडों प्रकारची गोधनसमृद्धि, उत्कृष्ट अश्वसंपत्ति यांचें भाग्य आमच्या रक्षणासाठीं तूं आमच्याकडे वहात आण १७. —हे सोमा उत्तम रूपाप्रमाणेंच दुर्दम्य

---

इहो षु इन्दो आ गहि ॥ ५ ॥ यत् अद्भिः परि षिच्यसे मृज्यमानो गभस्त्योः । द्रूणा सधस्थम् अश्नुषे ॥ ६ ॥ प्र सोमाय व्यश्ववत् पवमानाय गायत । महे सहस्रचक्षसे ॥७॥ यस्य वर्णं मधुश्चुतं हरिं हिन्वन्ति अद्रिभिः । इन्दुम् इन्द्राय पीतये ॥ ८ ॥ तस्य ते वाजिनो वयं विश्वा धनानि जिग्युषः । सखित्वम् आ वृणीमहे ॥ ९ ॥ वृषा पवस्व धारया मरुत्वते च मत्सरः । विश्वा दधान ओजसा ॥ १० ॥ तं त्वा धर्तारम् ओण्योः पवमानः स्वर्दृशम् । हिन्वे वाजेषु वाजिनम् ॥ ११ ॥ अया चित्तो विपा ऽ नया हरिः पवस्व धारया । युजं वाजेषु चोदय ॥ १२ ॥ आ न इन्दो महीम् इषं पवस्व विश्वदर्शतः । अस्मभ्यं सोम गातुवित् ॥ १३ ॥ आ कलशाः अनूषत इन्दो धाराभिर् ओजसाऽऽ । इन्द्रस्य पीतये विश ॥ १४ ॥ यस्य ते मद्यं रसं तीव्रं दुहन्ति अद्रिभिः । स पवस्वा-भिमातिहा ॥ १५ ॥ राजा मेधाभिर् ईयते पवमानो मनौ अधि । अन्तरिक्षेण यातवे ॥ १६ ॥ आ न इन्दो शतग्विनं गवां पोषं सु अश्व्यम् । वहा भगत्तिम्

सामर्थ्य आणि चापल्य हे गुण, आमचें वर्चस्व रहावें आणि देवसेवा घडावी म्हणून, तूं घोषणा करीत आमच्यामध्यें आण १८. —अत्यंत तेजस्वी असा तूं ससाण्याप्रमाणें आपल्या ठिकाणीं गर्जना करीत करींत द्रोणपात्रांत वहात जा १९. —(वसतीवरी) उदकाशीं मिश्रित झालेला हा सोमरस इन्द्राप्रीत्यर्थ, वायुप्रीत्यर्थ, मरुतांप्रीत्यर्थ (अथवा) विष्णुप्रीत्यर्थ वहात आहे २० —आमच्या पुत्रपौत्रांसाठीं आम्हांमध्यें उत्साह राखून, हे सोमा, तूं हजारों प्रकारचें सामर्थ्य आमच्याकडे सर्व बाजूंनीं वहात आण २१. —जे सोमरस दूर देशांत, जे जवळच्या प्रदेशांत, तसेंच जे त्या शर्यणावतांत पिळले गेले; जे आर्जिक देशांत, कृत्व देशांत, आणि जे आपल्या सदनांत किंवा आपल्या पांच प्रकारच्या समाजांत पिळले गेले; ते देदीप्यमान आल्हादप्रद सोम पिळले गेले म्हणजे आकाशांतून पर्जन्यवृष्टि, आणि (शरीरांत) उत्कृष्ट शौर्य (अशी देणगी) आम्हांकडे वहात आणोत २२, २३, २४. —देवप्रिय आणि हरिद्वर्ण असा सोम जमदग्नीनें स्तवन करून पिळला, तो गव्याच्या चामड्यावर ठेऊन घुसळल्यावर स्वच्छ प्रवाहानें वहातो २५. —शुभ्रतेजाचे, तारुण्याचा जोम आणणारे, आणि अश्वाप्रमाणें धांवणारे सोमरस उदकांत मिसळून स्वच्छ करा २६. —(हे सोमा) तुझा रस पिळून ऋत्विजांनीं देवसेवेला अर्पण केला आहे, तर ह्या अशाच तेजस्वितेनें तूं वहात रहा २७. —तुझ्या कल्याणकर, आणि दिव्यविभूतिंना घेऊन येणाऱ्या चातुर्याची आम्ही प्रतीक्षा करीत आहोंत. तें चातुर्यबल भक्तरक्षक आहे, तें सर्वांनाच हवें हवेंसें वाटतें २८. —हर्षकारी, सर्वोत्कृष्ट, ज्ञानशील, मननीय, सर्वरक्षक आणि सर्वांना स्पृहणीय असें युक्तिबल आम्हीं तुजपाशीं हात जोडून मागत आहों २९. —(अक्षय) धन, आणि चित्तबोधकज्ञान असें वरदान, हे सत्क्रियावान सोमा, आम्हीं विनत होऊन मागत आहों, तें आमच्या स्वतःचें संरक्षण करतें आणि सर्वांनाच स्पृहणीय वाटतें ३०

---

ऊतये ॥ १७ ॥ आ नः सोम सहो जुवो रूपं न वर्चसे भर । सुष्वाणो देववीतये॥१८॥ अर्षा सोम द्युमत्तमः अभि द्रोणानि रोरुवत् । सीदन् श्येनो न योनिम् आ ॥ १९ ॥ अप्साः इन्द्राय वायवे वरुणाय मरुद्भ्यः । सोमो अर्षति विष्णवे ॥२०॥ इषं तोकाय नो दधत् अस्मभ्यं सोम विश्वतः । आ पवस्व सहस्रिणम् ॥ २१ ॥ ये सोमासः परावति ये अर्वावति सुन्विरे । ये वा ऽ दः शर्यणावति ॥ २२ ॥ ये आर्जीकेषु कृत्वसु ये मध्ये पस्त्यानाम् । ये वा जनेषु पन्चसु ॥ २३ ॥ ते नो वृष्टिं दिवस् परि पवन्ताम् आ सुवीर्यम् । सुवानाः देवास इन्दवः ॥ २४ ॥ पवते हर्यतो हरि गृणानो जमदग्निना । हिन्वानो गोर् अधि त्वचि ॥ २५ ॥ प्र शुक्रासो वयोजुवो हिन्वानासो न सप्तयः । श्रीणानाः अप्सु मृञ्जत ॥२६॥ तं त्वा सुतेषु आभुवो हिंन्विरे देवतातये । स पवस्वा-नया रुचा ॥ २७ ॥ आ ते दक्षं मयोभुवं वह्निम् अद्या वृणीमहे । पान्तम्

## सूक्त ६६

सर्वदर्शी सोमा, भक्तजनांच्या यच्चावत् कवनांना उद्देशून तूं आपला शुद्धप्रवाह वहात ठेव. तूं आम्हां भक्तांचा प्रशंसनीय मित्र आहेस १. —तुझीं जीं दोन तेजस्वी स्वरूपें हे, सोमा, ( भक्तांच्या ) संन्मुखच राहिलीं आहेत त्यांच्या योगानें, हे पावना, तूं अखिल विश्वाचा अधिपति झाला आहेस २. —ह्याप्रमाणें तुझीं जीं जीं तेजोमय स्थानें असतात त्या स्थानांना, हे पावना सोमा, हे काव्यज्ञा, तूं सर्व ऋतूंमध्यें व्यापून राहतोस ३. —( भक्तांमध्यें ) मनोत्साह उत्पन्न करून, आणि सर्व उत्कृष्ट वस्तूंना अनुलक्षून तूं आपला शुद्ध प्रवाह वहात ठेव; रक्षणाच्या कामीं तूं भक्तांचा प्रियमित्रच आहेस ४. —तुझ्या शुभ्रदीप्ति, द्युलोकाच्या पृष्ठभागावर आपल्या तेजःसमूहाच्या योगानें पवित्रच पसरून देत आहेत कीं काय असें वाटतें ५. —ह्या सप्तसिन्धूदेखील, हे सोमा, तुझ्या आज्ञेप्रमाणेंच वाहतात. धेनूहि तुझ्याचकडे धांव घेतात ६. —सोमा, तू जो हर्षोत्कर्ष करणारा आहेस, त्या तुजला इन्द्राप्रीत्यर्थ पिळलेला ( आहे तर ) आपल्या प्रवाहानें अविनाशी कीर्ति करून देवाकडे गमन कर ७. —ह्या सात भगिनीनीं तुजला सूर्याच्या विस्तीर्ण अंगणांत ( संचार करण्याला ) सोडून दिलें, आणि तुज ज्ञानशीलाला उद्देशून अगदीं लय लावून मोठ्यानें आलाप घेतले ८. —खळखळाट उडवून देणारा तूं वनामध्यें जसा ( उदकानें ) भिजून जातोस, त्याच पद्धतीनें ह्या अंगुलि झरझर वहाणाऱ्या तुज सोमाला नादयुक्त पवित्रावर ( गाळण्यावर ) ठेवून

---

आ पुरुस्पृहम् ॥ २८ ॥ आ मन्द्रम् आ वरेण्यम् आ विप्रम् आ मनीषिणम् । पान्तम् आ पुरुस्पृहम् ॥ २९ ॥ आ रयिम् आ सुचेतुनम् आ सुक्रतो तनूपु आ । पान्तम् आ पुरुस्पृहम् ॥ ३० ॥

## सूक्तम् ६६

शतं वैखानसाः पवमानसोमः गायत्री

पवस्व विश्वचर्षणे अभि विश्वानि काव्या । सखा सखिभ्य ईड्यः ॥ १ ॥ ताभ्यां विश्वस्य राजसि ये पवमान धामनि । प्रतीची सोम तस्थतुः ॥ २ ॥ परि धामानि यानि ते त्वं सोमा-सि विश्वतः । पवमान ऋतुभिः कवे ॥ ३ ॥ पवस्व जनयन् इषः अभि विश्वानि वार्या । सखा सखिभ्य ऊतये ॥ ४ ॥ तव शुक्रासो अर्चयो दिवः पृष्ठे वि तन्वते । पवित्रं सोम धामभिः ॥ ५ ॥ तवे-मे सप्त सिन्धवः प्रशिषं सोम सिस्रते । तुभ्यं धावन्ति धेनवः ॥ ६ ॥ प्र सोम याहि धारया सुतः इन्द्राय मत्सरः । दधानो अक्षिति श्रवः ॥ ७ ॥ सम् उ त्वा धीभिर् अस्वरन् हिन्वतीः सप्त जामयः । विप्रम् आजा विवस्वतः ॥ ८ ॥ मृजन्ति त्वा सम् अग्रुवः अव्ये जीरौ

स्वच्छ करतात ९. —हे काव्यप्रिया, हे सत्वधीरा, महतयशाची इच्छा धरणाऱ्या अश्ववीराप्रमाणें तुझ्या पावनप्रवाहाच्या धारा चोहोंकडे धांवतात १०. —मधुररसानें तोंडोतोंड भरलेला कलश लोंकरीच्या गाळण्यावर ओतला, त्या वेळेस (भक्तांच्या) ध्यानस्तुति उच्चस्वरांत चालू झाल्या ११. —रविकिरण आणि धेनू आपआपल्या वसतिस्थानाकडे जातात, त्याप्रमाणें हे सोमरसबिन्दु समुद्राकडे आणि सत्यधर्माच्या वसतिस्थानाकडे गेले १२. —आल्हादप्रदा सोमा, जेव्हां गोदुग्धानें तूं आच्छादित होशील, त्या वेळेस श्रेष्ठ (आनंदाचे) पूर आणि नद्या आमच्याकडे धों धों वहात येतील १३. —यज्ञ करण्याची इच्छा धरणारे, आणि हे सोमा, तूं रक्षण केलेले आम्हीं भक्तजन तुझ्या मित्रत्वाच्या आश्रयाला आहों; तुझ्या मित्रत्वाचीच आम्हांला लालसा आहे १४. —प्रकाशधेनूंच्या प्राप्तीसाठीं, हे सोमा, सकल जनांना पाहणारा जो सर्वश्रेष्ठ इन्द्र, त्याच्याप्रीत्यर्थ शुद्ध प्रवाहानें वहा, आणि इन्द्राच्या उदरांत प्रवेश कर १५. —हे सोमा, तूं थोर वरिष्ठ आहेस; हे आल्हादप्रदा, तूं तीव्रपेयांत ओजस्वी आहेस; आणि सतत युद्ध चालवून तूं शत्रूंचीं धनें जिंकून घेतलींस १६. —जे उग्र आहेत त्यांच्यापेक्षांहि तूं तेजस्वीच आहेस; कोणत्याहि शूरांपेक्षा देखील तूं अधिक शूर आहेस; आणि जे अतिशय दानशूर त्यांच्याहि पेक्षां तूं दानशूर आहेस १७. —हे सोमा तूं (आमचा) अग्रेसर आहेस; उत्साह, संतति आणि उत्तम शरीर ह्यांच्या प्राप्तीकरितां आम्हीं तुझी प्रार्थना करतों; तुझ्या मित्रत्वासाठीं, तुझ्या सहवासासाठीं तुझी विनवणी करितों १८. —हे अग्ने, तूं आमच्या आयुष्याचा प्रवाह वहात ठेव; ऊर्जस्विता आणि मनोत्साह ह्यांचा ओघ वहात ठेव; आणि दुष्टबुद्धीला आमच्यापासून दूर हांकून देऊन तिचा नायनाट कर १९. —पतितपावन अग्नि हा पांचहि समाजांचा ऋषि आणि पुरोहित आहे, त्याच्यापाशीं आम्हीं महदैश्वर्य हात जोडून मागतों २०. —हे अग्निदेवा, सत्क्रियावान तूं आम्हांमध्यें वर्चस्व राखण्याची शक्ति

---

अधि ष्वणि। रेभो यत् अज्यसे वने ॥९॥ पवमानस्य ते कवे वाजिन् सर्गाः असृक्षत। अर्वन्तो न श्रवस्यवः ॥ १० ॥ अच्छा कोशं मधुश्चुतम् असृग्रं वारे अव्यये । अवावशन्त धीतयः ॥ ११ ॥ अच्छा समुद्रम् इन्दवः अस्तं गावो न धेनवः। अग्मन् ऋतस्य योनिम् आ ॥ १२ ॥ प्र ण इन्दो महे रणे आपो अर्षन्ति सिन्धवः। यत् गोभि र्वासयिष्यते ॥१३॥ अस्य ते सख्ये वयम् इयक्षन्तस् त्वाऊतयः। इन्दो सखित्वम् उश्मसि ॥ १४ ॥ आ पवस्व गविष्टये महे सोम नृचक्षसे। एन्द्रस्य जठरे विश ॥ १५ ॥ महाँ असि सोम ज्येष्ठः उग्राणाम् इन्दो ओजिष्ठः। युध्वा सन् शश्वत् जिगेथ ॥ १६ ॥ यः उग्रेभ्य श्चित् ओजीयान् शूरेभ्य श्चित् शूरतरः। भूरिदाभ्य श्चित् महीयान् ॥ १७ ॥ त्वं सोम सूर आ इषस् तोकस्य साता तनूनाम्। वृणीमहे सख्याय वृणीमहे युज्याय ॥ १८ ॥ अग्न आयूंषि पवसे आ सुवो-र्जम् इषं च नः। आरे बाधस्व दुच्छुनाम् ॥ १९ ॥ अग्नि र्ऋषिः पवमानः पाञ्चजन्यः पुरोहितः। तम् ईमहे

आणि उत्कृष्ट शौर्य ठेऊन, मज भक्ताला ऐश्वर्य आणि समृद्धि देऊन पावन कर २१. —पावनप्रवाही सोम हा द्वेष्ट्यांना दूर पिटाळून देऊन आमच्या उत्तम स्तवनांकडे वहात येतो. तो सूर्याप्रमाणें सकल विश्वाचें निरीक्षण करणारा आहे २२. —तो ऋत्विजांनीं वारंवार गाळून स्वच्छ केलेला आहे. तो प्रसन्नचित्त असून (देवाच्या) प्रसन्नतेसाठींच पात्रांत ठेवला आहे. तो आल्हादप्रद, तीव्रगति आणि सूक्ष्मदृष्टि आहे २३. —पावनप्रवाह सोमानें काळ्याकुट्ट अन्धकाराचा समूळ नाश करून श्रेष्ठ असा न्यायनीतिधर्म आणि शुभ्रप्रकाश हे उत्पन्न केले २४. —शुद्धप्रवाही, पातकांचा संहार करणारा, हरिद्वर्ण, आणि चकचकाट उडवून देणारा जो सोम, त्याच्या शीतलकान्तिधारा पहा चोहोंकडे धांवूं लागल्या २५. —पावनप्रवाही सोम हा वीरश्रेष्ठ आहे. तो आपल्या शुभ्रतेजांनीं अतिशयच शुभ्र दिसतो; त्याचा हरिद्वर्ण आल्हादप्रद आहे, आणि मरुत्‌गण हे त्याचे सहायकर्ते होत. २६. —पावनप्रवाह सोम हा सत्वपरीक्षेंत सदैव विजयी होतो. तो भक्तांच्या ठिकाणीं उत्कृष्ट शौर्य ठेऊन आपल्या किरणांनीं सर्व व्यापून टाकतो. २७. —आल्हादप्रद सोम हा पिळला तेव्हां त्याचा आल्हादप्रद रस लोंकरीच्या पवित्रांतून इन्द्राप्रीत्यर्थ स्वच्छ प्रवाहानें पाझरला २८. —हा सोम गव्याच्या चामड्यावर (ठेवलेल्या फलकांवर) ग्राव्यांशीं क्रीडाच करीत आहे कीं काय ? त्यानें इन्द्राला हृष्टचित्त करण्यासाठींच पाचारण केलें २९. तुझें जें तेजस्वी रसदुग्ध आहे तें, हे पावनप्रवाहा सोमा, दिव्यलोकींहून आणलेलें आहे. अशा त्या तुझ्या दुग्धानें आम्हीं जगावें म्हणून आमच्यावर अनुग्रह कर ३०



महागयम् ॥ २० ॥ अग्ने पवस्व सुअपाः अस्मे वर्चः सुवीर्यम् । दधत् रयिं मयि पोषम् ॥ २१ ॥ पवमानो अति स्रिधः अभि अर्षति सुष्टुतिम् । सूरो न विश्व दर्शतः ॥ २२ ॥ स मर्मृजानः आयुभिः प्रयस्वान् प्रयसे हितः । इन्दुर् अत्यो विचक्षणः ॥ २३ ॥ पवमान ऋतं बृहत् शुक्रं ज्योतिर् अजीजनत् । कृष्णा तमांसि जङ्घनत् ॥ २४ ॥ पवमानस्य जंघ्नतो हरे श्चन्दा असृक्षत । जीराः अजिरशोचिषः ॥ २५ ॥ पवमानो रथीतमः शुभ्रेभिः शुभ्रशस्तमः । हरिश्चन्द्रो मरुद्गणः ॥ २६ ॥ पवमानो वि अश्नवत् रश्मिभि र्वाजसातमः । दधत् स्तोत्रे सुवीर्यम् ॥ २७ ॥ प्र सुवानः इन्दुर् अक्षाः पवित्रम् अति अव्ययम् । पुनानः इन्दुर् इन्द्रम् आ ॥ २८ ॥ एष सोमो अधि त्वचि गवां क्रीळति अद्रिभिः । इन्द्रं मदाय जोहुवत् ॥ २९ ॥ यस्य ते द्युम्नवत् पयः पवमाना-भृतं दिवः । तेन नो मृळ जीवसे ॥ ३० ॥



## सूक्त ६७

हे सोमा तूं धारावर्षाव करणारा आहेस. तूं तल्लीन करणारा, आणि अत्यंत ओजस्वी आहेस. तर ( दिव्य )धनांची देणगी देणारा तूं आमच्या अध्वरयागांत स्वच्छ प्रवाहानें वहा १. —तूं पिळला गेलास म्हणजे शूरांना तल्लीन करणारा आणि सकलांचा आधार असतोस. आणि तूं ( आमचा ) अग्रेसर आपल्या पेयानें इन्द्राला पाचारण करतोस २. —ग्राव्यांनीं मधुरशब्द केला आहे; तर तूं गर्जना करून तेजस्वी आणि उत्कृष्ट जोम आम्हांमध्यें आण. ३ —आल्हादप्रद सोमाला हलवून सोडल्यानें तो वाहूं लागला. आणि लोंकरीच्या वस्त्रांतून ( पाझरतांना ) त्या सोमानें सत्वाढयतेची गर्जना केली ४. —हे आल्हादप्रदा, ऊर्णावस्त्रांतून पाझरतांना तूं सत्कीर्तीचा प्रवाह वाहवितोस, सद्भाग्याचा वाहवितोस, आणि हे सोमा, प्रकाशपूर्ण सत्वसामर्थ्याचाहि प्रवाह वाहवितोस ५. —आल्हादरूपा, गोसंपन्न आणि अश्वसंपन्न असें धन, हे सोमा, तूं शेंकडोंपट (नव्हे, तर) हजारोंपटीनें आम्हांकडे घेऊन ये ६. —आल्हादप्रद आणि त्वरितगति सोमरस, पवित्रांतून पलीकडे स्वच्छ प्रवाहानें वहाणारे रस, आपल्या गतीनें इन्द्रापर्यंत पोहोंचले देखील. ७. —सर्वोन्नत, आणि पूर्वी प्रथमच पिळलेला सोमाचा आल्हादप्रद आणि आयुष्यवर्धक रस, विश्वायुष्य जो इन्द्र त्याच्याप्रीत्यर्थ स्वच्छ प्रवाहानें वहात आहे ८ —प्रकाशधेनू, सोमरूप सूर्याला, त्या मधुररसस्रावी पावनप्रवाह सोमाला, हलवून वहात सोडतात. त्यांनीं स्तुती करून त्याचें मधुरस्वरानें गुणगायनहि केलें आहे ९. —अजवाहन, विश्वपोषक पूषा हा प्रत्येक प्रवासामध्यें आमचा रक्षणकर्ता असो. तो मुग्धबालिकांच्या समूहांत आम्हांस त्यांच्या प्रेमाचे अंशभागी करो १०. —हा सोम कपर्दधारी ( रुद्रा )प्रीत्यर्थ घृता-

## सूक्तम् ६७

भरद्वाजः पवमानसोमः गायत्री

त्वं सोमा—सि धारयु मंन्द्र ओजिष्ठो अध्वरे । पवस्व मंहयत् रयिः ॥ १ ॥ त्वं सुतो नृमादनो दधन्वान् मत्सरिंतमः । इन्द्राय सूरिर् अन्धसा ॥ २ ॥ त्वं सुष्वाणो अद्रिभिर् अभि अर्ष कनिक्रदत् । द्युमन्तं शुष्मम् उत्तमम् ॥ ३ ॥ इन्दु र्हिन्वानो अर्षति तिरो वाराणि अव्यया । हरि र्वाजम् अचिक्रदत् ॥ ४ ॥ इन्दो वि अव्यम् अर्षसि वि श्रवांसि वि सौभगा । वि वाजान् सोम गोमतः ॥ ५ ॥ आ न इन्दो शतग्विनं रयिं गोमन्तम् अश्विनम् । भर सोम सहस्रिणम् ॥ ६ ॥ पवमानास इन्दवस् तिरः पवित्रम् आशवः । इन्द्रं यामेभिर् आशत ॥ ७ ॥ ककुहः सोम्यो रसः इन्दुर् इन्द्राय पूर्व्यः । आयुः पवते आयवे ॥ ८ ॥ हिन्वन्ति सूरम् उस्रयः पवमानं मधुश्रुतम् । अभि गिरा सम् अस्वरन् ॥ ९ ॥ अविता नो अजाश्वः पूषा यामनि यामनि । आ भक्षत् कन्यासु नः ॥ १० ॥ अयं सोमः कपर्दिने घृतं न पवते मधु ।

प्रमाणें मधुररसाचा प्रवाह सोडतो, तो लावण्यवती बालिकांच्या समूहांत आम्हांस त्यांच्या प्रेमाचे अंशभागी करो ११. —तेजानें तळपणाऱ्या विश्वपोषका पूषा, हा तुझ्यासाठीं पिळलेला स्वच्छ रस घृताप्रमाणें वहात आहे. तो कमनीय बालिकांच्या समूहांत आम्हांला त्यांच्या प्रेमाचे अंशभागी करो १२. —कवींच्या स्तुतींना प्रसविणाऱ्या सोमा, तूं आपल्या धारेनें ( रसाचा ) शुद्धप्रवाह वहावयास लाव. सकल दिव्यविभूतीमध्यें अमूल्य रत्नें ( भक्तांना ) देणारा तूं आहेस १३. —हा सोम कलशांमध्यें चोहोंबाजूंनीं धांवत वहातो, हा सणाणा आपल्या कवचांत शिरून वसतो, आणि मंजूळ शब्द करीत द्रोणपात्राच्या भोंवतीं फिरतो १४. —सोमा, तुझा रस पिळून कलशामध्यें ओतला म्हणजे तो एकदम झडप घालणाऱ्या ससाण्याप्रमाणें वहात जातो १५. —सोमा, तूं मन तल्लीन करून इन्द्राप्रीत्यर्थ वहात रहा. तूं अत्यंत मधुर आहेस. १६. —तुझे रस देवसेवेसाठीं सत्वपराक्रम गाजविणाऱ्या रथाप्रमाणें पुढें सरसावले १७. —आणि ते पिळून ठेवलेले अतिहर्षकर शुभ्रतेजस्वी सोमरस वायूकडे वेगानें चालते झाले १८. —तुजला ग्राव्यांनीं चुरून चांगला पिळला आणि प्रशंसा केली म्हणजे हे सोमा, तूं स्तोतृजनाच्या ठिकाणीं उत्कृष्ट शौर्य ठेऊन पवित्रांतून वहात जातोस १९. —हा चुरलेला आणि सर्वांनीं प्रशंसा केलेला राक्षसांतक रस लोंकरीच्या केंसाळ गाळण्यांतून खालीं ( पात्रांत ) बुडी देऊन वसतो २०. —जें जें भय - जवळून किंवा दुरून येथें मजवर कोसळूं पाहतें; तें तें हे पावनप्रवाहा, तूं नष्ट कर २१. —आपल्या पवित्रतेनें तो विश्वदर्शी सोम आज आम्हांकडे पावनप्रवाहानें वाहो. भक्तपावन जो सोम तो मला पवित्र करो २२. —अग्निदेवा तुझें जें पवित्र करणारें सामर्थ्य तुझ्या ज्वालेच्या आंत भरलेलें आहे त्यानें आमचें ब्रह्मसाधन पवित्र कर २३. —जें तुझें पवित्र आणि

आ भक्षत् कन्यासु नः ॥ ११ ॥ अयं ते आघृणे सुतः घृतं न पवते शुचि । आ भक्षत् कन्यासु नः १२ ॥ वाचो जन्तुः कवीनां पवस्व सोम धारया । देवेषु रत्नधाः असि ॥ १३ ॥ आ कलशेषु धावति श्येनो वर्म वि गाहते । अभि द्रोणा कनिक्रदत् ॥ १४ ॥ परि प्र सोम ते रसः असर्जि कलशे सुतः । श्येनो न तक्तो अर्षति ॥ १५ ॥ पवस्व सोम मन्दयन् इन्द्राय मधुमत्तमः ॥ १६ ॥ असृग्रन् देववीतये वाजयन्तो रथा इव ॥ १७ ॥ ते सुतासो मन्दिन्तमाः शुक्रा वायुम् असृक्षत ॥ १८ ॥ ग्राव्णा तुन्नो अभिष्टुतः पवित्रं सोम गच्छसि । दधत् स्तोत्रे सुवीर्यम् ॥ १९ ॥ एष तुन्नो अभिष्टुतः पवित्रम् अति गाहते । रक्षोहा वारम् अव्ययम् ॥ २० ॥ यत् अन्ति यत् च दूरके भयं विन्दति माम् इह । पवमान वि तत् जहि ॥ २१ ॥ पवमानः सो अद्य नः पवित्रेण विचर्षणिः । यः पोता स पुनातु नः ॥ २२ ॥ यत् ते पवित्रम् अर्चिषि अग्ने विततम् अन्तरा । ब्रह्म तेन पुनीहि नः ॥ २३ ॥ यत् ते पवित्रम् अर्चिवत् अग्ने तेन पुनीहि नः । ब्रह्म सवैः पुनीहि

ज्वालारूप सामर्थ्य आहे, त्यानें हे अग्निदेवा, आम्हांला पवित्र कर. प्रार्थनासूक्त आणि सोमसवन ह्यांच्या योगानें आम्हांला पावन कर २४. —जगत् निर्माण करणाऱ्या देवा, तुझें पावन सामर्थ्य आणि सोमसवन ह्या उभयतांच्या योगानें मला सर्व प्रकारें पुनीत कर २५. —जगतप्रसवा देवा, हे सोमरूपा, तूं आपल्या तिन्ही अतिश्रेष्ठ सामर्थ्यपूर्ण तेजांनीं मला पवित्र कर. हे अग्निरूपा आपल्या कौशल्यवलांनीं आम्हांला शुद्ध कर २६. —देवाचे जे सेवक, ते मला पवित्र करोत; दिव्यवसु आपल्या एकाग्रतेनें पवित्र करोत; दिव्यविबुधानों मला पावन करा; हे सर्वज्ञा अग्निदेवा, मला पवित्र कर २७. —तूं पुष्ट हो, आणि हे सोमा आपल्या सकल पल्लवानीं ( रसधारांचा ) ओघ वाहूं दे, आणि दिव्यविभूतिसाठीं उत्कृष्ट हविर्भागाचा प्रवाह सोड २८. —प्रिय, अत्यंत प्रशंसनीय, आणि आहुतींना वृद्धिंगत करणारा युवक जो सोम त्याच्याकडे आम्हीं प्रणिपात करीत करीत प्राप्त झालों आहों २९. —अलाय्याच्या फरशुनें दुष्टांचा नाश केला, तर देदीप्यमान सोमा, त्याच्याकरितां स्वच्छ प्रवाहानें वहा–दिव्य सोमा, जो उंदराप्रमाणें दुष्ट आहे त्यालाच तूं ठार कर ३० —ह्या पवित्र स्तुतींचें जो अध्ययन करतो, आणि ऋषींनीं संकलिक केलेल्या सुरस सूक्तांचें जो पठण करतो तो मातरिश्व्यानें मधुर केलेलें जें पवित्र फल, तें सर्व सेवन करितो ३१ —ह्या पवित्र स्तुतींचें जो अध्ययन करतो, ऋषींनीं संकलित केलेल्या सुरस सूक्तांचें जो पठण करतो, त्याच्यासाठीं सरस्वती ही, दुग्ध नवनीत मधु आणि स्वच्छ उदक ह्यांचा पान्हा सोडते ३२

## सूक्त ६८

दुग्ध देणाऱ्या धेनूप्रमाणें मधुर रस स्रवणारे आल्हादप्रद सोमबिन्दु देवाकडे वहात गेले आहेत. कुशासनावर ठेवलेले ते सोमरस स्तुतिवचनांनीं वाखाणलेले आहेत; त्यांच्या,

---

नः ॥ २४ ॥ उभाभ्यां देव सवितः पवित्रेण सवेन च । मां पुनीहि विश्वतः ॥ २५ ॥ त्रिभि ष्ट्वं देव सवित र्वर्षिष्ठैः सोम धामभिः । अग्ने दक्षैः पुनीहि नः ॥ २६ ॥ पुनन्तु मा देवजनाः पुनन्तु वसवो धिया । विश्वे देवाः पुनीत मा जातवेदः पुनीहि मा ॥ २७ ॥ प्र प्यायस्व प्र स्यंदस्व सोम विश्वेभिर् अंशुभिः । देवेभ्य उत्तमं हविः ॥ २८ ॥ उप प्रियं पनिप्नतं युवानम् आहुतिवृधम् । अगन्म बिभ्रतो नमः ॥ २९ ॥ अलाय्यस्य परशु र्ननाश तम् आ पवस्व देव सोम । आखुं चित् एव देव सोम ॥ ३० ॥ यः पावमानीर् अध्येति ऋषिभिः सभृतं रसम् । सर्वं सपूतम् अश्नाति स्वदितं मातरिश्वना ॥३१॥ पावमानी र्यो अध्येति ऋषिभिः सभृतं रसम् । तस्मै सरस्वती दुहे क्षीरं सर्पि र्मधू–दकम् ॥ ३२ ॥

करितां आपल्या कांसेंतून पाझरणाऱ्या दुग्धाचें एक परिधानच (जणों) प्रकाशधेनूंनीं योजून ठेवलेलें आहे १. —तो निनादित झाला. (भक्तांनीं) प्रथम केलेल्या स्तुतींना अनुलक्षून त्यानें गर्जना केली; त्या हरिद्वर्ण सोमानें पालवी फुटलेल्या औषधीलतांना शिवशिवीत करून त्यांना स्वादिष्ट केलें. तशीच देदीप्यमान सोमानें आणखी एक गोष्ट उत्तम केली. ती ही कीं, पवित्रांतून पाझरून आपला जोम विस्तृत केला, आणि आपला चोथा मात्र शिल्लक ठेवला २. —तसेंच, एकत्र राहिलेल्या आणि एकत्र वृद्धिंगत झालेल्या दोघींना ज्या हर्षकारी सोमानें मापून टाकलें, ज्यानें अक्षय द्यावापृथिवींना आपल्या रसानें भरून सोडलें, त्या सोमानें अपार अंतरालाहि स्पष्ट दृग्गोचर करून आणि त्यांना चोहों-कडून वेढून आपलें अविनाशी तेजोबल प्रदर्शित केलें ३. —उभयतां जननींच्या जवळ जाऊन सत्कर्माला सत्वाचें पाठबळ देऊन प्रज्ञाशाली सोम आपल्या स्वाभाविक सामर्थ्यानें स्वस्थान ओतप्रोत भरून सोडतो. त्याचा पल्लव यवधान्याशीं कुसकरला गेल्यानें एकरूप होतो, आणि शूर ऋत्विजांनीं आपल्या अंगुलीनीं त्याला पिळला तरी हल्लक झालेल्यांना टवटवी आणून तो त्यांचें रक्षण करतो ४. —कवि जन्माला येतो, तो चातुर्यशाली मना-सहच जन्माला येतो. तोच सनातन नीतिधर्माचा अंकुर आहे; तो उभयलोकांपेक्षांहि श्रेष्ठ होय. हे उभयतां सर्वांच्या आधीं उत्पन्न झाले तरी अजून तरुणच आहेत; आणि त्यांची उत्पत्ति कशी झाली हें जरी गूढच आहे तरी त्या (गूढा)चा अर्धा भाग त्यांनीं स्पष्ट केला आहे ५ —जेव्हां श्येनानें दूरच्या स्वर्लोकांतून सोमवल्ली आणली, तेव्हांच त्या हर्षोत्फुल्लकर सोमाचें स्वरूप ज्ञानीजनांना कळलें. त्यांनीं समृद्धिप्रद, देवोत्सुक आणि व्यापन-शील जो ऋक्स्तोत्रप्रिय सोम, त्याला नदीप्रवाहांत धुवून स्वच्छ केलें ६. —ऋषींनीं

## सूक्तम् ६८

वत्सप्रिः पवमानसोमः जगती

प्र देवम् अच्छा मधुमन्तः इन्दवः असिष्यदन्त गावः आ न धेनवः । बर्हि-षदो वचनावन्त ऊधभिः परिस्रुतम् उस्रियाः निर्णिजं धिरे ॥ १ ॥ स रोरुवत् अभि पूर्वाः अचिक्रदत् उपारुहः श्रथयन् स्वादते हरिः । तिरः पवित्रम् परियन् उरु ज्रयो नि शर्याणि दधते देव आ वरम् ॥ २ ॥ वि यो ममे यम्या संयती मदः साकंवृधा पयसा पिन्वत् अक्षिता । मही अपारे रजसी विवेविदत् अभिव्रजन् अक्षितं पाज आ ददे ॥ ३ ॥ स मातरा विचरन् वाजयन् अपः प्र मेधिरः स्वधया पिन्वते पदम् । अंशु यवेन पिपिशे यतो नृभिः सं जामिभि र्नसते रक्षते शिरः ॥ ४ ॥ सं दक्षेण मनसा जायते कवि र्ऋतस्य गर्भो निहितो यमा परः । यूना ह सन्ता प्रथमं वि जज्ञतु गुहा हितं जनिम नेमम् उद्यतम् ॥ ५ ॥ मन्द्रस्य रूपं विविदु र्मनीषिणः श्येनो यत् अन्धो अभरत् परावतः । तं मर्जयन्त सुवृधं नदीषु आ उशन्तम् अंशुं परियन्तम्

तुजला पिळून आपल्या एकाग्रबुद्धीनीं, ध्यानस्तुतींनीं, स्वस्थानीं ठेवलें म्हणजे हे सोमा, ( अंगुलीरूप ज्या ) दहा स्त्रिया त्या तुजला अलंकृत करतात; आणि ऋत्विजानीं देवाचा धांवा करून तुजला लोंकरीच्या वस्त्रांतून गाळून घेतलें म्हणजे ( भक्तांच्या ) विजयप्राप्तिसाठीं तूं आपलें सत्वसामर्थ्य प्रत्ययास आणतोस ७. —एकदम व्यापून टाकणारा, सर्वांना हवा हवासा वाटणारा आणि यथायोग्य स्थलीं आरुढ झालेल्या सोमाची, ( भक्तांनीं ) मनःपूर्वक गाईलेल्या पद्यांनीं प्रशंसा झाली. माधुर्ययुक्त सोम आपल्या धारेनें, आपल्या तरंगानें, द्युलोकांतून भक्ताच्या वाणीला प्रेरणा करतो. तो ( दिव्य )धनाचा नेता आहे. ८. —सोम हा द्युलोकांतून अखिल विश्वाला आणि रजोलोकाला चालना देतो, आणि स्वच्छ प्रवाहानें वाहून कलशांत सांठतो; उदकांनीं आणि गोदुग्धानें अलंकृत होतो, आणि ग्राव्यांनीं त्याला चुरून पिळलें म्हणजे तो आल्हादप्रद सोम, प्रिय आणि श्रेष्ठ असें जें सुख तें अर्पण करतो ९. —याप्रमाणें हे सोमा, तुजला पात्रांत ओतला आहे. तूं तारुण्याचा अद्भूत जोम ( भक्तांना ) देऊन स्वच्छ प्रवाहानें वहा. आम्हीं द्यावापृथिवींना पाचारण करतों; आणि दिव्यविभूतिनों, तुम्हीं उत्कृष्ट वीरांनीं युक्त असें ऐश्वर्य आम्हांस अर्पण करा. १०

## सूक्तम् ६९

धनुष्यापासून बाण ( सुटतो ), किंवा धेनूच्या कांसेकडे वांसरूं ( सुटतें ) त्याप्रमाणें माझी प्रतिभा आतां ध्येयाकडे धांवून तेथें जडली आहे. विपुल दुग्धधारा सोडणाऱ्या धेनूप्रमाणें ती प्रथम पुढें होऊन पान्हा सोडते; आणि याप्रमाणें ह्या ( इन्द्रा )च्या

---

ऋग्मियम् ॥ ६ ॥ त्वां मृजन्ति दश योषणः सुतं सोम ऋषिभि र्मतिभि र्धीतिभि र्हितम् । अव्यो वारेभिर् उत देवहूतिभि र्नृभि र्यतो वाजम् आ दर्षि सातये ॥ ७ ॥ परि प्रयन्तं वय्यं सुषंसदं सोमं मनीषाः अभि अनूषत स्तुभः । यो धारयां मधुमाँ ऊर्मिणा दिवः इयर्ति वाचं रयिषाळ् अमर्त्यः ॥ ८ ॥ अयं दिवः इयर्ति विश्वम् आ रजः सोमः पुनानः कलशेषु सीदति । अद्भि र्गोभि र्मृज्यते अद्रिभिः सुतः पुनानः इन्दु र्वरिवो विदत् प्रियम् ॥ ९ ॥ एवा नः सोम परिषिच्यमानो वयो दधत् चित्रतमं पवस्व । अद्वेषे द्यावापृथिवी हुवेम देवाः धत्त रयिम् अस्मे सुवीरम् ॥ १० ॥

## सूक्तम् ६९

हिरण्यस्तूपः पवमानसोमः जगती

इषु र्न धन्वन् प्रति धीयते मति र्वत्सो न मातुर् उप सर्जि ऊधनि । उरु धारेव दुहे अग्रे आयती अस्य व्रतेषु अपि सोम इष्यते ॥ १ ॥ उपो मतिः पृच्यते सिच्यते

यज्ञकर्मांत त्याला सोम अर्पण होतो १. —आतां ( माझी ) मति तिकडेच रमली; मधुररसहि पाझरूं लागला; हर्षानें प्रोत्साहन पावलेली जिव्हा मुखाच्या आंत स्फुरण पावूं लागली; आणि मधुर सोमरस विन्दु, ( एकमेकांवर ) वार करणाऱ्या योद्ध्यांच्या मालिकेप्रमाणें पवित्रांतून पात्रांत एका मागें एक असे टपटप गळूं लागले २. —वधू-करितां उत्सुक झालेला सोमरस पवित्राच्या आस्तरणांतून स्वच्छ प्रवाहानें वहातो; आणि अदितिमातेच्या नाती शोभणाऱ्या ज्या औषधि त्यांना, नीतिधर्मशील भक्तासाठीं रसानें टचटचीत करतो. याप्रमाणें हरिद्वर्ण, पूज्य, सुयन्त्रित, ( देवाला ) हृष्ट करणारा आणि आपलें पौरुष गाजविणारा सोम एखाद्या धिप्पाड वीराप्रमाणें शोभतो ३. —सोमरूप वृषभ मोठ्यानें हंबारतो त्यावरोवर धेनू त्याच्याकडे धांवत येतात, आणि दिव्याङ्गना देवाच्या निवासस्थानाकडे जातात. तसेंच, शुभ्र ऊर्णावस्त्रांतून सोमरस वाहूं लागला म्हणजे त्यानें स्वच्छ घांसलेलें कवचच घातलें आहे कीं काय असें वाटतें ४. —कोऱ्या करकरीत तेजोमय वस्त्राच्या योगानें ह्या अमर, निर्धूताङ्ग, आणि हरिद्वर्ण सोमानें आपलें शरीर आच्छादित केलें. त्यानें द्युलोकाचा पृष्ठभाग आपल्या पल्लवानें स्वच्छ धुतल्याप्रमाणें केला, आणि चमूपात्रासाठीं मेघवितान पसरून दिलें ५. —सूर्याच्या किरणांप्रमाणें वेगवान आणि ( मनाला ) हर्षोत्फुल्ल आणि निद्रावश करणाऱ्या सोमरसाचे तीव्रवेगी फवारे ( यज्ञरूपी ) वितत तंतूकडे एकदम येतात. कारण सोमरस इन्द्राला सोडून इतर कोणत्याहि ठिकाणाकडे वहात नाहींत ६. —महानदीप्रमाणें उतरत्या ओघांत, किंवा खोल दरींत देखील वीर्यशाली भक्ताच्या हातून सांडलेल्या तीव्रवेगी आणि हर्षकारी रसाला ( इन्द्राचा ) मार्ग सांपडला आहे, तर आमच्या निवासस्थानांत आमच्या मुलांमाणसांना आणि पशूंना तूं सुखरूप ठेव. हे सोमा, आमच्या अंगीं सत्वसामर्थ्य आणि आमच्या सहवासाला अनेक मनुष्यें राहोत ७. —वैभवप्रचुर सुवर्णप्रचुर,

मधु मन्द्राजनी चोदते अन्त आसनि। पवमानः संतनिः प्रघ्नतामिव मधुमान् द्रप्सः परि वारम् अर्षति ॥ २ ॥ अव्ये वधूयुः पवते परि त्वचि श्रथ्नीते नप्तीर् अदितेर् ऋतं यते । हरिर् अक्रान् यजतः संयतो मदो नृम्णा शिशानो महिषो न शोभते॥३॥ उक्षा मिमाति प्रति यन्ति धेनवो देवस्य देवीर् उप यन्ति निष्कृतम् । अत्य–क्रमीत् अर्जुनं वारम् अव्ययम् अत्कं न निक्तं परि सोमो अव्यत ॥ ४ ॥ अमृक्तेन रुशता वाससा हरिर् अमर्त्यो निर्णिजानः परि व्यत । दिवः पृष्ठं बर्हणा निर्णिजे कृत उपस्तरणं चम्वो र्नभस्मयम् ॥ ५ ॥ सूर्यस्येव रश्मयो द्रावयित्नवो मत्सरासः प्रसुपः साकम् ईरते । तन्तुं ततं परि सर्गास आशवो ने–न्द्रात् ऋते पवते धाम किं चन ॥ ६ ॥ सिन्धोर् इव प्रवणे निम्ने आशवो वृषच्युताः मदासो गातुम् आशत ॥ शं नो निवेशे द्विपदे चतुष्पदे अस्मे वाजाः सोम तिष्ठन्तु कृष्टयः ॥ ७ ॥ आ नः पवस्व वसुमत् हिरण्यवत् अश्ववत् गोमत् यवमत् सुवीर्यम् । यूयं हि सोम

अश्वप्रचुर, गोधनप्रचुर, आणि धान्यप्रचुर अशा ( स्थितींत ठेवणाऱ्या ) उत्कृष्ट शौर्याचा प्रवाह आमच्याकडे वाहूं दे. सोमरस हो, तुम्हींच आमचे पितर आहांत. तुम्हींच द्युलोकाचीं उत्तुङ्ग मस्तकें आहांत, आणि तारुण्याचा जोम आणण्याला समर्थ आहांत ८. —पावनप्रवाह सोम वरद इन्द्राकडे रथाप्रमाणें त्वरित चालते झाले. ते हरिद्वर्ण सोमपल्लव पिळ्ले म्हणजे ऊर्णावस्त्रांतून पात्रांत पाझरतात, आणि मेघावरण बाजूस फेंकून उदकवृष्टि करण्यास प्रवृत्त होतात ९. —आल्हादप्रदा सोमा, तूं वात्सल्यपूर्ण आणि कलंकरहित आहेस; शत्रुनाशन असा तूं त्या परमसमर्थ इन्द्राप्रीत्यर्थ स्वच्छ प्रवाहानें वहा. चन्द्राप्रमाणें उल्लासप्रद ऐश्वर्यें स्तोतृजनासाठीं आण, आणि ह्या द्यावापृथिवी दिव्यविभूतींसह आम्हांवर कृपा करोत १०.

## सूक्त ७०

एकवीस धेनूंनीं ह्या ( सोमा )साठीं पूर्वेकडील आकाशांत सत्यरूप दुग्धसुधेचा पान्हा सोडला, आणि त्यानें दुसरीं चार शोभिवंत भुवनें आपल्या अलंकृतिसाठीं निर्माण केलीं, त्याच वेळीं तो सनातन यज्ञधर्मांनीं वृद्धिंगत झाला १. —रुचिर अमृताची याचना त्याच्यापाशीं ( भक्तांनीं ) केली तेव्हां त्याच्या प्रतिभेनें द्युलोक आणि भूलोक निरनिराळे व्यक्त झाले. त्यानें अत्यंत तेजःपुंज अशा दिव्योदकांना आपल्या महिम्यानें व्यापून टाकलें त्या वेळीं देवाच्याच गुणश्रवणानें त्याचें निवासस्थान (भक्तांना) विदित झालें २. —ज्यांना मृत्यु नाहीं, ज्यांचा कोणीं घात करूं शकत नाहीं, असे जे त्याचे किरण ते ( द्युलोक आणि भूलोक ह्या ) दोन्ही लोकांना अनुकूल राहोत. त्या किरणांच्या योगानें मानवी आणि दिव्य सामर्थ्यें तो पवित्र करतो, आणि म्हणूनच मनःपूर्वक केलेल्या स्तुतींनीं

पितरो मम स्थन दिवो मूर्धानः प्रस्थिताः वयस्कृतः ॥ ८ ॥ एते सोमा पवमानास इन्द्रं रथाइव प्र ययुः सातिम् अच्छ। सुताः पवित्रम् अति यन्ति अव्यं हित्वी वव्रिं हरितो वृष्टिम् अच्छ ॥९॥ इन्दो इन्द्राय बृहते पवस्व सुमृळीको अनवद्यो रिशादाः। भर चन्द्राणि गृणते वसूनि देवै र्द्यावापृथिवी प्रा-वतं नः ॥ १० ॥

## सूक्तम् ७०

रेणुः पवमानसोमः जगती

त्रिर् अस्मै सप्त धेनवो दुदुह्रे सत्याम् आशिरं पूर्व्ये विओमनि। चत्वारि अन्या भुवनानि निर्णिजे चारूणि चक्रे यत् ऋतैर् अवर्धत ॥ १ ॥ स भिक्षमाणो अमृतस्य चारुणः उभे द्यावा काव्येना वि शश्रये। तेजिष्ठाः अपो मंहना परि व्यत यदी देवस्य श्रवसा सदो विदुः ॥ २ ॥ ते अस्य सन्तु केतवः अमृत्यवः अदाभ्यासो जनुषी उभे अनु। येभि र्नृम्णा च देव्या च पुनते आत् इत् राजानं मननाः अगृ-

( विश्वाचा ) अधिपति म्हणून त्याचा आदर केला आहे ३. —कर्मकुशल अशा दक्ष ( ऋत्विजां )कडून तो अलंकृत होऊन अन्तराळांत मध्यभागीं असणाऱ्या (मेघरूप) मातां-मध्यें ( राहून सकल वस्तूंना ) व्यापून टाकण्याला उद्युक्त आहे, आणि सुरुचिर अमृताच्या ( प्राप्तीच्या ) मार्गाचा संरक्षक आणि वीरांचा निरीक्षक म्हणून (मानव आणि दिव्य अशा) दोन्ही लोकांचें तो सतत अवलोकन करतो ४. —( विश्वाचें ) धारण करणारें जें इन्द्राचें सामर्थ्य त्याच्यासाठीं जेव्हां सोमरस स्वच्छ होऊन राहिला, तेव्हां द्युलोक आणि भूलोक ह्या दोहोंच्यामध्यें ( व्यापून ) राहिलेला ( भगवान् ) हृष्ट झाला. तो वीर्यशाली देव धडाक्यासरशीं दुरात्म्याचा नाश करतो, आणि शरसंधान करणाऱ्या वीराप्रमाणें आपला नेम कोणावर धरला आहे तेंहि तो दाखवितो ५. —मातांप्रमाणेंच प्रकाशधेनूंना अवलोकन करून मरुतांच्या निर्घोषाप्रमाणें गर्जना करीत करीत तो सर्वत्र संचार करतो. आद्य आणि दिव्यप्रकाशप्रापक जें सनातन सत्य तें जाणणारा महत्कार्यकर्ता जो सोम त्यानें तें सत्य सर्वांना सांगण्यासाठीं संतोषानें प्रसृत केलें ६. —तो भीषण वृषभ मोठ्यानें डुरकणी फोडतो, आणि आपला तडाका दाखविण्याच्या इर्षेनें तो विलक्षण धोरणी धुरीण आपलीं दोन्हीं हरितवर्ण शिंगें पाजळून ठेवतो. याप्रमाणें सोम हा आपल्या अलंकृत स्थानीं आरूढ होतो, तेव्हां गव्याचें चर्म आणि मेंढ्याचें चर्म ह्यांनींच त्याचें आवरण होतें ७. —स्वतः शुद्ध आणि दुसऱ्यालाहि पवित्र करणारा हरिद्वर्ण सोम आपलें निष्कलंक शरीर ऊर्णापवित्राच्या पृष्ठभागावर ठेवतो, तेव्हां त्या प्रसन्नचित्त सोमाचें, मित्र, वरुण आणि वायु यांच्याप्रीत्यर्थ कुशल ऋत्विजांच्या हातून तीन प्रकारचें पेय बनतें ८. —हे सोमा वीर्यशाली असा तू देवसेवेसाठीं स्वच्छ प्रवाहानें वहा; आणि तुज सोमाचें आगर म्हणजे इन्द्राचें जें हृदय, त्यांत प्रवेश कर; आणि आम्हांला उपद्रव होण्यापूर्वींच आम्हांस संकटाच्या पार ने; कारण ज्याला एखाद्या प्रदेशाची माहिती असेल तोच मनुष्य वाट पुसणाऱ्याला योग्य मार्ग दाखवील ९. —युद्धासाठीं उभा ठाकलेल्या अश्वाप्रमाणें तू

भ्णत ॥ ३ ॥ स मृज्यमानो दशभिः सुकर्मभिः प्र मध्यमासु मातृषु प्रमे सचा । व्रतानि पानो अमृतस्य चारुणः उभे नृचक्षाः अनु पश्यते विशौ ॥ ४ ॥ स मर्मृजानः इन्द्रियाय धायसे ओ-भे अन्ता रोदसी हर्षते हितः । वृषा शुष्मेण बाधते वि दुर्मतीर् आदेदिशानः शर्यहे-व शुरुधः ॥ ५ ॥ स मातरा न ददृशान उस्त्रियो नानदत् एति मरुतामूइव स्वनः ॥ जानन् ऋतं प्रथमं यत् स्वर्णरं प्रशस्तये कम् अवृणीत सुक्रतुः ॥ ६ ॥ रुवति भीमो वृषभस् तविष्यया शृङ्गे शिशानो हरिणी विचक्षणः ॥ आ योनिं सोमः सुकृतं निषीदति गव्ययी त्वक् भवति निर्णिक् अव्ययी ॥ ७ ॥ शुचिः पुनानस् तन्वम् अरेपसं अव्ये हरि निर् अधारिष्ट सानवि । जुष्टो मित्राय वरुणाय वायवे त्रिधातु मधु क्रियते सुकर्मभिः ॥ ८ ॥ पवस्व सोम देववीतये वृषा इन्द्रस्य हार्दि सोमधानम् आ विश । पुरा नो बाधात् दुरिताऽति पारय क्षेत्रवित्

पुढें सरून सत्वाच्या झुंजाकडे वहात रहा. हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राच्या द्रोणकलशाकडे वहात रहा. तूं ज्ञानी आहेस. तर नावेच्या योगानें नदीपार जावें त्याप्रमाणें आम्हांला संकटांच्या पार ने. युद्धप्रवीण शूराप्रमाणें निन्दकांपासून आमचें रक्षण कर १०.

## सूक्त ७१

दक्षिणा धेनू दिली. दमदार सोमहि आपल्या आसनावर हौसेनें वसला. तो सदैव जागरूक राहणारा सोम, दुष्ट लोक आणि राक्षस यांच्यापासून ( भक्तांचें ) रक्षण करतो. तो हरिद्वर्ण सोम मेघमंडळाचा चांदवा बनवितो, आणि ( द्यावापृथिवीरूप ) चमूच्या आस्तरणासाठीं वृष्टि, आणि परिधानासाठीं प्रार्थनासूक्त निर्माण करतो १. —स्तवनीय सोम हा दुष्टांचा नाश करणाऱ्या वीराप्रमाणें गर्जना करीत संचार करतो, आणि आपलें तें ( अपूर्व ) दिव्यतेज लोकांच्या दृष्टीस पाडतो. तो आपलें जीर्ण आवरण टाकून देतो, ( जगत् )पित्याच्या गृहाकडे गमन करतो, आणि तेजस्वी जें दशापवित्र तें परिधान करतो २. —ग्राव्यांनीं चुरलेला सोमरस ( ऋत्विजांच्या ) दोन्हीं हातांतून ( पात्रांत ) वहात आहे. नभोमंडळामुळें तो वीर्यभरानें फोंफावतो आणि मननस्तुतीनें हलून जातो. भक्ताच्या वाणीनें तो आनंदित होतो आणि त्यांचें सहाय करतो; उदकानें तो स्वच्छ होतो आणि देवाचें यजन करतो ३. —द्युलोकांत वास करणारा, धाडसाचा पर्वत वृद्धिंगत करणारा, आणि नभोमंडळापर्यंत जाऊन भिडणारा जो सोम, त्याचा मधुररस ऋत्विज् लोक पात्रांत ओतीत आहेत. हुतहव्य भक्षण करणाऱ्या धेनू त्या रसामध्यें आपल्या कांसेंतील उत्कृष्ट दुग्ध मोठ्या सौजन्यानें मिसळून देतात ४. —दोन्हीं

हि दिश आहा वि पृच्छते ॥ ९ ॥ हितो न सप्तिर् अभि वाजम् अर्ष इन्द्रस्य इन्दो जठरम् आ पवस्व ॥ नावा न सिन्धुम् अति पर्षि विद्वान् शूरो न युध्यन् अव नो निदः स्पः ॥ १० ॥

## सूक्तम् ७१

वृषभः पवमानसोमः जगती

आ दक्षिणा सृज्यते शुष्मी आसदं वेति द्रुहो रक्षसः पाति जागृविः । हरिर् ओपशं कृणुते नभः पयः उपस्तिरे चम्वो ब्रह्म निर्णिजे ॥ १ ॥ प्र कृष्टिहेव शूषः एति रोरुवत् असुर्यं वर्णं नि रिणीते अस्य तम् । जहाति वव्रिं पितुर् एति निष्कृतम् उपप्रुतं कृणुते निर्णिजं तना ॥ २ ॥ अद्रिभिः सुतः पवते गभस्त्यो वृषायते नभसा वेपते मती । स मोदते नसते साधते गिरा नेनिक्ते अप्सु यजते परीमणि ॥ ३ ॥ परि द्युक्षं सहसः पर्वतावृधं मध्वः सिञ्चन्ति हर्म्यस्य सक्षणिम् । आ यस्मिन् गावः

हातांनीं रथ भरधांव हांकावा त्याप्रमाणें दहा भगिनींनीं त्याला अदितिसमीप भरवेगानें नेलें. तेव्हां प्रकाश धेनूंच्या गूढस्थानीं जाऊन तो थडकला. त्या स्थानाच्या अगदीं निकट गेला ; तें स्थान त्याच्याच भावनांनीं उत्पन्न केलें होतें ५. —ससाणा आपल्या घरट्याकडे जातो त्याप्रमाणें दीप्तिमान् सोम ध्यानभक्तीनें सुवर्णमय झालेल्या स्थानीं आरूढ होण्याकरितां गमन करतो. भक्तजन सर्वप्रिय सोमाला स्तुतिवाणीनें कुशासनावर अधिष्ठित करतात; ( तेव्हां ) तो यज्ञार्ह सोमहि अश्वाप्रमाणें त्वरेनें दिव्यविभूतिंकडे जातो ६. —स्पष्टपणें दृग्गोचर, आरक्तवर्ण, ज्ञानी, आणि तीन स्थलीं वास करणाऱ्या त्या वीर्यशाली सोमानें दूरच्या द्युलोकांतून येऊन (भक्तांच्या) स्तवनवाणीची प्रशंसा केली. हजारों प्रकारांनीं मार्गदर्शक होणारा, आणि एकदां इकडे, एकदां तिकडे, याप्रमाणें संचार करणारा सोम प्रत्येक उषःकालीं दिव्य बन्दिजनाप्रमाणें आपल्या तेजानें विराजमान होतो ७. —त्याचा वर्ण तेजस्वी रूप धारण करतो. आणि तो जेथें स्वस्थ पडून राहतो तेथेंहि तो युद्धांत शत्रूनां ठार करतो. दिव्य उदकें स्वाधीन ठेवणारा सोम हा आपल्या स्वभावानुसार दिव्यविबुधांकडे जातो. आणि ( भक्तांच्या ) माधुर्यपूर्ण स्तुतीशीं रममाण होतो ८. —भक्तसमूहाभोंवतीं हिंडून पाहून त्यानें वृषभाप्रमाणें डुरकणी फोडली, आणि सूर्याची झळाळी आंगीं धारण केली. दिव्य गरुडानें खालीं पृथिवीकडे अवलोकन केलें, त्याप्रमाणें सोमानेंहि आपल्या कर्तृत्वानें सकलजनाचें निरीक्षण केलें ९.

## सूक्त ७२

हरिद्वर्ण सोमाला ऋत्विज् आलंकृत करितात. आरक्तवर्ण अश्वाप्रमाणें त्याला ( यज्ञाशीं ) जोडतात. ( म्हणून ) कलशामध्यें सोमरस दुग्धाशीं मिसळून ठेवला जातो. तो स्तुतीला स्फूर्ति देतो, मननाला प्रोत्साहन देतो. ( उघडच आहे कीं, ) परोपरीनें ज्याची स्तुति होते अशा सोमाला कोणता भक्त अत्यंत प्रिय नसेल ? १. —जेव्हां इन्द्राच्या

---

सुहुतादः ऊधनि मूर्धन् श्रीणन्ति अग्रियं वरीमभिः ॥ ४ ॥ सम् ईं रथं न भुरिजोः अहेषत दश स्वसारो अदितेर् उपस्थे आ । जिगात् उप ज्रयति गोर् अपीच्यं पदं यत् अस्य मतुथाः अजीजनन् ॥ ५ ॥ श्येनो न योनिं सदनं धिया कृतं हिरण्ययम् आ सदं देव-ए–पति । आ ईं रिणन्ति बर्हिषि प्रियं गिरा अश्वो न देवाँ अप्येति यज्ञियः ॥ ६ ॥ परा विअक्तो अरुषो दिवः कवि र्वृषा त्रिपृष्ठो अनविष्ट गाः अभि । सहस्रणीति र्यतिः परायती रेभो न पूर्वीर् उषसो वि राजति ॥७॥ त्वेषं रूपं कृणुते वर्णो अस्य स यत्रा ऽ शयत् समृता सेधति स्रिधः । अप्साः याति स्वधया दैव्यं जनं सं सुष्टुती नसते सं गोअग्रया ॥ ८ ॥ उक्षेव यूथा परियन् अरावीत् अधि त्विषीर् अधित सूर्यस्य ॥ दिव्यः सुपर्णो अव चक्षत क्षां सोमः परि क्रतुना पश्यते जाः ॥९॥

हृत्कलशांत सोमरस ओततात तेव्हां असंख्य ज्ञानीभक्त एकदम नाना प्रकारांनीं ( देवाचें ) स्तवन करतात. आपले भुजदण्ड उत्तम ठेवणारे भक्त एकत्र झालेल्या आपल्या दहा अंगुलींनीं कमनीय आणि मधुर असें सोमपेय जेव्हां अलंकृत करतात, तेव्हांहि ते अशीच स्तुति करतात २. —कधींहि विश्रांति न घेणारा सोम हा सूर्याच्या प्रभातरूप कन्येला प्रिय जो गीतध्वनि, त्याच्या आटोक्यापलीकडील ज्या उषा धेनू, त्यांच्या सन्मुख जातो; आणि 'विनंगृसा'नें त्याचा पूर्ण संतोष केला म्हणूनच दोन्ही नात्यानें ज्या सख्या वहिणी आहेत त्यांच्यासह तो वास करतो ३. —शूरांनीं स्वच्छ धुतलेला, ग्राव्यांनीं चुरलेला, यज्ञामध्यें सर्वप्रिय झालेला, प्रकाशधेनूंचा नाथ, पुरातन कालापासून आल्हादप्रद, योग्य ऋतूंत पालवणारा, सद्बुद्धीनीं मण्डित, मानवांचा हितकारी, यज्ञाचें साधन, आणि शुद्ध असा जो सोम, तो हे इन्द्रा, तुझ्याप्रीत्यर्थ ध्यानभक्तीच्या योगानें वहात आहे ४. —शूर भक्तांच्या बाहूंनीं ढवळून हलविलेला, आणि प्रवाह वाहील अशा रीतीनें पिळलेला सोमरस, हे इन्द्रा, तुझ्याप्रीत्यर्थ आपल्या स्वभावानुरूप स्वच्छ प्रवाहानें वहात आहे. त्यानें सर्व पुण्यकर्में व्यापून टाकलीं, अध्वरयागांत ध्यानप्रवृत्तींना प्रेरणा केली, आणि वृक्षावर वसणाऱ्या पक्ष्याप्रमाणें तो हरित्पल्लव सोम ( द्युलोक आणि भूलोक ह्यांमध्यें ) दोन्ही चमूपात्रांत अधिष्ठित झाला ५. —ध्वनीनें नादित, नष्ट न होणारा, प्रतिभाशाली, अशा सोमपल्लवाला पिळून, ज्ञानी, सत्कर्मशील, आणि आत्मवान् भक्तजन त्याचें दुग्ध काढतात; अशा त्या सोमाशीं ( स्तुतिरूप ) धेनू, आणि भक्तांच्या मनःप्रवृत्ति परस्पर संलग्न होतात. सनातन सद्धर्माचें उत्पत्तिस्थान जें यज्ञमंदिर तेथेंच अशा स्तुतिधेनूंचा आणि मनःप्रवृत्तींचा पुनःपुनः संगम होतो ६. —पृथ्वीच्या नाभिस्थानीं (वेदीवर ), जगदाधार

## सूक्तम् ७२

हरिमन्तः पवमान सोमः जगती

हरिं मृजन्ति अरुषो न युज्यते सं धेनुभिः कलशे सोमो अज्यते । उत् वाचम्
ईरयति हिन्वते मती पुरुष्टुतस्य कतिचित् परि प्रियः ॥ १ ॥ साकं वदन्ति बहवो
मनीषिणः इन्द्रस्य सोमं जठरे यत् आदयुः ॥ यदी मृजन्ति सुगभस्तयो नरः सनी-
ळाभि र्दशभिः काम्यं मधु ॥ २ ॥ अरममाणो अति एति गाः अभि सूर्यस्य प्रियं
दुहितुस् तिरो रवम् । अनु अस्मै जोपम् अभवत् विनंगृसः सं द्वयीभिः स्वसृभिः
क्षेति जामिभिः ॥ ३ ॥ नृधूतो अद्रिसुतो बर्हिषि प्रियः पति र्गवां प्रदिवः इन्दु
र्ऋत्वियः॥ पुरन्धिवान् मनुषो यज्ञसाधनः शुचि र्धिया पवते सोम इन्द्र ते ॥ ४ ॥
नृबाहुभ्यां चोदितो धारया सुतो अनुष्वधं पवते सोम इन्द्र ते ॥ आ ऽ प्राः ऋतून्
सम् अजैर् अध्वरे मती र्वे र्न द्रुषत् चम्वोर् आऽसदत् हरिः ॥ ५ ॥ अंशु
दुहन्ति स्तनयन्तम् अक्षितं कविं कवयो अपसो मनीषिणः । सम् ईति गावो
मतयो यन्ति संयतः ऋतस्य योना सदने पुनर्भुवः ॥ ६ ॥ नाभा पृथिव्याः धरुणो

अशा उच्च द्युलोकीं, उदकांच्या लहरींवर, नद्यांच्या अन्तर्भागीं सोमरसाचें सिंचन होतें. तोच सोम इन्द्राचें वज्र होतो; तोच वृष्टिवर्षकवीर सर्वव्यापक धनाचा स्वामी होय. हर्षोत्फुल्ल करणारा सोमच ( देवाच्या ) हृदयांकडे सुंदररीतीनें वाहतो ७. —अशा प्रकारें तूं पृथ्वीवरील रजोलोकांकडे सर्व बाजूंनीं वहात ये. तुजला धुवून स्वच्छ करणाऱ्या भक्ताला आणि स्तोतृजनाला वरदान देऊन, हे सत्कर्मप्रेरका सोमा, तूं वहात रहा. आमच्या मंदिराला जपून ठेवणाऱ्या वैभवापासून आमची ताटातूट करूं नको,आणि सुवर्णमण्डित अशा महत् वैभवाचें वस्त्र आम्हीं परिधान करूं ( असें कर ) ८. —आल्हादप्रदा सोमा, जें शेंकडों प्रकारांनीं दिलें जातें, किंबहुना हजारों प्रकारांनीं जें दिलें जाईल असें अश्वसंपन्न, गोसंपन्न, आणि सुवर्णसंपन्न वैभव आम्हांस अर्पण कर. श्रेष्ठ आणि दिव्यधनयुक्त मनो-त्साह अर्पण कर, आणि हे पावनप्रवाहा ह्या आमच्या स्तवनाकडे अगत्य ये ९.

## सूक्त ७३

सोमबिन्दूच्या धों धों आवाज करणाऱ्या परंतु मिटलेल्या ओष्ठप्रान्तांनीं ( म्हणजे अभिषवणफलकांनीं ) एकच कल्होळ उडवून दिला. रथचक्राचे तुंबे सद्धर्माच्या उद्गम-स्थानीं धांवून गेले. त्रिभुवनाचीं तीन उच्चस्थानें ( भक्तांनीं ) आक्रमण करावीं म्हणून परमात्म्यानें उत्पन्न केलीं, आणि सत्याच्या नौका सत्कर्मरत भक्ताला ( दुःखाच्या ) पार नेत्या झाल्या १. —उत्तम रीतीनें एकत्र वास करणाऱ्या महाजनांनीं नदीच्या कल्लोलांत ( सोमाला ) सरसावून दिलें तेव्हां ( भक्तीच्या ) मनोहर वाणी स्तुति गुणगुणूं लागल्या. आणि मधुररसाच्या धारांनीं "अर्क" स्तोत्र म्हणून इन्द्राला प्रिय जी भक्तिरूप तनू तिला वृद्धिंगत केलें २. —पवित्र हातीं घेतलेले भक्त ( देवाची ) स्तुति

महो दिवो अपाम् ऊर्मौ सिन्धुषु अन्त उक्षितः । इन्द्रस्य वज्रो वृषभो विभूवसुः सोमो हृदे पवते चारु मत्सरः ॥ ७ ॥ सतू पवस्व परि पार्थिवं रजः स्तोत्रे शिक्षन् आधून्वते च सुक्रतो । मा नो रि भाक् वसुनः सदनस्पृशो रयिं पिशङ्गं बहुलं वसीमहि ॥ ८ ॥ आ तू न इन्दो शतदातु अश्व्यं सहस्रदातु पशुमत् हिरण्यवत् । उप मास्व बृहती रेवतीर् इषः अधि स्तोत्रस्य पवमान नो गहि ॥ ९ ॥

## सूक्तम् ७३

पवित्रः पवमानसोमः जगती

स्रक्वे द्रप्सस्य धमतः समस्वरन् ऋतस्य योना सम् अरन्त नाभयः । त्रीन् स मूर्ध्नो असुर श्चक्र आ रभे सत्यस्य नावः सुकृतं अपीपरन्॥१॥सम्यक् सम्यञ्चो महिषाः अहेषत सिन्धोर् ऊर्मौ अधि वेनाः अवीविपन् । मधो र्धाराभि र्जनयन्तो अर्कम् इत्

चालली असतांना भोंवतीं जमतात. कारण पुराणपुरुष जो ( जगत् )पिता तो ह्या ( सत्या )च्या धर्मांचें सर्वस्वी रक्षण करतो. श्रेष्ठ वरुणानें अन्तरिक्षसमुद्राला जेव्हां झांकून टाकलें, तेव्हां केवळ ध्याननिरत भक्तच नित्य व्यवसायांमध्यें त्याला चिकटून राहूं शकले ३. —अत्युच्च द्युलोकाच्या प्रदेशांत निरंतर वाहणाऱ्या त्या मधुरभाषी सोमानीं सहस्रावधि छिद्राच्या पवित्रांत एकच निनाद उठवून दिला. ह्याचे भिरभिरी धांवणारे सेवक कधींहि डोळे मिटून स्वस्थ बसत नाहींत, तर हातांत प्रतिबंधक पाश घेऊन ते ठिकठिकाणीं असतातच ४. —( जगत् )पित्याच्या आणि मातेच्या सन्निध, ऋचेनें उज्ज्वल झालेल्या आणि धर्मभ्रष्टांस जाळून टाकणाऱ्या परिचारकांनीं एकच घोष केला. इन्द्राचा द्वेष करणारे जे कृष्णवर्ण पाखांडी दुष्ट त्यांना ते आपल्या अतर्क्य गूढ शक्तीनें भूमीवरून जोरानें उडवून आकाशांत भोवंडून ठार करतात ५. —जे पुरातन प्रमाणापासून ( च्युत होऊन ) भलताच घोष करूं लागले, जे स्तुतिस्तोत्रांवर नियन्त्रण घालूं लागले; जे सर्वत्र धुमाकूळ घालण्याच्या विचारांत निमग्न झाले, ते खरोखरच आंधळे आहेत, ते बहिरेहि आहेत. त्यांनीं सनातन धर्ममार्गाचा त्याग केला. त्या दुराचरणी दुष्टांचा कधींही उद्धार होणार नाहीं ६. —परतु मनाला कह्यांत ठेवणारे जे ज्ञानी ते हजारों धारांचें पवित्र पसरून त्यावर सोमरस गाळतांना आपली स्तुतिवाणी पवित्र करतात. अशा पुण्यशीलांचे सहायकर्ते कोण म्हणाल, तर तीव्रवेगी, द्वेषरहित, अत्युत्कृष्ट, प्रियदर्शन आणि सर्वदर्शी मरुत् हेच. ७. —सद्धर्माचा पालक आणि सत्कर्मकारी जो प्रभू त्याला कोणीहि ठकवूं शकत नाहीं; त्यानें ( मानवी ) हृदयांत तीन पवित्र वस्तु ठेवल्या आहेत. तो सर्वज्ञ देव सर्व भुवनें निरीक्षण करतो. आणि तिरस्करणीय असे जे अधार्मिक दुष्ट त्यांना त्यांचें दुष्कर्म चालू असतांनाच भोंसकून ठार करतो. ८. सद्धर्माचा तंतु सोमपवित्रांवर उलगडून ठेवला आहे. आणि वरुणाच्या अतर्क्य शक्तीनें तो ( भक्ताच्या ) जिव्हेच्या अग्रावरहि

---

प्रियाम् इन्द्रस्य तन्वम् अवीवृधन् ॥ २ ॥ पवित्रवन्तः परि वाचम् आसते पितैषाम् प्रत्नो अभि रक्षति व्रतम्। महः समुद्रं वरुणस् तिरो दधे धीरा इत् शेकुर् धरुणेषु आरभम् ॥ ३ ॥ सहस्रधारे अव ते सम् अस्वरन् दिवो नाके मधुजिह्वा असश्चतः। अस्य स्पशो न नि मिषन्ति भूर्णयः पदेपदे पाशिनः सन्ति सेतवः ॥ ४ ॥ पितुर् मातुर् अधि आ ये सम् अस्वरन् ऋचा शोचन्तः संदहन्तो अव्रतान्। इन्द्रद्विष्टाम् अप धमन्ति मायया त्वचम् असिक्नीं भूमनो दिवस् परि ॥५॥ प्रत्नात् मानात् अधि आ ये सम् अस्वरन् श्लोकयन्त्रासो रभसस्य मन्तवः। अपानक्षासो बधिरा अहासत ऋतस्य पन्थाम् न तरन्ति दुष्कृतः ॥ ६ ॥ सहस्रधारे वितते पवित्रे आ वाचं पुनन्ति कवयो मनीषिणः ॥ रुद्रास एषाम् इषिरासो अद्रुहः स्पशः सुअञ्चः सुदृशो नृचक्षसः ॥ ७ ॥ ऋतस्य गोपा न दभाय सुक्रतुस् त्री ष पवित्रा हृदि अन्त आ दधे। विद्वान् स विश्वा भुवनाऽभि पश्यति अव जुष्टान् विध्यति कर्ते अव्रतान् ॥ ८ ॥ ऋतस्य

आहे. प्रज्ञावान् जे भक्त असतात ते समजूनच सद्धर्मांचा तंतु स्वाधीन करून घेतात. परंतु हें काम करण्याला जो असमर्थ असेल तो मात्र धडपडत खालीं पडतो ९.

## सूक्त ७४

नुकत्याच उपजलेल्या बालकाप्रमाणें तो वनामध्यें खालीं वांकून मोठ्यानें गर्जना करितो; कारण, अरुणवर्ण सत्वाढ्य वीर स्वर्लोक जिंकण्याला उद्युक्त होत आहे. उदकाची भरपूर वृद्धि करणारें जें द्युलोकांतील बीज त्याच्याबरोबर जो नेहमीं असतो त्या सोमाजवळ आम्हीं सद्बुद्धीनें त्याचा उदार आश्रय मागत आहों १. —जो हा द्युलोकाचा अतिविस्तीर्ण आधारस्तंभ, जो हा परिपूर्ण भरलेला किरणपल्लव, तो सर्व बाजूंनीं सर्वत्र संचार करतो; तोच ह्या आच्छादित आणि उत्तम रीतीनें एकत्र वास करणाऱ्या थोर द्यावापृथिवींना संतुष्ट करो. त्याच काव्यप्रेरक देवानें मनोत्साहाचें धारण केलें आहे २. —उत्तमरीतीनें बनविलेले नामांकित पक्वान्न म्हणजे मधुर सोमपेय, आणि धेनूसाठीं अदितीचा विस्तृत प्रदेश अशी देणगी सद्धर्मानें वागणाऱ्या भक्तांकरितांच आहे. प्रकाशशाली वृषभ जो सोम तो येथूनच पर्जन्यवृष्टीवर अधिकार चालवितो; जो येथें येऊन भक्तांचें रक्षण करतो तोच सोम ( दिव्य )उदकांचा धुरीण आहे. ऋक्स्तोत्रांनीं प्रशंसा करण्यास तोच योग्य होय ३. —आत्म्यानें व्याप्त असें जें आकाश त्याच्यापासून उदकरूप घृताचें दोहन होतें. सद्धर्माचा गाभा म्हणजे अमृत, तेंहि तेथूनच उत्पन्न होतें. म्हणून उत्तम रीतीनें एकत्र राहणारे दानशूर भक्त त्याच्यावरच प्रेम करतात, सर्वांना पार पाडणारे शूर भक्त त्या हितकर सोमाकडूनच उदकाचा वर्षाव करवितात ४. —उदककल्लोळांनीं चिंब झालेल्या सोमरसानें मोठ्यानें

---

तन्तु विततः पवित्रे आ जिह्वायाः अग्रे वरुणस्य मायया । धीरा श्चित् तत् सम् इनक्षन्त आशत अत्रा कर्तम् अव पदाति अप्रभुः ॥ ९ ॥

## सूक्तम् ७४

दीर्घतमाः पवमानसोमः जगती

शिशु नं जातः अवचक्रदत् वने स्व र्यत् वाजी अरुषः सिषासति । दिवो रेतसा सचते पयोवृधा तम् ईमहे सुमती शर्म सप्रथाः ॥ १ ॥ दिवो यः स्कम्भो धरुणः सु आततः आपूर्णो अंशुः परिएति विश्वतः । स इमे मही रोदसी यक्षत् आवृता समीचीने दाधार सम् इषः कविः ॥२॥ महि प्सरः सुकृतं सोम्यं मधु उर्वी गव्यूतिर् अदितेः ऋतं यते । ईशे यो वृष्टेर् इत उस्रियो वृषा अपां नेता यः इतऊति ऋग्मियः ॥ ३ ॥ आत्मन्वत् नभो दुह्यते घृतं पयः ऋतस्य नाभिर् अमृतं विजायते । समीचीनाः सुदानवः प्रीणन्ति तं नरो हितम् अव मेहन्ति पेरवः ॥ ४ ॥ अरावीत् अंशुः सच-

गर्जना केली, मानवांच्या हिताकरितां आपला देवसेवेला योग्य असा पल्लव तो टवटवीत करितो. आणि अदितीच्या सन्निध तो आपला अंकुर असा ठेवतो कीं, त्या योगानें आम्हांला पुत्रपौत्रांचा लाभ घडतो ५. —हजारों छिद्राच्या पवित्रांतून, त्याच्या तिसऱ्या रजपटलांतून, प्रजेला हितकर अशा अविरतप्रवाही धारा वहात राहोत. त्या ( सोमा )चे चार मुख्य भाग द्युलोकाच्या खालींच ठेवलेले आहेत, ते घृतानें थवथवले म्हणजे अमृतमय हविर्भाग ( देवाकडे ) नेतात ६. —शुभ्र आणि तेजस्वी असें रूप सोम ( स्वतः ) धारण करतो; आणि तसेंच रूप तो भक्तांना मिळवून देतो. सोम हा कामनावर्षक ईश्वरांश आहे. तो विपुल वरदान देतो. उतरत्या जागेकडे उदक धांवतें त्याप्रमाणें यज्ञकर्माकडे ध्यानानें आणि सत्कर्मांनें सहज येतो; आणि उदकानें तुडुंब भरलेल्या द्युलोकाच्या पटलाला वृडाशीं छेद पाडतो ७. —शुभ्रवर्ण आणि दुग्धपूर्ण कलशाकडे सत्वाढय सोम, जयेच्छु योद्धा रणाकडे धांवतो त्याप्रमाणें, धांवत गेला, तेव्हां मनःपूर्वक देवोत्सुक झालेल्या भक्तांनीं शंभर वर्षे जगलेल्या वृद्ध कक्षीवानाकडे धेनूंची देणगी पाठविली ८. —सोमा, उदकांशीं मिश्र झालेला जो तूं, त्या तुझा रस, हे पावना, लोंकरीच्या पवित्रांतून पहा कसा झरझर वहात आहे. प्रतिभावान् भक्तांनीं तुजला अलंकृत केलें आहे, तर हे अत्यंत हर्षकरा, हे पावना, इन्द्रानें प्राशन करावें म्हणून तूं मधुररुचिप्रद हो ९.

## सूक्त ७५

सर्वप्रिय आणि प्रभावशाली सोम हा ( देवाच्या ) ज्या नांवामध्यें तल्लीन होतो, त्या नांवाकरितां वहात राहतो. थोर आणि सूक्ष्मज्ञानी सोमानें थोर सूर्याच्या सर्वगामी

---

मान ऊर्मिणा देवाव्यं मनुषे पिन्वति त्वचम्। दधाति गर्भम् अदितेर् उपस्थे आ येन तोकं च तनयं च धामहे ॥ ५ ॥ सहस्रधारे अव ताः असश्चतस् तृतीये सन्तु रजसि प्रजावतीः। चतस्रो नाभो निहिताः अवो दिवो हवि र्भरन्ति अमृतं घृतश्चुतः ॥६॥ श्वेतं रूपं कृणुते यत् सिषासति सोमो मीढ्वाँ असुरो वेद भूमनः। धिया शमी सचते से-म् अभि प्रवत् दिवः कवन्धम् अव दर्षत् उद्रिणम् ॥ ७ ॥ अध श्वेतं कलशं गोभिर् अक्तं कार्ष्मन् आ वाजी अक्रमीत् ससवान्। आ हिन्विरे मनसा देवयन्तः कक्षीवते शतं हिमाय गोनाम् ॥ ८ ॥ अद्भिः सोम पपृचानस्य ते रसः अव्यो वारं वि पवमान धावति। स मृज्यमानः कविभि र्मदिन्तम स्वदस्वे-न्द्राय पवमान पीतये ॥ ९ ॥

## सूक्तम् ७५

भार्गवः कविः पवमानसोमः जगती

अभि प्रियाणि पवते चनोहितो नामानि यह्वो अधि येषु वर्धते। आ सूर्यस्य बृहतो बृहन् अधि रथं विष्वञ्चम् अरुहत् विचक्षणः ॥ १ ॥ ऋतस्य जिह्वा पवते मधु

रथावर आरोहण केलें १ —सद्धर्माची वाणी प्रिय आणि मधुर असा रसप्रवाह सोडते. त्या वाणीचा जो वक्ता तो ह्या ध्यानवुद्धीचा पति होय. तो अजिंक्य आहे. म्हणून तो पुत्र आपल्या मातापितरांचें तिसरें जें गूढ नामाभिधान तें तेज:पुंज द्युलोकाच्या प्रदेशीं गुप्त ठेवतो. २ —दीप्तिमान् सोम शूर ऋत्विजांनीं सुवर्णाच्या सांठवणींत ठेऊन पिळला म्हणजे खालीं ठेवलेल्या कलशांत वहातांना गर्जना करितो. सत्यधर्माचें दोहन करणाऱ्या ऋत्विजांनीं सोमाचें स्तवन केलें तेव्हां तीन पृष्ठभागीं अधिष्ठित झालेला सोम उष:कालीं आपल्या तेजानें शोभूं लागला ३. —ग्राव्यांनीं पिळलेला आणि मन:पूर्वक केलेल्या स्तुतीनीं ( देवाला ) प्रिय झालेला शुद्ध सोमरस (जगताचीं) मातापितरें ज्या द्यावापृथिवी त्यांना उज्ज्वल करून ऊर्णावस्त्राच्या पवित्रावर त्याच्या भोंवतीं अनेक प्रकारानें वहात आहे; त्या मधुर सोमाची धार भरगच्च फुगलेली असते ४. —हे सोमा, ( जगाच्या ) कल्याणासाठीं, शूर ऋत्विजांनीं तुजला गाळून स्वच्छ केलें आहे, तर तूं सर्व बाजूंनीं वहात रहा. आणि तुझे जे हर्षोत्फुल्ल करणारे आणि खळखळाट उडविणारे उत्तुंग रसप्रवाह त्यांच्या योगानें, आम्हांला वरप्रसाद देण्याची इच्छा तूं इन्द्रामध्यें उत्पन्न कर. ५.

## दुसरा अध्याय समाप्त.

---

## अध्याय तिसरा

## सूक्त ७६

द्युलोकाचा धारक, कर्तृत्ववान्, आणि दिव्यविभूतिमध्यें चतुर असा सोमरस वहात आहे, त्याची प्रशंसा भक्तांनीं करावी हें अगदीं योग्य. सत्वाढ्यवीरांनीं भरधांव फेंकलेल्या अश्वांप्रमाणें हरिद्वर्ण सोम हा नदीच्या उदकांत आपलें तेजोवल सहजगत्या प्रकट करतो १. —शूराप्रमाणें, प्रकाशधेनू जिंकण्याच्या झुंजांत स्वर्गीयप्रकाश स्वाधीन करून घेणारा हा योद्धा आपल्या दोन्हीं हातांत आयुधें वाळगितो. इन्द्राच्या प्रतापाला प्रोत्साहन

---

प्रियं वक्ता पति र्धियो अस्याः अदाभ्यः। दधाति पुत्रः पित्रोर् अपीच्यं नाम तृतीयम् अधि रोचने दिवः ॥ २ ॥ अव द्युतानः कलशाँ अचिक्रदत् नृभि र्येमानः कोश आ हिरण्यये। अभीम् ऋतस्य दोहनाः अनूषत अधि त्रिपृष्ठः उषसो वि राजति ॥ ३ ॥ अद्रिभिः सुतो मतिभि श्चनोहितः प्ररोचयन् रोदसी मातरा शुचिः। रोमाणि अव्या समया वि धावति मधो र्धारा पिन्वमाना दिवेदिवे ॥ ४ ॥ परि सोम प्र धन्व स्वस्तये नृभिः पुनानो अभि वासया-शिरम्। ये ते मदाः आहनसो विहायसस् तेभिर् इन्द्रं चोदय दातवे मघम् ॥ ५ ॥

## इति सप्तमे द्वितीयोऽध्यायः

---

देणारा हा आल्हादप्रद सोमरस कर्मनिष्ठ भक्तांनीं ढवळला आहे. आणि मनोजय करणाऱ्या भक्तांनीं दुग्धाशीं मिश्रित केला आहे. २. —सोमा, तूं कल्लोलानें आपला जोम प्रत्ययास आणतोस; तर तूं स्वच्छप्रवाहानें वहात राहून इन्द्राच्या ( द्रोणकलशरूप ) उदरांत प्रवेश कर. मेघाला ज्याप्रमाणें विद्युत् त्याप्रमाणें द्यावापृथिवींना तूं आमच्यासाठीं समृद्ध कर. ध्यानयुक्तीनें तूं भक्तांना सत्वसामर्थ्यांच्या जवळ नेतोस ३. —विश्वाचा राजा, दिव्य-प्रकाशदर्शक असा सोम स्वच्छ प्रवाहानें वहात आहे. ऋषींच्या अशा या धुरीणानें सनातन सत्याचें मनन चालविलें. जो सूर्याच्या तीव्र किरणांनीं घांसला जातो, तो हा ( सोम ) सन्मतींचा पिता होय. कवनांनीं याचें आकलन होतच नाहीं ४. —वृषभ जसा गोस-मूहाकडे, त्याप्रमाणें तूं चोहोंकडून द्रोणकलशांकडे धांवतोस. नदीप्रवाहाजवळ त्या वृषभानें डुरकणी फोडलीच. हे अत्यंत हर्षप्रदा सोमा, तूं इन्द्रासाठीं स्वच्छ प्रवाहानें वहातोस, तर तूं संरक्षण केलेले आम्हीं भक्त संग्रामामध्यें विजयी होऊं असें कर ५.

## सूक्त ७७

हा मधुररस कलशांत खळखळत वहात गेला. मनोहर वस्तूपेक्षां मनोहर असा हा सोमरस इन्द्राचें वज्रच होय. ( म्हणून ) विपुल दुग्ध देणाऱ्या, घृतानें ओथंबणाऱ्या,

---

### अथ तृतीयोऽध्यायः

## सूक्तम् ७६

भार्गवः कविः पवमानसोमः जगती

धर्ता दिवः पवते कृत्व्यो रसो दक्षो देवानाम् अनुमाद्यो नृभिः । हरिः सृजानो अत्यो न सत्वभि र्वृथा पाजांसि कृणुते नदीषु आ ॥ १ ॥ शूरो न धत्ते आयुधा गभस्त्योः स्वः सिषासन् रथिरो गविष्टिषु । इन्द्रस्य शुष्मम् ईरयन् अपस्युभिर् इन्दु र्हिन्वानो अज्यते मनीषिभिः ॥ २ ॥ इन्द्रस्य सोम पवमान ऊर्मिणा तविष्यमाणो जठरेषु आ विश । प्र णः पिन्व विद्युत् अभ्रेव रोदसी धिया न वाजाँ उप मासि शश्वतः ॥ ३ ॥ विश्वस्य राजा पवते स्वर्दृशः ऋतस्य धीतिम् ऋषिषाळ् अवीवशत् । यः सूर्यस्य असिरेण मृज्यते पिता मतीनाम् असमष्टकाव्यः ॥ ४ ॥ वृषेव यूथा परि-कोशम् अर्षसि अपाम् उपस्थे वृषभः कनिक्रदत् । स इन्द्राय पवसे मत्सरिन्तमो यथा जेषाम समिथे त्वोतयः ॥ ५ ॥

## सूक्तम् ७७

पूर्ववत्

एष प्रकोषे मधुमाँ अचिक्रदत् इन्द्रस्य वज्रो वपुषो वपुष्टरः । अभीम् ऋतस्य सुदुघाः घृतश्चुतो वाश्राः अर्षन्ति पयसे–व धेनवः ॥ १ ॥ पूर्व्यः पवते यं दिवस्

धेनू हंबारत प्रवाहाप्रमाणें त्याच्याकडे धांवतात १. —तो हा पुरातन सोम, कीं ज्याला श्येनानें द्युलोकांतून एकदम उचलून आणलें, आणि जो रजोलोकांतून नीट खालीं सोडला गेला, तो स्वच्छ प्रवाहानें वहात आहे. धनुर्धर कृशानूच्या पुढें कांपत कांपत येणारा पल्लव भ्यालेल्या मनानेंच जणों मधुर रस निराळा करतो २. —तुझे पहिले आणि आतांचे आल्हादप्रद बिन्दु आम्हांला गोसंपन्न असें विपुल सत्वसामर्थ्य प्राप्त करून घेण्याची प्रेरणा करतात. ते सोमबिन्दु खरोखरच प्रेक्षणीय असतात. 'अह्यां'प्रमाणें सुंदर असतात. त्यांनीं प्रत्येक प्रार्थनास्तोत्र, प्रत्येक हवि गोड करून घेतलें असतें ३. —हा आमचा सर्वज्ञ, इकडे मानवांकडे येणारा, आणि ज्याची स्तुति सर्वांनीं अगदीं मनःपूर्वक केली आहे असा सोमरस प्रतिस्पर्ध्यांना पादाक्रांत करतो. ज्या सोमानें ईश्वराच्या निवासस्थानीं आपला पल्लव ठेवला, तो हा सोम, प्रकाशधेनूंच्या विस्तीर्ण द्वाराकडे वहात जातो ४. —कर्तृत्ववान्, कर्मकुशल सोम, द्युलोकांतून स्वच्छ प्रवाहानें वहातो. तो श्रेष्ठ आणि अजिंक्य वरुणच होय. तो भक्ताकडे वळसे घेत घेत वहात जातो. ज्याचा पिळलेला रस आम्हांला संकटांमध्यें मननीय असा मित्रच होतो, तो हा सोम, चलाख अश्व आपल्या समूहांत खिंकाळतो त्याप्रमाणें, वीर्य गाजविण्यास उत्सुक होऊन गर्जना करतो ५.

## सूक्त ७८

सोमराजा वाणीला प्रेरणा करून आणि उदकाशीं मिश्र होऊन वाहून राहिला आहे. प्रकाशधेनूंना उद्देशून तो देवाचें यजन ( भक्ताकडून ) करवितो. त्याचें लोंकराचें

---

परि श्येनो मथायत् इषितस् तिरो रजः । स मध्व आ युवते वेविजान इत् कृशानोर् अस्तु र्मनसाऽह बिभ्युषा ॥ २ ॥ ते नः पूर्वास उपरास इन्दवो महे वाजाय धन्वन्तु गोमते । ईक्षेण्यासो अह्यो न चारवो ब्रह्मब्रह्म ये जुजुषु र्हविर्हविः ॥ ३ ॥ अयं नो विद्वान् वनवत् वनुष्यतः इन्दुः सत्राचा मनसा पुरुष्टुतः । इनस्य यः सदने गर्भम् आ दधे गवाम् उरुब्जम् अभि अर्षति व्रजम् ॥ ४ ॥ चक्रि र्दिवः पवते कृत्व्यो रसो महाँ अदब्धो वरुणो हुरुक् यते । असावि मित्रो वृजनेषु यज्ञियो अत्यो न यूथे वृषयुः कनिक्रदत् ॥ ५ ॥

## सूक्तम् ७८

ऋष्याद्याः पूर्ववत्

प्र राजा वाचं जनयन् असिष्यदत् अपो वसानो अभि गाः इयक्षति । गृभ्णाति रिप्रम् अविर् अस्य तान्वा शुद्धो देवानाम् उप याति निष्कृतम् ॥ १ ॥ इन्द्राय सोम



जें गाळणें आहे तें आपल्या तंतूंनीं त्यांतील चोथा एका बाजूस सारून देतें. त्यामुळें तो स्वच्छ होऊन दिव्यविभूतिंच्या गृहांकडे गमन करतो १. —सोमा, शूर ऋत्विजांकडून तूं इन्द्राप्रीत्यर्थ पात्रांत ओतला जातोस. तूं सर्व मनुष्यांना अवलोकन करणारा आहेस; ( आनंदाचा ) कल्लोल आणि प्रतिभावान् असा तूं वनांतून ( देवाकडे ) गमन करतोस. तुझे अनेक प्रवाह तिकडे जाण्यास सिद्धच असतात, आणि तुझे रसरूप अश्व चमूपात्रांत ओतलेले हजारों दिसतात २. —समुद्राच्या आंत वास करणाऱ्या अप्सरा मनोजयी सोमाकडे धांवत गेल्या.—त्याच अप्सरा, यज्ञमंदिरांत सतत वास्तव्य करणाऱ्या यजमानाला उल्लसित करतात, आणि पावनप्रवाही सोमाजवळ अक्षय सुख मागतात ३. —आम्हांसाठीं प्रकाशधेनू जिंकणारा, रथ जिंकणारा, सुवर्ण जिंकणारा, दिव्यप्रकाश जिंकणारा, (दिव्य) उदकें जिंकणारा, इतकेंच नव्हे तर अगणित वस्तु जिंकणारा असा सोम स्वच्छ प्रवाहानें वहात आहे. ज्या सोमाला, ज्या हर्षकर, अत्यंत रुचिर, अरुणवर्ण आणि जनहितकर सोमबिन्दूला दिव्यविभूतिंनीं आपलें पेय केलें तो वहात आहे ४. —हे सोमा, तूं पावनप्रवाह आमचा कनवाळू आहेस, जीं जीं वैभवें आहेत तीं तीं आमच्यासाठीं तूं सत्यतेस आणून वहातोस. तर आमचा शत्रु, मग तो जवळ असो किंवा दूर असो, त्याला ठार कर, आणि आमच्या गोधनासाठीं विस्तीर्ण प्रदेश देऊन आम्हांला निर्भय कर ५.

## सूक्त ७९

ज्यांना कोणाकडूनहि प्रेरणा होण्याची आवश्यकता नाहीं असे आल्हादप्रद हरिद्वर्ण सोमरस पिळले असतां श्रेष्ठ आणि परमोच्च स्वर्लोकाकडे आपला ओघ लोटोत. आमचा

---

परि षिच्यसे नृभि नृचक्षाः ऊर्मिः कविर् अज्यसे वने । पूर्वी हि ते स्रुतयः सन्ति यातवे सहस्रम् अश्वाः हरय श्चमूषदः ॥ २ ॥ समुद्रियाः अप्सरसो मनीषिणम् आसीनाः अन्तर् अभि सोमम् अक्षरन् । ता ईं हिन्वन्ति हर्म्यस्य सक्षणिं याचन्ते सुम्नं पवमानम् अक्षितम् ॥ ३ ॥ गोजित् नः सोमो रथजित् हिरण्यजित् स्वर्जित् अप्जित् पवते सहस्रजित् । यं देवास श्चक्रिरे पीतये मदं स्वादिष्ठं द्रप्सम् अरुणं मयोभुवम् ॥४॥ एतानि सोम पवमानो अस्मयुः सत्यानि कृण्वन् द्रविणानि अर्षसि । जहि शत्रुम् अन्तिके दूरके च यः उर्वीम् गव्यूतिम् अभयं च न-स्कृधि ॥ ५ ॥

## सूक्तम् ७९

ऋष्याद्याः पूर्ववत्

अचोदसो न धन्वन्तु इन्दवः प्र सुवानासो बृहद्दिवेषु हरयः । वि च नशत् नः इषो अरातयः अर्यो नशन्त सनिषन्त नो धियः ॥१॥ प्र णो धन्वन्तु इन्दवो मदच्युतो

उत्साह( रूप हविर्भाग देवाला ) अर्पण करूं न देणारे जे शत्रु ते नष्ट होवोत. पहा, शत्रु नाश पावले आणि आमच्या आकांक्षा यशस्वी झाल्या १. —हर्षभरानें ओथंबलेले सोम-बिन्दु आमच्याकडे धनाचा ओघ लोटून देवोत. त्या धनांच्या योगानें आम्हीं अश्वारूढ होऊन शत्रूंवर तुटून पडूं. कोणताहि मानव असो त्याच्या कपटजालाचा विध्वंस करून आम्हीं यशोधन चोहोंकडून जिंकून आणूं २. —सोम हा आपल्या स्वतःच्या शत्रूचा शत्रू आहे तसाच आमच्यासारख्या इतर ( भक्तां )च्याहि शत्रूंचा वृकच आहे. रेताड मैदानांत तहानेनें सारावें त्याप्रमाणें हे सोमा, त्या दुराराध्य ( हट्टी ) शत्रूंना अगदीं निपटून टाक ३. —तुझा जो उत्कृष्ट पल्लव द्युलोकांत मुख्य जागीं आहे तोच पृथिवीच्या शिखरावर ( ऋत्विजांनीं ) रोवून दिला आहे. म्हणूनच गव्याच्या चर्मावर ठेऊन ग्रावे तुजला चुरून टाकतात आणि मनोनिग्रही ऋत्विज् तुजला उदकांत कालवून तुझें दोहन करतात ४. —याप्रमाणें हे आल्हादरूपा सोमा, तुझा व्यापक, सामर्थ्यशाली आणि मनोहर रस, तुझ्या आश्रयाला प्रथम येणारे ऋत्विज् जोरानें चुरून सिद्ध करीत आहेत. तर हे पावनप्रवाहा, प्रत्येक निन्दकाच्या तडाक्यांतून आम्हांला पार ने आणि तुझा प्रिय हर्षकारी रस प्रतापी आहे असें निदर्शनास आण ५.

## सूक्त ८०

मानवांचें निरीक्षण करणाऱ्या सोमाचा प्रवाह स्वच्छ वहात आहे. तो सनातन सद्धर्मांच्या योगानें दिव्यविभूतिंना द्युलोकाच्या उच्च भागांतून पाचारण करतो. आणि बृहस्पतीच्या सिंहनादाबरोबरच प्रकाशित होतो. त्याच्या सवनांनीं समुद्राप्रमाणें यज्ञमंदिरें

धना वा येभिर् अवतो जुनीमसि । तिरो मर्तस्य कस्य चित् परिह्वृतिं वयं धनानि विश्वधा भरेमहि ॥ २ ॥ उत स्वस्याः अरात्याः अरि र्हि षः उतान्यस्याः अरात्याः वृको हि सः । धन्वन् न तृष्णा सम् अरीत ताँ अभि सोम जहि पवमान दुराध्यः॥३॥ दिवि ते नाभा परमो य आददे पृथिव्या स्ते रुरुहुः सानवि क्षिपः । अद्रय स्त्वा बप्सति गोर् अधित्वचि अप्सु त्वा हस्तै र्दुदुहु र्मनीषिणः ॥ ४ ॥ एवा ते इन्दो सुभ्वं सुपेशसं रसं तुञ्जन्ति प्रथमाः अभि श्रियः । निदं निदं पवमान नि तारिषः आविस् ते शुष्मो भवतु प्रियो मदः ॥ ५ ॥

## सूक्तम् ८०

भारद्वाजो वसुः पवमानसोमः जगती

सोमस्य धारा पवते नृचक्षसः ऋतेन देवान् हवते दिवस् परि । बृहस्पते रवथेना वि दिद्युते समुद्रासो न सवनानि विव्यचुः ॥ १ ॥ यं त्वा वाजिन् अघ्न्याः

व्यापून टाकलीं १. —हे सत्वाढ्या, ज्या तुजसाठीं अश्राप धेनू हंबारून राहिल्या, तो तूं तेजःपुंज सोम आपल्या लोहमय स्थानांत आरूढ होतोस, आणि आमच्या यजमानांचें आयुष्य आणि थोर कीर्ति यांना वृद्धिंगत करून, हे सोमा, तूं वीर्यशाली हर्षप्रकर्षानें इन्द्राप्रीत्यर्थ स्वच्छ प्रवाहानें वहातोस २. —इन्द्राच्या ( कलशरूप ) जठरांत अत्यंत हर्षकर आणि मंगलरूप सोमरस ओजस्वितेचें वस्त्र परिधान करून ( धर्माची ) प्रख्याति व्हावी म्हणून स्वच्छ प्रवाहानें वहातो. त्यानें स्वतः अखिल भूप्रदेशावर आपल्या यशाचा विस्तार केला, आणि तो हरिद्वर्ण अश्वारूढ वीर क्रीडा करीत ( रसरूपानें वाहूं ) लागला ३. —दिव्यविबुधासाठीं, तुझ्या त्या अत्यंत मधुर आणि हजारों धारा सोडणाऱ्या रसाचें, शूर ऋत्विज् आणि त्यांच्या दहा अंगुलि मिळून दोहन करितात; त्याच शूर ऋत्विजांनीं हे सोमा तुला ग्राव्यांनीं चुरून पिळला आहे, तर सहस्रावधि धनें जिंकणारा असा तूं अखिल दिव्यजनांसाठीं स्वच्छ प्रवाहानें वहा ४. —उत्तम भुजदण्डांचे ऋत्विज् आणि त्यांच्या दहा अंगुलि ( एकत्र मिळून ) ग्राव्यांच्या योगानें तुझ्या मधुरस्रावी वीर्यशाली रसाचें उदकांमध्यें दोहन करतात; आणि हे सोमा तूंहि इन्द्राला आणि दिव्यविबुधांना हर्षउत्पन्न करून समुद्राच्या लाटेप्रमाणें उचंवळून स्वच्छ प्रवाहानें वहातोस ५

## सूक्त ८१

स्वच्छ प्रवाहानें वहाणाऱ्या सोमाचे मनोहर कल्लोल इन्द्राच्या ( कलशरूप ) उदरांत प्रवेश करतात. तेथें, धेनूंचें प्रत्यक्ष यशच असें जें घट्ट दूध त्यानें त्या रसाला रुचकरपणा आणला आणि त्या सोमरसांनीं (भक्ताला ) वरदान देण्यासाठीं इन्द्राला हर्ष निर्भर केलें १. —खरोखरच रथ ओढून नेणाऱ्या आणि भरधांव दौडणाऱ्या तेजस्वी अश्वांप्रमाणें

अभि अनूषत अयोहतं योनिम् आ रोहसि द्युमान् । मघोनाम् आयुः प्रतिरन् महि श्रवः इन्द्राय सोम पवसे वृषा मदः ॥ २ ॥ ए—न्द्रस्य कुक्षा पवते मदिन्तमः ऊर्जं वसानः श्रवसे सुमङ्गलः । प्रत्यङ् स विश्वा भुवनाऽभि पप्रथे क्रीळन् हरिर् अत्यः स्यन्दते वृषा ॥ ३ ॥ तं त्वा देवेभ्यो मधुमत्तमं नरः सहस्रधारं दुहते दश क्षिपः । नृभिः सोम प्रच्युतो ग्रावभिः सुतो विश्वान् देवाँ आ पवस्व सहस्रजित् ॥ ४ ॥ तं त्वा हस्तिनो मधुमन्तम् अद्रिभि र्दुहन्ति अप्सु वृषभं दश क्षिपः । इन्द्रं सोम मादयन् दैव्यं जनं सिन्धोरिव ऊर्मिः पवमान अर्षसि ॥ ५ ॥

## सूक्तम् ८१

### पूर्ववत्

प्र सोमस्य पवमानस्य ऊर्मयः इन्द्रस्य यन्ति जठरं सुपेशसः । दध्ना यदीम् उन्नीताः यशसा गवां दानाय शूरं उद–मन्दिषुः सुताः ॥ १ ॥ अच्छा हि सोमः

सोम हा द्रोणकलशांकडेच वहात राहिला; आणि नंतर दिव्यविभूतिंचे दोन्ही जन्म जाणणारा सोम, इहलोक आणि दिव्यलोक ह्या दोन्ही ठिकाणीं सर्वत्र व्यापून राहिला २. —हे सोमा, हे आल्हादप्रदा, पावनप्रवाहानें वहाणारा तूं अत्युत्कृष्ट धन आमच्याकडे विखरून टाक, आणि श्रेष्ठ अशा वरदानाचा दाता हो. तारुण्याचा उत्साह देणाऱ्या सोमा, मला "**वसला**" तूं आपल्या उत्तम चैतन्यानें शिकव, आणि आमचें कल्याण आमच्यापासून दूर झुगारून देऊं नको ३. —पूषा, पावनप्रवाह सोम, भक्तवश मित्र आणि वरुण हे आमच्याकडे आगमन करोत. तसेंच, प्रेमळ बृहस्पति, मरुत्, वायु, अश्वीदेव, त्वष्टा, सविता आणि उत्तम नियम घालून देणारी सरस्वती हेहि आगमन करोत ४. —सर्वव्यापक द्यावापृथिवी, देदीप्यमान अर्यमा, अदिति, दैवघटना घडविणारा प्रशंसनीय भग, विस्तीर्ण अन्तरिक्ष आणि त्याचप्रमाणें सर्व दिव्यविबुध हे स्वच्छ प्रवाहानें वहाणाऱ्या सोमाचा स्वीकार करोत ५.

## सूक्त ८२

सोमरस पिळला आहे; तो अरुणवर्ण, वीर्यशाली हरिद्वर्ण आणि अद्भुतस्वरूप सोम हा राजाप्रमाणें ( दिसत आहे; ) प्रकाशधेनूंना अनुलक्षून त्यानें गर्जना केली, आणि स्वच्छ होतांना तो लोंकरीच्या गाळण्याकडे घृताप्रमाणें मृदु अशा त्या आपल्या स्थानीं आरूढ होण्यासाठीं श्येनपक्ष्याप्रमाणें धांवत गेला १. —तूं स्फूर्तिदाता यज्ञसंस्था चालविण्याच्या इच्छेनें त्या महा पवित्रावर अधिष्ठित होतोस, आणि चपल वीराप्रमाणें स्वच्छ होऊन सात्विक कार्याला अनुलक्षून वहातोस; तर हे सोमा, सकल संकटांचें उच्चा-

---

कलशाँ असिष्यदत् अत्यो न वोळ्हा रघुवर्तनि र्वृषा । अथ देवानाम् उभयस्य जन्मनो विद्वाँ अश्नोति अमुतः इतश्च यत् ॥ २ ॥ आ नः सोम पवमानः किरा वसु इन्दो भव मघवा राधसो महः । शिक्षा वयोधाः वसवे सु चेतुना मा नो गयम् आरे अस्मत् परा सिचः ॥ ३ ॥ आ नः पूषा पवमानः सुरातयो मित्रो गच्छन्तु वरुणः सजोषसः । बृहस्पति र्मरुतो वायुर् अश्विना त्वष्टा सविता सुयमा सरस्वती ॥ ४ ॥ उभे द्यावा पृथिवी विश्वमिन्वे अर्यमा देवो अदिति र्विधाता । भगो नृशंसः उरु अन्तरिक्षं विश्वे देवाः पवमानं जुषन्त ॥ ५ ॥

## सूक्तम् ८२

पूर्ववत्

असावि सोमो अरुषो वृषा हरी राजेव दस्मो अभि गाः अचिक्रदत् । पुनानो वारं परि एति अव्ययं श्येनो न योनिं घृतवन्तम् आसदम् ॥ १ ॥ कवि र्वेधस्या परि-

टन करून आम्हांवर कृपा कर. तूं घृता(प्रमाणें मृदु) वस्त्र परिधान करून सर्व पवित्र व्यापून टाकतोस २. —पर्जन्य हा त्या श्रेष्ठ अशा सोमपल्लवाचा पिता होय. पृथिवीचा मुख्य भाग जे पर्वत त्यांच्या ठिकाणीं तो वास करतो. तेथें भगिनी आपोदेवी प्रकाशधेनूंना उद्देशून वहात गेल्या आणि चित्ताकर्षी अशा अध्वरांत ग्राव्यांशीं संलग्न झाल्या ३. —पत्नी जशी पतीच्या ठिकाणीं अर्पावी, त्याप्रमाणें भक्ताच्या ठिकाणीं तूं आपल्या कृपेची देणगी अर्पण करतोस. तर, पर्जन्याच्या बालका सोमा, मी तुजला जें बोलतों तें ऐकून घे. ( भक्तांच्या ) स्तुतींच्या आंत तू भरून रहा; आणि त्यांनीं उत्तम रीतीनें जगावें म्हणून निष्कलंक असा तूं आमच्या प्रदेशांमध्यें जागृत रहा ४. —हे आल्हादप्रदा अपराजित सोमा, शेंकडों वरदानें, किंबहुना सहस्रावधि देणग्या देणारा अशा त्वां पूर्वीच्या भक्तांकडे सत्वसामर्थ्य चोहोंकडून नेलेंस. त्याचप्रमाणें आतांहि आमच्या अपूर्व अभ्युदयासाठीं स्वच्छप्रवाहानें वहा. प्रत्यक्ष आपोदेवीसुद्धां तूं घालून दिलेल्या नियमानुसारच चालतात ५.

## सूक्त ८३

हे प्रार्थनास्तोत्राच्या प्रभो, हें तुझें पवित्र ( वस्त्र ) विस्तृत पसरलें आहे. तूं त्याचा स्वामी म्हणून त्याच्या सर्व धाग्यादोऱ्यांना तूं सर्वतोपरि व्यापून राहतोस. ज्यानें तपानें आपलें शरीर तापविलें नाहीं अशा कच्च्या मनुष्याला ही गोष्ट साधणार नाहीं. पण पुण्याचा भार वहाणारे आणि (तपश्चर्येनें) पक्व झालेले जे असतात तेच त्या (पवित्रा)चा लाभ करून घेऊं शकतात १. —प्रतापशाली सोमाचें पवित्र द्युलोकाच्या स्थानीं पसरून दिलें आहे. त्याचे तेजःपुंज तंतूहि निरनिराळे स्पष्ट दिसत आहेत. त्याचे शीघ्र-

---

एषि माहिनम् अत्यो न मृष्टो अभि वाजम् अर्षसि । अप सेधन् दुरिता सोम मृळय घृतं वसानः परि यासि निर्णिजम् ॥ २ ॥ पर्जन्यः पिता महिषस्य पर्णिनो नाभा पृथिव्याः गिरिषु क्षयं दधे । स्वसारः आपो अभि गाः उता–सरन् सं ग्रावभि र्नसते वीते अध्वरे ॥ ३ ॥ जायेव पत्यौ अधि शेव मंहसे पज्राया: गर्भ शृणुहि ब्रवीमि ते । अन्त र्वाणीषु प्रचरा सु जीवसे अनिन्द्यो वृजने सोम जागृहि ॥ ४ ॥ यथा पूर्वेभ्यः शतसाः अमृध्रः सहस्रसाः परिअयाः वाजम् इन्दो । एवा पवस्व सुविताय नव्यसे तव व्रतम् अनु आपः सचन्ते ॥ ५ ॥

## सूक्तम् ८३

आंगिरसः पवित्रः सोमः जगती

पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते प्रभु र्गात्राणि पर्येषि विश्वतः । अतप्ततनू र्न तत् आमो अश्नुते शृतासः इत् वहन्तस् तत् समाशत ॥ १ ॥ तपोष् पवित्रं विततं दिवस् पदे शोचन्तो अस्य तन्तवो वि अस्थिरन् । अवन्ति अस्य पवितारम् आशवो दिवः पृष्ठम्

गामी तुषार सोमरस स्वच्छ करणाऱ्या भक्ताचें रक्षण करतात, आणि (प्रेमयुक्त) अन्तःकरणानें द्युलोकाच्या पृष्ठभागीं अधिष्ठित होतात २. —अनेक रंगांच्या किरणांच्या दिव्य धुरीणानें प्रभातकाल उज्ज्वल केला. सत्वसामर्थ्यांचा प्रभाव दाखविणारा तो वीर सर्व भुवनें धारण करतो. त्याची माया जाणणारे भक्त त्याच्याच दैवी मायेनें उत्पन्न झाले, आणि मानवांकडे अवलोकन करणाऱ्या पितरांनीं मानवजातीचें बीजारोपण केलें ३. —गन्धर्व हा खरोखरच ह्या (सोमा)च्या स्थानांचें रक्षण करतो, तोच अद्भुतपराक्रमी दिव्यविबुधांच्या अनेक समूहांचा प्रतिपाल करतो. हातीं पाश धारण करणारा तो प्रभु आपल्या पाशानें शत्रूला पकडून ठेवितो. त्यामुळें अत्यंत पुण्यशील जे भक्त असतात ते मधुर अमृताचा उपभोग घेऊं शकतात ४. —हविसंपन्ना सोमा, तूं दिव्यजनांचें स्थान जें आकाश त्याचें वस्त्र परिधान करून हव्य आणि अध्वरयाग यांच्या भोंवतीं फिरत असतोस; हे सोमा राजा, तूं पवित्राचाच रथ करून सत्वसामर्थ्यावरहि ताण करतोस आणि सहस्रावधि आयुधें घेऊन श्रेष्ठ अशी कीर्ति (भक्तांसाठीं) जिंकून आणतोस ५.

## सूक्त ८४

देवाला हृष्ट करणारा, सर्वगामी, आणि उदकें आपलीशीं करून घेणारा असा तूं इन्द्राप्रीत्यर्थ, वरुणाप्रीत्यर्थ, पावनप्रवाहानें वहा. ह्या विस्तृत भूमीवर आमचें आश्रयस्थान आज कल्याणयुक्त कर आणि दिव्यविभूतिंचें स्तवन कर १. —जो अमर सोम अखिल भुवनांना व्यापून राहिला आहे तोच त्या (भुवनां)च्या भोंवतींहि वहात रहातो. त्यांचा संयोग आणि वियोग ह्या दोन्ही गोष्टी प्राणिमात्राच्या योगक्षेमासाठीं घडवून

---

**अधि तिष्ठन्ति चेतसा ॥ २ ॥ अरूरुचत् उषसः पृश्निर् अग्रियः उक्षा बिभर्ति भुवनानि वाजयुः । मायाविनो ममिरे अस्य मायया नृचक्षसः पितरो गर्भम् आ दधुः ॥ ३ ॥ गन्धर्वः इत्था पदम् अस्य रक्षति पाति देवानां जनिमानि अद्भुतः ॥ गभ्णाति रिपुं निधया निधापतिः सुकृत्तमाः मधुनो भक्षम् आशत ॥ ४ ॥ हवि र्हविष्मो महि सद्म दैव्यं नभो वसानः परि यासि अध्वरम् । राजा पवित्ररथो वाजम् आरुहः सहस्रभृष्टि र्जयसि श्रवो बृहत् ॥ ५ ॥**

## सूक्तम् ८४

प्रजापतिः सोमः जगती

**पवस्व देवमादनो विचर्षणिर् अप्साः इन्द्राय वरुणाय वायवे । कृधी नो अद्य वरिवः स्वस्तिमत् उरुक्षितौ गृणीहि दैव्यं जनम् ॥ १ ॥ आ यस् तस्थौ भुवनानि अमर्त्यो विश्वानि सोमः परि तानि अर्षति । कृण्वन् संचृतं विचृतम् अभिष्टये इन्दुः**

आणून आल्हादप्रद सोम हा सूर्याप्रमाणेंच उषःकालाच्या पाठोपाठ येतो २. —सकल दिव्यनिधि ज्याच्याजवळ आहेत असा जो ( सोम ) औषधिमध्यें गोदुग्धासहित ओतला जातो, तो दिव्यविबुधांच्या सहजसुखमय स्थितींत ( त्यांना ) स्फूर्ति आणतो, आणि पिवळा असतां इन्द्राला आणि दिव्यजनांना हर्षित करण्याच्या हेतूनें विद्युल्लतारूप धारेनें वहात राहतो ३. —हा पहा तो सहस्रावधि ( ऐश्वर्य ) जिंकणारा, आणि प्रभातकाळीं जागृत होणाऱ्या शीघ्रस्फुरित स्तुतिवाणीला प्रेरणा करणारा सोम पावनप्रवाहानें वहात आहे. तो वायूच्या योगानें समुद्राला उचंबळून देतो, आणि इन्द्राच्या कलशरूप हृदयांत स्थिर राहतो ४. —दुग्धानें प्रफुल्लित होणाऱ्या आणि मननीय स्तुतींनीं स्वर्गीय प्रकाश मिळवून देणाऱ्या सोमाला, यज्ञधेनू आपल्या दुग्धाशीं मिश्रित करतात, तेव्हां तो वैभव-जेता सत्कार्यकुशल सोम स्वच्छ प्रवाहानें वहातो, आणि ज्ञानी कवि आपल्या कवनानें दिव्यप्रकाशाविषयीं लालस होतो ५.

## सूक्त ८५

सोमा, तुजला उत्तम रीतीनें पिळलेला आहे तर तूं इन्द्राप्रीत्यर्थ वेगानें वहात रहा. आधिव्याधि हे राक्षसासहित नष्ट होऊन जावोत. जे दुतोंडे किंवा कपटी असतील त्यांना तुझ्या रसाच्या आनंदाचा लाभ कधीं न मिळो; आणि तुझे वैभवसंपन्न बिन्दूच आमच्या येथें यज्ञांत वास करोत १ —पावनप्रवाहा सोमा, तूं संग्रामांत आम्हांला स्फुरण दे. दिव्यविभूतिंचें चातुर्यबल तूं आहेस. त्यांचा प्रिय आनंदहि तूंच आहेस. तर आमच्या समोर येऊन मोठमोठ्यानें फुशारकी मारणाऱ्या शत्रूंना तूं ठार कर. हे इन्द्रा, तूं सोमरस

---

सिषक्ति उषसं न सूर्यः ॥ २ ॥ आ यो गोभिः सृज्यते ओषधीषु आ देवानां सुम्ने इषयन् उपावसुः । आ विद्युता पवते धारया सुतः इन्द्रं सोमो मादयन् दैव्यं जनम् ॥ ३ ॥ एष स्यः सोमः पवते सहस्रजित् हिन्वानो वाचम् इषिराम् उषर्बुधम् । इन्दुः समुद्रम् उत् इयर्ति वायुभिर् एन्द्रस्य हार्दि कलशेषु सीदति ॥ ४ ॥ अभि त्यं गावः पयसा पयोवृधं सोमं श्रीणन्ति मतिभिः स्वर्विदम् । धनंजयः पवते कृत्व्यो रसो विप्रः कविः काव्येन स्वर्चनाः ॥ ५ ॥

## सूक्तम् ८५

भार्गवो वेनः पवमानसोमः जगती

इन्द्राय सोम सुषुतः परि स्रव अपा-मीवा भवतु रक्षसा सह । मा ते रसस्य मत्सत द्वयाविनो द्रविणस्वन्तः इह सन्तु इन्दवः ॥ १ ॥ अस्मान् समर्थे पवमान चोदय दक्षो देवानाम् असि हि प्रियो मदः । जहि शत्रूँर् अभि आ भन्दनायतः

प्राशन कर आणि आमच्या शत्रुसेनेचा धुव्वा उडवून दे २ —आल्हादप्रदा सोमा, तूं अजिंक्य आणि अत्यंत हर्षकर ( आहेस, तर ) आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा. तूं इन्द्राचा आत्मा आहेस. त्याचा उत्कृष्ट हविर्भागहि तूंच आहेस. म्हणून मनोनिग्रही जे अनेक भक्त आहेत ते तुझी प्रशंसा करतात, आणि या भुवनाचा राजा जो तूं त्या तुझ्या ( चरणाचें ) चुंबन घेतात ३. —सहस्रावधि प्रकारांनीं मार्ग दाखविणारा, असंख्य धारांचा आणि आश्चर्योत्पादक सोम हा इन्द्राप्रीत्यर्थ मनोहर मधुररसाचा प्रवाह सोडतो. (सोमा) तूं भूप्रदेश जिंकून आणि उदकें जिंकून वेगानें वहात रहा. हे सोमा मनोरथवर्षका, आम्हांला प्रशस्त मार्ग आंखून दे ४. —खळखळाट उडवून देऊन तूं कलशांतील दुग्धाशीं मिसळून जातोस; लोंकरीच्या पवित्रांतून चोहोंकडून एकदम पाझरतोस; आणि अश्वसैनिकाप्रमाणें स्वच्छ, अलंकृत आणि विजयशाली होऊन इन्द्राच्या जठरास अनुलक्षून वहात राहतोस ५. —तूं दिव्यजनांसाठीं मधुरप्रवाहानें वहा. ज्याचें नांव अत्यंत आदरणीय त्या इन्द्राप्रीत्यर्थ तूं मधुरप्रवाहानें वहा. तसेंच मित्रासाठीं, वरुणासाठीं, वायूसाठीं, ( अथवा ) बृहस्पतीसाठीं माधुर्ययुक्त आणि अजिंक्य असा तूं मधुरप्रवाहानें वहा ६. —(ऋत्विजांच्या) दहा अंगुलि तुज तीव्रवेगी सोमाला कलशामध्यें ( ओतून ) स्वच्छ करतात. ज्ञानी भक्ताच्या मननांनीं वाणीला प्रोत्साहन मिळतें, तेव्हां पावनप्रवाही सोमरस प्रेमळ स्तुतीला अनुलक्षून वहातात आणि हर्षोत्फुल्ल करणारे सोमबिन्दु इन्द्राच्या जठरांत प्रवेश करतात ७. —तूं पावनप्रवाहानें वाहून उत्कृष्ट शौर्य, धेनूंना योग्य असा विस्तीर्ण प्रदेश, आणि उत्तम, विख्यात आणि कल्याणप्रद आश्रय यांचा प्रवाह आम्हांवर लोटून दे. ह्या आमच्या सोमसवनावर कोणाचाहि वर्चष्मा चालूं नये म्हणून आल्हादप्रदा सोमा, तुझ्या सहाय्यानें आम्ही प्रत्येक युद्ध जिंकू असें कर ८. —सूक्ष्म निरीक्षण करणारा वीरपुंगव सोम,

---

पिबे-न्द्र सोमम् अव नो मृधो जहि ॥ २ ॥ अदब्धः इन्द्रो पवसे मदिन्तमः आत्मा इन्द्रस्य भवसि धासिर् उत्तमः । अभि स्वरन्ति बहवो मनीषिणो राजानम् अस्य भुवनस्य निंसते ॥३॥ सहस्रणीथः शतधारो अद्भुतः इन्द्राय इन्दुः पवते काम्यं मधु । जयन् क्षेत्रम् अभि अर्षा जयन् अपः उरुं नो गातुं कृणु सोम मीढ्वः ॥ ४ ॥ कनिक्रदत् कलशे गोभिर् अज्यसे वि अव्ययं समया वारम् अर्षसि । मर्मृज्यमानो अत्यो न सानसिः इन्द्रस्य सोम जठरे सम् अक्षरः ॥ ५ ॥ स्वादुः पवस्व दिव्याय जन्मने स्वादुर् इन्द्राय सुहवीतुनाम्ने । स्वादु मित्राय वरुणाय वायवे बृहस्पतये मधुमाँ अदाभ्यः ॥ ६ ॥ अत्यं मृजन्ति कलशे दश क्षिपः प्र विप्राणां मतयो वाच ईरते । पवमानाः अभि अर्षन्ति सुष्टुतिम् ए-न्द्रं विशन्ति मदिरास इन्दवः ॥ ७ ॥ पवमानो अभि अर्षा सुवीर्यम् उर्वीं गव्यूतिं महि शर्म सप्रथः । माकि र्नो अस्य परिषूतिर् ईशत इन्दो जयेम त्वया धनंधनम् ॥ ८ ॥ अधि द्याम् अस्थात् वृषभो विचक्षणः

द्युलोकावर अधिष्ठित झाला. त्या प्रतिभाशाली विभूतिनें द्युलोकाचे प्रदेश नाना प्रकारांनीं उज्वल केले. राजा सोम गर्जना करीत पवित्रांतून पाझरूं लागला; आणि अशा रीतीनें ( ऋत्विजांनीं ) द्युलोकाच्या अमृताचें त्या मानवदर्शी सोमापासून दोहन केलें ९. —मधुरभाषिणी आणि कार्यव्यापृत सुंदरी, द्युलोकाच्या अत्युच्च स्थळीं मेघमंडळांमध्यें राहणाऱ्या वृषभाला पिळून टाकतात; अर्थात् उदकांतील रसबिन्दूला—किंवा समुद्रांत वृद्धिंगत होणारा, नदीच्या कल्लोलांत उसळणारा, आणि पवित्रांतून पाझरणारा जो मधुर सोम त्यालाच ( त्या पिळून टाकतात ). १०. —आकाशांत उड्डान करणाऱ्या (सोमरूप) गरुडाचें या सुंदरींच्या नानाविध स्तवनवाणींनीं गुणवर्णन केलें. त्यांच्याच मननप्रयुक्त स्तुतींनीं त्या ( सोमरूप ) शिशूचें, त्या सुवर्णमय भूमीवर राहणाऱ्या सुवर्णमय पक्ष्याचें लालन केलें ११. —सज्ज झालेला गंधर्व या सृष्टींतील अखिल वस्तूंना अवलोकन करीत उच्च आकाशांत उभा राहिला. त्याचा किरणपुंज शुभ्र तेजानें तळपूं लागला, आणि त्यानें द्यावापृथिवींना,—जगताच्या मातापितरांना सुप्रकाशित केलें १२.

## सूक्त ८६

पावनप्रवाहा सोमा, पहा तुझे ते शीघ्रसंचारी, ध्यानबलानें प्रेरित, हर्षकारी रस, चपल घोड्यांप्रमाणें आपण होऊन त्वरेनें वहात आहेत. ते उत्तम पल्लवांनीं मंडित, माधुर्ययुक्त आणि अत्यंत हर्षकर रसबिन्दु सोमपात्रांत सांठले आहेत १. —ते तुझे हर्षकारी, शीघ्रगति, आनंदरस, रथाचे अश्व जसे निरनिराळ्या चालीनें धांवतात त्याप्रमाणें, वाहत गेले आहेत; आणि धेनू वत्साकडे पान्हावून धांवते तसे हे आल्हादबिन्दु,

---

अरूरुचत् वि दिवो रोचना कविः ॥ राजा पवित्रम् अति एति रोरुवत् दिवः पीयूषं दुहते नृचक्षसः ॥ ९ ॥ दिवो नाके मधुजिह्वाः असश्चतो वेनाः दुहन्ति उक्षणं गिरिष्ठाम् ॥ अप्सु द्रप्सं वावृधानं समुद्रे आ सिन्धोर् ऊर्मा मधुमन्तं पवित्रे आ ॥ १० ॥ नाके सुपर्णम् उपपप्तिवांसं गिरो वेनानाम् अकृपन्त पूर्वीः । शिशुं रिहन्ति मतयः पनिप्नतं हिरण्ययं शकुनं क्षामणि स्थाम् ॥ ११ ॥ ऊर्ध्वो गन्धर्वो अधि नाके अस्थात् विश्वा रूपा प्रतिचक्षाणो अस्य । भानुः शुक्रेण शोचिषा वि अद्यौत् प्रारूरुचत् रोदसी मातरा शुचिः ॥ १२ ॥

## सूक्तम् ८६

आकृष्टाः माषाः पवमानसोमः जगती

प्र ते आशवः पवमान धीजवो मदा अर्षन्ति रघुजाः इव त्मना । दिव्याः सुपर्णाः मधुमन्त इन्दवो मदिन्तमासः परि कोशम् आसते ॥ १ ॥ प्र ते मदासो

ह्या मधुर रसाच्या लाटा वज्रधर इन्द्राकडे दुग्धमिश्रित होऊन चोहोंकडून धांवल्या आहेत. २. —सत्वसामर्थ्यांच्या झुंजाकडे जाण्यास प्रोत्साहन दिलेल्या अश्वारूढ वीराप्रमाणें तूं दिव्यप्रकाश जिंकणारा ( आहेस, तर ) मेघाची माता जें आकाश त्याच्या कलशाकडे वहात जा. लोंकरीच्या पवित्राच्या शिखरावर आरूढ होणारा तूं सोम वीर, इन्द्राप्रीत्यर्थ– इन्द्राच्या तृप्तीसाठीं पावनप्रवाहानें (वहात रहा) ३. —पावनप्रवाहा सोमा, तुझ्या ज्या सर्वव्यापी दिव्य धारा भक्तिबलानें प्रोत्साहित होतात, त्या रसधारक कलशामध्यें दुग्धासह वाहून राहिल्या आहेत. आणि जे काव्यकल्पक ऋषि तुला अलंकृत करीत आहेत, त्यांनींच, हे ऋषिसहचरा, तुझी अखण्डधारा ( कलशाच्या ) आंत ओतली आहे ४. —सर्व कांहीं अवलोकन करणाऱ्या सोमा, सज्जनाचा धीरोदात्त प्रभु जो तूं, त्या तुझे किरण अखिल भुवनांना व्यापून टाकतात. म्हणून हे सोमा, तूंहि व्यापनशील होऊन पावनप्रवाहानें वहातोस, आणि ( परमेश्वराच्या ) सृष्टिनियमांनींच तूं या सर्व तेजोगोलांचा राजा होतोस ५. — सत्प्रवृत्त, पावनप्रवाही, आणि अढळ अशा सोमाचे किरण जगताला दोन्हीं बाजूंनीं घेरून टाकतात. आणि जेव्हां हरिद्वर्ण सोम चुरून पवित्रावर स्वच्छ धुतला जातो तेव्हां तो आपल्या स्वतःच्याच घरीं रहाणारा म्हणून द्रोणकलशांत अधिष्ठित होतो ६. —यज्ञाचा ध्वज, आणि अध्वरयागाला उत्तम रीतीनें सिद्धीस नेणारा सोम दिव्यविबुधांच्या निवासस्थानाकडे गमन करतो; तो सहस्रावधि प्रवाहांनीं पाझरून द्रोणकलशाकडे वहात जातो, तो वीरपुंगव गर्जना करीत पवित्रांतून खालीं पाझरतो ७ —हा ( वनस्पतींचा ) राजा समुद्रांत आणि त्याचप्रमाणें नद्यांत नानाप्रकारांनीं उड्या घेतो. महानद्यांत राहून त्याच्या उदकांच्या लाटांबरोबर वर उसळतो. पहा हा पावनप्रवाही सोम ऊर्णावस्त्राच्या शिखरावर

---

मदिरास आशवः असृक्षत रथ्यासो यथा पृथक्। धेनु र्न वत्सं पयसाऽभि वज्रिणम् इन्द्रम् इन्दवो मधुमन्त ऊर्मयः ॥ २ ॥ अत्यो न हियानो अभि वाजम् अर्ष स्वर्वित् कोशं दिवो अद्रिमातरम्। वृषा पवित्रे अधि सानो अव्यये सोमः पुनानः इन्द्रियाय धायसे ॥ ३ ॥ प्र त आश्विनीः पवमान धीजुवो दिव्याः असृग्रन् पयसा धरीमणि। प्र अन्त ऋषयः स्थाविरीर् असृक्षत ये त्वा मृजन्ति ऋषिषाण वेधसः ॥ ४ ॥ विश्वा धामानि विश्वचक्षः ऋभ्वसः प्रभो स्ते सतः परि यन्ति केतवः। वि आनशिः पवसे सोम धर्मभिः पति र्विश्वस्य भुवनस्य राजसि ॥५॥ उभयतः पवमानस्य रश्मयो ध्रुवस्य सतः परि यन्ति केतवः। यदी पवित्रे अधि मृज्यते हरिः सत्ता नि योना कलशेषु सीदति ॥ ६ ॥ यज्ञस्य केतुः पवते सुअध्वरः सोमो देवानाम् उप याति निष्कृतम्। सहस्रधारः परि कोशम् अर्षति वृषा पवित्रम् अतिएति रोरुवत् ॥ ७ ॥ राजा समुद्रं नद्यो वि गाहते अपाम् ऊर्मिं सचते सिन्धुषु श्रितः। अधि अस्थात् सानुः पवमानो अव्ययं नाभा पृथिव्याः धरुणो महो दिवः ॥ ८ ॥ दिवो न सानु स्तनयन् अचिक्रदत् द्यौ श्च यस्य पृथिवी च धर्मभिः। इन्द्रस्य सख्यं पवते विवेविदत् सोमः पुनानः

पृथ्वीच्या मध्यप्रदेशीं आरूढ झाला आहे. तो उच्च अशा द्युलोकाचाहि धारण करणारा आहे ८. —द्युलोकाचा उच्च प्रदेश दणाणून जाईल अशी ज्यानें गर्जना केली, आकाश ज्याच्या स्वाधीन आहे, आणि सृष्टिनियमाप्रमाणें पृथिवीहि आहे, तो इन्द्राचें अन्तरंग पूर्णपणें जाणणारा सोम स्वच्छप्रवाहानें वहातो आणि शुद्ध स्वरूपानें कलशांत अधिष्ठित होतो ९. —( सोम हा ) यज्ञाचें तेज आहे, सर्वांना प्रिय असें मधुर-पेयहि तोच आहे. तो दिव्यविभूतिंचा प्रतिपालक किंवहुना त्यांचा जनक आहे. असा तो अपारवैभव सोम शुद्धप्रवाहानें वहातो. सृष्टिधर्माप्रमाणें वर्तणाऱ्या द्यावा-पृथिवीच्या आंत तो रत्न ( ठेवतो तें ) गुप्त ठेवतो. अत्यंत हर्षकर, हर्षनिर्भर आणि इन्द्राला प्रिय असा रस तोच. १० —मोठयानें निनाद करून तो सत्ववीर, तो द्युलोकाचा पालक, तो असंख्य प्रवाहांनीं वहाणारा सूक्ष्मद्रष्टा सोम ( आपल्या ) कलशाकडे वहात जातो. लोंकरीच्या पवित्रांनीं, आणि नद्यांच्या उदकांनीं स्वच्छ होऊन तो हरिद्वर्ण वीरपुंगव मित्राच्या गृहांत अधिष्ठित होतो ११. —(भक्तांना) पावन करणारा सोम हा नद्यांच्या अग्रभागीं वहातो, स्तुतीच्याहि अग्रभागीं वहातो; तो सर्वांचा अग्रेसर म्हणून ( वाक् ) धेनूंच्या समूहांत संचार करतो. सत्वसामर्थ्यांच्याहि अग्रभागीं तोच रहातो. उत्तम शस्त्रांनीं सज्ज होऊन महायुद्धांत तोच भाग घेतो, आणि तोच वीरपुंगव स्तोतृजनांकडून अलंकृत होतो १२. —हातावर घेतलेला पक्षी जसा प्रिय तसाच हाहि सर्वमान्य आहे. तो लाटांनीं उचंबळून लोंकरीच्या पवित्रांतून शुद्ध प्रवाहानें वाहत आहे; तुझ्याच कर्तृत्वानें, तुझ्याच इच्छेनें, हे प्रतिभादायका इन्द्रा, हा शुद्ध सोम, द्यावापृथिवींच्या मधल्या अन्तरालांत स्वच्छ प्रवाहानें वहात आहे १३. —आकाशस्पर्शी असें कवच धारण करणारा, परमपूज्य, आणि अन्तराल व्यापून टाकणारा हा सोम ( सर्व ) भुवनांमध्यें स्थापन केलेला आहे. तो दिव्यप्रकाशाचा ज्ञाता आहे. त्यानें मेघमंडळाच्या मार्गानें सर्व ठिकाणीं संचार केला आहे, आणि त्याचा पुरातन पिता ( जो ईश्वर ) त्याचीच सेवा तो करीत आहे १४. —ज्यानें सर्वांच्या अगोदर ह्या

---

कलशेषु सीदति ॥ ९ ॥ ज्योति र्यज्ञस्य पवते मधु प्रियं पिता देवानां जनिता विभू-वसुः । दधाति रत्नं स्वधयोर् अपीच्यं मदिन्तमो मत्सरः इन्द्रियो रसः ॥ १० ॥ अभि क्रन्दन् कलशं वाजी अर्षति पति र्दिवः शतधारो विचक्षणः । हरि र्मित्रस्य सदनेषु सीदति मर्मृजानः अविभिः सिन्धुभि र्वृषा ॥ ११ ॥ अग्रे सिन्धूनां पवमानो अर्षति अग्रे वाचो अग्रियो गोषु गच्छति । अग्रे वाजस्य भजते महाधनं सु आयुधः सोतृभिः पूयते वृषा ॥ १२ ॥ अयं मतवान् शकुनो यथा हितः अव्ये ससार पवमानः ऊर्मिणा । तव क्रत्वा रोदसी अन्तरा कवे शुचि र्धिया पवते सोमः इन्द्र ते ॥ १३ ॥ द्रापिं वसानो यजतो दिविस्पृशम् अन्तरिक्षप्राः भुवनेषु अर्पितः । स्व र्जज्ञानो नभसाऽभि अक्रमीत् प्रत्नम् अस्य पितरम् आ विवासति ॥ १४ ॥ स अस्य विशे

(इन्द्रा)चें तेजोमय स्थान व्यापून टाकलें तोच सोम, या (इन्द्रा)च्या हृदयांत (भक्तांनीं) प्रवेश करावा म्हणून त्यांना निःश्रेयस मार्गाचा आधार देतो. ह्याचें निवासस्थान अत्युच्च आकाशांत आहे म्हणूनच तो स्वतः संयमी (देव) अखिल वस्तूंना व्यापून राहतो १५. —आल्हादप्रद सोम इन्द्राच्या लोकीं गेला आहे. त्याचा प्राणमित्र (जो इन्द्र तो) आपल्या मित्राचा आग्रह कधीं सोडीत नाहीं. वीर जसा सुस्वरूप तरुणींसह सहल करीत जातो त्याप्रमाणें सोमरस हा शेंकडों मार्गांनीं कलशाकडे वहात जातो १६. —तुमच्या हर्षोत्फुल्ल, स्तवननिरत, आणि स्तवनोत्सुक ज्या भावना त्या आपल्या निवासस्थानांमध्यें सर्वच भरून गेल्या आहेत; म्हणूनच भक्ताच्या एकाग्र स्तुतींनीं सोमाची महती गाथिली, आणि धेनू दुग्धानें [तुस्त होऊन] त्याच्या आश्रयाला धांवून गेल्या १७. —मनाला कह्यांत ठेवणारा, वुद्धीचा परिपोष करणारा, आणि अप्रतिहत राहणारा असा उत्साह, हे आल्हादप्रदा, तूं पावनप्रवाह (आहेस) म्हणून आम्हांकडे अखंड वहात आण; म्हणजे तो सततप्रभावी, सत्वाढय आणि मधुर अशा वीर्यप्रकर्षाचें दोहन, दिवसांतून तिन्ही वेळां आमच्यासाठीं करील १८. —सन्मतींची वृष्टि करणारा, सूक्ष्म दृष्टीनें पहाणारा, दिवस, उषा आणि द्युलोक ह्यांना वृद्धिंगत करणारा जो सोम तो पावनप्रवाहानें वहात आहे. जो नद्यांना उत्पन्न करितो त्या सोमानें—मनोजयी भक्ताच्या इच्छेनें इन्द्राच्या हृदयांत प्रवेश करणाऱ्या सोमानें कलशामध्यें (रसप्रवाहानें) ध्वनि उत्पन्न केला १९. —मनोजयी ऋत्विजांनीं नियमन केलेला हा पुरातन कवि जो सोम, तो स्वच्छ प्रवाहानें वहात आहे. त्यानें द्रोणकलश आपल्या प्रवाहानें निनादित केले; अशासाठीं, कीं, त्रिताचें नांव प्रसिद्धीस आणून इन्द्राचें, वायूचें, मित्रत्व जोडावें २०. —पावनप्रवाहानें वहाणाऱ्या सोमानें उषःकालांना उज्ज्वल केलें. नद्यां(नीं वहात रहावें या)साठीं विस्तीर्ण प्रदेश मोकळा करून देऊन आणि एकवीस प्रकारचें दुग्धखाद्य दोहन करून

---

महि शर्म यच्छति यो अस्य धाम प्रथमं वि आनशे। पदं यत् अस्य परमे वि ओमनि अतो विश्वाः अभि सं याति संयतः ॥ १५ ॥ प्रो अयासीत् इन्दुर् इन्द्रस्य निष्कृतं सखा सख्यु र्न प्र मिनाति सं गिरम्। मर्यइव युवतिभिः सम् अर्षति सोमः कलशे शतयाम्ना पथा ॥ १६ ॥ प्र वो धियो मन्द्रयुवो विपन्युवः पनस्युवः संवसनेषु अक्रमुः। सोमं मनीषाः अभि अनूषत स्तुभो ऽभि धेनवः पयसा ईम् अशिश्रयुः ॥ १७ ॥ आ नः सोम संयतं पिप्युषीम् इषम् इन्दो पवस्व पवमानो अस्रिधम्। या नो दोहते त्रिर् अहन् असश्चुषी क्षुमत् वाजवत् मधुमत् सुवीर्यम् ॥ १८ ॥ वृषा मतीनां पवते विचक्षणः सोमो अह्नः प्रतरीतो–षसो दिवः। क्राणा सिन्धूनां कलशाँ अवीवशत् इन्द्रस्य हार्दि आविशन् मनीषिभिः ॥ १९ ॥ मनीषिभिः पवते पूर्व्यः कवि र्नृभि र्यतः परि कोशाँ अचिक्रदत्। त्रितस्य नाम जनयन् मधुक्षरत् इन्द्रस्य वायोः सख्याय कर्तवे ॥ २० ॥ अयं पुनानः उषसो वि रोचयत् अयं सिन्धुभ्यो अभवत् उ लोककृत्।

हा हर्षकारी सोम विस्तीर्ण पात्रांत सुंदर रीतीनें वहात आहे. २१. —आल्हादप्रदा सोमा, पवित्रांतून पात्रांत ओतला जाणारा तूं दिव्यविभूतिंच्या स्थानांमध्यें वहात रहा. तूं खळखळाट उडविणारा; पण इन्द्राच्या ( द्रोणकलशरुप ) जठरांत तुजला स्थिर करून ऋत्विजांनीं तुझें नियमन केलें आणि तूं सूर्याला गगनांत उंच चढवून दिलेंस २२. —आल्हादप्रदा सोमा, तुजला ग्राव्यांनीं पिळलेला आहे; आणि इन्द्राच्या जटरांत प्रवेश करण्याची इच्छा धरून तूं पवित्रांतून पाझरत आहेस. सकलवस्तुजात सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्या सोमा, तूं आम्हां मानवांनाहि ( कृपादृष्टीनें ) पहातोस, (आणि म्हणूनच) हे सोमा तूं अंगिरांसाठीं प्रकाशधेनूंचा समूह मोकळा केलास २३. —सोमा, शुद्ध प्रवाहानें वाहणाऱ्या तुला अनुलक्षून उत्तम ध्यान करणारे आणि ( देव )कृपेची इच्छा धरणारे ज्ञानीजन हृष्ट झाले. आल्हादप्रदा सोमा, अखिल जगाच्या सदिच्छांनीं तूं अलंकृत झालास ( म्हणूनच ) गरुड तुला द्युलोकांतून खालीं घेऊन आला २४. —लोंकरीच्या पवित्रांतून आपल्या लाटांनीं ( उचंबळून ) स्वच्छप्रवाहानें वहाणाऱ्या हरिद्वर्ण सोमाचें स्तवन, धेनू " हंवा " असा शब्द करून करतात; म्हणून उदकांच्या सन्निध, सनातनसत्याच्या स्थानांमध्यें महाथोर भक्तांनीं प्रतिभाशाली सोमाला त्वरेनें धाडून दिलें २५. —आल्हादप्रद सोम स्वच्छ प्रवाहानें वाहूं लागला म्हणजे शत्रुसमूहांत थेट घुसून जातो, आणि यजन करणाऱ्या भक्तांसाठीं सर्व ठिकाणें सुगम करतो. धेनुदुग्धरूपी वस्त्र परिधान करून तो सर्वप्रिय प्रतिभासंपन्न सोम मौजेनें उड्या मारणाऱ्या चपल अश्वाप्रमाणें पवित्रांतून वहात जातो २६. —शेंकडों धारांनीं अखंड वहाणाऱ्या सुशोभित अशा जललहरी हरिद्वर्ण सोमाचेंच स्तवन करितात; आणि तो द्युलोकाच्या सुप्रकाशित गोलांत तिसऱ्या पटलांत असतो तरीहि दुग्धरूपवस्त्रानें आच्छादित असलेल्या त्या सोमाला ऋत्विजांच्या अंगुलि अलंकृत करतात २७. —तुझ्या दिव्य बीजापासूनच

अयं त्रिः सप्त दुदुहान आशिरं सोमो हृदे पवते चारु मत्सरः ॥ २१ ॥ पवस्व सोम दिव्येषु धामसु सृजानः इन्दो कलशे पवित्रे आ । सीदन् इन्द्रस्य जठरे कनिक्रदत् नृभिः यतः सूर्यम् आ रोहयो दिवि ॥ २२ ॥ अद्रिभिः सुतः पवसे पवित्रे आ इन्दो इन्द्रस्य जठरेषु आविशन् । त्वं नृचक्षाः अभवो विचक्षण सोम गोत्रम् अङ्गिरोभ्योऽवृणोर् अप ॥ २३ ॥ त्वां सोम पवमान सुआध्यः अनु विप्रासो अमदन् अवस्यवः । त्वां सुपर्ण आ अभरत् दिवस्परि इन्दो विश्वाभि मतिभिः परिष्कृतम् ॥ २४ ॥ अव्ये पुनानं परिवार ऊर्मिणा हरिं नवन्ते अभि सप्त धेनवः । अपाम् उपस्थे अधि आयवः कविम् ऋतस्य योना महिषाः अहेषत ॥ २५ ॥ इन्दुः पुनानो अति गाहते मृधो विश्वानि कृण्वन् सुपथानि यज्यवे । गाः कृण्वानो निर्णिजं हर्यतः कविर् अत्यो न क्रीळन् परि वारम् अर्षति ॥ २६ ॥ असश्चतः शतधाराः अभि श्रियो हरिं नवन्ते अव ताः उदन्युवः । क्षिपो मृजन्ति परि गोभिर् आवृतं

ह्या सर्व प्रजा निर्माण झाल्या आहेत. तूं सर्व भुवनांचा राजा आहेस; पावनप्रवाह सोमा, हें सकल जगत् तुझ्या आधीन आहे. हे आल्हादप्रदा, तूं आद्य आहेस. तेजोमयभवनें ( जागच्या जागीं ) ठेवणाराहि तूंच आहेस २८. —तूं विश्वाचें ज्ञान करून देणारा सागर आहेस. हे प्रतिभासंपन्ना, ह्या पांचहि दिशा तुझ्या विशिष्ट धर्मानेंच चालतात. द्युलोक आणि भूलोक ह्यांच्याहि पलीकडे तूं पोहोंचला आहेस. पावनप्रवाहा, हे तेजोगोल तुझे आहेत, आणि सूर्यहि तुझाच आहे २९. —रजोलोकाचा विविध धर्म ज्यांत प्रतिबिंबित झाला आहे अशा पवित्रांतून हे पावनप्रवाहा, तूं स्वच्छ होऊन वाहतोस. देवभक्तांनींच तुझें गृहण प्रथम केलें, आणि यच्चावत् भुवनेंहि तुजपुढें नम्र झालीं ३०. कवनांची स्फूर्ति देणारा सोम हा ऊर्णावस्त्रांतून पाझरत आहे. ह्या हरिद्वर्ण वीरपुंगवानें वनामध्यें वारंवार गर्जना केली, ( तेव्हां ) भक्तांच्या देवोत्सुक बुद्धींनीं त्याला आळविलें, आणि ( सज्जनांच्या ) मननांनीं त्या मंजुळनिनादी बालकाचें चुंबन घेतलें ३१. —सूर्याच्या किरणांनीं तो आच्छादित झाला आहे. पण सर्वांना समजेल अशा रीतीनें यज्ञकर्मांचा तीन पेडाचा तंतु तो विस्तृत पसरून देतो. सद्धर्मांचे नूतन आदेश तो मनुष्यांपर्यंत आणून पोहोंचवून, कुलवधूच्या पतीप्रमाणें तो स्वगृहाकडे ( द्रोणपात्राकडे ) जातो ३२. —नद्यांचा राजा, द्युलोकाचा पालक, असा जो सोम तो पावनप्रवाहानें वहात आहे, आणि गर्जना करीत सद्धर्मांच्याच मार्गांनीं चालत आहे. पहा, तो हजारों धारांनीं वाहणारा हरिद्वर्ण सोम काव्यैश्वर्यमंडित स्तवनांची स्फूर्ति देऊन आणि स्वच्छ होऊन द्रोणकलशांत ओतला जात आहे ३३. —पावनप्रवाहा, सूर्याप्रमाणें अद्भुतकर्मकारी असा तूं स्वच्छ होण्याच्या इच्छेनें अफाट समुद्रच ( कीं काय अशा ) नाना प्रकारांनीं, लोंकरीच्या पवित्रांतून धांवत जातोस; आणि ऋत्विजांनीं आपल्या बाहूंनीं ग्राव्यांच्या योगानें तुजला पिळलें असतां, श्रेष्ठ आणि धन्य अशा सत्वसामर्थ्यासाठीं तूं

---

तृतीये पृष्ठे अधि रोचने दिवः ॥ २७ ॥ तवे-माः प्रजाः दिव्यस्य रेतसस् त्वं विश्वस्य भुवनस्य राजसि । अथे-दं विश्वं पवमान ते वशे त्वम् इन्दो प्रथमो धामधाः असि ॥ २८ ॥ त्वं समुद्रो असि विश्ववित् कवे तवेमाः पञ्च प्रदिशो विधर्मणि । त्वं द्यावापृथिवीं चा-ति जभ्रिषे तव ज्योतिंषि पवमान सूर्यः ॥ २९ ॥ त्वं पवित्रे रजसो विधर्मणि देवेभ्यः सोम पवमान पूयसे । त्वाम् उशिजः प्रथमाः अगृभ्णत तुभ्ये-मा विश्वा भुवनानि येमिरे ॥ ३० ॥ प्र रेभः एति अति वारम् अव्ययं वृषा वनेषु अव चक्रदत् हरिः । सं धीतयो वावशानाः अनूषत शिशुं रिहन्ति मतयः पनिप्नतम् ॥ ३१ ॥ स सूर्यस्य रश्मिभिः परि व्यत तन्तुं तन्वानस् त्रिवृतं यथा विदे । नयन् ऋतस्य प्रशिषो नवीयसीः पति जैनीनाम् उपयाति निष्कृतम् ॥ ३२ ॥ राजा सिन्धूनां पवते पति दिंव ऋतस्य याति पथिभिः कनिक्रदत् । सहस्रधारः परि षिच्यते हरिः पुनानो वाचं जनयन् उपावसुः ॥ ३३ ॥ पवमान महि अर्णो विधा-

उचंबळून जातोस ३४. —पावनप्रवाहा, तूं ऊर्जस्विता आणि उत्साह यांचा प्रवाहच (भक्तांवर) लोटतोस; आणि ससाणा आपल्या घरट्यांत वसतो तसा तूंहि इन्द्रासाठीं कलशांत राहतोस. तूं (आतां) पिळला गेला आहेस; तूं हर्षकर, हर्षहेतु, आणि हर्षरूप (आहेस), तूं द्युलोकाचा अगदीं निकटवर्ती आधारस्तंभ, आणि (मानवांकडे) विशेष दृष्टीनें पाहणारा आहेस ३५. —नूतन जन्मलेल्या, विजयी, महाज्ञानी बाल-काला–उदकांचा दिव्यगन्धर्व आणि मानवांचें हित पाहणाऱ्या तुज सोमाला, सात भगिनी आणि माता त्रिभुवनांमध्यें विराजमान होण्यासाठीं जवळ घेतात ३६. —तूं ईश्वररूप आहेस; तूं ह्या जगताभोंवतीं आपल्या अत्यंत चपल आणि हरिद्वर्ण घोड्या जोडून भ्रमण करतोस; त्या तुझ्या घोड्या माधुर्ययुक्त घृताचा भूतलावर वर्षाव करोत. हे सोमा, मनुष्य तुझ्या आज्ञेंत वर्तन करोत ३७. —तूं सर्व प्रकारांनीं मानवांचें हित पाहणारा आहेस. हे सोमा, हे पावनप्रवाहा, हे मनोरथवर्षका, तूं नाना प्रकारांनीं त्यांच्याकडे गमन करतोस. तूं (दिव्य)निधानशाली आणि सुवर्णपूर्ण (आहेस) तूं आपला प्रवाह आमच्यावर लोट, म्हणजे आम्हीं ह्या जगतांत उत्कृष्ट जीवनासाठीं वास करूं ३८. —तूं धेनू देणारा, धन देणारा, आणि हे आल्हादरूपा (नानाविध धान्यांचें) बीज पृथ्वीवर विखरणारा आहेस म्हणून तुजला ह्या भूमंडळांत ठेवलेलें आहे. सोमा, तूं उत्कृष्ट वीर आणि सर्वज्ञ आहेस; म्हणूनच हे स्तोतृजन स्तुतिद्वारा तुझी सेवा करीत असतात ३९. —तुझ्या माधुर्यांच्या लाटेनें मनोहर स्तुतींची स्फूर्ति उत्पन्न झाली. पंहा, तो श्रेष्ठविभूति सोम उदकांचें वस्त्र परिधान करून त्यांतच अवगाहन करतो. तो पवित्रावर आरूढ होणारा सोम पवित्र रथावर आरोहण करणाऱ्या राजाप्रमाणें सत्वसंग्रामांत आपलें वर्चस्व गाजवितो आणि सहस्रावधि शस्त्रास्त्रांनीं महद्यश जिंकून आणतो ४०. —तो संततिप्रद (आशीर्वादाच्या) ललकाऱ्या देतो. तो विश्वजीवन (सोम)

---

वसि सूरो न चित्रो अव्ययानि पव्यया। गभस्तिपूतो नृभिर् अद्रिभिः सुतो महे वाजाय धन्याय धन्वसि॥ ३४॥ इषम् ऊर्जं पवमाना-भि अर्षसि श्येनो न वंसु कलशेषु सीदसी। इन्द्राय मद्वा मद्यो मदः सुतो दिवो विष्टंभः उपमो विचक्षणः ॥ ३५॥ सप्त स्वसारः अभि मातरः शिशुं नवं जज्ञानं जेन्यं विपश्चितम्। अपां गन्धर्वं दिव्यं नृचक्षसं सोमं विश्वस्य भुवनस्य राजसे॥ ३६॥ ईशानः इमा भुव-नानि वी–यसे युजानः इन्दो हरितः सुपर्ण्यः। ता स्ते क्षरन्तु मधुमत् घृतं पयस् तव व्रते सोम तिष्ठन्तु कृष्टयः॥ ३७॥ त्वं नृचक्षाः असि सोम विश्वतः पवमान वृषभ ता विधावसि। स नः पवस्व वसुमत् हिरण्यवत् वयं स्याम भुवनेषु जीवसे॥३८॥ गोवित् पवस्व वसुवित् हिरण्यवित् रेतोधाः इन्दो भुवनेषु अर्पितः। त्वं सुवीरो असि सोम विश्ववित् तं त्वा विप्राः उप गिरे–म आसते॥ ३९॥ उत् मध्वः ऊर्मि र्वननाः अतिष्ठिपत् अपो वसानो महिषो वि गाहते। राजा पवित्ररथो

सहज हस्तगत होणारी समृद्धिहि प्रत्यहीं धाडून देतो. आल्हादप्रदा सोमा, तुजला प्राशन केलें म्हणजे देवभक्ति आणि संततियुक्त आणि अश्वयुक्त असें वैभव स्तोतृजन इन्द्राजवळ आमच्याकरितां मागून घेवो ४१. —दिवस उगवण्यापूर्वीं तो सर्वप्रिय, हर्षरूप आणि हरिद्वर्ण सोम आपल्या चैतन्यानें आणि उज्जल कांतीनें स्पष्टपणें निदर्शनास येतो. परोपकारी जन आणि दिव्यविभूति अशा उभयतांनाहि तो आपआपल्या कामीं व्यापृत करून ह्या आधारभूत ( विश्वांत ) संचार करतो ४२. —(स्तोतृजन) त्याला उद्वर्तन करतात, नाना प्रकारानें उद्वर्तन करतात; अगदीं पूर्णपणें उद्वर्तन करतात. त्या कर्तृत्वशाली सोमाचें अवघ्राण करितात, आणि त्याला मधानें लिप्त करतात. नदीच्या डोहांत बुडी मारणाऱ्या त्या द्रष्ट्याला, त्या वृषभाला, सुवर्णाप्रमाणें स्वच्छ लकलकीत करणारे (ऋत्विज्) तेथेंच धरून ठेवतात ४३. —त्या ज्ञानवान् पावनप्रवाह सोमासाठीं तुम्ही गायन करा. जोरानें कोसळणाऱ्या वृष्टिप्रमाणें (त्याचें)मधुर पेय खळवळून वहात आहे. सर्प आपली कात टाकतो त्याप्रमाणें तो पवित्रांतून स्वच्छ होऊन वाहतो; पहा मौजेनें धांवणाऱ्या अश्वाप्रमाणें तो हरिद्वर्ण वृषभ पुढें सरसावला आहे ४४. —तो अग्रेसर राजा, तो उदकानें स्वच्छ झालेला सोम आपला प्रभाव दाखवीत आहे. दिवसाच्या गतीचें मापन करणारा म्हणून त्याला जगतीतलावर स्थापन केलें आहे; त्याप्रमाणें ( पहा ) तो हरिद्वर्ण, घृतार्द्र, नयनमनोहर समुद्रच ( कीं काय, असा ) तेजोराशि आणि ऐश्वर्याचें निवासस्थान जो सोम तो आमच्या ( शाश्वत ) संपत्तीसाठीं शुद्धप्रवाहानें वहात आहे ४५. —तो द्युलोकाचा स्तंभच उभारलेला आहे. हा हर्षकर सोम–हा तीन स्वरूपाचा रस या भूतलावर चोहोंकडून वहात येत आहे; आणि जेव्हां ऋक्स्तोत्रप्रिय भक्त त्याच्या ( दुग्धरूप ) आवरणाजवळ प्राप्त झाले, तेव्हां त्यांच्या सद्बुद्धीनीं, ( यज्ञमंदिर ) स्तुतीनें दुमदुमून सोडणाऱ्या त्या सोमपल्लवाचें चुंबन घेतलें ४६. —तूं गाळला जात असतांना जोरानें वाहणाऱ्या

---

वाजम् आऽरुहत् सहस्रभृष्टिर् जयति श्रवो बृहत् ॥ ४० ॥ स भन्दनाः उदियर्ति प्रजावतीर् विश्वायुर् विश्वाः सुभराः अहर्दिवि । ब्रह्म प्रजावत् रयिम् अश्वपस्त्यं पीत इन्दो इन्द्रम् अस्मभ्यं याचतात् ॥ ४१ ॥ सो अग्रे अह्नां हरिर् हर्यतो मदः प्रचेतसा चेतयते अनु द्युभिः । द्वा जना यातयन् अन्तर् ईयते नराशंसंच दैव्यं च धर्तरि ॥४२॥ अञ्जते व्यञ्जते सम् अञ्जते क्रतुं रिहन्ति मधुनाऽभि अञ्जते ॥ सिन्धोर् उत्श्वासे पतयन्तम् उक्षणं हिरण्यपावाः पशुम् आसु गृभ्णते ॥ ४३ ॥ विपश्चिते पवमानाय गायत मही न धारा अति अन्धो अर्षति । अहिर् न जूर्णाम् अति सर्पति त्वचम् अत्यो न क्रीळन् असरत् वृषा हरिः ॥ ४४ ॥ अग्रेगो राजा अप्यस् तविष्यते विमानो अह्नां भुवनेषु अर्पितः । हरिर् घृतस्नुः सुदृशीको अर्णवो ज्योतीरथः पवते राय ओक्यः ॥ ४५ ॥ असर्जि स्कम्भो दिव उद्यतो मदः परि त्रिधातु भुवनानि अर्षति अंशुं रिहन्ति मतयो पनिप्नतं गिरा यदि निर्णिजम् ऋग्मिणो ययुः ॥ ४६ ॥ प्र ते

तुझ्या धारा आंवरून धरल्या तरी लोंकरीच्या पवित्रांतून त्या झरझर वाहतात. तर हे आल्हादप्रदा जेव्हां तूं चमूपात्रांत दुग्धाशीं मिश्रित होतोस, तेव्हांच हे सोमा, तुझा पिळलेला रस कलशांत पडतो ४७. —सोमा, तूं पवित्रप्रवाहानें वहा. तूं सत्कर्म जाणणारा आम्हांला स्तुत्यच आहेस. लोंकरीच्या पवित्रांतून आपला मधुर रस वेगानें पाझरून दे; मनुष्यभक्षक अशा यच्चावत् राक्षसांना ठार कर आणि हे आल्हादप्रदा, यज्ञमंडपांत आम्हीं वीरांसह तुझें महनीय स्तोत्र गात राहू असें कर ४८.

## सूक्त ८७

वेगानें धांवून जा. कलशांत अधिष्ठित हो. तूं ऋत्विजांच्या हातून स्वच्छ होत आहेस तर सत्व( प्राप्तीच्या ) संग्रामाकडे वहात जा. युद्धोत्सुक अश्वाप्रमाणें तुजला ते स्वच्छ करून अलंकृत करीत आहेत आणि लगाम घालून कुशासनाकडे नेत आहेत १. —आल्हादप्रद सोम उत्तम शस्त्रास्त्रांनीं [ युक्त होऊन ] पावनप्रवाहानें वहात आहे तो ( दुष्टांच्या ) शापांचा नाश करतो. ( धेनूंच्या ) आवाराचें रक्षण करतो; तो चातुर्यबलाढ्य, दिव्यविबुधांचा पालक, आणि उत्पन्नकर्ता आहे. तो आकाशाचा धिरा आहे, आणि भूलोकाचा आधार आहे २. —तो ऋषि, तो स्तोता, तो लोकधुरीण आहे. तो बुद्धिशाली ऋभु आहे, आपल्या प्रतिभेनें तो **उशना**च आहे. ह्या प्रकाशधेनूंचें जें एक नांव गुप्त आणि गूढ राखलें आहे तें त्यानेंच जाणलें ३. —इन्द्रा, हाच तो तुझा मधुररसस्रावी सोम. हा वीरपुंगव वीराला योग्य अशा पवित्रांतून वाहत गेला. तो शेंकडोंच काय, पण सहस्रावधि वरदानें देणारा आहे. तो सत्ववीर अखंड चालणाऱ्या यज्ञा-

धाराः अति अण्वानि मेष्यः पुनानस्य संयतो यन्ति रंहयः। यत् गोभिर् इन्दो चम्वोः सम् अज्यते आ सुवानः सोम कलशेषु सीदसि ॥ ४७ ॥ पवस्व सोम क्रतुवित् नः उक्थ्यो अव्यो वारे परि धाव मधु प्रियम्। जहि विश्वान् रक्षसः इन्दो अत्रिणो बृहत् वदेम विदथे सुवीराः ॥ ४८ ॥

## सूक्तम् ८७

काव्यः उशनाः पवमानसोमः त्रिष्टुप्

प्र तु द्रव परि कोशं निषीद नृभिः पुनानो अभि वाजम् अर्ष। अश्वं न त्वा वाजिनं मर्जयन्तो अच्छा बर्हीं रशनाभि र्नयन्ति ॥ १ ॥ सुआयुधः पवते देव इन्दुर् अशस्तिहा वृजनं रक्षमाणः। पिता देवानां जनिता सुदक्षः विष्टम्भो दिवो धरुणः पृथिव्याः ॥२॥ ऋषि विप्रः पुरएता जनानाम् ऋभु धीरः उशनाः काव्यन॥ स चित् विवेद नि हितं यत् आसाम् अपीच्यं गुह्यं नाम गोनाम् ॥३॥ एष स्य ते मधुमाँ इन्द्र सोमो वृषा वृष्णे परि पवित्र अक्षाः। सहस्रसाः शतसाः भूरिदावा

कडे निघाला आहे ४. —हे सोमरसाचे प्रवाह सहस्रावधि धेनूंकडे आणि (सहस्रावधि) विख्यात वस्तूंकडे, श्रेष्ठ सत्वाढ्यता आणि अमरत्व यांच्या प्राप्तीसाठीं वहात राहिले आहेत. सत्कीर्तिविषयीं उत्सुक असलेले आणि पवित्रांतून स्वच्छ प्रवाहानें वाहणारे सोमरस, विजयी योद्ध्याप्रमाणें झपाट्यानें पुढें सरसावले आहेत ५. —ज्याचें स्तवन अखिल भक्तांनीं केलें, आणि लोकांचे भोग्यपदार्थ जो पवित्र करतो तो हा सोमरस ( पहा कसा ) पुढें सरसावला आहे. हे सोमा, ज्या तुजला श्येनपक्ष्यानें जगतीतलावर आणलें तो तूं झपाट्यानें पुढें वाढून, प्रेमळ पण ( शाश्वत )संपत्ति, आणि सत्वाढ्यता यांच्याकडे आपला ओघ वळीव ६. —पिळला जाणारा हा तडफदार सोम ( शत्रूवर ) फेंकलेल्या अस्त्राप्रमाणें पवित्रांतून खालीं धांवून गेला. अणकुचीदार शिंगें पाजळणाऱ्या धेनूत्सुक आणि धिप्पाड वृषभाप्रमाणें, ( अथवा ) सत्ववान् शूराप्रमाणें, तो पुढें धांवून गेला ७. —ही ( सोमधारा ) अत्युच्च पर्वताच्या खोल उदरांतून बाहेर आली, आणि तेथेंच कोठल्याशा विवरांत कोंडून ठेवलेल्या प्रकाशधेनूंना ( तिनें ) हुडकून बाहेर आणलें. हे इन्द्रा, आकाशांतील मेघडंबरांत गडगडाट उडवून देणारी जणों विजलीच, अशी ही तुझ्या सोमरसाची धारा पहा कशी वाहत आहे ८. —हे सोमा, तूं पवित्रप्रवाहानें धेनूसमूहाच्या भोंवतीं इन्द्रासह एकाच रथांत आरूढ होऊन फिरतोस, तर हे शीघ्रवरदा, श्रेष्ठ अशा अनेक आकांक्षांचें शिक्षण ( आम्हांस ) दे. हे समर्था त्या आकांक्षांचें तूं कौतुक कर ९.

## सूक्त ८८

इन्द्रा, हा सोम तुझ्याप्रीत्यर्थ पिळला जात आहे, तुझ्याप्रीत्यर्थच तो पावनप्रवाहानें वाहत आहे. तर तूं त्याचें प्राशन कर. त्याला तूंच उत्पन्न केलेंस त्या आल्हादप्रदाला

---

शश्वत्तमं बर्हिर् आ वाजी अस्थात् ॥ ४ ॥ एते सोमाः अभि गव्या सहस्रा महे वाजाय अमृताय श्रवांसि । पवित्रेभिः पवमानाः असृग्रन् श्रवस्यवो न पृतनाजो अत्याः ॥ ५ ॥ परि हि ष्मा पुरुहूतो जनानां विश्वाऽसरत् भोजना पूयमानः । अथाऽऽभर श्येनभृत प्रयांसि रयिं तुञ्जानो अभि वाजम् अर्ष ॥ ६ ॥ एष सुवानः परि सोमः पवित्रे सर्गो न सृष्टो अदधावत् अर्वा । तिग्मे शिशानो महिषो न शृङ्गे गाः गव्यन् अभि शूरो न सत्वा ॥ ७ ॥ एषाऽऽययौ परमात् अन्तर् अद्रेः कूचित् सतीर् ऊर्वे गाः विवेद । दिवो न विद्युत् स्तनयन्ती अभ्रैः सोमस्य ते पवत इन्द्र धारा ॥ ८ ॥ उत स्म राशिं परियासि गोनाम् इन्द्रेण सोम सरथं पुनानः । पूर्वीर् इषो बृहती र्जीरदानो शिक्षा शचीवस् तव ताः उपष्टुत् ॥ ९ ॥

हर्षांसाठीं आणि सहवासासाठीं तूंच पसंत केलेंस १. —तो हा श्रेष्ठ सोम, रथस्थ वीराप्रमाणें विपुल यश जिंकणारा ( सोम ), असंख्य वस्तूंचें किंवा असंख्य ( शत्रूंचें ) आक्रमण करण्यासाठीं तुझ्याशीं संयुक्त झाला आहे. आणि म्हणूनच अखिल मानव-जातींनीं वनांमध्यें उठून उभे राहून स्वर्लोकप्राप्तीसाठीं त्याची स्तुति केली २. —जो सोम वायूप्रमाणें "नियुत्" घोडया जोडणारा, आणि इच्छेनुरूप गमन करणारा आहे; जो धांवा केला असतां सत्यस्वरूप अश्वीदेवांप्रमाणें अत्यंत कल्याणकारी आहे, ( अविनाशी)संपत्ति देणाऱ्या (धनदा)प्रमाणें सर्वांना अभिलषणीय आहे;हे सोमा असा तूं पूषाप्रमाणें प्रज्ञाप्रेरकहि आहेस ३. —इन्द्राप्रमाणेंच जो महत् कार्यं करतो तो तूं हे सोमा, वृत्रांचा नाशक आणि त्यांच्या नगरांचा विध्वंसक आहेस. पेदूच्या अश्वाप्रमाणें तूं "अहि" हें नांव धारण करणाऱ्या दुष्टांचाच केवळ नव्हे, तर सर्वच अधार्मिकांचा निःपात करणारा आहेस ४. —जो अरण्यांत मोकाट सुटलेल्या दवाग्नीप्रमाणें (दिसतो), जो नद्यांच्या प्रवाहांत आपलें तेज सहज प्रतिबिंबित करतो, तो हा स्वच्छप्रवाहानें वाहणारा जणों युद्धोत्सुक वीर सोम, एखाद्या प्रचंड श्वापदाच्या आरोळीप्रमाणें आपला खळखळणारा ओघ जोरानें पुढें लोटतो ५. —हे सोमरस, मेघमंडलांतून वृष्टि करणाऱ्या आकाशाच्या जलाशयाप्रमाणें लोंकरीच्या पवित्रांतून वर्षाव करतात, आणि सहज वाहणाऱ्या नद्या समुद्राकडेच लोटतात त्याप्रमाणें हे सोमपल्लव पिळले म्हणजे ( त्यांतील ) रस खालीं द्रोणकलशाकडेच सरसावतात ६. —मरुतांच्या बलाढ्य सैन्याप्रमाणें तूं प्रभावशाली आहेस. तर स्वच्छ-प्रवाहानें वहात रहा. दिव्यविबुधांच्या समूहाप्रमाणेंच तुझ्यांतहि दोष काढण्याला जागाच नाहीं. तूं उदकांप्रमाणें ( निर्मल ) आहेस. तुला आमचा कळवळा येऊं दे. तूं सहस्रावधि

## सूक्तम् ८८

### ऋष्याद्याः पूर्ववत्

अयं सोमः इन्द्र तुभ्यं सुन्वे तुभ्यं पवते त्वम् अस्य पाहि । त्वं ह यं चकृषे त्वं ववृषे इन्दुं मदाय युज्याय सोमम् ॥ १ ॥ स ईं रथो न भुरिषाळ् अयोजि महः पुरूणि सातये वसूनि । आत् ईं विश्वा नहुष्याणि जाता स्वर्षाता वने ऊर्ध्वा नवन्त ॥ २ ॥ वायु नं यो नियुत्वाँ इष्टयामा नासत्येव हवे आ शंभविष्ठः । विश्ववारो द्रविणोदा इव त्मन् पूषा इव धीजवनोऽसि सोम ॥ ३ ॥ इन्द्रो न यो महा कर्माणि चक्रि र्हन्ता वृत्राणाम् असि सोम पूर्भित् । पैद्वो न हि त्वम् अहिनाम्नां हन्ता विश्वस्य असि सोम दस्योः ॥ ४ ॥ अग्नि र्न यो वने आ सृज्यमानो वृथा पाजांसि कृणुते नदीषु । जनो न युध्वा महतः उपब्दिर् इयर्ति सोमः पवमान ऊर्मिम् ॥ ५ ॥ एते सोमाः अति वाराणि अव्या दिव्याः न कोशासो अभ्रवर्षाः । वृथा समुद्रं सिन्धवो न नीचीः सुतासो अभि कलशाँ असृग्रन् ॥ ६ ॥ शुष्मी शर्धो न मारुतं

सत्कार्यें घडविणारा आणि यज्ञाप्रमाणें ( अधार्मिक ) शत्रुसैन्याला चिरडून टाकणारा आहेस ७. —तुझे नियम म्हणजे राजा वरुणाचेच धर्मनियम होत. हे सोमा, तुझें तेजोमय स्थान विस्तीर्ण आणि भव्य आहे. शुद्धस्वरूप असा तूं आम्हांला मित्राप्रमाणें प्रिय आहेस. आणि हे सोमा, तूं अर्यमाप्रमाणें चातुर्यबलानें संपन्न आहेस ८.

## सूक्त ८९

हविर्भाग पोहोंचविणारा तो सोम योग्य मार्गांनींच पाझरत राहिला, पावनप्रवाह सोमानें आकाशांतून पडणाऱ्या पर्जन्याप्रमाणें वृष्टि केली आणि सहस्रशः प्रवाहांनीं वाहणारा सोमरस आमच्या मातेच्या सन्निध आणि वनांमध्येंहि एकसारखाच राहिला १ —राजा सोमानें नद्यांच्या उदकाचें वस्त्र परिधान केलें, आणि अत्यंत ऋजुगामिनी जी सद्धर्माची नौका तिच्यावर आरोहण केलें. ससाण्यानें आणलेला सोमाचा अंकुर उदकामध्येंच वृद्धिंगत झाला. पित्यानें त्याचें दोहन केलें; पित्याच्या ह्या बालकाचें त्यानेंच दोहन केलें २. —( सोमरूप ) सिंहाकडे ते प्राप्त झाले. मधुररसाचा झरा, हरिद्वर्ण, आरक्त आणि ह्या द्युलोकाचा पालक अशा सोमाकडे ( भक्तजन ) प्राप्त झाले, तेव्हां ( शत्रूंमध्यें ) प्रथम घुसणाऱ्या शूर इन्द्रानें "प्रकाशधेनू कोठें आहेत असें विचारलें;" कारण ह्या सोमाच्याच नेत्रानें तो वीरपुंगव ( इन्द्र आम्हांकडे अवलोकन करून ) आमचें सर्वतोपरि रक्षण करितो ३ —मधुररसानें ओथंबलेला, विकराळ, चपल आणि विशाल अश्व ( जो सोम ) त्याला मोठमोठ्या चाकांच्या ( यज्ञरूप ) रथाला जोडून देतात. तेव्हां सख्या बहिणी ( म्हणजे ऋत्विजांच्या अंगुलि ) त्या सोमाला अलंकृत करतात. एकाच कुलांत उत्पन्न झालेल्या भगिनी त्या सत्ववीराला ओजस्वी करतात ४. —घृताचें दोहन करणाऱ्या

पवस्वा–नभिशस्ता दिव्या यथा विट्। आपो न मक्षू सुमतिं भवा नः सहस्राप्साः पृतनाषाट् न यज्ञः ॥ ७ ॥ राज्ञो न ते वरुणस्य व्रतानि बृहत् गभीरं तव सोम धाम। शुचिस् त्वम् असि प्रियो न मित्रो दक्षाय्यो अर्यमेवा–सि सोम ॥ ८ ॥

## सूक्तम् ८९

### पूर्ववत्

प्रो स्य: वह्निः पथ्याभिर् अस्यान् दिवो न वृष्टिः पवमान अक्षाः। सहस्रधारो असदत् नि अस्मे मातुर् उपस्थे वन आ च सोमः ॥ १ ॥ राजा सिन्धूनाम् अवसिष्ट वासः ऋतस्य नावम् आ ऽ रुहत् रजिष्ठाम्। अप्सु द्रप्सो वावृधे श्येनजूतो दुहे ईं पिता दुहे ईं पितुर्जाम् ॥ २ ॥ सिंहं नसन्त मध्वो अयासं हरिम् अरुषं दिवो अस्य पतिम्। शूरो युत्सु प्रथमः पृच्छते गाः अस्य चक्षसा परि पाति उक्षा ॥ ३ ॥ मधुपृष्ठं घोरम्

चौघीजणी त्याच्याबरोबर राहतात. कारण सर्वांचा एकच आधार ( जें अंतरिक्ष ) त्यांत त्यांचा निवास असतो. प्रणिपात केला म्हणजे (भक्तांना) त्या पावन करतात, आणि सोमाकडे धांवत जातात. त्या विपुलसंख्य धेनू सर्व बाजूंनीं त्याच्या भोंवतीं भोंवतीच राहतात ५. —तो आकाशाचा स्तंभ आहे, पृथ्वीचा आधार आहे, आणि यच्चावत् मानव त्याच्या अगदीं हातांत आहेत. सोमा, तुझा " नियुत् " अश्व जोडलेला रथ स्तोतृ-जनाला ( अभीष्टाचा ) अखंड झराचा होय. ( म्हणून ) तुझ्या मधुररसाचा अंश इन्द्राच्या हर्षासाठीं स्वच्छप्रवाहानें वहातो ६. —तूं अपराजित आहेस. देवसेवेची उत्कट लालसा धरून हे सोमा वृत्रनाशक जो तूं तो इन्द्राप्रीत्यर्थ पावनप्रवाहानें वहा; चंद्राप्रमाणें अत्याल्हादप्रद जें महत् ऐश्वर्य त्याचें आम्हांला स्वामित्व दे, आणि उत्कृष्ट शौर्याचे आम्हीं प्रभू होऊं असें कर ७.

## सूक्त ९०

हा द्यावापृथिवींचा जनक ( होय. त्याला ) हेलावून दिला, तेव्हां ( भक्तांना ) सत्वसामर्थ्य हस्तगत करून देण्याची इच्छा धरून तो रथाप्रमाणें दौडत गेला. हा इन्द्राकडेच निघालेला वीर शस्त्रास्त्रांनीं झगझगीत दिसत आहे. सर्व प्रकारचीं उत्कृष्ट धनें त्यानें आपल्या दोन्हीं हातांत ठेविलीं आहेत. १ —तिन्ही उच्चस्थानांत राहणारा, तारुण्याचा जोम उत्पन्न करणारा जो वीर्यशाली सोम त्याला उच्चस्वरांत म्हटलेल्या सूक्तांनीं प्रसन्न केलें आहे. वरुण जसा नद्यांचे प्रवाह ( सोडतो ) त्याप्रमाणें पल्लवाच्छादित आणि उदार हस्तानें रत्नें देणारा सोम हा भक्तांना उत्कृष्ट संपत्ति यथेच्छ अर्पण करितो २ सोमा तूं शूर-

---

अयासम् अश्वं रथे युञ्जन्ति उरुचक्र ऋष्वम् । स्वसारः ईं जामयो मर्जयन्ति सनाभयो वाजिनम् ऊर्जयन्ति ॥ ४ ॥ चतस्र ईं घृतदुहः सचन्ते समाने अन्तो धरुणे निषत्ताः ॥ ताः ईम् अर्षन्ति नमसा पुनानास् ताः ईं विश्वतः परिषन्ति पूर्वीः ॥ ५ ॥ विष्टम्भो दिवो धरुणः पृथिव्याः विश्वाः उत क्षितयो हस्ते अस्य । असत् ते उत्सो गृणते नियुत्वान् मध्वो अंशुः पवते इन्द्रियाय ॥६॥ वन्वन् अवातो अभि देववीतिम् इन्द्राय साम वृत्रहा पवस्व । शग्धि महः पुरुश्चन्द्रस्य रायः सुवीर्यस्य पतयः स्याम ॥ ७ ॥

## सूक्तम ९०

वसिष्ठः पवमानसोमः त्रिष्टुप् .

प्र हिन्वानो जनिता रोदस्योः रथो न वाजं सनिष्यन् अयासीत् । इन्द्रं गच्छन् आयुधा सं शिशानो विश्वा वसु हस्तयोर् आ दधानः ॥ १ ॥ अभि त्रिपृष्ठं वृषणं वयोधाम् आङ्गूषाणाम् अवावशन्त वाणीः । वना वसानो वरुणो न सिन्धून् वि

संघाचा नायक, सकल वीरांचा प्रभु, शत्रूंना रगडणारा विजयी योद्धा, आणि यशोधनजेता (आहेस, तर) आपल्या पावनप्रवाहानें वहा. तूं तेजस्वी आयुधें धारण करणारा आपलें धनुष्य झटपट सज्ज करतोस. तूं समरामध्यें अजिंक्य आणि तुमुल युद्धांत शत्रुसेनाला दडपून टाकणारा आहेस. तूं स्वच्छप्रवाहानें वहा ३. —धेनूंना चरण्याला विस्तीर्ण प्रदेश तूं देऊन सर्वांना निर्भय केलेंस. (तर आतां) परस्पर संलग्न आणि सर्वांचें निवासस्थान ज्या बुद्धिचालक (द्यावापृथिवी) त्यांच्याकडे तुझा पावनप्रवाह वाहूं दे. दिव्योदकें, उषःकाल, दिव्यलोक, आणि प्रकाशधेनू या सर्वांचें नियमन करून आणि श्रेष्ठ सत्वसंपत्ति आम्हांकडे वळवून तूं सिंहनाद केलास ४. —पावनप्रवाहा, सोमा, तूं वरुणाला हृष्ट कर, मित्राला तल्लीन कर, आनंदनिधि इन्द्राला प्रमुदित कर, विष्णूला प्रसन्नचित्त कर, मरुतसेनेला संतुष्ट कर, तसेंच अखिल दिव्यजनांनाहि आनंदित कर. हे उल्लासरूपा (स्वतः) हृष्ट होण्यासाठींच तूं परमथोर इन्द्राला हर्षनिर्भर कर ५. — अशा रीतीनें राजाप्रमाणें तूं कर्तृत्वशाली सोम आपल्या प्रभावानें सर्व संकटांचा पार धुव्वा उडवून स्वच्छ प्रवाहानें वहा. हे आल्हादरूपा उत्कृष्ट सूक्तें गाणाऱ्या भक्ताची तरतरी अढळ ठेव, आणि हे अखिल विभूतिनों तुम्हींहि आपल्या मंगल आशीर्वादांनीं आमचें सदैव रक्षण करा ६.

अध्याय तिसरा समाप्त

---

### अध्याय चवथा

## सूक्त ९१

वाचेला वदविणारा, मनाचा आद्यनियामक, आणि मनोजवी अशा सोमाला रथांनीं गजबजलेल्या रणांगणावर वीराला दवडावें त्याप्रमाणें (भक्तांच्या) ध्यानबुद्धीनें यज्ञमंडपांत पाठविलें आहे. म्हणून परस्परांच्या भगिनी अशा ज्या दहा अंगुलि त्या हव्यवाहक सोमाला

---

रत्नधाः दयते वार्याणि ॥ २ ॥ शूरग्रामः सर्ववीरः सहावान् जेता पवस्व सनिता धनानि । तिग्मायुधः क्षिप्रधन्वा समत्सु अषाळ्हः सह्वान् पृतनासु शत्रून् ॥ ३ ॥ उरुगव्यूतिर् अभयानि कृण्वन् समीचीने आ पवस्वा पुरन्धी । अपः सिषासन् उषसः स्व गाः सं चिक्रदो महो अस्मभ्यं वाजान् ॥ ४ ॥ मत्सि सोम वरुणं मत्सि मित्रं मत्सि इन्द्रम् इन्दो पवमान विष्णुम् । मत्सि शर्धो मारुतं मत्सि देवान् मत्सि महाम् इन्द्रम् इन्दो मदाय ॥ ५ ॥ एवा राजेव क्रतुमाँ अमेन विश्वा घनिघ्नत् दुरिता पवस्व । इन्दो सूक्ताय वचसे वयोधाः यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥ ६ ॥

इति सप्तमे तृतीयोऽध्यायः

---

स्वस्थांनीं अधिष्ठित होण्यासाठीं लोंकरीच्या पवित्रांमध्यें उच्चभागीं ओतून देत आहेत. १. —भक्तांच्या अनेक कवनांनीं दिव्यविबुधांच्या सेवेसाठीं हा आल्हादप्रद सोम पिळला आहे. शूर नहुषांच्या मर्त्यजनांकडून हा अमर सोम (अलंकृत होत आहे). लोंकरीच्या पवित्रांनीं, गोदुग्धानें, आणि उदकांनीं स्वच्छ होऊन अलंकृत होत आहे २. —वीर्यशाली सोम मोठ्यानें आरोळी देऊन महावीर्यशाली इन्द्राप्रीत्यर्थ स्वच्छ आणि तेजस्वी होऊन वेगानें वहात आहे. याप्रमाणें तो ऋक्स्तोत्रप्रिय आणि स्फूर्तिदाता यज्ञधुरीण सोम सहस्रावधि वारीक छिद्रांच्या पवित्रांतून आपल्या अविनाशी मार्गांनीं गमन करीत असतो. ३. —राक्षसांचीं मंदिरें फार मजबूत आहेत त्यांचा विध्वंस कर; आल्हादप्रद सोमा, तूं पावनप्रवाहानें वाहून सत्वसामर्थ्य उघड करून दे. शत्रू वरून येत असोत, जवळ असोत, किंवा दूर असोत त्यांना तूं आपल्या तीक्ष्ण शस्त्रानें छाटून टाक, त्यांच्या पुढाऱ्याला हि तोडून टाक ४. —हे अखिलजनप्रिया सोमा, प्राचीन कवनाप्रमाणें आमच्या अपूर्व सूक्तालाहिं तूं मार्ग मोकळा करून दे. जे स्वतः अजिंक्य आहेत आणि विजयी सामर्थ्यामुळें ज्यांना श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे असे जे तुझे आशीर्वाद त्यांना, हे अपारकर्तृत्वा, हे अतुलबला सोमा, आम्हीं प्राप्त करून घेऊं असें कर ५. —याप्रमाणें तूं पावनप्रवाहानें वहात राहून दिव्योदकें, दिव्यलोक, दिव्यप्रकाश आणि पुत्रपौत्रादि संतति ह्यांचा विपुल लाभ आम्हांस होऊं दे. आम्हांला आमची भूमि सुखदायक कर, प्रकाश भरपूर दे, आणि हे सोमा, निरंतर आमच्या नेत्रांना सूर्यदर्शनाचा लाभ होईल असें कर.

---

अथ सप्तमे चतुर्थोऽध्यायः

## सूक्तम् ९१

मारीचः काश्यपः पवमानसोमः त्रिष्टुप्

असर्जि वक्वा रथ्ये यथाऽऽजौ धिया मनोता प्रथमो मनीषी । दश स्वसारो अधि सानो अव्ये अजन्ति वह्निं सदनानि अच्छा ॥१॥ वीती जनस्य दिव्यस्य कव्यैर् अधि सुवानो नहुष्येभिर् इन्दुः प्र यो नृभिर् अमृतो मर्त्येभि र्मर्मृजानो अविभि र्गोभिर् अद्भिः॥२॥ वृषा वृष्णे रोरुवत् अंशुर् अस्मै पवमानो रुशत् ईर्ते पयो गोः ॥ सहस्रम् ऋक्वा पथिभि र्वचोवित् अध्वस्मभिः सूरो अण्वं वि याति ॥ ३ ॥ रुज दृळहा चित् रक्षसः सदांसि पुनानः इन्दो ऊर्णुहि वि वाजान् ॥ वृश्चो–परिष्टात् तुजता वधेन ये अन्ति दूरात् उपनायम् एषाम् ॥ ४ ॥ स प्रत्नवत् नव्यसे विश्ववार सूक्ताय पथः कृणुहि प्राचः । ये दुःषहासो वनुषा बृहन्तस् स्ताँ स्ते अश्याम पुरुकृत् पुरुक्षो ॥ ५ ॥ एवा पुनानो अपः स्व र्गाः अस्मभ्यं तोका तनयानि भूरि । शं नः क्षेत्रम् उरु ज्योतिंषि सोम ज्योङ् नः सूर्यं दृशये रिरीहिं ॥ ६ ॥

# सूक्त ९२

पिळला जाणारा, हरिद्वर्ण सोमपल्लव, विजयप्राप्तीसाठीं रथाप्रमाणें हेलावून देऊन पवित्रावर ओतला आहे; त्यामुळें शुद्धप्रवाहानें वाहणाऱ्या त्या सोमाला सत्कीर्ति आणि इंद्राचें कृपाबल हीं प्राप्त झालीं. आणि त्यानें आपल्या प्रेमळपणानें दिव्यविभूतिना संतुष्ट केलें १. —मनुष्यांना कृपाकटाक्षानें पाहणारा, प्रतिभापूर्ण सोम आपलें नांव गाजवीत आपल्या स्वस्थानीं ( जाण्यासाठीं ) पवित्राकडे सरसावला आहे. यज्ञसंपादक जसा आपल्या ठिकाणीं आसनस्थ होतो त्याप्रमाणें तो चमूपात्रांत अधिष्ठित झाला तेंव्हां सात ज्ञानी ऋषि त्याच्याकडे गेले २. —पूर्णप्रज्ञ, सन्मार्ग जाणणारा, सकल देवप्रिय असा सोम पावनप्रवाहानें वहात वहात आपल्या शाश्वतस्थलीं प्राप्त होतो. तो भक्तांच्या निखिल काव्यमाधुरींत रममाण होवो. तो धीरोदात्त सोम आम्हां मानवांच्या पांचहि जातींच्या (हिता)साठीं झटत असतो ३. —पावनप्रवाहा सोमा, तुझ्या गूढ स्थानांत तेहेतीस **विश्वेदेव** आणि (ऋत्विजांच्या) दहा अंगुलि आपल्या परिपाटीप्रमाणें तुजला लोंकरीच्या पवित्राच्या उच्चदेशीं ठेवून स्वच्छ करितात. भरवेगानें वाहणाऱ्या सात नद्या तुला सोमाला अलंकृत करितात ४. —तेंच ह्या पावनप्रवाह सोमाचें सत्यस्वरूप होय, कीं जेथें सर्व कर्तृत्ववान कविजन प्राप्त होतात. ज्या सत्यानें दिनमणि–सूर्यासाठीं आकाश बनविलें, मनूवर कृपादृष्टि ठेवली आणि अधार्मिक दुष्टासाठीं नरक निर्माण केला ५. —पशु संपन्न गृहाकडे यज्ञपुरोहित जातो, किंवा **सत्यप्रेमी राजा लोकसभेमध्यें प्रवेश** करतो, त्याप्रमाणें पावनप्रवाह सोम द्रोणकलशांत प्रविष्ट होतो, अरण्यांतील विक्राळ श्वापदाप्रमाणें कलशांत अधिष्ठित होतो ६.

# सूक्तम् ९२

## पूर्ववत्

परि सुवानो हरिर् अंशुः पवित्रे रथो न सर्जि सनये हियानः । आपत् श्लोकम् इन्द्रियं पूयमानः प्रति देवाँ अजुषत प्रयोभिः ॥ १ ॥ अच्छा नृचक्षाः असरत् पवित्रे नाम दधानः कविर् अस्य योनौ । सीदन् होतेव सदने चमूषु उपे–म् अग्मन् ऋषयः सप्त विप्राः ॥ २ ॥ प्र सुमेधा गातुवित् विश्वदेवः सोमः पुनानः सद एति नित्यम् । भुवत् विश्वेषु काव्येषु रन्ता अनु जनान् यतते पञ्च धीरः ॥ ३ ॥ तव त्ये सोम पवमान निण्ये विश्वे देवास् त्रय एकादशासः । दश स्वधाभिर् अधि सानो अव्ये मृजन्ति त्वा नद्यः सप्त यह्वीः ॥ ४ ॥ तत् नु सत्यं पवमानस्य अस्तु यत्र विश्वे कारवः सं नसन्त । ज्योति र्यत् अह्ने अकृणोत् उ लोकं प्रा–वत् मनुं दस्यवे को अभीकम् ॥ ५ ॥ परि सद्मेव पशुमन्ति होता राजा न सत्यः संयतीर् इयानः । सोमः पुनानः कलशाँ अयासीत् सादत् मृगो न महिषो वनेषु ॥ ६ ॥

## सूक्त ९३

एकदम जलसिंचन करणाऱ्या आणि (भक्ताला) प्रोत्साहन देणाऱ्या ज्या ध्यान-स्तुति—ज्या धीरोदात्त सोमाच्या दहा भगिनी होत, त्या त्याला अलंकृत करितात. सूर्यापासून उत्पन्न झालेल्या अरुणप्रभेच्या भोंवतीं सोम धांवत चालला, आणि चपल अश्वारूढ वीराप्रमाणें द्रोणकलशाकडे धांवत गेला. १. —मातांबरोबर जाणाऱ्या बालकाप्रमाणें मोठ्यानें खळखळ करीत हा सर्वजनप्रिय वीरपुंगव सोम उदकांसह उचंबळून वाहतो, आणि जेव्हां तो तकतकीत गोदुग्धाशीं कलशांमध्यें मिश्र होतो तेव्हां एखादा शूर पुरुष आपल्या यौवनाढ्य लावण्यलतिकेसह स्वगृहीं जात आहे कीं काय असें वाटतें २. —पहा ह्या अवध्य धेनूची कांस कशी तट्ट फुगली; आणि परमप्रज्ञ आल्हादप्रद सोम-बिन्दुहि दुग्धप्रवाहाशीं संयुक्त झाला. यज्ञाचा शिरोमणि जो सोम त्याला निर्मल आणि उत्कृष्ट भूषणांनीं सुशोभित करावें त्याप्रमाणें धेनू आपल्या दुग्धाशीं मिश्र करून अलंकृत करितात ३. —पावनप्रवाहा सोमा, तूं सर्वांना वश करणारा, दिव्यविभूतिंसह (येऊन) आम्हांला अश्वप्रचुर असें धन अर्पण कर; आणि रथारूढ वीरांविषयीं उत्कंठित असणारी जी औदार्यबुद्धि तिच्यामुळें उत्कृष्ट अभीष्टाची प्राप्ति व्हावी म्हणून तिला आमच्याकडे वळीव ४. —स्वच्छ प्रवाहानें वहात राहून तूं शूर सैनिकानीं युक्त आणि सर्वांना चंद्राप्रमाणें अत्यंत आल्हादप्रद असा आमचा उत्कर्ष कर. तुजला प्रणिपात करणाऱ्या भक्ताचें आयुष्य हे सोमा, तुझ्याकडून वृद्धिंगत होवो. आणि प्रज्ञाधन असा तूं प्रातःसवनाच्या वेळीं आमच्याकडे त्वरेनें यावेंस असें घडो ५.

## सूक्तम् ९३

गौतमो नोधाः पवमानसोमः त्रिष्टुप्

साकम् उक्षो मर्जयन्त स्वसारो दश धीरस्य धीतयो धनुत्रीः । हरिः परि अद्रवत् जाः सूर्यस्य द्रोणं ननक्षे अत्यो न वाजी ॥ १ ॥ सं मातृभि र्न शिशु र्वाव-शानो वृषा दधन्वे पुरुवारो अद्भिः । मर्यो न योषाम् अभि निष्कृतं यत् सं गच्छते कलशे उस्रियाभिः ॥ २ ॥ उत प्र पिप्ये ऊधर् अघ्न्यायाः इन्दु र्धाराभिः सचते सुमेधाः । मूर्धानं गावः पयसा चमूषु अभि श्रीणन्ति वसुभि र्न निक्तैः ॥३॥ स नो देवेभिः पवमान रद इन्दो रयिम् अश्विनं वावशानः ॥ रथिरायताम् उशती पुरन्धिर् अस्मद्र्यक् आ दावने वसूनाम् ॥४॥ नू नो रयिम् उप मास्व नृवन्तं पुनानो वाताप्यं विश्वश्चन्द्रम् । प्र वन्दितुर् इन्दो तारि आयुः प्रात र्मक्षू धियावसु र्जगम्यात् ॥ ५ ॥

# सूक्त ९४

ओजस्वी सत्ववृत्तीप्रमाणें, किंवा मानवी प्रजाजन सूर्याच्या ठिकाणीं अहमहमिकेनें लक्ष लावतात त्याप्रमाणें भक्ताच्या मंगल भावना सोमाच्या ठायीं ( प्राप्त होण्यासाठीं जणों ) स्पर्धा करीत असतात. उदकांचा लाभ देणारा हा सोम, पशूंच्या अभिवृद्धीकरितां जसें संरक्षक आवार, त्याप्रमाणें, हा कविप्रतिभेला स्फूर्ति देऊन मननीय स्तोत्रांचा प्रवाह लोटतो १. —अमरत्वाचें जें तेजोमय स्थान आहे तें दिव्यलोकप्राप्तीसाठीं ( सोम हा ) अगदीं उघडपणें निदर्शनास आणतो; हीं सर्व भुवनें त्याच्या इच्छेनेंच विस्तार पावलीं आहेत. सूर्याच्या ठिकाणीं प्रकाशकिरण, किंवा आवारांत ज्याप्रमाणें धेनू विश्रांति पावतात त्याप्रमाणें भक्तिप्रेमानें उचंबळणाऱ्या स्तुति सद्धर्मोत्सुक होऊन आल्हादप्रद सोमाला मोठ्यानें हांक मारूं लागतात २. —हा काव्यस्फूर्तिदाता सोम, शूराचा रथ जसा सर्व भूप्रदेशांत वावरतो त्याप्रमाणें भक्तांच्या कवनांत सर्वत्र भरून राहतो. तो दिव्यविबुधांमध्यें यश, आणि चातुर्यबलशाली मानवाला ( अक्षय ) संपत्ति देण्याची इच्छा दर्शवून सकल भक्तांकडून प्रशंसा पावतो ३. —( भक्तांना ) भूषणभूत होण्यासाठीं जो प्रकट झाला; भूषण मिरविण्यासाठीं जो बाहेर निघाला, तो हा सोम स्तोतृजनाला वैभवाचें भूषण आणि तारुण्याचा जोम अर्पण करतो. त्याच्या वैभवाचें वस्त्र परिधान करून ( भक्त ) अमरत्व पावले. व्यवस्थित गतीनें जाणारा हा सोम विद्यमान आहे म्हणूनच न्याय्य युद्धें सत्य आणि यशस्वी होतात ४. —उत्साह आणि ओजस्विता यांचा प्रवाह वाहूं दे. अश्व, धेनू आणि विपुल प्रकाश हे सुलभ कर. तूं दिव्यविबुधांना हर्षित करतोस. यच्चावत् वस्तु तुजला सहज स्वाधीन करून घेतां येतात. हे सोमा, शत्रूंना तूंच पराजित करतोस ५.

# सूक्तम् ९४

आङ्गिरसः कण्वः पवमानसोमः त्रिष्टुप्

अधि यत् अस्मिन् वाजिनीव शुभः स्पर्धन्ते धियः सूर्ये न विशः। अपो वृणानः पवते कवीयन् व्रजं न पशुवर्धनाय मन्म ॥ १ ॥ द्विता विऊर्ण्वन् अमृतस्य धाम स्वर्विदे भुवनानि प्रथन्त। धियः कृण्वानाः स्वसरे न गावः ऋतायन्तीर् अभि वावश्र इन्दुम् ॥ २ ॥ परि यत् कविः काव्या भरते शूरो न रथो भुवनानि विश्वा। देवेषु यशो मर्ताय भूषन् दक्षाय रायः पुरुभूषु नव्यः ॥ ३ ॥ श्रिये जातः श्रिये आ निर् इयाय श्रियं वयो जरितृभ्यो ददाति। श्रियं वसानाः अमृतत्वम् आयन् भवन्ति सत्या समिथा मितद्रौ ॥ ४ ॥ इषम् ऊर्जम् अभि अर्ष अश्वम् गाम् उरु ज्योतिः कृणुहि मत्सि देवान्। विश्वानि हि सुषहा तानि तुभ्यं पवमान बाधसे सोम शत्रून् ॥ ५ ॥

## सूक्त ९५

अरण्याच्या अन्तर्भागीं वास करणारा हा हरिद्वर्ण सोम ओतला जातांना आणि शूर ऋत्विजांच्या हातून स्वच्छ होतांना मोठ्यानें गर्जना करतो. जेव्हां दुग्धाला तो आपलें वस्त्र करतो, तेव्हां नित्य परिपाठाप्रमाणें ( हे ऋत्विजांनों ) तुम्हीं सोमासाठीं मननीय स्तोत्रें रचून तीं म्हणा १. —वल्हीं मारणारा नाविक नौकेला गति देतो त्याप्रमाणें हरितपल्लव सोम हा पात्रांत ओततांना सद्धर्माचा हितकर मार्ग म्हणजे जी देवस्तुति–तिची स्फूर्ति देतो; आणि दिव्यसोम हा दिव्यविभूतिंचीं जीं जीं नांवें गुप्त आहेत तीं यज्ञामध्यें मोठ्यानें स्तवन करणाऱ्या भक्ताकरितां प्रकट करतो २. —उदकाच्या कल्लोलाप्रमाणें जोरानें झरझर वाहणाऱ्या मननस्तुति सोमाकडे वेगानें धांवतात. देवापुढें नम्र होऊन केलेल्या ज्या उत्सुकस्तुति, त्या, उत्सुक सोमाच्या सन्निध जातात आणि त्याच्याशीं संलग्न होतात ३. —पर्वताच्या शिखरावर एखाद्या विशाल वृषभाप्रमाणें अधिष्ठित झालेल्या सोमपल्लवाला ( ऋत्विज् हे ) स्वच्छ करून त्याचें दोहन करितात. ( सर्व जग ) आपल्या शब्दानें वश करणाऱ्या सोमाला भक्ताच्या सद्भावना शरण जातात; अन्तरिक्ष समुद्रांतील वरुण( रूप सोमा )ला त्रित हा धारण करतो ४. —उपवक्ता अध्वर्यू हा होत्याच्या स्तुतीला प्रोत्साहन देतो त्याप्रमाणें तूं शुद्धप्रवाहानें वाहतांना, हे आल्हादरूपा, भक्ताच्या बुद्धीला खुलावट देऊन चालन दे. तूं आणि इंद्र हे ( भक्ताच्या ) उन्नतीकरतांच ( यज्ञमंडपांत ) वास करितां, तर उत्कृष्टशौर्याचे आम्हीं प्रभू होऊं हें खचित ५.

## सूक्तम् ९५

प्रस्कण्वाः सोमः त्रिष्टुप्

कनिक्रन्ति हरिर् आ सृज्यमानः सीदन् वनस्य जठरे पुनानः । नृभिर् यतः कृणुते निर्णिजं गाः अतो मती र्जनयत स्वधाभिः ॥ १ ॥ हरिः सृजानः पथ्याम् ऋतस्य इयर्ति वाचम् अरितेव नावम् ॥ देवो देवानां गुह्यानि नाम आविष् कृणोति बर्हिषि प्रवाचे ॥ २ ॥ अपामिवे–त् ऊर्मयस् तर्तुराणाः प्र मनीषाः ईरते सोमम् अच्छ । नमस्यन्तीर् उप च यन्ति सं च आ च विशन्ति उशतीर् उशन्तम् ॥ ३ ॥ तं मर्मृजानं महिषं न सानौ अंशुं दुहन्ति उक्षणं गिरिष्ठाम् । तं वावशानं मतयः सचन्ते त्रितो बिभर्ति वरुणं समुद्रे ॥४॥ इष्यन् वाचम् उपवक्तेव होतुः पुनान इन्दो इति वि ष्या मनीषाम् । इन्द्र श्च यत् क्षयथः सौभगाय सुवीर्यस्य पतयः स्याम ॥५॥

## सूक्त ९६

शूर सेनाधिपति रथांच्याहि पुढें चालून जातो त्याप्रमाणें हा सोम प्रकाशधेनू हस्तगत करण्याच्या इच्छेनें अग्रभागीं धांवून जातो; तेव्हां सर्व सेना हर्षभरित होते. भक्तजन इन्द्राचा धांवा करतात; तो धांवा आपले मित्र जे भक्त त्यांच्यासाठीं सफल करून सोम हा आपलीं चट्कन नेसतां येण्यासारखीं वस्त्रें परिधान करुन सिद्ध होतो १. —ज्याच्या योगानें अश्वांना दौडत नेतात त्या प्रतोदाचा ज्याला स्पर्शहि झाला नाहीं अशा सोमरूपी हरिद्वर्ण अश्वाला या इन्द्राचे हरिद्वर्ण सेवक प्रणतिपूर्वक अलंकृत करतात; तेव्हां तो इन्द्राचा प्रियमित्र रथारूढ होतो; तो ज्ञानवान् सोम त्यांत आरूढ होऊन भक्तांच्या मनोहर स्तुतींकडे गमन करतो २. —हे दिव्य सोमा, इन्द्राचें पेय तूं आहेस; तर ईश्वराच्या सेवेसाठीं, तुझा उत्कृष्ट आस्वाद दिव्यविभूतिंनीं घ्यावा म्हणून तूं पावनप्रवाहानें वहा; आणि उदकांना मुक्त करून, ह्या द्युलोकाकडून जलवर्षाव करवून आणि अपार अशा अन्तरालांतून येऊन भक्तपावन असा तूं आमचें समाधान कर ३. —आम्हीं कोणाकडूनहि जिंकले जाऊं नये, कोणाकडूनहि मारले जाऊं नये आमचें कल्याण व्हावें; श्रेष्ठ आणि सर्वमान्य सेवा आमच्या हातून व्हावी यासाठीं तूं वहात रहा—हीच इच्छा या आमच्या सर्व मित्रांची आहे. पावनप्रवाहा सोमा, मलाहि पण तीच गोष्ट हवी आहे ४. —मननीय स्तुतींचा जनक, द्युलोकाचा जनक, पृथ्वीचा जनक, यज्ञाग्नीचा जनक, सूर्याचा जनक आणि त्याचप्रमाणें इन्द्राच्या [ हर्षाचा ] जनक आणि विष्णूच्याहि हर्षाचा जनक असा हा सोम पावनप्रवाहानें वहात आहे ५. —दिव्यविबुधांत हा ब्रह्मा, कवींमध्यें अग्रेसर, ज्ञानी स्तोतृजनांत ऋषि, श्वापदांत महिष गृध्रादि खादाड पक्ष्यांत ससाणा, वृक्षोच्छेदकांत परशु अशा अनेक रूपांचा हा सोम खळखळून पवित्रांतून पार वहात जातो ६ —समुद्र जसा लाटा उत्पन्न करतो, त्याप्रमाणें

## सूक्तम् ९६

प्रतर्दनः पवमान सोमः त्रिष्टुप्

प्र सेनानीः शूर अग्रे रथानां गव्यन् एति हर्षते अस्य सेना । भद्रान् कृण्वन् इन्द्रहवान् सखिभ्यः आ सोमो वस्त्रा रभसानि दत्ते । सम् अस्य हरिं हरयो मृजन्ति अश्वहयैर् अनिशितं नमोभिः । आ तिष्ठति रथम् इन्द्रस्य सखा विद्वाँ एना सुमतिं याति अच्छ ॥ २ ॥ स नो देव देवताते पवस्व महे सोम प्सरसे इन्द्रपानः ॥ कृण्वन् अपो वर्षयन् द्याम् उते–माम् उरोर् आ नो वरिवस्या पुनानः ॥ ३ ॥ अजीतये अहतये पवस्व स्वस्तये सर्वतातये बृहते । तत् उशन्ति विश्व इमे सखायस् तत् अहं वश्मि पवमान सोम ॥ ४ ॥ सोमः पवते जनिता मतीनां जनिता दिवो जनिता पृथिव्याः । जनिता अग्ने र्जनिता सूर्यस्य जनिता इन्द्रस्य जनितो–त विष्णोः ॥५॥ ब्रह्मा देवानां पदवीः कवीनाम् ऋषि र्विप्राणां मृहिषो मृगाणाम् । श्येनो गृध्राणां

पावनप्रवाह सोमानें वाचेला चालना दिली, स्तुतींना स्फूर्ति दिली; मनाला प्रेरणा केली; आणि (रक्षणाच्या दृष्टीनें) हीं आवारें लहान आहेत असें मनांत जाणून, ज्ञाता जो वीरपुंगव सोम तो आमच्या गो-समूहांत जाऊन उभा राहिला ७. —हर्षनिर्भर करणारा, संग्रामामध्यें विजयी होणारा, अपराजित आणि अमितवीर्य असा तूं आमच्या सत्वसामर्थ्याकरितां वहात रहा. हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ पावनप्रवाहानें वहाणारा मनोजयी सोम, प्रकाशधेनू जिंकण्याच्या इच्छेनें आपल्या पल्लवाच्या रसाची लाट जोरानें उडव ८. —सर्वप्रीय आणि देवानें प्रेरणा केलेला रम्य सोम इन्द्राला हर्ष व्हावा म्हणून द्रोण-कलशांत वेगानें वहात जातो. असंख्य प्रवाहांचा, असंख्य सत्वसामर्थ्यांचा हा सोम, एखादा प्रवल अश्ववीर युद्धाला जातो त्याप्रमाणें कलशांकडे धांवतो ९. —तूं पुराणपुरुष ( आहेस ), उत्कृष्ट धनदाता ( आहेस ), तूं प्रकट होऊन उदकांमध्यें स्वच्छ होतोस; पर्वतावर ( म्हणजे अभिषवणफलकावर ) तुझें दोहन होतें. तूं दुष्टांच्या निन्देपासून ( आमचें ) रक्षण करतोस आणि भुवनाचा राजा असा तूं ब्रह्म-ऋत्विजासाठीं शुद्ध होऊन ( भक्ताला ) सन्मार्ग दाखवितोस १०. —तुझ्या योगानेंच आमच्या प्राचीन सत्वधीर वाडवडिलांनीं, हे पावनप्रवाहा, आपलीं सत्कर्मे यथासांग केलीं. तूं अजिंक्य आणि विजयोत्सुक ( आहेस ), चोहोंकडून बंद केलेलीं स्थानें तूं मोकळीं कर, आणि शूर सैनिक आणि अश्व यांच्यासह आम्हांला भाग्यदाता हो ११. —तारुण्याचा जोम आणणारा, शत्रूंना ठार मारणारा, समाधानवृत्ति देणारा, आणि ( दिव्यजनाला ) हविर्भाग पोहोंचविणारा तूं जसा पूर्वीं मनुराजाकरितां पावनप्रवाहानें वहात होतास तसा आतांहि ( अक्षय )संपत्ति घेऊन येऊन आपल्या शुद्धप्रवाहानें वहा, इन्द्राच्या ठिकाणीं वास कर आणि ( युद्धांत ) शस्त्रास्त्रें प्रकट कर १२. —सोमा तूं माधुर्यपूर्ण, सद्धर्मप्रवर्तक, उदकरूपवस्त्र धारण करणारा ( आहेस ), तूं लोंकरीच्या पवित्राच्या उच्चस्थानावर स्वच्छ

---

स्वधिति र्वनानां सोमः पवित्रम् अतिएति रेभन् ॥ ६ ॥ प्रा–वीविपत् वाच ऊर्मिं न सिन्धु र्गिरः सोमः पवमानो मनीषाः । अन्त पश्यन् वृजने–माऽवराणि आ तिष्ठति वृषभो गोषु जानन् ॥ ७ ॥ स मत्सरः पृत्सु वन्वन् अवातः सहस्ररेताः अभि वाजम् अर्ष । इन्द्राय इन्दो पवमानो मनीषी अंशोर् ऊर्मिम् ईरय गाः इषण्यन् ॥ ८ ॥ परि प्रियः कलशे देववातः इन्द्राय सोमो रण्यो मदाय । सहस्रधारः शतवाजः इन्दु र्वाजी न सप्तिः समना जिगाति ॥ ९ ॥ स पूर्व्यो वसुवित् जायमानो मृजानो अप्सु दुदुहानो अद्रौ । अभि शस्तिपाः भुवनस्य राजा विदत् गातुं ब्रह्मणे पूयमानः॥१०॥ त्वया हि नः पितरः सोम पूर्वे कर्माणि चक्रुः पवमान धीराः । वन्वन् अवातः परिधीँर् अपोर्णु वीरेभिर् अश्वै र्मघवा भवा नः ॥११॥ यथा ऽ पवथाः मनवे वयोधाः अमित्रहा वरिवोवित् हविष्मान् । एवा पवस्व द्रविणं दधानः इन्द्रे सं तिष्ठ जनया–युधानि॥१२॥ पवस्व सोम मधुमाँ ऋतावा अपो वसानो अधि सानो अव्ये ॥ अव द्रोणानि घृतवन्ति

प्रवाहानें वहा; आणि घृतपूर्ण द्रोणकलशांत स्थिर हो. तूं ( अन्तःकरणाला )अगदीं तल्लीन करणारा, हर्षनिर्भर करणारा आणि इन्द्रानें प्राशन करण्याला अगदीं योग्य आहेस १३. —असंख्य धारा वाहविणारा तूं द्युलोकांतून वृष्टिप्रवाह सोड. तूं अगणित संपत्ति मिळवून देणारा आणि सत्वप्रेमी आहेस तर ह्या देवयज्ञांत सिन्धूंसह, प्रकाशधेनूंसह, आमचें आयुष्य वृद्धिंगत करून गर्जना करीत द्रोणकलशामध्यें स्वच्छप्रवाहानें वहा १४. —हाच तो सोम भक्ताच्या मननीय स्तुतिकडे वहात राहून अश्वारूढ सत्ववीराप्रमाणें शत्रूसमूहांतून पार निघून जातोच जातो; (आतां तो कसा आहे म्हणाल तर) उत्साहप्रद आणि नुकतेंच दोहन केलेलें अदितीचें जणों दुग्ध, किंवा प्रशस्त मार्ग, किंवा सुयंत्रित चालणारा अश्व होय १५. —उत्कृष्ट शस्त्रें धारण करणारा, आणि स्तोतृजनांनीं स्वच्छ केलेला असा तूं आपलें रमणीय परंतु गुप्त नांव प्रकट करून आमच्याकडे वहात रहा. कीर्तीच्या इच्छेनें अश्वारूढ वीर धांवतो त्याप्रमाणें सत्वसामर्थ्याला अनुलक्षून, हे दिव्यसोमा, तूं वायुदेवाकडे, आणि प्रकाशधेनूंकडे वहात रहा १६. —नुकत्याच उपजलेल्या बालकाला स्वच्छ करतात त्या प्रमाणें तुज भक्तप्रिय विभूतिला ( भक्तजन ) स्वच्छ करीत आहेत. हवि पोहोंचविणारा जो तूं त्या तुला मरुत् हे आपल्या समूहानें सुशोभित करितात. असें झालें म्हणजे ज्ञानी सोम ललकारी देत पवित्रांतून वहात जातो १७. —जो ऋषींचें मन आहे, जो ऋषींनां ऋषित्व देणारा आहे, जो स्वर्लोक देणारा, असंख्य स्तुतींचा स्वीकार करणारा आणि कवींचा अग्रेसर आहे; तो महाभाग, स्तवनीय सोम आपल्या तिसऱ्या तेजोमय स्थानीं वास करण्याच्या इच्छेनें **विराज** आणि **स्तुति** यांना सुप्रकाशित करतो १८. —चमूपात्रांत अधिष्ठित झालेला श्येन, अभीष्टदाता, सामर्थ्यसंपन्न पक्षिराज, प्रकाशधेनू देणारा आणि आपलीं आयुधें धारण करून उदकांचा कल्लोल जो समुद्र त्याच्या निकट राहणारा महाभाग सोम तो आपलें चवथें तेजोमय स्थान देखील प्रकट करतो १९. —शुभ्रतेजानें मंडित असलेल्या पुरुषाप्रमाणें आपलें अंग स्वच्छ करणारा, चपल

---

सीद मन्दिन्तमो मत्सर-इन्द्रपानः ॥ १३ ॥ वृष्टिं दिवः शतधारः पवस्व सहस्रसा वाजयु र्देववीतौ । सं सिन्धुभिः कलशे वावशानः सम् उस्रियाभिः प्रतिरन् न आयुः ॥१४॥एष स्य सोमो मतिभिः पुनानो अत्यो न वाजी तरती-त् अरातीः। पयो न दुग्धम् अदितेर् इषिरम् उर्विव गातु सुयमो न वोह्ला ॥१५॥ सु आयुधः सोतृभिः पूयमानः अभिअर्ष गुह्यं चारु नाम । अभि वाजं सप्तिरिव श्रवस्या अभि वायुम् अभि गाः देव सोम ॥ १६ ॥ शिशुं जज्ञानं हर्यतं मृजन्ति शुम्भन्ति वह्निं मरुतो गणेन। कविं र्गीर्भिः काव्येना कविः सन् सोमः पवित्रम् अतिएति रेभन् ॥१७॥ ऋषिमनाः य ऋषिकृत् स्वर्षाः सहस्रणीथः पदवी कवीनाम् । तृतीयं धाम महिषः सिषासन् सोमो राजन् अनु राजति ष्टुप् ॥ १८ ॥ चमूषत् श्येनः शकुनो वि भृत्वा गोविन्दु र्द्रप्सः आयुधानि बिभ्रत् । अपाम् ऊर्मिं सचमानः समुद्रं तुरीयं धाम महिषो विवक्ति॥१९॥

अश्वारूढवीराप्रमाणें यशोधनासाठीं धांव घेणारा, वृषभाप्रमाणें धेनूसमूहाकडे जाणारा हा सोम द्रोणकलशाकडे वहात जाऊन चमूपात्रांत भरून राहिला आहे २० —आल्हादप्रदा, पावनप्रवाहा सोमा, स्वच्छप्रवाहानें वहात रहा. गर्जना करीत श्रेष्ठ ऋत्विजांच्या हातून लोंकरीच्या पवित्रांतून तुझा प्रवाह वाहूं दे—तूं क्रीडा करीत चमूपात्रांत स्वच्छप्रवाहानें भरून रहा; आणि तुझा तल्लीन करणारा रस इन्द्राला हर्षनिर्भर करो २१—पहा, ह्याचे विशाल प्रवाह झपाट्यानें वहात चालले, आणि तोहि गोदुग्धाशीं मिश्र होऊन कलशामध्यें प्रविष्ट झाला. जो सामप्रिय सामगायनांची प्रेरणा करतो, तो महाज्ञानी सोम मोठ्यानें गर्जना करून मित्राच्या आप्तवर्गाकडे जातो २२. —पावनप्रवाहा, ( लावण्यवती तरुणीचा ) प्रियकर जसा आपल्या वल्लभेकडे जातो त्याप्रमाणें सर्वत्र प्रशंसा पावलेला आल्हादप्रद सोम शत्रूंना अगदीं ठार करून ( कलशाकडे ) गमन करतो. यथेच्छ संचार करणारा पक्षी वृक्षावर स्वस्थ वसतो त्याप्रमाणें शुद्धप्रवाह सोमहि कलशामध्यें स्थिर होतो २३. —पावनप्रवाह सोमा, प्रभो, तुझ्या सहज वाहणाऱ्या रसधारा नवयुवतीप्रमाणें सहल करीत असतात. सर्वांना हवाहवासा वाटणारा सोम ( ऋत्विजांनीं ) आणला तेंव्हां त्या हविर्द्रूर्ण सोमानें उदकांत आणि कलशांत शिरतांना मोठ्यानें गर्जना केली २४.

## सूक्त ९७

ह्या ( ऋत्विजा )च्या प्रेरणेनें आणि प्रोत्साहनानें स्वच्छ होऊन त्वां दिव्यविभूतिनें आपल्या रसाचा दिव्यविबुधाशीं संयोग करून दिलास. यज्ञपुरोहित व्यवस्थित बांधलेल्या

---

मर्यो न शुभ्रस् तन्वं मृजानः अत्यो न सृत्वा सनये धनानाम् । वृषेव यूथा परि कोशम् अर्षन् कनिक्रदत् चम्वोर् आ विवेश ॥ २० ॥ पवस्वे-न्दो पवमानो महोभिः कनिक्रदत् परि वाराणि अर्ष । क्रीळत् चम्वोर् आ विश पूयमानः इन्द्रं ते रसो मदिरो ममत्तु ॥ २१ ॥ प्र अस्य धाराः बृहतीर् असृग्रन् अक्तो गोभिः कलशाँ आ विवेश । साम कृण्वन् सामन्यो विपश्चित् क्रन्दन् एति अभि सख्यु र्न जामिम् ॥२२॥ अपघ्नन् एषि पवमान शत्रून् प्रियां न जारो अभिगीत इन्दुः । सीदन् वनेषु शकुनो न पत्वा सोमः पुनानः कलशेषु सत्ता ॥ २३ ॥ आ ते रुचः पवमानस्य सोम योषेव यन्ति सुदुघाः सुधाराः । हरिर् आनीतः पुरुवारो अप्सु अचिक्रदत् कलशे देवयूनाम् ॥ २४ ॥

## सूक्तम् ९७

वसिष्ठः पवमानसोमः त्रिष्टुप्

अस्य प्रेषा हेमना पूयमानो देवो देवेभिः सम् अपृक्त रसम् । सुतः पवित्रं परि एति रेभन् मितेव सद्म पशुमन्ति होता ॥ १ ॥ भद्रा वस्त्रा समन्या वसानो

पशुयुक्त गृहांत प्रवेश करितो त्याप्रमाणें खळखळाटानें वाहणारा तुझा रस पवित्राकडे जातो १. —समारंभाला योग्य अशीं मंगलवस्त्रें परिधान करणारा तूं महाप्रतिभाशाली भक्तांच्या स्तवनांची वाखाणणी करून आणि अलंकृत होऊन चमूपात्रांत वाहत जा. सूक्ष्म दृष्टीनें सर्व कांहीं पाहणारा तूं देवयज्ञाविषयीं तर सदैव जागरूकच राहतोस २. —सर्वांना प्रिय, यशस्वी जनांतहि अत्यंत यशोवान् असा क्षेत्रपालक सोम, तो आमच्यासाठीं लोंकरीच्या पवित्राच्या उच्चभागीं स्वच्छ आणि अलंकृत होतो. हे सोमा तूं गर्जना करीत स्वच्छप्रवाहानें वहात जा; आणि दिव्यविभूतिनों तुम्हीं आपल्या कल्याणप्रद आशीर्वचनांनीं आमचें सदैव रक्षण करा ३. —( मित्रांनों ) तुम्हीं गुणगायन करा. दिव्यविभूतिंचें आम्हीं ऋक्स्तोत्रांनीं अर्चन करतों; आणि उच्चप्रतीचें धन प्राप्त व्हावें म्हणून तुम्हीं (देवाला) सोमरस अर्पण करा. तो मधुररुचि सोमरस लोंकरीच्या पवित्रांतून स्वच्छ होऊन वहातो आणि मग देवोत्सुक होऊन आमच्या द्रोणकलशांत अधिष्ठित होतो ४. —दिव्यविभूतिंचें मित्रत्व जोडून तो आल्हादी आणि असंख्य धारांचा सोम ( दिव्यविबुधांच्या ) हर्षासाठीं शुद्ध प्रवाहानें वाहतो. शूर ऋत्विजांनीं स्तविलेल्या सोमानें आपल्या पूर्वींच्या तेजस्वितेला अनुसरून भक्ताला महत्भाग्य प्राप्त होण्यासाठीं इन्द्राकडे गमन केलें ५. —तूं हरिद्वर्ण सोम, स्वच्छ होऊन स्तोतृजनांसाठीं, त्यांच्या अखंड ऐश्वर्यासाठीं वहात रहा. तुझ्या उत्कर्षाकरितां हर्षकारी रस इन्द्रापाशीं प्राप्त होवो. हे सोमा, दिव्यविभूतिंसह एकाच रथांत आरूढ होऊन कृपाप्रसाद करण्याच्या हेतूनें गमन कर; आणि दिव्यविभूतिनों तुम्हींहि आपल्या कल्याणप्रद आशीर्वचनांनीं आमचें सदैव रक्षण करा. ६. —आद्यकवि जो उशना त्याच्याप्रमाणें हा दिव्य सोम काव्य रचून दिव्यविभूतिंचे अवतार कथन करतो. ज्याची विरुदावलि श्रेष्ठ आहे, जो पवित्रजनांचा वन्धु, जो ( दुसऱ्याला ) पवित्र करतो तो हा सोमरूपी वराह गर्जना करीत आपल्या पायांनीं सर्व भूप्रदेशाचें आक्रमण करतो ७. —हंस आणि वृषभसमूह ( या सोमाचा ) तडफदार

---

महान् कवि र्निवचनानि शंसन् । आ वच्यस्व चम्वोः पूयमानो विचक्षणो जागृवि र्देववीतौ ॥ २ ॥ समु प्रियो मृज्यते सानो अव्ये यशस्तरो यशसां क्षैतो अस्मे । अभि स्वर धन्वा पूयमानो यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥ ३ ॥ प्र गायत अभि अर्चाम देवान् सोमं हिनोत महते धनाय । स्वादुः पवाते अति वारम् अव्यम् आ सीदाति कलशं देवयु र्नः ॥४॥ इन्दु र्देवानाम् उप सख्यम् आयन् सहस्रधारः पवते मदाय । नृभिः स्तवानो अनु धाम पूर्वम् अगन् इन्द्रं महते सौभगाय ॥ ५ ॥ स्तोत्रे राये हरिर् अर्षा पुनानः इन्द्रं मदो गच्छतु ते भराय । देवै र्याहि सरथं राधो अच्छा यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥ ६ ॥ प्र काव्यं उशनेव ब्रुवाणो देवो देवानां जनिमा विवक्ति । महिव्रतः शुचिबन्धुः पावकः पदा वराहो अभिएति रेभन् ॥७॥ प्र हंसासस् तृपलं मन्युम् अच्छा अमात् अस्तं वृषगणाः अयासुः । आङ्गूष्यं पव-

जोष पाहूनच भयानें आपल्या स्थानाकडे चालते झाले; परंतु प्रियमित्र जे ऋत्विज ते सर्व-प्रकारें स्तुत्य, दर्दम, आणि भक्तपावन अशा सोमाला (अनुलक्षून) एक समयावच्छेदेंकरून स्तोत्रें म्हणत असतात ८ —ज्याचें स्तवन सर्वत्र होतें अशा ईश्वराच्या प्रोत्साहनाला अनुसरून सोमरस मोठ्या सरोवरीनें वहातो, तेव्हां सहजवृत्तीनें क्रीडा करणाऱ्या सोमाला प्रकाशधेनू आकलन करूं शकत नाहींत. तीक्ष्ण शृंगाचा सोम सर्व वस्तूंची परिपूर्णता करितो. तो दिवसा हरित्पल्लवयुक्त आणि रात्रीं तीव्र तेजाचा दिसतो. ९. —आल्हादप्रद, सत्वाढ्य सोम हा दुग्धौघाशीं मिश्रित होऊन आपले ओजस्वी रस इन्द्राच्या ठिकाणीं अर्पण करून त्याला हर्ष व्हावा म्हणून शुद्ध प्रवाहानें वहातो. तो राक्षसांना ठार करतो; (भक्तांना) विपुल सौख्य देतो, आणि दानधर्म न करणाऱ्या शत्रूंची धूळधाण उडवितो. गोसमूहाचा तो राजा होय. १०. —आपल्या धारेनें, आपल्या मधुररसानें (दिव्यविभूतिंना) तृप्त करणारा आणि ग्राव्यांनीं पिळलेला सोमरस लोंकरीच्या पवित्रांतून स्वच्छ गाळला जात आहे. हा आल्हादी रस इन्द्राच्या मित्रत्वाची लालसा धरतो. तो दिव्य आणि हर्षकारी रसच देवाच्या हर्षोत्कर्षाला कारण होतो ११. —आपल्या रसानें दिव्यविभूतिंना तृप्त करून हा दिव्य आणि पावन सोम सर्व प्रकारच्या प्रियवस्तु आपल्या भक्ताकडे घेऊन येतो. प्रत्येक ऋतूप्रमाणें निरनिराळे स्वभावधर्म धारण करणारा सोम हा पवित्रावर उच्चभागीं राहून (ऋत्विजाच्या) दहा अंगुलींना कार्यव्यापृत करतो. १२. —रक्तवर्ण सोमरूपवृषभ दिशारूप धेनूंना प्रतिनादित करून पृथिवी आणि द्युलोक यांच्या सन्मुख गर्जना करीत जातो. तेव्हां समरांत इन्द्राच्या सिंहनादाप्रमाणें ध्वनि ऐकूं येतो, आणि भक्तांना स्फूर्ति देऊन सोम हा आमच्या स्तवनवाणींना अनुलक्षून वहात जातो १३. —अतिशय रसाळ असा तूं दुधाशीं मिश्र होऊन उचंवळून जाऊन आणि आपल्या मधुर अंकुराला तरतरीत करून वहात जातोस. हे सोमा, स्वच्छप्रवाह असा तूं इन्द्राप्रीत्यर्थ ओतला जातांना संतत धार उत्पन्न करून वहातोस १४. —याप्रमाणें हर्षोत्क-

---

मानं सखायो दुर्मर्षं साकं प्रवदन्ति वाणम् ॥ ८ ॥ स रंहते उरुगायस्य जूतिं वृथा क्रीळन्तं मिमते न गावः । परीणसं कृणुते तिग्मशृङ्गो दिवा हरि र्ददृशे नक्तमृज्रः ॥ ९ ॥ इन्दु र्वाजी पवते गोन्योघाः इन्द्रे सोमः सहः इन्वन् मदाय । हन्ति रक्षो बाधते परि अराती र्वरिवः कृण्वन् वृजनस्य राजा ॥ १० ॥ अध धारया मध्वा पृचानस् तिरो रोम पवते अद्रिदुग्धः । इन्दुर् इन्द्रस्य सख्यं जुषाणो देवो देवस्य मत्सरो मदाय ॥ ११ ॥ अभि प्रियाणि पवते पुनानो देवो देवान् स्वेन रसेन पृञ्चन् । इन्दु र्धर्माणि ऋतुथा वसानो दश क्षिपो अव्यत सानो अव्ये ॥ १२ ॥ वृषा शोणो अभिकनिक्रदत् गाः नदयन् एति पृथिवीम् उत द्याम् । इन्द्रस्येव वग्नुर् आ शृण्व आजौ प्र चेतयन् अर्षति वाचम् ए-माम् ॥ १३ ॥ रसाय्यः पयसा पिन्वमानः इरयन् एषि मधुमन्तम् अंशुम् ॥ पवमानः संतनिम् एषि कृण्वन् इन्द्राय सोम

भंकर असा तूं उदकांचा अवरोध करणाऱ्या दुष्टाला आपल्या घातक शस्त्रांनीं वठणीस आणून देवाच्या हर्षोत्सवासाठीं स्वच्छप्रवाहानें वहा; तेजस्वी अंगकांति धारण करणारा, आणि हे सोमा, प्रकाशधेनूविषयीं उत्सुक असा तूं पात्रांत ओतला गेलास ( म्हणजे ) आमच्याकडे वहात ये १५. —आल्हादप्रदा, तूं आमच्यावर प्रसन्न हो. सर्व मार्ग आम्हांला सुगम करून आणि आमचें हित साधून या विस्तीर्ण कलशांत स्वच्छप्रवाहानें वहा. लोखंडी घणानें ठेंचून टाकल्याप्रमाणें सर्व संकटाचा चुराडा उडव, आणि लोंकरीच्या पवित्राच्या उच्च भागावर आपल्या उत्कृष्ट प्रवाहानें वहा १६. —दिव्य, त्वरितगति, धान्यसमृद्धिकर, कल्याणरूप, आणि दानोत्सुक अशी पर्जन्यवृष्टि आम्हांवर वाहूं दे. मनोहर पुष्पगुच्छ वेंचून घ्यावे त्याप्रमाणें हे आल्हादप्रदा, तुझे कनिष्ठ बन्धू जे हे वायु त्यांना उचलून घेऊन तूं धों धों वहात ये १७. —गुंतागुंत झालेली गांठ उकलावी त्याप्रमाणें सरळ नीतिमार्ग आणि वक्रमार्ग ह्याचा घोंटाळा तूं उलगडून टाक. हे सोमा, शुद्धस्वरूप, हरिद्वर्ण असा तूं ( कलशांत ) ओतला जात असतां जोमदार अश्वाप्रमाणें गर्जना कर. दिव्यरूपा तूं वीर आपल्याच सदनांत सुखासीन आहेस ( तेथून ) आमच्याकडे वहात ये १८. —आल्हादरूपा सोमा, तूं प्रसन्न होऊन ( देवाच्या ) हर्षासाठीं, ( देवाच्या ) यज्ञासाठीं आपल्या प्रवाहानें ऊर्णापवित्राच्या उच्चभागीं वहात रहा. तूं सहस्रावधि धारा सोडतोस, तूं सुगंधित आणि अप्रतिहत आहेस तर शूरांच्या धकाधकीला योग्य अशा सत्वविजयाच्या प्रसंगीं तूं आपला रसौघ एकसारखा वहात ठेव १९. —ज्यांना लगामाची जरूर नाहीं, जे रथ ओढीत नाहींत, ( किंवा ) जे रथाला जोडलेलेही नाहींत असे रणांगणाकडे धांवणारे तीव्रवेगी जसे अश्व, त्याप्रमाणें हे शुभ्रतेजस्क सोमरस वहात आहेत. तर हे दिव्यविबुधानों तुम्हीं तो रस प्राशन करण्यास्तव इकडे आगमन करा २०. —याप्रमाणें आल्हादरूपा सोमा, देवाच्या प्रसन्नतेला अनुलक्षून मेघमंडलांतील उदककल्लोलाचा ओघ तूं चमूपात्रांत लोट. जें (सकलांना)

---

परि षिच्यमानः ॥ १४ ॥ एवा पवस्व मदिरो मदाय उदग्राभस्य नमयन् वधस्नैः । परि वर्णं भरमाणो रुशन्तं गव्युर् नो अर्ष परि सोम सिक्तः ॥ १५ ॥ जुष्ट्वी न इन्दो सुपथा सुगानि उरौ पवस्व वरिवांसि कृण्वन् । घनेव विष्वक् दुरितानि विघ्नन् अधि ष्णुना धन्व सानो अव्ये ॥ १६ ॥ वृष्टिं नो अर्ष दिव्यां जिगत्नुम् इळावतीं शङ्गयीं जीरदानुम् । स्तुकेव वीता धन्वा विचिन्वन् बन्धूंर् इमान् अवराँ इन्दो वायून् ॥ १७ ॥ ग्रंथिं न वि ष्य ग्रथितं पुनानः ऋजुं च गातुं वृजिनं च सोम । अत्यो न क्रदो हरिर् आ सृजानो मर्यो देव धन्व पस्त्यावान् ॥ १८ ॥ जुष्टो मदाय देवताते इन्दो परि ष्णुना धन्व सानो अव्ये । सहस्रधारः सुरभिर् अदब्धः परि स्रव वाजसातौ नृषह्ये ॥ १९ ॥ अरश्मानो ये अरथाः अयुक्ताः अत्यासो न ससृजानास आजौ ॥ एते शुक्रासो धन्वन्ति सोमाः देवासस् तान् उपयाता पिबध्यै ॥२०॥ एवा न इन्दो

प्रिय, जें श्रेष्ठ, वीरांनीं युक्त आणि शत्रुभीषण आहे, असें धन सोम हा आम्हांस अर्पण करो २१. —उत्सुक भक्ताच्या मनापासून निघालेल्या, किंवा श्रेष्ठ पुरुषानें उच्चारलेल्या वाणीनें जेव्हां या सोमाला धर्मामध्यें आणि वत्ससमूहामध्यें सुसंस्कृत करून ठेविलें, तेव्हांच कलशामध्यें ठेवलेल्या उत्कृष्ट आणि प्रसन्नचित्त अशा आपल्या पतीकडे धेनू हंबारतच धांवून आल्या २२. —जो दानशाली आहे, जो दिव्य आणि दानयोग्यवस्तूंनीं ओतप्रोत भरलेला आहे, असा महाप्राज्ञ सोम सनातन सद्धर्मासाठीं सनातन धर्माचा प्रवाह लोटून देत आहे. राजा सोम हा संकटनिवारक सामर्थ्यांचा निधि आहे, तो आपल्या दहा रश्मींनीं विपुल समृद्धीचा भार वहातो २३. —पवित्राच्या योगानें स्वच्छप्रवाहानें वहाणारा, मानवहितदर्शी, दिव्यविबुधांचा आणि मानवांचा राजा सोम हा दोन्ही प्रकारचा आहे. तो ( अक्षय )धनाचा प्रभु आहे. सर्वत्र ओतप्रोत भरलेलें जें सुंदर सनातन सत्य, त्याचेंच धारण या आल्हादी सोमानें केलें आहे २४. —ज्याप्रमाणें तीव्र वेगी अश्व यशासाठीं विजयचिन्हाकडे धांवतो, त्याप्रमाणें इन्द्राच्या आणि वायूच्या प्रसन्नतेला अनुलक्षून तूं वहात रहा. आम्हाला उच्चप्रतीचा उत्साह हजारों पटीनें दे. हे सोमा, तूं भक्तपावन आम्हांला ( अक्षय ) संपत्तीचा दाता हो २५. —देवाला प्रसन्न करणारे आणि पात्रांत ओतलेले सोमरस आमच्या वीरप्रचुर सदनाकडे धों धों वहात येवोत. ( कारण ) हे सोमरस ( भक्ताची ) सद्भक्ति देवाला अर्पण करतात. ते सर्वजनाला प्रिय, यज्ञपुरोहिताप्रमाणें दिव्यतेजाची उपासना करणारे, आणि हर्षोत्कर्षकारी असे आहेत २६. —याप्रमाणें हे दिव्यरूपा, तूं देवाचें पेय ( आहेस म्हणून ) हे सोमा, ह्या देवयज्ञांत त्याच्या उत्कृष्ट प्रसादासाठीं तूं स्वच्छप्रवाहानें वहा. तुज महाविभूतिचे आम्हीं भक्त संग्रामांत गुंतलों आहोंत, तर पावनप्रवाह असा तूं या द्यावापृथिवींना सुस्थितींत ठेव २७.

अभि देववीतिं परि स्रव नभो अर्णं श्चमूषु। सोमो अस्मभ्यं काम्यं बृहन्तं रयिं ददातु वीरवन्तम् उग्रम् ॥ २१ ॥ तक्षत् यदी मनसो वेनतो वाक् ज्येष्ठस्य वा धर्मणि क्षोर् अनीके । आदीम् आयन् वरम् आ वावशानाः जुष्टं पतिं कलशे गाव इन्दुम् ॥ २२ ॥ प्र दानुदो दिव्यो दानुपिन्वः ऋतम् ऋताय पवते सुमेधाः । धर्मा भुवत् वृजन्यस्य राजा प्र रश्मिभि र्दशभि र्भारि भूम ॥ २३ ॥ पवित्रेभिः पवमानो नृचक्षाः राजा देवानाम् उत मर्त्यानाम् । द्विता भुवत् रयिपती रयिणाम् ऋतं भरत् सुभृतं चारु इन्दुः ॥ २४ ॥ अर्वाँ इव श्रवसे सातिम् अच्छा इन्द्रस्य वायोर् अभि वीतिम् अर्ष । स नः सहस्रा बृहतीर् इषोदाः भवा सोम द्रविणोवित् पुनानः ॥ २५ ॥ देवाव्यो नः परिषिच्यमानाः क्षयं सुवीरं धन्वन्तु सोमाः । आयज्यवः सुमतिं विश्ववाराः होतारो न दिवियजो मन्द्रतमाः ॥ २६ ॥ एवा देव देवताते पवस्व महे सोम प्सरसे देवपानः । मह श्चित् हि ष्मसि हिताः समर्ये कृधि सुष्ठाने रोदसी पुनानः ॥ २७ ॥ अश्वो न क्रदो वृषभि र्युजानः सिंहो

—वीरांनीं तुझी कार्यीत योजना केली म्हणजे तूं अश्वाप्रमाणें खिंकाळतोस; तूं सिंहाप्रमाणें भयंकर आणि मनापेक्षांहि वेगवान आहेस. तर ये; आणि आम्हांला अनुकूल अशा अत्यंत सरळ मार्गांनीं, हे आल्हादरूपा, तुझ्या सौजन्याचा ओघ आम्हांकडे वहात ठेव २८. —देवापासून निघालेल्या शेंकडोंच नव्हे तर सहस्रावधि धारा वाहूं लागल्या. त्या धारांनाच कविजन ( काव्यानें ) अलंकृत करतात. आल्हादरूपा सोमा, द्युलोकांतून अभीष्ट-प्राप्तीचें साधन वहात आण. ( कारण ) श्रेष्ठ अशा धनाचा पुरोगामी दूत तूंच आहेस २९. —आकाशांतील पर्जन्यवृष्टीप्रमाणें,रस प्रवाह एकसारखा चालू राहिला कारण (रस) धीरोदात्त राजा (सोम) हा आपल्या मित्राचें म्हणणें कधीं मोडीत नाहीं. ( इतकेंच काय पण, ) पुत्र आपल्या कर्तृत्वानें पित्याच्या ( संतोषा )साठीं झटतो तसा तूं या जनतेसाठीं अजिंक्यतेचा ओघ वहात आण ३०. —तुझ्या मधुर धारा वाहूं लागल्या म्हणजे तूं ऊर्णावस्त्राच्या पवित्रांतून शुद्धप्रवाहानें पाझरतोस. हे पावनप्रवाहा, तूं प्रकाशधेनूंच्या तेजोमय स्थानाकडे वहात जातोस; आणि प्रकट होतांच सूर्याला प्रकाशकिरणांनीं भरून टाकतोस ३१. —सद्धर्मांच्या मार्गानें जातांना गर्जना करणारा शुभ्रतेजस्क तूं अमरत्वाचें तेजोमय स्थान सुप्रकाशित करतोस,आणि कविजनांच्या वाणीला सद्बुद्धीच्या योगानें स्फूर्ति देऊन,हर्षोत्कर्षकारी असा तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या शुद्धप्रवाहानें वहातोस ३२. —हे सोमा, तूं दिव्यलोकींचा गरुडपक्षी, आपला धाराप्रवाह सत्कर्मांनें भरगच्च भरून टाकून, या देवोपासनेच्या प्रसंगीं खालीं भूतलाकडे दृष्टि दे. आल्हादप्रदा, तुज सोमाचें आधारपात्र जो कलश त्यांत प्रवेश कर, आणि खळखळाट उडवून रविकिरणाच्या सान्निध्यानें गमन कर ३३. —हविर्भाग अर्पण करणारा ऋत्विज् तीन वाणींचा उच्चार करतो. तो सनातन सत्याचें चिन्तन आणि ब्रह्म(स्तोत्रा)चें मनन करतो. यज्ञधेनू ( मार्ग ) हुडकीत आपल्या धन्याकडे जातात तशाच ( स्तोतृजनाच्या ) भावनाहि मोठ्या उत्कंठेनें उच्च स्वरांत गायन करीत सोमाकडे गमन करतात ३४. —दूध देणाऱ्या गाई उंचस्वरानें हंबारत सोमाकडे जातात; तसे ज्ञानी स्तोतेहि

---

न भीमो मनसो जवीयान् । अर्वाचीनैः पथिभि र्ये रजिष्ठाः आ पवस्व सौमनसं नः इन्दो ॥ २८ ॥ शतं धाराः देवजाताः असृग्रन् सहस्रम् एनाः कवयो मृजन्ति । इन्दो सनित्रं दिव आ पवस्व पुरएता असि महतो धनस्य ॥ २९ ॥ दिवो न सर्गाः अससृग्रम् अह्नाम् राजा न मित्रं प्र मिनाति धीरः ॥ पितु र्न पुत्रः क्रतुभि र्यतानः आ पवस्व विशे अस्यै अजीतिम् ॥३०॥ प्र ते धाराः मधुमतीर् असृग्रन् वारान् यत् पूतो अतिएषि अव्यान् । पवमान पवसे धाम गोनां जज्ञानः सूर्यम् अपिन्वो अर्कैः ॥३१॥ कनिक्रदत् अनुपन्थाम् ऋतस्य शुक्रो विभासि अमृतस्य धाम । स इन्द्राय पवसे मत्सर वान् हिन्वानो वाचं मतिभिः कवीनाम् ॥ ३२ ॥ दिव्यः सुपर्णो अव चक्षि सोम पिन्वन् धाराः कर्मणा देववीतौ । एन्दो विश कलशं सोमधानं क्रन्दन् इहि सूर्यस्योप रश्मिम् ॥ ३३ ॥ तिस्रो वाचः ईरयति प्र वह्नि ऋतस्य धीतिं ब्रह्मणो मनीषाम् ॥

मननस्तुतींनीं शोध करीत करीत सोमाकडेच जातात. पिळलेला सोमरस प्रवाहानें वाहूं लागला म्हणजे सर्व वस्तूंना पावन करतो, आणि अर्कस्तोत्रें आणि त्रिष्टुभ्स्तोत्रें देखील सोमाच्या ठिकाणीं एकत्र होऊन (ईश्वराचें) स्तवन करितात ३५. —सोमा, याप्रमाणें तूं पात्रांत ओतला जाऊन (भक्तांना) पावन करणारा आहेस, तर स्वच्छप्रवाहानें वहात रहा. मोठयानें खळखळां वाहून तूं इन्द्राच्या ठिकाणीं खुशाल प्रवेश कर, स्तुतिवाणीला वृद्धिंगत कर, आणि ( भक्तामध्यें ) स्फूर्ति उत्पन्न कर ३६. —जागरूक, ज्ञानी कवि, मननीय स्तुतींचें सत्यतत्त्व, असा जो भक्तपावन सोम तो चमूपात्रांत भरून राहिला. अनेक उत्कंठित जोडपीं, आणि त्वरेनें जाणारे उत्तम भुजदंडांचे अध्वर्यू ज्याची सेवा करितात असा सोम पात्रांत भरून राहिला ३७. —भक्तपावन सोमानें सूर्य सन्निध येतांच ( जगत् )-स्रष्ट्याप्रमाणें उभय लोक आक्रमण करून टाकले आणि प्रकटहि केले. ज्याच्या कृपेनें प्रिय वस्तु अधिक प्रिय होतात तो सोम, ( काम करणाराला ) वेतन द्यावें त्याप्रमाणें वरदान देईल ३८. —आपण वृद्धिंगत होऊन दुसऱ्यालाहि वृद्धिंगत करणारा, भक्तपावन, आणि अभीष्टवर्षक जो सोम त्यानें आपल्या तेजानें चोहोंकडून आमचें रक्षण केलें. अशा ह्या सोमाच्या योगानें सन्मार्गाची पाऊलवाट जाणणारे, आणि दिव्यलोकाची प्राप्ति झालेले जे आमचे पूर्वज वाडवडील त्यांनीं प्रकाशधेनू( प्राप्ती )च्या उद्देशानें पर्वतहि फोडून टाकला ३९. —जो समुद्र (अथवा) भुवनांचा जो राजा त्यानें विविधस्वभावी जगाच्या पहिल्या स्थितींत प्राणिमात्र उत्पन्न करून सर्व आक्रमण केलें; त्याप्रमाणें आल्हादप्रद वीरपुंगव सोम पिळला जातांना ऊर्णापवित्रावर उच्चभागीं अत्यंत वृद्धिंगत झाला. ४०. —महाविशाल सोमानें एक महत्कार्य असें केलें कीं, उदकांच्या पोटीं राहून देवांना प्रसन्न केलें. पावनप्रवाह सोमानें आपली ओजस्विता इन्द्राच्या ठिकाणीं अर्पिली;

गावो यन्ति गोपतिं पृच्छमानाः सोमं यन्ति मतयो वावशानाः ॥ ३४ ॥ सोमं गावो धेनवो वावशानाः सोमं विप्राः मतिभिः पृच्छमानाः । सोमः सुतः पूयते अज्यमानः सोमे अर्कास् त्रिष्टुभः सं नवन्ते ॥ ३५ ॥ एवा नः सोम परि षिच्यमानः आ पवस्व पूयमानः स्वस्ति । इन्द्रम् आ विश बृहता रवेण वर्धय वाचं जनया पुरंधिम् ॥३६॥ आ जागृवि र्विप्रः ऋता मतीनां सोमः पुनानो असदत् चमूषु । सपन्ति यं मिथुनासो निकामाः अध्वर्यवो रथिरासः सुहस्ताः ॥ ३७ ॥ स पुनानः उप सूरे न धाता ओभे अप्राः रोदसी वि ष आवः । प्रिया चित् यस्य प्रियसास ऊती स तु धनं कारिणे न प्र यंसत् ॥ ३८ ॥ स वर्धिता वर्धनः पूयमानः सोमो मीढ्वाँ अभि नो ज्योतिषा ऽऽवीत् । येना नः पूर्वे पितरः पदज्ञाः स्वर्विदो अभि गाः अद्रिम् उष्णन् ॥ ३९ ॥ अक्रान् समुद्रः प्रथमे विधर्मन् जनयन् प्रजाः भुवनस्य राजा । वृषा पवित्रे अधि सानो अव्ये बृहत् सोमो वावृधे सुवानः इन्दुः ॥ ४० ॥ महत् तत् सोमो महिष श्चकार अपां यत् गर्भः अवृणीत देवान् । अदधात् इन्द्रे पवमानः ओजः अजनयत्

आल्हादप्रद सोमानें सूर्याच्या ठिकाणीं प्रकाश उत्पन्न केला ४१. —इष्टसिद्धीसाठीं आणि प्रसादासाठीं तूं वायूला हृष्ट करतोस; स्वच्छप्रवाहानें वाहून मित्रावरुणांना हृष्ट करतोस, मरुत्गणाला हर्षित करतोस; दिव्यविबुधांना हर्षित करतोस; हे दिव्य सोमा तूं द्यावापृथिवींनाहि हर्षित करतोस. ४२. —सरळ स्वभावाचा तूं सोम पावनप्रवाहानें वहा. तूं कुटिलमार्गांचा उच्छेद करणारा आहेस; आधिव्याधींना आणि शत्रुसैन्याला दूर हांकून देऊन त्यांचा नाश करणारा आहेस. तूं आपलें शुभ्र दुग्ध धेनूच्या दुग्धाशीं मिसळून देतोस. तूं इन्द्राचा प्रियमित्र आहेस, आणि आम्हीं तुझे प्रियमित्र आहोंत ४३. —मधुररसाचा ओघ वाहूं दे. तूं सर्वोत्कृष्ट धनाचा झरा आहेस; तर वीर्यशाली संतान आणि भाग्य ह्यांचा प्रवाह आमच्याकडे वाहूं दे. हे आल्हादप्रदा तूं स्वच्छ प्रवाहानें वाहून इंद्राला रुचिप्रद हो; आणि त्याच्या ( ऐश्वर्य )समुद्रापासून ( अढळ )धनाचा प्रवाह आमच्यावर लोट ४४. —पिळल्यावर तो सत्ववीर सोम आपल्या धारेनें असा वहात राहील कीं, जणों लढाई जिंकणारा अश्व, किंवा उतरल्या जागेकडे धांवणारा प्रवाहच. ( याप्रमाणें ) भक्तपावन सोम वनस्पतींना योग्य अशा सदनांत अधिष्ठित झाला आणि नंतर तो आल्हादप्रद रस उदकांसह गोदुग्धाशीं मिश्र होऊन वाहूं लागला ४५. —इन्द्रा, हाच तो तुझा धीरोदात्त सोम, कीं जो तुज उत्सुक देवासाठीं चमूपात्रांत वाहत आहे. तो तीव्रवेगी, दिव्यलोकदर्शी सोम रथाप्रमाणें त्वरित धांवणारा आहे. **सत्य हेंच त्याचें बल आहे**, आणि आम्हां देवभक्तांची जणों काय मूर्तिमंत आकांक्षाच असा तो पात्रांत ओतला जात आहे ४६. —हा भक्तपावन सोम आपल्या पुरातन आणि अखंड तारुण्यानेंच [ द्यु ]कन्येच्या तेजस्वी भूषणांना आच्छादित करून तीन प्रकारचें दुःखनिवारक आवरण परिधान करितो; आणि यज्ञपुरोहित ( देवाचें ) स्तवन करीत यज्ञसभेमध्यें जातो, त्याप्रमाणें उदकामध्यें संचार करतो ४७. —खरोखरच दिव्य सोमा तूं आमचा महारथी आहेस; तूं स्वच्छ होऊन चमूपात्रांत सर्व दिशांनीं वहात रहा.

---

सूर्ये ज्योतिर् इन्दुः ॥ ४१ ॥ मत्सि वायुम् इष्टये राधसे च मत्सि मित्रावरुणा पूयमानः । मत्सि शर्धो मारुतं मत्सि देवान् मत्सि द्यावापृथिवी देव सोम ॥ ४२ ॥ ऋतुः पवस्व वृजिनस्य हन्ता अपा–मीवां बाधमानो मृध श्च । अभि श्रीणन् पयः पयसाऽभि गोनाम् इन्द्रस्य त्वं तव वयं सखायः ॥ ४३ ॥ मध्वः सूदं पवस्व वस्व उत्सं वीरं च नः आ पवस्वा भगं च । स्वदस्वे–न्द्राय पवमान इन्दो रयिं च नः आ पवस्वा समुद्रात् ॥ ४४ ॥ सोमः सुतो धारयाऽत्यो न हित्वा सिन्धर्न निम्नं अभि वाजी अक्षाः । आ योनिं वन्यं असदत् पुनानः सम् इन्दु र्गोभिर् असरत् सम् अद्भिः ॥ ४५ ॥ एष स्य ते पवते इन्द्र सोम श्चमूषु धीरः उशते तवस्वान् । स्वर्चक्षाः रथिरः सत्यशुष्मः कामो न यो देवयताम् असर्जि ॥४६॥ एष प्रत्नेन वयसा पुनानस् तिरो वर्पांसि दुहितु र्दधानः । वसानः शर्म त्रिवरूथम् अप्सु होतेव याति

तूं उदक ( रसां )त अत्यंत रुचिकर आहेस; मधुर आहेस. सद्धर्मप्रिय असा तूं जगत्स्रष्टा जो देव त्याच्याप्रमाणेंच सत्यसंकल्प आहेस ४८. —देवसेवेसाठीं तूं वायूकडे वहात जा. तुझी स्तुति होत असतां तूं स्वच्छ होऊन मित्रावरुणाकडे वहात जा. मनोवेगी, रथारूढ, वीर्यशाली, वज्रहस्त जो शूर इन्द्र, त्याच्याकडे वहात जा ४९. —उत्तम वस्त्रप्रावरणें यांचा प्रवाह आमच्याकडे लोटून दे. स्वच्छ ओघानें वाहून अभीष्टरूप दुग्ध विपुल देणाऱ्या धेनूंचा प्रवाह वहात राहूं दे. आमच्या संभरणासाठीं चंद्राप्रमाणें मनोल्हादी सुवर्णांचा ओघ वहात ठेव. दिव्यसोमा, अश्व आणि रथारूढ वीर यांचाहि प्रवाह वहात ठेव ५०. —आमच्याकडे, **उत्कृष्ट दिव्य वस्तूंचा**, त्याचप्रमाणें **पृथ्वीवरील यच्चावत्** उत्कृष्ट वस्तूंचा प्रवाह तूं स्वच्छ होतांना वहात ठेव. आणि ज्याच्या योगानें ( अचल )धनाचा आम्हीं उपभोग घेऊं असें जें ऋषितेज तेंहि जमदग्नीप्रमाणें आमच्याकडे वहात आण. ५१. —अशाच धारेनें तूं स्वच्छ प्रवाहानें वहात रहा. आल्हादप्रदा, "मांश्चत्व" सरोवरांत तूं उत्कृष्ट धनांचा ओघ लोट; (म्हणजे) सर्वांचा श्रेष्ठ मूलाधार, वायूप्रमाणें वेगवान्, आणि अखिलजनपूज्य जो इन्द्र तो तत्काल शरण जाणाऱ्या भक्ताला शूर पुत्राचा लाभ देईल ५२. —आणखीहि अशाच धारेनें वहात रहा; कीर्तीला सर्वस्वी योग्य आणि सर्वप्रसिद्ध अशा श्रवाय्याच्या तीर्थावर तूं शुद्धप्रवाहानें वहा. **निगुत** नांवाचे जे दुरात्मे आहेत त्यांच्या साठ हजार उत्कृष्ट वस्तु आमच्याकडे लोटून दे. पक्व फळांनीं डवरलेला वृक्ष गदगद हलवावा त्याप्रमाणें ती संपत्ति हलवून आमच्याकडे झुगारून दे ५३. —ह्या ( देवा )चीं हीं श्रेष्ठ आणि वीराला योग्य अशीं दोन नांवें कल्याणप्रदच आहेत. या '**मांश्चत्वा**' वर किंवा ज्या ठिकाणीं बाहुयुद्धांत शत्रू ठार झाले, त्या "**पृशता**"वर देवाचें मीं संकीर्तन करतों. पूर्वीं देवानें **निगुतांना** गाढ झोंप आणली आणि त्यांचा संहार केला; त्याचप्रमाणें आतांहि यज्ञ न करणारे जे आमचे शत्रू आहेत

---

समनेषु रेभन् ॥ ४७ ॥ नू न-स्त्वं रथिरो देव सोम परि स्रव चम्वोः पूयमानः अप्सु स्वादिष्ठो मधुमाँ ऋतावा देवो न यः सविता सत्यमन्मा ॥ ४८ ॥ अभि वायुं वीति अर्षा गृणानः अभि मित्रावरुणा पूयमानः । अभी नरं धीजवनं रथेष्ठाम् अभि इन्द्रं वृषणं वज्रबाहुम् ॥ ४९ ॥ अभि वस्त्रा सुवसनानि अर्षा अभि धेनूः सुदुघाः पूयमानः । अभिचन्द्रा भर्तवे नो हिरण्या अभि अश्वान् रथिनो देव सोम ॥ ५० ॥ अभी नो अर्ष दिव्या वसूनि अभि विश्वा पार्थिवा पूयमानः । अभि येन द्रविणम् अश्नवाम अभि आर्षेयं जमदग्निवत् नः ॥ ५१ ॥ अया पवा पवस्वै-ना वसूनि मांश्चत्वे इन्दो सरसि प्र धन्व । ब्रध्न श्चित् अत्र वातो न जूतः पुरुमेध श्चित् तकवे नरं दात् ॥ ५२ ॥ उत न एना पवया पवस्व अधि श्रुते श्रवाय्यस्य तीर्थे । षष्टिं सहस्रा नैगुतो वसूनि वृक्षं न पक्वं धूनवत् रणाय ॥ ५३ ॥ मही-मे अस्य वृषनाम शूषे मांश्चत्वे वा पृशने वा वधत्रे।

त्यांना दूर हांकून देऊन त्यांचा नाश कर ५४. —एकावर एक पसरून दिलेल्या तीन पवित्रांतून तूं पाझरून जातोस; स्वच्छ होतांना एकेक पवित्रांतून झरझर धांवतोस. हे आल्हादप्रदा, तूं दानशूराचाहि दाता; ऐश्वर्यवानांचाहि ऐश्वर्यसंपन्न प्रभु आहेस ५५. —सर्व कांहीं जाणणारा हा मनोजयी आणि यच्चावत् भुवनांचा राजा सोम शुद्धप्रहानें वहात आहे. यज्ञमण्डपांत आपल्या रसाचे विन्दु टपटप पाझरून देऊन हा आल्हादप्रद इन्दु ऊर्णा–पवित्रांतून सर्व बाजूंनीं पार वाहून जात आहे ५६. —कोणाकडूनहि पराभूत न होणारे महाभाग ऋषि आल्हादप्रद सोमाचें अवघ्राण करतात; त्याच्या स्थानांत, निरंकुश कवीप्रमाणें त्याच्या यशाचें संकीर्तन करतात. तसेंच धीरोदात्त ऋत्विज् आपल्या दहा अंगुलींनीं (पिळण्यासाठीं) सोमाला उचलून नेतात, आणि त्याचें रूप उदकांच्या तत्वाशीं पूर्णपणें मिसळून देतात ५७. —तुज पावनप्रवाहाच्या योगानें, हे सोमा, यशस्वी संग्रामामध्यें जें जें आम्हीं हस्तगत केलें आहे तें निरंतर एकत्र व्यवस्थित ठेऊं असें कर. जगन्मित्र, (विश्वाला आवरणारा) वरुण आणि अदिति, तसेंच सिन्धु, पृथिवी आणि द्युलोक हे, हीं सर्व वरदानें आम्हांस देवोत ५८.

## सूक्त ९८

सत्वसामर्थ्यांचा अतिशय लाभ करून देणारें आणि सर्व जनाला स्पृहणीय वाटणारें असें ऐश्वर्य, हे आल्हादप्रदा सोमा, हजारों लोकांचें संभरण करणारें, अपार तेजस्वी, सर्वांपेक्षां वरचढ असें ऐश्वर्य तूं आम्हांकडे वहात आण १. —वीरानें रथांत बसून कवच चढवावें, त्याप्रमाणें पिळला जातांना ह्या सोमानें लोंकरीचें पवित्र हेंच कवच धारण केलें;

अस्वापयत् निगुतः स्नेहयत् च अपामित्रॉं अपा–चितो अचे-तः ॥ ५४ ॥ सं त्री पवित्रा विततानि एषि अनु एकं धावसि पूयमानः । असि भगो असि दात्रस्य दाता असि मघवा मघवद्भ्य इन्दो ॥ ५५ ॥ एष विश्ववत् पवते मनीषी सोमो विश्वस्य भुवनस्य राजा । द्रप्सॉं इरयन् विदथेषु इन्दु र्वि वारम् अव्यं समया–ति याति ॥५६॥ इन्दुं रिहन्ति महिषाः अदब्धाः पदे रेभन्ति कवयो न गृध्राः । हिन्वन्ति धीराः दशभिः क्षिपाभिः समञ्जते रूपम् अपां रसेन ॥ ५७ ॥ त्वया वयं पवमानेन सोम भरे कृतं वि चिनुयाम शश्वत् । तत् नो मित्रो वरुणो मामहन्ताम् आदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥ ५८ ॥

## सूक्तम् ९८

अम्बरीषः पवमानसोमः अनुष्टुप्

अभि नो वाजसातमं रयिं अर्ष पुरुस्पृहम् । इन्दो सहस्रभर्णसं तुविद्युम्नं विभ्वासहम् ॥ १ ॥ परि ष्य सुवानो अव्ययं रथे वर्म अव्यत । इन्दुर् अभि द्रुणा

आणि काष्ठाच्या द्रोणांत ठेवलेला आल्हादी पल्लव दावून पिळला तेव्हां त्यांतील रस अनेक प्रवाहांनीं वहात गेला २. —पिळला जातांना हा आल्हादी, आणि हर्षप्रवाह पाझरणारा इन्दु लोंकरीच्या पवित्रांतून वहात गेला. जो आपल्या दीप्त धारेनें [वहातो] तो प्रकाशधेनू जिंकणारा सोम एकाद्या वीराप्रमाणें अध्वरयागांत नीट वर देवाकडे गमन करतो. ३. —तो तूं, हे दिव्यसोमा, आपल्या असंख्य भक्तगणाला हजारों प्रकारचें, आणि शेंकडों आत्म्यांना संतोष देणारें ऐश्वर्य खचित देतोस ४. —हे वृत्रनाशका, दिव्यधना, अप्रतिहता देवा, तुझ्या या सर्व स्पृहणीय निधींच्या, तुझ्या मनोत्साहाच्या, तुझ्या निजानन्दाच्या आम्हीं अगदीं सन्निध राहणारे होऊं असें कर ५. —पांचाच्या दुप्पट म्हणजे दहा (अंगुलीरूप) ज्या भगिनी त्या, आपल्याच यशानें मंडित, ग्राव्यांनीं चुरलेला, सर्वांना प्रिय, इन्द्राला आवडणारा आणि रसकल्लोलानें उचंबळणारा असा जो सोम त्याला स्नान घालतात ६. —सर्वप्रिय, हरिद्वर्ण आणि नानारूपी सोमाला पवित्रावर स्वच्छ करतात, आणि तोहि आपल्या हर्षोत्कर्षासह दिव्यविभूतिकडेच गमन करतो ७. —त्याच्याच कृपेनें, तुमच्या चातुर्यबलाचें साधन जो सोमरस तो प्राशन करा. दिव्यप्रकाशाप्रमाणें, त्या सर्वप्रिय सोमानें आमच्या लोकधुरीणांमध्यें श्रेष्ठप्रतीचें यश ठेविलें आहे. ८. —मानवहितकारी द्यावापृथिवीहो, यज्ञांमध्यें तुमचा हा दिव्यसोम प्रकट झाला; तेव्हां पर्वतावर वास करणाऱ्या त्या वनस्पतिला, हे दिव्यविभूतिनों, स्तोत्रनादानें दुमदुमन गेलेल्या यज्ञमण्डपांत ( ऋत्विजांनीं ) ग्राव्यांच्या योगानें अगदीं चुरून टाकलें ९. —हे सोमा, वृत्रनाशन जो इन्द्र त्यानें तुला प्राशन करावें म्हणून तूं द्रोणपात्रांत ओतला जात आहेस; मानवहितकारी, दक्षिणाधेनू देणारा, आणि यज्ञगृहांत वास करणारा जो परमेश्वर त्याच्याप्रीत्यर्थ तुजला पात्रांत ओतीत आहेत १०. —ते पुरातन सोमाचे रस प्रभात-समय होतांच पवित्रावर पाझरले. आणि छपून राहणाऱ्या, मन्दबुद्धि दुष्टचोरट्यांना आपल्या केवळ खिंकाळण्यानेंच दूर उडवून ते विजयशाली सोमरस वाहूं लागले ११.

---

हितो हियानो धाराभिर् अक्षाः ॥ २ ॥ परि ष्य सुवानो अक्षाः इन्दुर् अव्ये मदच्युतः । धारा य ऊर्ध्वो अध्वरे भ्राजा न एति गव्ययुः ॥ ३ ॥ स हि त्वं देव शश्वते वसु मर्ताय दाशुषे । इन्दो सहस्रिणं रयिं शतात्मानं विवाससि ॥ ४ ॥ वयं ते अस्य वृत्रहन् वसो वस्वः पुरुस्पृहः । नि नेदिष्ठतमाः इषः स्याम सुम्नस्य अध्रिगो ॥ ५ ॥ द्विर् यं पञ्च स्वयशसं स्वसारो अद्रिसंहतम् । प्रियम् इन्द्रस्य काम्यं प्रस्नापयन्ति ऊर्मिणम् ॥ ६ ॥ परि त्यं हर्यतं हरिं बभ्रुं पुनन्ति वारेण । यो देवान् विश्वाँ इत् परि मदेन सह गच्छति ॥ ७ ॥ अस्य वो हि अवसा पान्तो दक्षसाधनम् । यः सूरिषु श्रवो बृहत् दधे स्व र्ण हर्यतः ॥ ८ ॥ स वां यज्ञेषु मानवी इन्दुर् जनिष्ट रोदसी । देवो देवी गिरिष्ठाः अस्रेधन्तं तुविष्वणि ॥ ९ ॥ इन्द्राय सोम पातवे वृत्रघ्ने परि षिच्यसे । नरे च दक्षिणावते देवाय सदनासदे ॥ १० ॥ ते प्रत्नासो विडष्टिषु सोमाः

मित्रानों, तुम्हीं आणि आमचे धुरीण असे सर्वजण मिळून अत्यंत तेजःपुंज, सत्व-सामर्थ्यांच्या सुगंधानें मण्डित आणि सत्वसामर्थ्यांच्या गृहांतच वास करणारा जो सोम तो प्राप्त करून घेऊं १२.

## सूक्त ९९

सर्वांना प्रिय, आणि मोठ्या धडाडीचा जो सोम त्याच्यासाठीं पौरुषरूप धनुष्य सज्ज करितात; ( आणि नंतर ) सेवोत्सुक भक्त दैवी सामर्थ्यानें युक्त अशा त्या सोमाकरितां, शुभ्रकान्तीचें वस्त्र म्हणजे पवित्र, स्तवनाला प्रारंभ करण्याच्या अगोदरच विणून सिद्ध करतात १. —नंतर रात्रीनें अलंकृत झालेला सोम सत्वप्राप्तीच्या संगरांत एकदम घुसतो; जेव्हां यजमानांच्या ध्यानस्तुति हरिद्वर्ण सोमानें पुढें २.रसावावें म्हणून त्याला उत्तेजन देतात, त्यावेळीं घुसतो २. —ह्या सोमाचा हर्षकर रस, जो इन्द्रानें प्राशन करण्याला अत्यंत योग्य आहे, त्या रसाला आम्हीं अलंकृत करतों; ज्या सोमाला धेनूंनीं आपल्या मुखांत धरलें, आणि पूर्वींचे आणि आतांचे यजमान धारण करतात, त्याला अलंकृत करतों ३. —पुरातन गाथेच्या योगानें या भक्तपावन सोमाची महती ऋत्विजांनीं गाथिली, आणि दिव्यविभूतिंचीं नांवें जिव्हाग्रावर धारण करणाऱ्या ध्यानस्तुति सोमावर अनुरक्त झाल्या ४. —ऊर्णापवित्रावर पाझरणाऱ्या त्या यज्ञाधार सोमाला ( भक्तजन ) स्वच्छ करतात; ते मनोनिग्रही ऋत्विज् सर्वांच्या अगोदर ( दिव्यविभूतींचें) ज्ञान व्हावें म्हणून दूताप्रमाणें या सोमाची प्रार्थना करितात ५. —तो भक्तपावन, तो अत्यंत हर्षकर सोमरस चमूपात्रांत अधिष्ठित होतो. जसें पशूंमध्यें तसें इतरत्रहि त्यानें उत्पत्तीचें सामर्थ्य ठेवलें आणि चमूपात्रांत तो अधिष्ठित झाला, म्हणूनच बुद्धिमत्तेचा

---

पवित्रे अक्षरन् । अप प्रोथन्तः सनुत हुरश्चितः प्रातस् ताँ अप्रचेतसः ॥ ११ ॥ तं सखायः पुरोरुचं यूयं वयं च सूरयः । अश्याम वाजगन्ध्यं सनेम वाजपस्त्यम् ॥१२॥

## सूक्तम् ९९

रेभसूनू पवमानसोमः बृहती, अनुष्टुप्

आ हर्यताय धृष्णवे धनुस् तन्वन्ति पौंस्यम् । शुक्रां वयन्ति असुराय निर्णिजं विपाम् अग्रे महीयुवः ॥ १ ॥ अध क्षपा परिष्कृतो वाजाँ अभि प्र गाहते । यदी विवस्वतो धियो हरिं हिन्वन्ति यातवे ॥ २ ॥ तम् अस्य मर्जयामसि मदो य इन्द्रपातमः । यं गावः आसभि र्दधुः पुरा नूनं च सूरयः ॥ ३ ॥ तं गाथया पुराण्या पुनानं अभ्य- नूषत । उतो कृपन्त धीतयो देवानां नाम बिभ्रतीः ॥ ४ ॥ तम् उक्षमाणम् अव्यये वारे पुनन्ति धर्णसिम् । दूतं न पूर्वचित्तये आ शासते मनीषिणः ॥५॥

स्वामी अशी त्याची वाखाणणी होते ६. —कर्मकुशल ऋत्विजांकडून दिव्यविबुधांसाठीं पिळलेला तो दिव्यरस त्यांच्याच हातून अलंकृत होतो. तो ह्या उदकांमध्यें उत्तम तत्व स्थापन करतो ही गोष्ट सर्वश्रुत आहे, म्हणूनच मोठ्या जलौघांत तो निमज्जन करतो ७. —हे आल्हादप्रदा सोमा, शूर ऋत्विजांनीं तुजला पिळून पवित्रावर नेऊन ठेविला आहे म्हणून तूं इन्द्राला अत्यंत हर्षप्रद होतोस, आणि म्हणूनच चमूपात्रांत अधिष्ठित होतोस ८.

## सूक्त १००

कोणाचाहि द्वेष न करणाऱ्या उदकरूप माता, आपला प्रिय वत्स आणि इन्द्राचा आवडता जो सोम, त्याचें लहानग्या तान्हुल्याप्रमाणें चुंबन घेतात १. —आल्हादप्रदा सोमा, तूं स्वच्छ होतांना दोन्ही प्रकारचें ऐश्वर्य आमच्याकडे आण. हविर्दात्या यजमानाच्या गृहांतील सर्व उत्कृष्ट वस्तूंची अभिवृद्धि तूंच करतोस २. —मनानेंच जिची योजना होते अशा भक्तिभावनेला, गर्जना करणाऱ्या मेघमंडलांतून जशी वृष्टि ( करावी ) त्याप्रमाणें चालना दे. **ऐहिक आणि दिव्य** अशा ज्या ज्या उत्कृष्ट वस्तु आहेत त्यांची, हे सोमा, अभिवृद्धि तूंच करतोस ३. —तूं जो विजयेच्छु, त्या तुझ्या पिळलेल्या रसाची जोरानें वाहणारी धारा ऊर्णा—पवित्रांतून अशी धांवते, कीं जणों युद्धोत्सुक सत्ववीरच. ४. —ज्यांत कर्तृत्व आहे अशा चातुर्याच्या प्राप्तीसाठीं, हे प्रतिभाचालका सोमा, तूं पिळला जाऊन तुझ्या धारेच्या योगानें, इन्द्रानें, मित्रानें, आणि वरुणानें तुजला प्राशन करावें म्हणून स्वच्छ प्रवाहानें वहात रहा. ५. —सोमा, सत्वाढ्यतेचा लाभ अतिशय देणारा,

स पुनानो मदिन्तमः सोम श्चमूषु सीदति । पशौ न रेत आ दधत् पति र्वचस्यते धिया ॥ ६ ॥ स मृज्यते सुकर्मभि र्देवो देवेभ्यः सुतः । विदे यत् आसु संददि र्महीर् अपो वि गाहते ॥ ७ ॥ सुतः इन्दो पवित्र आ नृभि र्यतो वि नीयसे । इन्द्राय मत्सरिन्तम श्चमूषु आ नि षीदसि ॥ ८ ॥

## सूक्तम् १००

### पूर्ववत्

अभी नवन्ते अद्रुहः प्रियम् इन्द्रस्य काम्यम् । वत्सं न पूर्व आयुनि जातं रिहन्ति मातरः ॥ १ ॥ पुनान इन्दो आ भर सोम द्विबर्हसं रयिम् । त्वं वसूनि पुष्यसि विश्वानि दाशुषो गृहे ॥ २ ॥ त्वं धियं मनोयुजं सृज वृष्टिं न तन्यतुः । त्वं वसूनि पार्थिवा दिव्या च सोम पुष्यसि ॥ ३ ॥ परि ते जिग्युषो यथा धारा सुतस्य धावति । रंहमाणा वि अव्ययं वारं वाजीव सानसिः ॥ ४ ॥ क्रत्वे दक्षाय नः कवे पवस्व सोम धारया ॥ इन्द्राय पातवे सुतः मित्राय वरुणाय च ॥ ५ ॥ पवस्व वाज-

आणि इन्द्राप्रीत्यर्थ, विष्णूप्रीत्यर्थ, आणि दिव्यविबुधांप्रीत्यर्थ पिळलेला अत्यंत मधुररस जो तूं तो आपल्या धाराप्रवाहानें पवित्रांतून वहात रहा ६. —तुज हरिद्वर्ण वत्साला द्वेषरहित उदकमाता पवित्रावर ठेऊन तुझें चुंबन घेतात. हे पावनप्रवाहा, धेनू आपल्या तान्हुल्या वत्साला चाटतात त्याप्रमाणें या विविधवर्ण अन्तरालांत राहणाऱ्या तुजला (आपोदेवी) कुरवाळीत असतात ७. —पावनप्रवाहा, तूं आपल्या अद्भुत किरणांनीं उत्कृष्ट विख्याति पावतोस, आणि झपाट्यानें चालून जाऊन हविर्दात्या यजमानाच्या गृहांतील (दारिद्र्य आणि अज्ञानरूप) सर्व अन्धकाराचा समूळ नाश करतोस ८. —आपलें उच्चब्रीद राखणाऱ्या सोमा, तूं द्युलोक आणि पृथिवीं यांनाही व्यापून उरला आहेस. हे पावनप्रवाहा, आपल्या महिम्यानें तें एक कवचच तूं धारण केलें आहेस (आणखी —काय ?) ९.

अध्याय चवथा समाप्त

अध्याय ५ वा

## सूक्त १०१

तुमच्या सोमपेयाला प्रथमविजय प्राप्त व्हावा म्हणून, त्या पिळलेल्या उल्लासकारीं रसाला विजय प्राप्त व्हावा म्हणून, हे मित्रांनों, लांब जिभेचा जो श्वान असतो त्याला दूर पिटाळून द्या १. —हा जो सोमरस आपल्या पावन धारेनें पात्रांत वाहतो, तो पराक्रमी अश्वाप्रमाणें फारच तेजस्वी दिसत आहे २. —शूर ऋत्विज् त्या दुर्दम्य रसाचीं योजना, आपल्या सर्वगामी ध्यानबुद्धीनें, ग्राव्यांच्या योगानें यज्ञकर्मांकडे करितात

सातमः पवित्रे धारया सुतः । इन्द्राय सोम विष्णवे देवेभ्यो मधुमत्तमः ॥ ६ ॥ त्वां रिहन्ति मातरो हरिं पवित्रे अद्रुहः । वत्सं जातं न धेनवः पवमान वि धर्मणि ॥७॥ पवमान महि श्रव श्चित्रेभि र्यासि रश्मिभिः । शर्धन् तमांसि जिघ्नसे विश्वानि दाशुषो गृहे ॥ ८ ॥ त्वं द्यां च महिव्रत पृथिवीं चा-ति जभ्रिषे । प्रति द्रापिं अमुञ्चथाः पवमान महित्वना ॥ ९ ॥

इति सप्तमे चतुर्थोऽध्यायः

अथ पञ्चमोऽध्यायः

## सूक्तम् १०१

अन्धीगुः इत्यादयः पवमानसोमः अनुष्टुप्

पुरोजिती वो अन्धसः सुताय मादयित्नवे । अप श्वानं श्नथिष्टन सखायः दीर्घजिह्व्यम् ॥ १ ॥ यो धारया पावकया परि प्रस्यन्दते सुतः । इन्दुर् अश्वो न कृत्व्यः ॥ २ ॥ तं दुरोषं अभी नरः सोमं विश्वाच्या धिया । यज्ञं हिन्वन्ति

३. —अत्यंत मधुर, उल्लासकारी, आणि पवित्र असे सोमरस इन्द्राप्रीत्यर्थ पात्रांत वहात राहिले आहेत, ते तुमचे हर्षकारी रस दिव्यविभूतिंकडे गमन करोत ४. —हा सोमरस इन्द्राप्रीत्यर्थ पात्रांत वहात आहे, असें दिव्य विवुधांनीं सांगितलें तेव्हां स्तुति-वाणींचा प्रभु आणि आपल्या ओजस्वितेनें विश्वाचा अधिपति जो ( इन्द्र ) त्यानें यज्ञाची इच्छा प्रकट केली ५. —सहस्रावधि धारांचा, ( कल्लोळयुक्त ) समुद्रच, वाणीला चालना देणारा, ( अक्षय )धनाचा स्वामी, आणि इन्द्राचा आवडता असा सोम पावनप्रवाहानें वहात असतो ६. —हा धनाधिपति पूषा, हा भक्तांचें भाग्य, हा आपल्या वैभवानें विश्वाचा धनी शोभणारा भक्तपावन सोम, पात्रांत वहात आहे; त्यानें द्युलोक आणि भूलोक या दोहोंनाही प्रकाशित केलें ७. —सर्वांना प्रिय ज्या तेजस्वी वाणी त्यांनीं देवाला हर्ष व्हावा म्हणून त्याचें स्तवन केलें, तेव्हां भक्तपावन सोम-रसविन्दूनीं ( यज्ञाला ) मार्ग करून दिला. ८. —जें **अत्यंत तेजस्वी** आहे त्या अतिविख्यात ( धना )ला, हे पावना, तूं आमच्याकडे आण. जें पांचहि समाजांना व्यापून राहतें तें ( अक्षय )धन आम्हीं त्या ( सोमा )च्या सहाय्यानें प्राप्त करून घेऊं ९. —आल्हादी सोमरसविन्दु आमच्यासाठीं शुद्धप्रवाहानें वहात आहेत; ते सन्मार्ग उत्तम रीतीनें जाणतात; ते मित्राप्रमाणें हितकर, आणि पिळले गेले तरी निष्कलंक, ध्यानसुलभ, आणि दिव्यप्रकाश प्राप्त करून देणारे आहेत १०. —ग्राव्यांच्या योगानें ते अनेक प्रकारचे मधुर नाद उत्पन्न करितात; गव्याच्या चामड्यावर ठेवले म्हणजे आपल्या चकाकीनें ते फारच स्पष्ट दिसतात; अशा त्या ( दिव्य )निधिप्रापक सोमरसांनीं आमच्या भोंवतीं चोहोंकडे उत्साहपूर्ण असे ध्वनि उत्पन्न केले ११. —हे पवित्र, महा प्राज्ञ, दधिमिश्रित सोम सूर्याप्रमाणें प्रेक्षणीय आहेत. आणि ते जरी चंचल असले तरी (वसतीवरी) उदकामध्यें अगदीं स्थिर राहतात १२. —पिळून सिद्ध होत असलेल्या सोमपेयाचे ते शब्द मूर्ख

---

अद्रिभिः ॥ ३ ॥ सुतासो मधुमत्तमाः सोमाः इन्द्राय मन्दिनः । पवित्रवन्तो अक्षरन् देवान् गच्छन्तु वो मदाः ॥ ४ ॥ इन्दुर् इन्द्राय पवते इति देवासो अब्रुवन् । वाच-स्पति र्मखस्यते विश्वस्ये-शान ओजसा ॥ ५ ॥ सहस्रधारः पवते समुद्रो वाचमीङ्खयः । सोमः पती रयीणां सखे-न्द्रस्य दिवेदिवे ॥ ६ ॥ अयं पूषा रयि र्भगः सोमः पुनानो अर्षति । पति र्विश्वस्य भूमनो वि अख्यत् रोदसी उभे ॥ ७ ॥ सम् उ प्रियाः अनूषत गावो मदाय घृष्वयः । सोमासः कृण्वते पथः पवमानास इन्दवः ॥ ८ ॥ य ओजिष्ठस् तम् आभर पवमान श्रवाय्यम् । यः पञ्च चर्षणीर् अभि रयिं येन वनामहै ॥ ९ ॥ सोमाः पवन्ते इन्दवः अस्मभ्यं गातुवित्तमाः । मित्राः सुवानाः अरेपसः स्वाध्यः स्वर्विदः ॥ १० ॥ सुष्वाणासो वि अद्रिभि श्चिताना: गोर् अधि त्वचि । इषम् अस्मभ्यम् अभितः सम् अस्वरन् वसुविदः ॥ ११ ॥ एते पूताः विपश्चितः सोमासो दध्याशिरः । सूर्यासो न दर्शतासो जिगत्नवो ध्रुवाः घृते ॥ १२ ॥ प्र सुन्वानस्य

मानवाला कळत नाहींत. म्हणून पूर्वी भृगूंनीं जसें "मख" या (अधार्मिक)ला ठार केलें त्याप्रमाणें तुम्हींही दानधर्म न करणाऱ्या कुत्र्याला ठार मारून टाका १३. —खांद्यावर किंवा कडेवर पुत्राला घ्यावें त्याप्रमाणें आमचा आप्त हा सोम पवित्ररूप वस्त्रावर पसरला आहे; आणि युवतींच्या प्रियकराप्रमाणें, किंवा त्यांच्या पतिप्रमाणें, आपल्या सदनांत जाऊन राहण्यासाठीं पुढें सरसावला आहे १४. —ज्यानें उभय लोकांना आपआपल्या ठिकाणीं सांवरून धरलें, तो हा वीर ( सोम ) चातुर्यबलाचें साधनच आहे; जसा ज्ञानी कवि आपल्या स्थानीं वसण्याकरितां जातो, तसा हा हरिद्वर्ण सोम पवित्रावर सर्वत्र पसरतो १५. —तो ऊर्णावर्ण ( लोंकरीप्रमाणें दिसणारा ) सोम ऊर्णापवित्रांतून गव्याच्या चामड्यावर शुद्धप्रवाहानें वहातो; तो वीर्यशाली हरिद्वर्ण सोम गर्जना करीत इन्द्राच्या पवित्र आणि अलंकृत स्थानाकडे गमन करितो १६.

## सूक्त १०२

श्रेष्ठ मातांचा बालक ( जो सोम तो ) आपल्या कृतीनें सत्यधर्माची प्रभा चोहोंकडे विखरून सकल प्रिय वस्तूंना व्यापून राहिला, अशी गोष्ट दोन्ही वेळां घडली १. त्रिताच्या ग्राव्यांचें स्थान, ( अर्थात ) यज्ञाचें गुप्तस्थान त्यानें आपल्या सात किरणांनीं व्याप्त केलें; हें हवें होतें तेंच झालें २. —आपल्या धारेनें त्रिताच्या पृष्ठभागावर तीन [ ठिकाणीं ] ( अक्षय )धन विखरून दे. ही त्याची योजना घडून येते म्हणूनच सोम हा सुकृती होय ३. —स्तवननिर्माता (सोम) उत्पन्न होतांच सात मातांनीं यज्ञ सुशोभित करण्याची त्याला आज्ञा केली, म्हणूनच हा (अक्षय)धनांचा अढळ ( उद्गम ) स्पष्टपणें दृग्गोचर झाला ४. —ह्याच्या आज्ञेंत, एकविचारानें राहणारे आणि द्वेषरहित असे

---

अन्धसो मर्तो न वृत तत् वचः। अप श्वानं अराधसं हता मखं न भृगवः॥ १३॥ आ जामिर् अत्के अव्यत भुजे न पुत्र ओण्योः। सरत् जारो न योषणाम् वरो न योनिम् आसदत्॥१४॥ स वीरो दक्षसाधनः वि यस् तस्तंभ रोदसी। हरिः पवित्रे अव्यत वेधाः न योनिम् आ सदम्॥ १५॥ अव्यो वारेभिः पवते सोमो गव्ये अधि त्वचि। कनिक्रदत् वृषा हरिर् इन्द्रस्या-भि एति निष्कृतम्॥ १६॥

## सूक्तम् १०२

आप्त्यः त्रित पवमानसोमः उष्णिक्

क्राणा शिशु र्महीनाम् हिन्वन् ऋतस्य दीधितिम्। विश्वा परि प्रिया भुवत् अध द्विता॥ १॥ उप त्रितस्य पाष्योर् अभक्त यत् गुहा पदम्। यज्ञस्य सप्त धामभिर् अध प्रियम्॥ २॥ त्रीणि त्रितस्य धारया पृष्ठेषुआ ईरया रयिम्। मिमीते अस्य योजना वि सुक्रतुः॥ ३॥ जज्ञानं सप्त मातरो वेधाम् अशासत श्रिये। अयं ध्रुवो

यच्चावत् दिव्यविबुध असतात; ते जेव्हां संतुष्ट होतात तेव्हांच ते स्पृहणीयचारित्र्यविबुध आपलें दर्शन देतात ५ —सनातनधर्मांची अभिवृद्धि करणाऱ्या दिव्यविभूतिंनीं त्या मनोहर बालकाला, त्या कवीला, त्या ज्ञानी, यज्ञामध्यें श्रेष्ठ, आणि सर्वांना स्पृहणीय वाटणाऱ्या सोमाला ( जगानें ) अवलोकन करावें म्हणून उत्पन्न केलें ६. —एकत्र वास करणाऱ्या, महानुभाव, आणि सद्धर्मांच्या जननीं ज्या द्यावापृथिवी त्या यज्ञकर्माला आरंभ करून देऊन त्याला आपण होऊन वारंवार भेटतात ७. —( हे सोमा, ) तूं आपल्या कर्तृत्वानें, आपल्या देदीप्यमान नेत्रांनीं, अध्वरयागामध्यें सनातन सत्यमार्गांच्या किरणांचा रिघाव करून देऊन द्युलोकाच्या प्रकाशाचा समूह ( जगतावर ) लोटला आहेस ८.

## सूक्त १०३

भक्तपावन, स्तवननिर्माता जो सोम त्याच्याप्रीत्यर्थ औत्सुक्यपूर्ण कवन अर्पण कर. ऋण परत करावें त्याप्रमाणें ( भक्ति ) अर्पण कर. तो मननीय स्तवनांनीं प्रसन्न होतो १. —गोदुग्धाशीं मिश्र होऊन ऊर्णावस्त्राच्या गाळण्यांतून तो पात्रांत वहातो. तो हरिद्वर्ण सोमरस स्वच्छ होऊन आपलीं तिन्ही आसनें एकत्र मांडून ठेवतो २. —मधुररसानें ओथंबलेला संचयच असा सोमरस लोंकरीच्या गाळण्यांतून एकसारखा पाझरत आहे, आणि ( इकडे ) ऋषींच्या सप्त वाणींनीं ( देवाचें ) स्तवन चाललें आहे ३. —मननपूर्वक होणाऱ्या स्तुतींचा प्रेरक आणि सर्वांचें आराध्य अशा अप्रतिहत हरिद्वर्ण सोमानें स्वच्छ होऊन दोन्ही चमूपात्रांत प्रवेश केला ४. —आपल्या दैवी स्वभावानुसार इन्द्रासह

रयीणां चिकेत यत् ॥ ४ ॥ अस्य व्रते सजोषसो विश्वे देवासो अद्रुहः । स्पार्हाः भवन्ति रन्तयः जुषन्त यत् ॥ ५ ॥ यम् ईं गर्भम् ऋतावृधो दृशे चारुम् अजीजनन् । कविं मंहिष्ठम् अध्वरे पुरुस्पृहम् ॥ ६ ॥ समीचीने अभि त्मना यह्वी ऋतस्य मातरा । तन्वाना यज्ञम् आनुषक् यत् अञ्जते ॥ ७ ॥ क्रत्वा शुक्रेभिर् अक्षभि ऋणोर् अप व्रजं दिवः । हिन्वन् ऋतस्य दीधितिं प्र अध्वरे ॥ ८ ॥

## सूक्तम् १०३

### ऋष्याद्याः पूर्ववत्

प्र पुनानाय वेधसे सोमाय वच उद्यतम् । भृतिं न भर मतिभि र्जुजोषते ॥१॥ परि वाराणि अव्यया गोभिर् अञ्जानो अर्षति । त्री षधस्था पुनानः कृणुते हरिः ॥२॥ परि कोशं मधुश्चुतं अव्यये वारे अर्षति । अभि वाणी ऋषीणां सप्त नूषत ॥ ३ ॥ परि णेता मतीनां विश्वदेवो अदाभ्यः । सोमः पुनान श्चम्वो विंशत् हरिः ॥ ४ ॥ परि

एकाच रथांत आरूढ होऊन अमरविभूति जो तूं तो (देवाचें) स्तवन करीत वन्दिजनांसह सर्व ठिकाणीं गमन कर ५. —सत्वसमरोत्सुक अश्वाप्रमाणें हा दिव्यविभूति सोम,—हा दिव्यविभूतिसाठींच पिळलेला आणि पवित्रांतून स्वच्छ गाळलेला सोम, द्रोणपात्रांत तुडुंब भरून जाऊन इकडे तिकडे धांवत आहे ६.

## सूक्त १०४

मित्रांनो आसनावर वसा; पवित्रांतून स्वच्छ होत असलेल्या सोमरसाची महती वर्णन करा; आणि आपल्या उत्कर्षासाठीं त्याला बालकाप्रमाणें यज्ञालंकारांनीं भूषित करा १. —ऐहिक कल्याणाचें साधन, असा देवसंरक्षित, उल्लासप्रद, आणि दोन्ही प्रकारचें उत्कटवल आंगीं आणणारा जो सोम त्याला, मातेकडे वत्स न्यावें त्याप्रमाणें, आपोदेवीशीं संयुक्त करा २. —चातुर्यवलाचें साधन असा सोम गाळून स्वच्छ करा; जेणेंकरून तुमची धडाडी टिकून राहील, तुमची सेवा चालेल, आणि मित्राला, (विश्वावरक) वरुणाला अत्यंत संतोष होईल ३. —आमच्यासाठीं उत्कृष्टसंपत्ति देणारा तूं, त्या तुझी स्तुति आम्हीं आमच्या वाणींनीं केली आहे; आणि (आतां) गोदुग्धानें तुझा तेजस्वी वर्ण आम्हीं आच्छादित करीत आहोंत ४. —हे आमच्या आनंदनिधाना, हे आल्हादप्रदा सोमा, तूं देवाचेंच स्वरूप आहेस, तर मित्र जसा मित्राला, त्याप्रमाणें आम्हांला उत्तमरातीनें सन्मार्गबोधक हो ५. —जो कोणी घातकी राक्षस असेल, जो कोणी (गरीब प्राण्यांना) खाऊन टाकीत असेल त्याला आम्हांपासून पार निपटून टाक; तसेंच, जो कोणी देवपराङ्मुख आणि कपटी असेल त्याचा आमच्या हातून निःपात कर आणि आमच्या पातकांशीं युद्ध करून तीं नाहींशीं कर ६.

---

दैवीर् अनु स्वधा इन्द्रेण याहि सरथम् । पुनानो वाघत् वाघद्भिर् अमर्त्यः ॥ ५ ॥
परि सप्ति र्न वाजयु र्देवो देवेभ्यः सुतः । वि आनशिः पवमानो वि धावति ॥ ६ ॥

## सूक्तम् १०४

पर्वतनारदौ पवमानसोमः उष्णिक्

सखायः आ निषीदत पुनानाय प्र गायत । शिशुं न यज्ञैः परि भूषत श्रिये ॥ १ ॥ सम् ई वत्सं न मातृभिः सृजता गयसाधनम् । देवाव्यं मदं अभि द्विशवसम् ॥ २ ॥ पुनाता दक्षसाधनं यथा शर्धाय वीतये । यथा मित्राय वरुणाय शंतमः ॥ ३ ॥ अस्मभ्यं त्वा वसुविदं अभि वाणीर् अनूषत । गोभि ष्टे वर्णं अभि वासयामसि ॥ ४ ॥ स नो मदानां पते इन्दो देवप्सराः असि । सखेव सख्ये गातुवित्तमो भव ॥ ५ ॥ सनेमि कृधि अस्मत्–आ रक्षसं कंचित् अत्रिणम् । अपा–देवं द्वयुं अंहो युयोधि नः ॥ ६ ॥

## सूक्त १०५

मित्रानों, तुम्हांला आल्हाद व्हावा म्हणून त्या तुमच्या (भक्त) पावन सोमाचें गुणगायन करा. आणि बालका( ला प्रसन्न ठेवावें त्या )प्रमाणें यज्ञाच्या योगानें आणि उत्तेजक कवनांनीं त्याला गोडी आणा १. —सोमरस ढवळला जात असतां वत्सा-प्रमाणें तो उदकरूप मातांशीं संयुक्त होतो; आणि देवप्रिय, हर्षकर, आणि मन:पूर्वक केलेल्या स्तुतींनीं अलंकृत होतो २. —हा चातुर्यबलाचें साधन होय; (शत्रूवर) धौशा उडवून देण्यासाठीं, तसेंच देवसेवेसाठीं आणि दिव्यविबुधांसाठीं हा अत्यंत मधुर-रस पिळला आहे ३. —हे आल्हादप्रद रसा, हे चातुर्यबलाढ्या, तूं पिळून सिद्ध झालेला आहेस तर गोसंपन्न आणि अश्वसंपन्न असें ऐश्वर्य आम्हांकडे धो धो वहात आण. तुझ्या तेजस्वी कान्तिला मीं दुग्धाशीं मिश्र करितों ४. —हे हरिद्वर्ण वनस्पते, हे आल्हादप्रदा रसा, तूं देवाचें अत्यंत मनोहररूप आहेस. तर मित्र जसा मित्राला त्याप्रमाणें मानवहितकारी असा तूं आमच्या वैभवाला कारण हो ५. —जो कोणी घातकी राक्षस असेल, जो कोणी (गरीब प्राण्यांना) खाऊन टाकीत असेल त्याला आमच्यापासून पार निसटून टाक, तसेंच, हे आल्हादरूपा, लोकांना बाधा करणाऱ्या दुष्टांना तूं चिरडून टाक, आणि दुटप्पी लवाडांचा धुव्वा उडवून दे ६.

## सूक्त १०६

हे पिळलेले हरिद्वर्ण सोमविन्दु वीर्यशाली इन्द्रापर्यंत जाऊन पोहोंचोत. हे झटपट निघालेले रस दिव्यप्रकाश प्राप्त करून देतात हें सर्वविश्रुतच आहे १. —हा पिळलेला भक्तवरद असा सोमरस इन्द्राच्या तृप्तीसाठीं गाळलेला, स्वच्छप्रवाहानें वहात आहे. हा

## सूक्तम् १०५

### पूर्ववत्

तं वः सखायो मदाय पुनानम् अभि गायत। शिशुं न यज्ञैः स्वदयन्त गूर्तिभिः ॥ १ ॥ सं वत्सइव मातृभिर् इन्दु र्हिन्वानो अज्यते। देवावी मंदो मतिभिः परिष्कृतः ॥ २ ॥ अयं दक्षाय साधनः अयं शर्धाय वीतये। अयं देवेभ्यो मधुमत्तमः सुतः ॥ ३ ॥ गोमत् नः इन्दो अश्ववत् सुतः सुदक्ष धन्व। शुचिं ते वर्णं अधि गोषु दीधरम् ॥ ४ ॥ स नो हरीणां पते इन्दो देवप्सरस्तमः। सखेव सख्ये नर्यो रुचे भव ॥ ५ ॥ सनेमि त्वम् अस्मत्आ अदेवं कंचित् अत्रिणम्। सहाँ इन्दो परि-बाधो अपद्वयुम् ॥ ६ ॥

रस त्या सर्वविजयी इन्द्राला च प्रोत्साहन देतो हेंहि आम्हांला माहित आहे २. —याच्याच प्राशनानें झालेल्या हर्षभरांत इन्द्रानें आपलें विजयी अस्त्र हातीं घेतलें— आपलें वीर्योत्फुल्ल वज्र त्या उदक जेत्या ( इन्द्रा )नें हातांत घेतलें ३. —सोमा, तूं जागरूक राहून धो धो वहात रहा. हे आल्हादप्रदा रसा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ पाझरत रहा. आणि देदीप्यमान दिव्यलोकप्रद असा जोम आम्हांमध्यें उत्पन्न कर ४. —इन्द्राप्रीत्यर्थ तूं आपला वीर्योत्फुल्ल आणि आल्हादप्रद प्रवाह सोड. तूं सर्वांना प्रेक्षणीय आहेस; हजारों मार्गांनीं जाणारा सन्मार्गदर्शक आणि अत्यंत चतुर आहेस ५. —तूं आम्हांला उत्तम रीतीनें ध्येयदर्शक, आणि दिव्यविभूतिंना अत्यंत मधुर ( आहेस. ) तर गर्जना करीत तूं आपल्या सहस्रावधि मार्गांनीं गमन कर ६. —आल्हाददायक रसा, देवसेवेसाठीं तूं आपल्या धारांनीं, आणि ओजस्वितेनें स्वच्छ होऊन वहा. आणि मधुर होऊन हे सोमा, आपल्या कलशामध्यें स्थिर रहा ७. —तुझे रसबिंदु उदकांशीं मिश्र झालेले, इन्द्राच्या हर्षासाठीं वृद्धिंगत झाले; अमरत्व लाभावें म्हणून दिव्यविबुधांनीं मोठ्या प्रेमानें तुझें प्राशन केलें ८. —पिळलेल्या सोमरसानों, पावन असे जे तुम्ही, ते अविनाशी ऐश्वर्याला सत्वर चालवीत आमच्याकडे आणा. तुम्हीं द्युलोकापासून पर्जन्य पाडणारे, उदकांचा प्रवाह सोडणारे आणि दिव्यप्रकाशाचे दाते आहांत ९. —गाळला जातांना हा सोमरस आपल्या लहरींनीं लोंकरीच्या पवित्रांतून जिकडे तिकडे धांवतो; आणि स्वच्छ होऊन भक्तांनीं स्तवन करण्याच्या अगोदरच गर्जना करीत ( वहातो ). १०. —वनांत क्रीडा करणाऱ्या (सोमरूपी) अश्वाला प्रतिभायुक्त कवनांनीं (ऋत्विज) हे लोंकरीच्या पवित्रांतून हलवून गाळतात. पण त्या पूर्वींच त्यांच्या मनःपूर्वक स्तुतींनीं, तीन पृष्ठांचा जो सोम

## सूक्तम् १०६

अग्निः पवमानसोमः उष्णिक्

इन्द्रम् अच्छ सुताः इमे वृषणं यन्तु हरयः । श्रुष्टी जातासः इन्दवः स्वर्विदः ॥ १ ॥ अयं भराय सानसिः इन्द्राय पवते सुतः । सोमो जैत्रस्य चेतति यथा विदे ॥ २ ॥ अस्ये–त् इन्द्रो मदेषु आ ग्राभं गृभ्णीत सानसिम् । वज्रं च वृषणं भरत् सम् अप्सुजित् ॥ ३ ॥ प्र धन्वा सोम जागृविर् इन्द्राये–न्दो परि स्रव । द्युमन्तं शुष्मम् आ भर स्वर्विदम् ॥ ४ ॥ इन्द्राय वृषणं मदं पवस्व विश्वदर्शतः । सहस्रयामा पथिकृत् विचक्षणः ॥ ५ ॥ अस्मभ्यं गातुवित्तमो देवेभ्यो मधुमत्तमः । सहस्रं याहि पथिभिः कनिक्रदत् ॥ ६ ॥ पवस्व देववीतये इन्दो धाराभिर् ओजसाऽऽ । कलशं मधुमान् त्सोम नः सदः ॥ ७ ॥ तव द्रप्साः उदप्रुतः इन्द्रं मदाय वावृधुः । त्वां देवासो अमृताय कं पपुः ॥ ८ ॥ आ नः सुतास इन्दवः पुनानाः धावता रयिम् । वृष्टिद्यावो रीतिआपः स्वर्विदः ॥ ९ ॥ सोमः पुनान ऊर्मिणा अव्यो वारं वि धावति ।

पल्लव त्याचें मोठ्या घोषानें वर्णन केलें. ११ —सोमाला द्रोणकलशांकडे मोठ्या वेगानें सोडला; जणों युद्धाच्या गर्दींत घुसणारा विजयोत्सुक अश्ववीरच. याप्रमाणें तो भक्तपावन सोमरस स्तुतिवाणीला स्फूर्ति देऊन पात्रांत वाहूं लागला १२. —भक्तप्रिय हरिद्वर्ण सोम मोठ्या सरोवरींनें ( दुष्टांच्या ) कपटजालाचीं पटलें फोडून निघाला, आणि वीराला योग्य असें यश भक्तजनाकडे वाहून आणून सर्वत्र पसरलां १३. —देवोत्सुक असा तूं याप्रमाणेंच वहात रहा. ह्या तुझ्या मधुर धारा पात्रांत पाझरल्या आहेत; आणि तूंहि मोठ्यानें ललकाऱ्या देत पवित्राला चोहोंकडून वेढून टाकीत आहेस १४.

## सूक्त १०७

आतांच पिळलेला सोमरस ( वसतीवरीं ) उदकांत एकसारखा ओतून द्या. हा दिव्यविभूतिंचें उत्कृष्ट हवि होय. हा जो मानवहितकर सोम त्याला ग्राव्यानीं चुरून उदकांत कोळून मिसळलें आहे १. —तर ( हे सोमा ) तूं आतां लोंकरीच्या गाळण्यांतून स्वच्छ होऊन पाझरत रहा; अप्रतिहत आणि अत्यंत सुगंधित होऊन तूं झरझर रसप्रवाह सोड. तुजला पिळून उदकांत मिसळल्यावर गोदुग्धाशीं चांगला मिश्र करून आणि उकळून आम्हीं त्या पेयानें उल्लसित होऊं २. —सर्वांनीं तुजला पहात रहावें म्हणून तूं उत्तम रीतीनें पिळलेला आहेस. तूं देवाला हृष्टचित्त करणारा, कर्तृत्वशाली आल्हादरूप आणि सर्वांना ( सूक्ष्मदृष्टीनें ) पाहणारा आहेस. ३. —हे सोमा, तूं धाराप्रवाहानें स्वच्छ झालास

---

अग्रे वाचः पवमानः कनि क्रदत् ॥ १० ॥ धीभि र्हिन्वन्ति वाजिनं वने क्रीळन्तम् अत्यविम् । अभि त्रिपृष्ठं मतयः समस्वरन् ॥ ११ ॥ असर्जि कलशाँ अभि मीळ्हे सप्ति र्न वाजयुः । पुनानो वाचं जनयन् असिष्यदत् ॥ १२ ॥ पवते हर्यतो हरिर् अति ह्वरांसि रंह्या । अभ्यर्षन् स्तोतृभ्यो वीरवत् यशः ॥ १३ ॥ अया पवस्व देवयु र्मधो र्धाराः असृक्षत । रेभन् पवित्रं परिएषि विश्वतः ॥ १४ ॥

## सूक्तम् १०७

भरद्वाजाद्याः पवमानसोमः बृहती

परी–तः सिञ्चता सुतं सोमो यः उत्तमं हविः । दधन्वाँ यो नर्यो अप्सु अन्तरा सुषाव सोमम् अद्रिभिः ॥ १ ॥ नूनं पुनानः अविभिः परि स्रव अदब्धः सुरभिन्तरः ॥ सुते चित् त्वा अप्सु मदामो अन्धसा श्रीणन्तो गोभिर् उत्तरम् ॥ २ ॥ पुनानः सोम धारया परि सुवान श्रक्षसे देवमादनः क्रतुर् इन्दु र्विचक्षणः ॥ ३ ॥ पुनानः सोम धारया

म्हणजे उदकरूप वस्त्र परिधान करून वहातोस. तूं रत्ननिधि आहेस, तूं सनातनधर्मांच्या आवस्थानीं वास करतोस; दिव्य सोमा, तूं सुवर्णाप्रमाणें तेजस्वी रसाचा निर्झर आहेस ४. —( द्युलोकाच्या ) दिव्यमधुर कासेचें दोहन करून हा रस आपल्या आवडत्या पुरातन लोकांत राहिला. हा सूक्ष्मदृष्टि सोमरस शूर ऋत्विजांनीं हलवून स्वच्छ केला म्हणजे सर्वांना हवें हवेंसें जें आधारपात्र त्याच्याकडे तो सत्ववीर सोमरस वहात जातो ५. —हे सोमा, जागरूक असा तूं ऊर्णावस्त्रांतून स्वच्छ झालास म्हणजे सर्वांना प्रिय होतोस. ज्ञानी असा तूं अंगिरा ऋषींमध्यें श्रेष्ठ आहेस, तर आमचाहि यज्ञ तुझ्या माधुर्यानें पुनीत कर ६. —सोम हा ( कामना )वर्षक आणि उत्तम प्रकारें सन्मार्ग जाणणारा आहे. तो ऋषि आहे, तो ज्ञानी, आणि अतिशय सूक्ष्मदृष्टि आहे. ( हे सोमा ), काव्यप्रेरक आणि देवसेवेंत अत्यंत तत्पर अशा त्वां सूर्याला वर द्युलोकीं चढवून दिलेंस ७. —रस पिळणाऱ्यांच्या हातांनीं सोम हा लोंकरीच्या पवित्रावर उंच स्थानीं ठेऊन त्याचा रस पिळला जाऊं लागला, म्हणजे वडवेप्रमाणें भरवेगानें वाहणाऱ्या हरिद्वर्ण धारेनें वहातो–उल्लासकारी धारेनें वहातो ८. —हा धेनुयुक्त सोम गोदुग्धाशीं युक्त होऊन उतरत्या जागेंकडे धाराप्रवाहानें वाहूं लागला, दुग्धासह खालीं वाहूं लागला. नंतर समुद्राकडे जावें त्याप्रमाणें ( ऋत्विज् हे ) रससंचय करण्याच्या पात्राकडे गेले. आणि तो हर्षवर्धन रस, ( देवाला ) हर्ष व्हावा म्हणून त्यांनीं जोरानें दाबून पिळला ९. —सोमा, ग्राव्यांच्या योगानें पिळला जातांना तूं लोंकरीच्या पवित्रांतून सारखा वहात राहतोस. लोक जसे ग्रामांत प्रवेश करतात त्याप्रमाणें तूं हरिद्वर्ण रस दोन्हीं चमूपात्रांत शिरलास आणि वनांतच आपलें स्थान केलेंस १०. —झुंजामध्यें युद्धोत्सुक अश्व जसा ( फळी फोडून जातो ) त्याप्रमाणें मेंढयाच्या लोंकरीच्या पवित्रांतून सोम हा स्वच्छ होऊन पाझरतो. म्हणून हा शुद्ध होणारा आणि शुद्ध करणारा जो सोम त्याचें ज्ञात्यांनीं, तसेंच ऋक्प्रवीण कवींनींहि गौरवच करावें ११. —देवानें स्वीकार करावा म्हणून समुद्र जसा लाटांनीं

अपो वसानो अर्षसि । आ रत्नधाः योनिम् ऋतस्य सीदसि उत्सो देव हिरण्ययः ॥ ४ ॥ दुहान ऊध र्दिव्यं मधु प्रियं । प्रत्नं सधस्थम् आऽसदत् । आपृच्छ्यं धरुणं वाजी अर्षति नृभि र्धूतो विचक्षणः ॥ ५ ॥ पुनानः सोम जागृविर् अव्यो वारे परि प्रियः । त्वं विप्रो अभवः अङ्गिरस्तमो मध्वा यज्ञं मिमिक्ष नः ॥ ६ ॥ सोमो मीढ्वान् पवते गातुवित्तमः ऋषि र्विप्रो विचक्षणः । त्वं कविर् अभवो देववीतमः आ सूर्यं रोहयो दिवि ॥ ७ ॥ सोमः उ षुवाणः सोतृभिर् अधि ष्णुभिर् अवीनाम् । अश्वयेव हरिता याति धारया मन्द्रया याति धारया ॥ ८ ॥ अनूपे गोमान् गोभिर् अक्षाः सोमो दुग्धाभिर् अक्षाः । समुद्रं न संवरणानि अग्मन् मन्दी मदाय तोशते ॥ ९ ॥ आ सोम सुवानो अद्रिभिस् तिरो वाराणि अव्यया । जनो न परि चम्वो र्विशत् हरिः सदो वनेषु दधिषे ॥ १० ॥ स मामृजे तिरो अण्वानि मेष्यो मीह्ळे

( उसळतो ) तसा तू आपल्या कल्लोलांनीं फुगून उचंबळतोस. तूं आपल्या पल्लवाच्या दुधासारख्या रसामुळें मादकारक नसतोस, पण मधुररसानें ओथंबलेला सांठा तूं जवळ आणून ( भक्ताला ) जागरूक ठेवतोस १२. —देवप्रिय सोमरस, ज्याप्रमाणें प्रिय पुत्र भूषित करावा त्याप्रमाणें शुभ्र वस्त्रांत आवृत असतो, आणि रथाला गति द्यावी त्याप्रमाणें कार्यकुशल ऋत्विज त्याला आपल्या हातांतून नदीच्या उदरांत लोटतात १३. —सोमरस हा तल्लीनता उत्पन्न करून हर्षोत्सुकता आणणारा ( आहे ), त्याला भक्तगण स्वच्छ करतात, म्हणूनच समुद्राच्या स्थानांत ज्ञानी जन हृष्ट होऊन त्यांना दिव्यलोकाचा लाभ होतो १४. —शुद्ध होत चाललेल्या सोमरसानें आपल्या लहरींनीं समुद्रावरहि ताण केली. त्या राजानें-त्या दिव्य सोमानें, श्रेष्ठ अशा सद्धर्मांचा प्रवाह सोडला. त्याला हलवून दिला तेव्हां त्यानें मित्राच्या, वरुणाच्या धर्मनियमानुसार श्रेष्ठ सद्धर्मांचा प्रवाह सोडला १५. —सर्वप्रिय, सूक्ष्मदृष्टि आणि समुद्रांतून गमन करणारा राजा-सोमदेव हा सत्कार्यनिरत भक्तांनीं आकळिला आहे १६. —हर्षवर्धक सोमरस पिळला जातांना मरुत्प्रभु जो इन्द्र त्याच्या-प्रीत्यर्थ स्वच्छप्रवाहानें वहातो. तो सहस्रावधि धारांनीं पवित्रांतून वहातो. भक्तजन त्यालाच उदकानें स्वच्छ करतात १७. —चमूपात्रांत स्वच्छ होणारा, मननीय कवनांची स्फूर्ति देणारा, असा कवि सोम तो दिव्यविभूतिमध्यें रममाण होतो आणि गोदुग्धाचें वस्त्र परिधान करून उत्कृष्ट दिसूं लागतो; पण वनांत असतांना मात्र आच्छादित असतो १८. —आल्हादप्रदा सोमा, तुझ्या मैत्रींत प्रत्यहीं मीं आनंद मानतों, हरिद्वर्ण सोमा, सहस्रावधि अडचणी माझ्या भोंवतीं घिरट्या घालीत आहेत, तर माझें रक्षण कर आणि त्या अडचणींचा कोट फोडून पार जा १९. —आणखी असें कीं, रात्रीं काय आणि दिवसा काय हे हरिद्वर्ण सोमा, मीं मित्रत्वासाठीं ( नेहमींच तुझ्या ) वक्षःस्थलाजवळच ( बसलों ) आहे. सूर्य हा उष्णतेनें तळपणारा आहे, दूर आहे. तरीहि पक्षी उडतातच; तसें

सस्नि र्न वाजयुः। अनुमाद्यः पवमानो मनीषिभिः सोमो विप्रेभि र्ऋक्वभिः ॥ ११ ॥ प्र सोम देववीतये सिन्धु र्न पिप्ये अर्णसा। अंशोः पयसा मदिरो न जागृविर् अच्छा कोशं मधुश्चुतम् ॥ १२ ॥ आ हर्यतो अर्जुने अत्के अव्यत प्रियः सूनु र्न मर्ज्यः। तम् ईं हिन्वन्ति अपसो यथा रथं नदीषु आ गभस्त्योः ॥ १३ ॥ अभि सोमास आयवः पवन्ते मद्यं मदम्। समुद्रस्या-धि विष्टपि मनीषिणो मत्सरासः स्वर्विदः ॥ १४ ॥ तरत् समुद्रं पवमान ऊर्मिणा राजा देवः ऋतं बृहत्। अर्षन् मित्रस्य वरुणस्य धर्मणा प्र हिन्वानः ऋतं बृहत् ॥ १५ ॥ नृभि र्येमानो हर्यतो विचक्षणो राजा देवः समुद्रियः ॥ १६ ॥ इन्द्राय पवते मदः सोमो मरुत्वते सुतः। सहस्रधारो अति अव्यम् अर्षति तम् ईं मृजन्ति आयवः ॥ १७ ॥ पुनान श्चमू जनयन् मतिं कविः सोमो देवेषु रण्यति। अपो वसानः परि गोभिर् उत्तरः सीदन् वनेषु अव्यत ॥ १८ ॥ तवाहं सोम रारण सख्ये इन्दो दिवेदिवे। पुरूणि बभ्रो नि

आम्हीहि उद्योग करीत राहूं असें कर २०. —हे सुपल्लवा सोमा, समुद्रांत धुतला जात असतां तूं काव्यमय वाणीला प्रेरणा करतोस. आणि हे पावना, सुवर्णालंकार युक्त आणि सर्वांना स्पृहणीय अशा विपुल ऐश्वर्याकडे तूं सर्व दिशांनीं वहात जातोस. २१. —धुतला जात असतां,—लोंकरीच्या पवित्रांतून स्वच्छ होत असतां, वीर्योत्कृष्ट असा तूं वनामध्यें वारंवार मोठ्यानें गर्जना करतोस. आणि हे पावना सोमा, गोदुग्धाशीं युक्त होऊन दिव्यविभूतिंच्या पवित्र स्थानाकडे वहात जातोस २२. —आम्हांला सत्वप्राप्ति व्हावी म्हणून आणि सर्व प्रकारचीं कवनें स्फुरावीं म्हणून शुद्ध प्रवाहानें वहा. सोमा, दिव्यविभूतिंना प्रथम हर्षनिर्भर करणारा तूं समुद्राचें नाना प्रकारानें धारण केलेंस. २३. —तो तूं, पृथ्वीजवळच्या रजोलोकाला पवित्र कर; हे सोमा आपल्या विविध धर्मांनीं दिव्यलोक पवित्र कर; सूक्ष्मदृष्टीचे ज्ञानी भक्त—आपल्या मननीय स्तोत्रांनीं आणि एकाग्र ध्यानांनीं तुज शुभ्र सोमरसाला हलवून सोडतात २४. —पवित्र सोमरस आपल्या धारेनें पवित्रांतून पार वहात चालले. ते मरुत्‌गणांनीं वेष्टित ( आहेत ). ते हर्षकर इन्द्रप्रिय आणि अश्वाप्रमाणें तरतरीत असे सोमरस भक्तांची प्रतिभा आणि प्रेमळपणा यांना अनुलक्षून वाहूं लागले २५. —उदकाचें परिधान करणारा आल्हादप्रद रस, पिळणाऱ्या ( ऋत्विजां )नीं ( उंचावरून खालीं ) ओतला असतां रससंचयामध्यें तुडुंब भरून वहातो; आणि प्रकाश उत्पन्न करून आणि दुग्धरूप वस्त्र परिधान करून हर्षनिर्भर झालेल्या ( स्तुति ) धेनूंना हंबारावयास लावतो २६.

---

चरन्ति माम् अव परिधीँर् अति ताँ इहि ॥ १९ ॥ उता-हं नक्तं उत सोम ते दिवा सख्याय बभ्रो ऊधनि । घृणा तपन्तम् अति सूर्यं परः शकुनाइव पप्तिम ॥ २० ॥ मृज्यमानः सुहस्त्य समुद्रे वाचम् इन्वसि । रयिं पिशङ्गं बहुलं पुरुस्पृहं पवमाना-भि अर्षसि ॥ २१ ॥ मृजानो वारे पवमानो अव्यये वृषाऽव चक्रदो वने । देवानां सोम पवमान निष्कृतं गोभिर् अञ्जानो अर्षसि ॥ २२ ॥ पवस्व वाजसातये अभि विश्वानि काव्या । त्वं समुद्रं प्रथमो वि धारयो देवेभ्यः सोम मत्सरः ॥ २३ ॥ स तू पवस्व परि पार्थिवं रजः दिव्या च सोम धर्मभिः । त्वां विप्रासो मतिभि विचक्षण शुभ्रं हिन्वति धीतिभिः ॥ २४ ॥ पवमानाः असृक्षत पवित्रम् अति धारया । मरुत्वन्तो मत्सराः इन्द्रियाः हयाः मेधाम् अभि प्रयांसि च ॥ २५ ॥ अपो वसानः परि कोशम् अर्षति इन्दु हियानः सोतृभिः । जनयन् ज्योति मन्दनाः अवीवशत् गाः कृण्वानो न निर्णिजम् ॥ २६ ॥

## सूक्त १०८

हे सोमा अत्यंत मधुर असा तूं इन्द्राप्रीत्यर्थ पावनप्रवाहानें वहा. तूं अत्यंत कर्तृत्व-शाली आहेस. तूं आनंदरूप आणि दिव्य लोकांतच निरंतर वास करणारा हर्ष आहेस. तर इन्द्राप्रीत्यर्थ तुझा पवित्रप्रवाह वाहूं दे १. —तुझा (रस) प्राशन करून वीर्यशाली इन्द्र आपलें वीर्य गाजवितो; दिव्यप्रकाश देणारा जो तूं त्या तुझ्या प्राशनाच्या योगानें महाप्राज्ञ इन्द्रानें उत्साहभराला चोहोंकडून आक्रमण केलें, अश्व ज्याप्रमाणें झुंजाकडे धांवतो त्याप्रमाणें आक्रमण केलें २. —हे पावना सोमा, खरोखर अत्यंत दीप्तिमान अशा दिव्यविभूतिंचा समूह अमरत्वाला पावला असा घोष तूंच केलास ३. —ज्याच्या योगानें "नवग्व" (वंशां)तील दध्यङ् ऋषीनें ज्ञानभाण्डार उघडून दिलें; ज्याच्या योगानें ज्ञानी कवींना दिव्य-विबुधांच्या सुखमय आश्रयाखालीं सुरुचिर अमृताचा लाभ झाला; आणि ज्याच्या योगानें त्यांना सत्कीर्तिही लाभली (असा तूंच आहेस); ४. —हाच तो सोम कीं जो पिळला असतां लोंकरीच्या पवित्रांतून धाराप्रवाहानें वहातो; आणि अत्यंत हर्षकर आणि उदक-कल्लोलाप्रमाणें क्रीडाशील असतो ५. —ज्यानें उदकांतून उद्भवलेल्या प्रकाश-धेनूंना मेघोदर फोडून त्यांतून बाहेर काढलें, असा तूं त्या धेनूंचा आणि अश्वांचा समूह विपुल करतोस. तर हे शत्रुधर्षका तूं चिलखत घातलेल्या वीराप्रमाणें शत्रूंचीं खांडोळीं कर ६. —मित्रांनों रस पिळा; आणि मग उदकांतून आणि रजोलोकांतून अश्वाप्रमाणें वेगानें धाव-णाऱ्या, अरण्यांत गर्जना करणाऱ्या, आणि उदकानें परिपूर्ण झालेल्या त्या स्तुत्य सोमाला (पात्रांत) ओतून द्या ७. —जो हजारों धारांचा आहे, वीर्यशाली आहे, उदकाची आणि दुग्धाची वृद्धि करणारा आहे, दिव्यविभूतिंना प्रिय आहे, सद्धर्मानेंच जो सद्धर्मापासून उत्पन्न झाला, जो नाना प्रकारानें (भक्तांचा) उत्कर्षच करतो, जो (जगाचा) राजा आहे,

## सूक्तम् १०८

गौरीवीत्याद्याः पवमानसोमः ककुप् बृहती

पवस्व मधुमत्तमः इन्द्राय सोम क्रतुवित्तमो मदः। महि द्युक्षतमो मदः ॥१॥ यस्य ते पीत्वा वृषभो वृषायते अस्य पीत्वा स्वर्विदः। स सुप्रकेतो अभि अक्रमीत् इषः अच्छा वाजं न एतशः ॥२॥ त्वं हि अङ्ग दैव्या पवमान जनिमानि द्युमत्तमः। अमृतत्वाय घोषयः ॥३॥ येना नवग्वो दध्यङ् अपोर्णुते येन विप्रास आपिरे। दवानां सुम्ने अमृतस्य चारुणो येन श्रवांसि आनशुः ॥४॥ एष स्य धारया सुतः अव्यो वारेभिः पवते मदिन्तमः ॥ क्रीळन् ऊर्मिर् अपाम् इव ॥५॥ य उस्रियाः अप्याः अन्तर् अश्मनो नि गाः अकृन्तत् ओजसा ॥ अभि व्रजं तत्निषे गव्यम् अश्व्यं वर्मी-व धृष्णो आ रुज ॥६॥ आ सोत परि षिञ्चत अश्वं न स्तोमम् अप्तुरं रजस्तुरम् ॥ वनक्रक्षम् उदप्रुतम् ॥७॥ सहस्र धारं वृषभं पयोवृधं

जो दिव्य आहे, आणि श्रेष्ठ असा सद्धर्महि आहे ८. —हे उत्साहाच्या प्रभू, दिव्यवैभव आणि श्रेष्ठ यश यांचा प्रकाश सर्वत्र पसर. हे दिव्या, तूं देवोत्सुक आहेस, तर आमच्या या मध्यलोकांतील उदकभाण्डार फोडून मोकळें कर ९. —हे चातुर्यबलाढ्या, तुंजला पिळून दोन चमूपात्रांत ठेविलें आहे; तर **लोकधुरीण** राजाप्रमाणें आमच्याकडे वळ; द्युलोकांतून वृष्टि कर, उदकांच्या ओघाला पुढें लोट; आणि ( आम्हांला ) प्रकाश-धेनूचा लाभ व्हावा म्हणून आमच्या बुद्धींना चालना दे १०. —ह्याच त्या हर्षानें ओथंबलेल्या ( सोमापासून )—हजारों धाराप्रवाह सोडून द्युलोकीं वास करणाऱ्या आणि यच्चावत् उत्कृष्ट वस्तु धारणकरणाऱ्या ह्याच सोमापासून सकल वस्तूंचें दोहन केलें ११. —तो वीर्यशाली आणि अमर असा उत्पन्न झाला, आणि त्यानें प्रकाश उत्पन्न करून त्या प्रकाशाच्या योगानें अंधकाराला भाजून काढून नाहींसें केलें. कवींनीं त्याची मनःपूर्वक स्तुति केली, तेव्हां त्यानें आपल्या अद्भुत सामर्थ्यानें तीन प्रकारचें प्रावरण धारण केलें १२. —हा जो उत्कृष्ट वस्तूंची, धनांची, अन्नांची, आणि उत्तम निवास-स्थलांची प्राप्ति करून देणारा आहे, त्या सोमाचा रस पिळून सिद्ध केला आहे १३. —ज्या आमच्या रसाचें प्राशन इन्द्र करीत असतो, ज्याचें प्राशन मरुत्, अर्यमा, आणि भाग्याधिपति देव करीत असतात; ज्याच्या योगानें उत्कृष्ट कृपाप्रसाद प्राप्त व्हावा म्हणून आम्हीं मित्र, वरुण, इन्द्र यांना आपल्याकडे आणतों ( तोच हा सोम होय ) १४. —सोमा जरी तूं शस्त्रास्त्रांनीं सज्ज आहेस तरी तुजला इन्द्रानें प्राशन करावें म्हणून शूर भक्तांनीं तुझें नियमन केलें. तो तूं, अत्यंत हर्षप्रद आणि मधुर असा प्रवाह वहात ठेव १५. —( हे रसा ) इन्द्राच्या हृदयांत जें सोमाचें स्थान आहे त्यामध्यें—समुद्रांत नद्यांनीं प्रवेश करावा त्याप्रमाणें तूं प्रवेश कर. तें स्थान मित्राला, वरुणाला, वायूला प्रिय असेंच आहे. तें स्थान द्युलोकाचा उत्कृष्ट आधारच होय १६.

---

प्रियं देवाय जन्मने । ऋतेन यः ऋतजातो विवावृधे राजा देवः ऋतं बृहत् ॥ ८ ॥ अभिद्युम्नं बृहत् यशः इषस्पते दिदीहि देव देवयुः । वि कोशं मध्यमं युव ॥ ९ ॥ आ वच्यस्व सुदक्ष चम्वोः सुतो । विशां वह्नि र्न विश्पतिः ॥ वृष्टिं दिवः पवस्व रीतिम् अपां जिन्वा गोइष्टये धियः ॥ १० ॥ एतम् उ त्यं मदच्युतं सहस्रधारं वृषभं दिवो दुदुहः ॥ विश्वा वसूनि बिभ्रतम् ॥ ११ ॥ वृषा वि जज्ञे जनयन् अमर्त्यः प्र तपन् ज्योतिषा तमः ॥ स सुष्टुतः कविभि र्निणिजं दधे त्रिधातु अस्य दंससा ॥ १२ ॥ स सुन्वे यो वसूनां यो रायाम् आनेता य इळानाम् ॥ सोमो यः सुक्षितीनाम् ॥ १३ ॥ यस्य नः इन्द्रः पिबात् यस्य मरुतो यस्य वा ऽर्यमणा भगः ॥ आ येन मित्रावरुणा करामहे आ इन्द्रम् अवसे महे ॥ १४ ॥ इन्द्राय सोम पातवे नृभि र्यतः सु आयुधः

## सूक्त १०९

हे सोमा तूं इन्द्राकरितां, मित्राकरितां, पूषाकरितां, आणि भाग्याधिपाकरितां आपला मधुर प्रवाह धों धों वहात ठेव १. —हे सोमा, तो तुझा रस इन्द्र प्राशन करो, आणि (आमच्या) कर्तृत्वासाठीं आणि चातुर्यबलासाठीं सकल दिव्यविबुधहि प्राशन करोत २. —असा तूं देदीप्यमान, दिव्य, आणि अमृतमय आहेस, तर (आमच्या) अमरत्वासाठीं, (आम्हांस) उत्तमलोकाची प्राप्ति व्हावी यासाठीं तूं वहात रहा ३. —सोमा तूं थोर आहेस; तूं समुद्राप्रमाणें विस्तीर्ण (आणि) देवांचा पिता आहेस. तूं सर्व तेजोमय स्थानांना अनुलक्षून पावनप्रवाहानें वहात रहा ४. —सोमा, देदीप्यमान असा तूं दिव्यविबुधांसाठीं, द्युलोकासाठीं, पृथिवीसाठीं, आणि लोकांच्या कल्याणासाठीं पावनप्रवाहानें वहा ५. —तूं देदीप्यमान, अमर, द्युलोकाचा धारक आहेस. तर सत्ववीर असा तूं सत्य आणि विविध धर्मांच्या प्रसंगीं पावनप्रवाहानें वहात रहा ६. —सोमा तूं तेजःपुंज, उत्कृष्ट धाराप्रवाहानें वहाणारा आहेस. तर त्या उत्तम ऊर्णावस्त्राच्या पवित्रांतून पूर्वीप्रमाणेंच वहात रहा ७. —उत्पन्न होतांच ऋत्विजांनीं नियमन केलेला, पवित्र, हर्षप्रद, आणि दिव्यलोकप्रापक असा तूं, सर्व प्रकारच्या उत्तम वस्तूंचा प्रवाह वहात ठेव ८. —सोमरस स्वच्छ होतांना (त्यानें) लोकांचें रक्षण करून सर्व प्रकारचीं (शाश्वत) धनें आम्हांस अर्पण केलीं ९. —हे सोमा, युद्धाकरितां लढाऊ अश्व सज्ज करतात त्याप्रमाणें स्वच्छ झालेला तूं सत्ववीर (आमच्या) कर्तृत्वासाठीं आणि चातुर्यबलासाठीं आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा १०. —रस पिळणारे ऋत्विज् (देवाला) हर्ष

---

सदिन्तमः॥ पवस्व मधुमत्तमः ॥ १५ ॥ इन्द्रस्य हार्दि सोमधानम् आ विश । समुद्रमिव सिन्धवः ॥ जुष्टो मित्राय वरुणाय वायवे दिवो विष्टंभ उत्तमः ॥ १६ ॥

## सूक्तम् १०९

अग्नयः पवमानसोमः द्विपदा विराट्

परि प्र धन्वे–न्द्राय सोम स्वादु मित्राय पूष्णे भगाय ॥ १ ॥ इन्द्र स्ते सोम सुतस्य पेयाः क्रत्वे दक्षाय विश्वे च देवाः ॥ २ ॥ एवा–मृताय महे क्षयाय स शुक्रो अर्ष दिव्यः पीयूषः ॥ ३ ॥ पवस्व सोम महान्त्समुद्रः पिता देवानां विश्वाऽभि धाम ॥४॥ शुक्रः पवस्व देवेभ्यः सोम दिवे पृथिव्यै शं च प्रजायै ॥५॥ दिवो धर्ताऽसि शुक्रः पीयूषः सत्ये विधर्मन् वाजी पवस्व ॥ ६ ॥ पवस्व सोम द्युम्नी सुधारो महाम् अवीनाम् अनु पूर्व्यः ॥ ७ ॥ नृभि र्येमानो जज्ञानः पूतः क्षरत् विश्वानि मन्द्रः स्वर्वित् ॥८॥ इन्दुः पुनानः प्रजाम् उराणः करत् विश्वानि द्रविणानि नः ॥९॥ पवस्व सोम क्रत्वे दक्षाय अश्वो न निक्तो वाजी धनाय ॥ १० ॥ तं ते सोतारो रसं

ऱ्हावा यासाठीं, आणि श्रेष्ठ अशा तेजोवैभवासाठीं तुझा रस गाळून तो स्वच्छ करीत असतात ११. —प्रकट होणाऱ्या त्या हरिद्वर्ण बालकाला—त्या आल्हादप्रद सोमाला, दिव्यविबुधांना अर्पण करावें म्हणून पवित्रांतून गाळून स्वच्छ करितात १२. —रुचिर, आल्हादप्रद, आणि काव्यस्फूर्ति देणारा जो सोम त्यानें, (भक्तांना) हर्ष ऱ्हावा, भाग्य प्राप्त ऱ्हावें म्हणून उदकाच्या स्थानाजवळ आपला पावनप्रवाह वहात ठेवला १३. —इन्द्राचें जें मनोहर नामाभिधान तें तो धारण करतो; त्याच्या जोरावर त्यानें सर्व शत्रूंचा निःपात केला आहे १४. —शूर ऋत्विजांनीं पिळलेला, आणि गोदुग्ध मिसळलेला, असा सोमाचा रस सकल दिव्यविबुध प्राशन करतात १५. —पिळला जात असतां लोंकरीच्या पवित्रांतून सहस्रावधि धारांनीं तो वहात राहिला आहे १६. —तो अमितवीर्य सत्ववीर स्वच्छ होऊन उदकांनीं आणि गोदुग्धानें युक्त असा वहात आहे १७. —सोमरसा, तूं इन्द्राच्या जठरांत प्रवेश कर, शूर ऋत्विजांनीं तुझें नियमन केलें आहे आणि ग्राव्यांच्या योगानें तुजला पिळलें आहे १८. —हा सहस्रप्रवाही, सत्वाढ्य, वीर, आम्हीं इन्द्राप्रीत्यर्थ पवित्रांतून पात्रांत गाळला आहे १९. —ह्या आल्हादप्रद सोमरसाला, वीर्यशाली इन्द्राला हर्ष ऱ्हावा म्हणून (भक्तजन) मधुररसाशीं संयुक्त करितात २०. —दिव्यविबुधांसाठीं, उदकांचें आवरण धारण करणाऱ्या तुज हरिद्वर्ण सोमाला तेजोबलासाठीं ऋत्विज् स्वच्छ करितात २१. —आल्हादरूप सोमरस इन्द्राप्रीत्यर्थंच चुरला जात असतो. दुग्धमिश्रित होऊन तो शत्रुभयंकर आणि उदकांना मुक्त करणारा सोम अगदीं जोरानें चुरला जात असतो २२.



मदाय पुनन्ति सोमं महे द्युम्नाय ॥ ११ ॥ शिशुं जज्ञानं हरिं मृजन्ति पवित्रे सोमं देवेभ्यः इन्दुम् ॥ १२ ॥ इन्दुः पविष्ट चारु मदाय अपाम् उपस्थे कवि र्भगाय ॥ १३ ॥ बिभर्ति चारु इन्द्रस्य नाम येन विश्वानि वृत्रा जघान ॥ १४ ॥ पिबन्ति अस्य विश्वे देवासो गोभिः श्रीतस्य नृभिः सुतस्य ॥ १५ ॥ प्र सुवानो अक्षाः सहस्रधारस् तिरः पवित्रं वि वारम् अव्यम् ॥ १६ ॥ स वाजी अक्षाः सहस्ररेताः अद्भि र्मृजानो गोभिः श्रीणानः ॥ १७ ॥ प्र सोम याहि इन्द्रस्य कुक्षा नृभि र्येमानो अद्रिभिः सुतः ॥ १८ ॥ असर्जि वाजी तिरः पवित्रम् इन्द्राय सोमः सहस्रधारः ॥ १९ ॥ अञ्जन्ति एनं मध्वो रसेन इन्द्राय वृष्णे इन्दुं मदाय ॥ २० ॥ देवेभ्य स्त्वा वृथा पाजसे अपो वसानं हरिं मृजन्ति ॥ २१ ॥ इन्दुर् इन्द्राय तोशते नि तोशते श्रीणन् उग्रो रिणन् अपः ॥ २२ ॥



## सूक्त ११०

( आम्हांला ) सत्वसामर्थ्याची प्राप्ति व्हावी म्हणून सर्व दिशांनीं धों धों वहात रहा. अन्धकाररूपी वृत्रांना तूं रगडून टाकणारा आहेस. द्वेष्ट्यांचा निःपात व्हावा म्हणून ऋणाची फेड करणाऱ्या ( मित्रा )प्रमाणें तूं भक्तांकडे येतोस १. —तुझा रस पिळून सिद्ध झाला म्हणजे, हे सोमा, आम्हीं आनंदमग्न होतों; कारण हे पावना, ज्यामध्यें विजय मिळाल्यानें राज्यलाभ होतो, अशा संग्रामांत सत्वसामर्थ्याला अनुलक्षून तूं उडी घेतोस २. —हे पावना, निराधार अशा आकाशांत तूं आपल्या शक्तिमत्वानें सूर्य उत्पन्न केलास, आणि प्रकाश विस्तारून देणाऱ्या आपल्या बुद्धिसामर्थ्यानें तेथें उदकहि उत्पन्न केलेंस ३. —हे अमर सोमा, सनातन सत्याच्या स्वभावधर्मानुसार, सुरुचिर अमृताच्या धर्मानुसार तूं मर्त्यमानवांमध्यें उत्पन्न झालास, आणि सत्वसामर्थ्याचा ओघ आमच्याकडे लोटून देऊन निरंतर वहात राहिलास ४. —तूं आपल्या यशस्वितेनें, सर्व जनांनीं जेथें सोमरस प्राशन करावा असा अक्षय निर्झर तूं खोदून ठेवलास; दोन्ही खांद्यांवर ( उदक ) वाहून नेणारा मनुष्य पहारीनें ( विहीर ) खोदतो, त्याप्रमाणें खोदून ठेवलास ५. —तुज आप्ताला अवलोकन करून उत्कृष्ट दिव्यसंपत्ति उपभोगणाऱ्या भक्तांनीं तुझें संकीर्तन केलें, म्हणून, झांकण काढावें त्याप्रमाणें, त्या संपत्तीवरचें आवरण ( जगतस्रष्टा ) सविता दूर करीत आहे ६. —हे सोमा, प्रथम ज्यांनीं यज्ञ केला त्या यजमानांनीं उच्च सत्वसामर्थ्यासाठीं आणि यशोलाभासाठीं तुझ्या ठिकाणीं आपली निष्ठा ठेविली; तर हे वीरा तूं आपलें वीर्य गाजविण्याची त्यांना प्रेरणा कर ७. —दिव्यलोकांतील पुरातन आणि प्रशंसनीय असें जें अमृत तें द्युलोकाच्या विस्तीर्ण खोल गुहेंतून त्यांनीं हलवून बाहेर काढलें; आणि इन्द्र प्रकट होतांच त्याची उच्च

---

## सूक्तम् ११०

त्र्यरुण-त्रसदस्यू पवमान सोमः पिपीलिकमध्या

परि ऊ षु प्र धन्व वाजसातये परि वृत्राणि सक्षणिः ॥ द्विषस् तरध्यै ऋणयाः न ईयसे ॥ १ ॥ अनु हि त्वा सुतं सोम मदामसि महे समर्यराज्ये ॥ वाजाँ अभि पवमान प्र गाहसे ॥ २ ॥ अजीजनो हि पवमान सूर्यं विधारे शक्मना पयः ॥ गोजीरया रंहमाणः पुरन्ध्या ॥ ३ ॥ अजीजनो अमृत मर्त्येषु आ ऋतस्य धर्मन् अमृतस्य चारुणः ॥ सदा ऽ सरो वाजम् अच्छा सनिष्यदत् ॥ ४ ॥ अभिअभि हि श्रवसा ततर्दिथ उत्सं न कं चित् जनपानम् अक्षितम् ॥ शर्याभि नं भरमाणो गभस्त्योः ॥ ५ ॥ आत् ईं केचित् पश्यमानास आप्यं वसुरुचो दिव्याः अभि अनूषत॥ वारं न देवः सविता वि ऊर्णुते ॥ ६ ॥ त्वे सोम प्रथमाः वृक्तबर्हिषो महे वाजाय श्रवसे धियं दधुः ॥ स त्वं नो वीर वीर्याय चोदय ॥ ७ ॥ दिवः पीयूषं पूर्व्यं यत्

स्वरानें स्तुति केली ८. —नंतर हे भक्तपावना, वृषभ जसा गोसमूहांत, त्याप्रमाणें द्यावापृथिवी आणि त्याचप्रमाणें सर्व भुवनें ह्या सर्वांमध्यें तूं ठाम उभा राहतोस ९. —सोमरस स्वच्छ होत असतांना लोंकरीच्या पवित्रांतून बालकाप्रमाणें क्रीडा करीत शुद्ध होऊन पाझरतो; तो आल्हादप्रद रस हजारों धारांचा आणि असंख्य सत्वसामर्थ्यांचा आहे १०. ह्या भक्तपावन आल्हादप्रद रस, हा मधुर आणि सनातन धर्मप्रिय रस, इन्द्रासाठीं पावन-प्रवाहानें वहात आहे; तो मधुर आहे, तो तरंगप्रचुर, सत्वसामर्थ्यप्रद, सौख्यप्रद आणि यौवनाचा जोम आणणारा आहे ११. —हे सोमा, भक्तांवर सैन्यानिशीं धांवून येणाऱ्या शत्रूंना तूं दडपून टाकणारा, राक्षसांचा फडशा उडविणारा, संकटांचा निरास करणारा, शस्त्रधारी, आणि शत्रूंना पादाक्रान्त करणारा आहेस. तर तूं आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा १२.

## सूक्त १११

ह्या आपल्या हरिद्वर्ण कान्तीनें ( सकल वस्तु ) पवित्र करणारा सोमरस सर्व द्वेष्टयांच्या तडाक्यांतून ( भक्तांना ) पार नेतो. आपोआप जोडल्या जाणाऱ्या आपल्या अश्वाच्या योगानें जसा सूर्य ( अंधकाराच्या पार नेतो ) त्याप्रमाणें नेतो. पवित्रांतून स्वच्छ होतांना तो हरिद्वर्ण तेजस्वी रस ऋक्स्तवनांच्या योगानें, सात मुखांतून निघणाऱ्या ऋक्स्तवनाच्या योगानें सर्व प्रकारचीं रूपें धारण करतो, तेव्हां त्या पिळलेल्या रसाची धार पहा कशी चमकते ती ! १. —तूं कंजुष मनुष्याचें तें ( अलोट ) द्रव्य आपल्या हातीं

उक्थ्यं । महो गाहात् दिव आ निर् अधुक्षत ॥ इन्द्रम् अभि जायमानं सम् अस्वरन् ॥ ८ ॥ अध यत् इमे पवमान रोदसी इमा च विश्वा भुवनाऽभि मज्मना ॥ यूथे न निष्ठाः वृषभो वि तिष्ठसे ॥ ९ ॥ सोमः पुनानो अव्यये वारे शिशुर् न क्रीळन् पवमानो अक्षाः ॥ सहस्रधारः शतवाजः इन्दुः ॥ १० ॥ एषः पुनानो मधुमाँ ऋतावा इन्द्राय इन्दुः पवते स्वादुर् ऊर्मिः॥ वाजसनि र्वरिवोवित् वयोधाः ॥ ११ ॥ स पवस्व सहमानः पृतन्यून् स्सेधन् रक्षांसि अप दुर्गहाणि ॥ सु आयुधः सासह्वान् स्सोम शत्रून् ॥ १२ ॥

## सूक्तम् १११

आनानतः पवमान सोमः अत्यष्टिः

अया रुचा हरिण्या पुनानो । विश्वा द्वेषांसि तरति स्वयुग्वभिः । सूरो न स्वयुग्वभिः ॥ धारा सुतस्य रोचते पुनानो अरुषो हरिः । विश्वा यत् रूपा परि याति ऋक्वभिः । सप्तास्येभि र्ऋक्वभिः॥१॥त्वं त्यत् पणीनां निदो वसु । सं मातृभि र्मर्जयसि

परत घेतलेंस, आणि उदकरूपमातांसह सत्यधर्माच्या ध्यान तत्परतेनें स्वतःच्या गृहांत अलंकृत झालास. दूर अन्तरावरून कानावर येणाऱ्या सामगायनाप्रमाणें तुझ्या ध्यानस्तुति जेथें रममाण होतात तेथें तीन प्रकारच्या दीप्तींनीं प्रकाशमान होऊन (भक्तांमध्यें) तारुण्याचा जोम ठेवलाच (म्हणून समजा) २. —सर्वांना स्पष्टपणें ज्ञानचैतन्य देणारा सोम थेट पूर्वेकडे जातो तेव्हां त्याचा तो दर्शनीय रथ, तो प्रेक्षणीय दिव्यरथहि तिकडेच धांवतो; त्याच वेळीं त्याचे प्रशंसनीय पराक्रम विजय संपादण्यासाठीं इन्द्राकडे गेले आणि त्यांनीं त्याला आनंदित केलें. याप्रमाणें त्या(इन्द्रा)चें वज्र आणि तूं असे उभयतां अजिंक्य ठरलां, युद्धांत अपराजित ठरलां ३.

## सूक्त ११२

आमच्या बुद्धि नानाप्रकारच्या; तसेंच लोकांच्या वागणुकीचे नियमही नानातऱ्हेचे आहेत. (पहा कीं,) सुतार तासलेलें लांकूडच शोधतो; वैद्य रोगी हुडकतो, आणि ब्रह्मा (ऋत्विज्), सोम अर्पण करणारा भक्त भेटावा अशी इच्छा करतो; परंतु हे सोमरसा, तूं मात्र इन्द्राप्रीत्यर्थंच आपला पावनप्रवाहवहात ठेव १. —जुन्या औषधींनीं, पक्ष्यांच्या पिसाऱ्यांनीं, किंवा चमकणाऱ्या पाषाणांनीं, खटपटी मनुष्य सुवर्णाचा सांठा शोधतो, तसेंच आम्हींहि हिरण्यवर्णाचा जो सोम त्याचा शोध करतों. तर हे सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थं आपला पावनप्रवाह वहात ठेव २. —मी स्वतः कवि आहे; माझा बाळ्या वैद्य आहे, आणि माझी "नना" (धान्य निवडून) त्यांतले खडे वेंचून टाकते. याप्रमाणें द्रव्याची इच्छा धरणारे आम्ही नानाप्रकारच्या बुद्धि चालवून, गाई तृणाकडे धांवतात त्याप्रमाणें, द्रव्याच्या पाठीमागें धांवत आहों; परंतु हे सोमा, तूं मात्र इन्द्राप्रीत्यर्थं आपला पावनप्रवाह वहात

---

स्व आ दमे ॥ परावतो न साम तत् यत्र रणन्ति धीतयः ॥ त्रिधातुभिर् अरुषीभि र्वयो दधे । रोचमानो वयो दधे ॥ २ ॥ पूर्वाम् अनु प्रदिशं याति चेकितत् । सं रश्मिभि र्यतते दर्शतो रथो । दैव्यो दर्शतो रथः ॥ अग्मन् उक्थानि पौंस्या इन्द्रं जैत्राय हर्षयन् । वज्रश्च यत् भवथो अनपच्युता । समत्सु अनपच्युता ॥ ३ ॥

## सूक्तम् ११२

आङ्गिरसो शिशुः पवमान सामः पङ्क्तिः

नानानं वै उ नो धियो वि व्रतानि जनानाम् ॥ तक्षा रिष्टं रुतं भिषक् ब्रह्मा सुन्वन्तम् इच्छति । इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ १ ॥ जरतीभिर् ओषधीभिः पर्णेभिः शकुनानाम् ॥ कार्मारो अश्मभि र्द्युभि र्हिरण्यवन्तम् इच्छति । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ २ ॥ कारुर् अहं ततो भिषक् उपलप्रक्षिणी नना ॥ नानाधियो वसूयवः अनु

ठेव ३. —दणगट घोड्याला हलका मजेदार रथ ओढणें बरें वाटतें. नी लोकांना थट्टामस्करी आवडते. धाधावलेला पुरुष स्त्रीच्या समागमाला हपापलेला असतो, बेडकाला पाणीच आवडतें; परंतु हे सोमा, तूं मात्र इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ४.

## सूक्त ११३

शर्यणावतांत वृत्रनाशन इन्द्र सोमरस प्राशन करो. 'तो आपल्या स्वतःच्या ठिकाणीं सर्व बल एकवटणारा आहे, उत्कृष्ट पराक्रम गाजविणारा आहे; म्हणून हे आल्हादप्रद रसा, इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा १. —हे सकल दिशांच्या प्रभू, (हे दिक्पाला) सोमा, कामनावर्षक असा तूं, ऋजीक प्रदेशांतून इकडे वहात रहा. सनातन धर्मांच्या वाणीनें, सत्यानें, भक्तीनें आणि तपश्चर्येनें तूं पिळलेला आहेस, तर हे आल्हाद-प्रदा सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा २. —पर्ज ें वाढविलेला जो श्रेष्ठ सोम त्याला सूर्याची कन्या वनांतून घेऊन आली, त्याला गन्धर्वांनींहि हातीं धरलें, आणि त्याच्या वल्लीमध्यें तो अपूर्व रस त्यांनीं सांठविला; तर हे आल्हादप्रदा, सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ३. —सनातन धर्माचें तेज अंगीं बाणलेल्या हे सोमा, तूं सद्धर्म वदणारा आहेस. हे सत्चारित्र्या, तूं सत्यच भाषण करणारा आहेस. हे राजा सोमा, तूं निष्ठेनें पूर्ण असें भाषण करणारा आहेस. हे सोमा, सृष्टिकर्त्यांनें तुजला अलंकृत केलें आहे. तर हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ४. —जो सत्याच्या प्रभावानें शत्रूंना भयंकर वाटतो अशा श्रेष्ठ सोमाचे पाझर एकत्र वाहतात; त्या रसपूर्ण सोमाचे रसप्रवाह एकत्रच होतात. हे

---

गाः इव तस्थिम । इन्द्राये—न्दो परि स्रव ॥ ३ ॥ अश्वो वोळहा सुखं रथं हसनाम् उपमन्त्रिणः ॥ शेपो रोमण्वन्तौ भेदौ । वार् इत् मण्डूक इच्छति । इन्द्राये—न्दो परि स्रव ॥ ४ ॥

## सूक्तम् ११३

मारीचः कश्यपः पवमानसोमः पङ्क्तिः

शर्यणावति सोमं इन्द्रः पिबतु वृत्रहा ॥ बलं दधानः आत्मनि करिष्यन् वीर्यं महत् । इन्द्राये—न्दो परि स्रव ॥ १ ॥ आ पवस्व दिशां पते आर्जीकात् सोम मीढ्वः । ऋतवाकेन सत्येन श्रद्धया तपसा सुतः । इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ २ ॥ पर्जन्यवृद्धं महिषं तं सूर्यस्य दुहिता ऽऽ भरत् । तं गन्धर्वाः प्रति अगृभ्णन् तं सोमे रसम् आ ऽ दधुः ॥ इन्द्राये—न्दो परि स्रव ॥ ३ ॥ ऋतं वदन् ऋतद्युम्न सत्यं वदन् त्सत्यकर्मन् । श्रद्धां वदन् त्सोम राजन् धात्रा सोम परिष्कृतः । इन्द्राये—न्दो परि स्रव ॥ ४ ॥ सत्यमुग्रस्य बृहतः सं स्रवन्ति संस्रवाः ॥ सं यन्ति रसिनो

हरिद्वर्णा, प्रार्थनासूक्तानें तूं भक्तपावन ठरला आहेस; तर हे आल्हादप्रदा सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ५. —हे पावनप्रवाहा, जेथें ब्रह्मसूक्त म्हणणारा ऋत्विज् छन्दोबद्ध वाणी मुखावाटे काढतो, ग्राव्यांच्या योगानें सोमयागप्रसंगीं आदरणीय होतो, आणि सोमाच्या योगानेंच हर्षनिर्भर होतो तेथें हे आल्हादप्रदा सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ६. —ज्या ठिकाणीं प्रकाश अखंड आहे, ज्या ठिकाणीं दिव्यतेज सांठविलेलें आहे, त्यां ठिकाणीं, हे पावनप्रवाहा, त्या अक्षय अमरलोकीं, मला स्थापन कर आणि हे आल्हादप्रदा सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावन-प्रावहानें वहात रहा ७. —ज्या ठिकाणीं विवस्वानाचा पुत्र यमराज वास्तव्य करतो, ज्या ठिकाणीं द्युलोकाचें—दृष्टीच्या टप्प्यांत नसलेलें—गुप्तस्थान आहे, ज्या ठिकाणीं भर वेगानें धांवणाऱ्या आपोदेवी राहातात, त्या ठिकाणीं मला ( ठेवून ) अमर कर, आणि हे आल्हादप्रदा तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ८. —द्युलोकाच्या ज्या तिसऱ्या उच्चलोकांत, ज्या तिसऱ्या दिव्यलोकांत, वाटेल तिकडे संचार करतां येतो; ज्या ठिकाणीं सर्व स्थळें तेजोमय आहेत, तेथें मला ठेवून मला अमर कर आणि हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ९. —ज्या ठिकाणीं काम्यकर्म करणारे, आणि तसेंच निष्कामकर्म आचरणारे लोक रहातात, जें सृष्टीच्या मूल-तत्त्वाचें स्थान आहे, ज्या ठिकाणीं स्वधा ( म्हणजे स्वयंसिद्ध अमृत ) आहे, ज्या ठिकाणीं तृप्ति आहे, अशा ठिकाणीं मला ठेवून अमर कर, आणि हे आल्हादरूपा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा १०. —ज्या ठिकाणीं आनंद आहेत; ज्या ठिकाणीं प्रमोद आहे, उल्लासवृत्ति आहे, हर्ष आहे, अत्यंतहर्षहि आहे; ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष वासनेच्याहि वासना सफल होतात त्या ठिकाणीं मला ( ठेवून ) अमर कर आणि हे आल्हादप्रदा तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ११.

---

रसाः पुनानो ब्रह्मणा हरेर् इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ५ ॥ यत्र ब्रह्मा पवमान छन्द-स्यां वाचं वदन् ॥ ग्राव्णा सोमे महीयते सोमेना–नन्दं जनयन् । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ६ ॥ यत्र ज्योतिर् अजस्रं यस्मिन् लोके स्व र्हितम् । तस्मिन् मां धेहि पवमान । अमृते लोके अक्षिते । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ७ ॥ यत्र राजा वैवस्वतो यत्रा–वरोधनं दिवः ॥ यत्रा–मू र्यह्वतीर् आपस् तत्र माम् अमृतं कृधि इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ८ ॥ यत्रा–नुकामं चरणं त्रिनाके त्रिदिवे दिवः ॥ लोकाः यत्र ज्योतिष्मन्तस् तत्र माम् अमृतं कृधि । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ९ ॥ यत्र कामाः निकामा श्च यत्र ब्रध्नस्य विष्टपम् ॥ स्वधा च यत्र तृप्ति श्च तत्र माम् अमृतं कृधि इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ १० ॥ यत्रा–नन्दा श्च मोदा श्च मुदः प्रमुद आसते ॥ कामस्य यत्रा–साः कामास् तत्र माम् अमृतं कृधि इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ११ ॥

## सूक्त ११४

जो ( भक्त ) आल्हादप्रद आणि पावनप्रवाह सोमाच्या तेजोमय स्थानांचें व्यवस्थित रीतीनें आक्रमण करितो. हे सोमा, जो आपलें अन्तःकरण तुझ्या ठिकाणीं लावतो तोच उत्कृष्ट संततीनें युक्त झाला असें म्हणतात. तर हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा १. —हे ऋषे, कश्यपा, मन्त्ररचना करणाऱ्या भक्तांच्या स्तवनांनीं आपली वाणी उन्नत करून, सोमराजाला प्रणिपात कर; जो सर्व लतावल्लींचा प्रभू म्हणून उत्पन्न झाला आहे त्याच्यापुढें नम्र हो. आणि हे आल्हाद प्रदा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा २. —सातहि दिशा, अनेक सूर्यमण्डलें, सात होते ( ऋत्विज् ) अदितीचे सात दिव्यपुत्र अशा सर्वांसह ( घेऊन ) हे सोमा, आमचें सर्व प्रकारें रक्षण कर, आणि हे आल्हादप्रदा तूं इन्द्रा प्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ३. —हे सोमराजा, हें जें तुझ्यापुढें पक्व हविरन्न ( ठेविलें ) आहे त्याच्या योगानें हे सोमा, तूं आमचें सर्व दिशांनीं रक्षण कर. कोणताहि अधार्मिक शत्रू, आमचा मोड कधींहि करूं शकणार नाहीं असें कर; इतकेंच नव्हे तर कोणीहि आमची कसलीही हानि करूं शकणार नाहीं असें कर, आणि हे आल्हादप्रदा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा ४.

**नववें मण्डल समाप्त.**

---

## सूक्तम् ११४

**ऋष्याद्याः पूर्ववत्**

य इन्दो पवमानस्य अनु धामानि अक्रमीत् । तम् आहुः सुप्रजाः इति य स्ते सोमा–विधत् मनः । इन्द्राये– न्दो परि स्रव ॥ १ ॥ ऋषे मन्त्रकृतां स्तोमैः कश्यपो –द्वर्धयन् गिरः । सोमं नमस्य राजानं यो जज्ञे वीरुधां पतिर् । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ २ ॥ सप्त दिशो नानासूर्याः सप्त होतार ऋत्विजः । देवाः आदित्याः ये सप्त तेभिः सोमा–भि रक्ष नः । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ३ ॥ यत् ते राजन् शृतं हविस् तेन सोमा–भि रक्ष नः । अरातीवा मा नस् तारीत् मो च नः किंचना–ममत् । इन्द्राये–न्दो परि स्रव ॥ ४ ॥

**इति नवमं मण्डलम्**

# थोडें दिग्दर्शन

परमेश्वराची उपासना करण्याची प्राचीन वैदिक आर्यांची जी पद्धति होती तिला अनुसरूनच ऋक्संहितेंतील सूक्तसंग्रहाचा अनुक्रम आहे. साधारणतः कोणत्याहि मण्डलाच्या आरंभीं अग्नीचीं सूक्तें असतात. आणि त्यानंतर इन्द्राचीं सूक्तें पठीत असतात; हा क्रम प्रत्येक ऋषीच्या सूक्तसंग्रहांत आढळतो, परंतु आठव्या मण्डलांत इन्द्रसूक्तें आरंभीं असून त्यानंतर अग्नीचीं सूक्तें आहेत. हीं इन्द्रविषयक सूक्तें हृदयंगम तर आहेतच; पण त्यांतील आवेश आणि तळमळ हीं खरोखरच लोकोत्तर आहेत. अग्नि आणि इन्द्र यांच्या नंतर मरुत्, वरुण, आदित्य, विश्वेदेव, अश्वी, आणि उषा इत्यादिकांचीं सूक्तें असतात. वरुण, मित्र, अर्यमा, सविता, यांना आदित्य ही संज्ञा आहे, आणि विश्वेदेव हें नामाभिधान ईश्वराच्या विभूतींना सर्वसाधारणपणें लावलेलें आहे.

उपासनेमध्यें बाह्यक्रिया अग्नीमध्यें घृताहुति अर्पण करणें ही होय. आहुति देण्याच्या पळीला "स्रुचा" किंवा "जुहू म्हणतात. कांहीं प्रसंगीं इतर वस्तूंचींहि आहुति देण्याचा प्रघात असतो. सोमरस अर्पण करणें हें तर उपासनेचें मुख्य कार्य होय. सबंध नववें मण्डल सोमाविषयीं आहे. सोमाचें माहात्म्य वेदांमध्यें किती आहे हें त्यावरून सहज ध्यानांत येईल. पारशी लोकांचा धर्मग्रंथ "आवेस्ता" त्यामध्येंहि सोमाचा निर्देश अनेक वेळां केलेला आहे. आवेस्तामध्यें "सोम" शब्द "होम" असा लिहितात. सोम हा एका विशिष्ट वृक्षाचा पल्लव आहे; परंतु तो वृक्ष कोणता तें आतां निश्चित समजत नाहीं. कदाचित् "सोम" हें नुसतें प्रतीक असून त्या शब्दानें "उत्कट भक्ती"च विवक्षित असावी अशीहि एक कल्पना आहे. सोमपल्लव मोराच्या पिसाच्याप्रमाणें दिसतो आणि त्याचा वर्ण "हरित्" असून रस मात्र शुभ्र असतो असें वर्णन आहे. हा रस फार तीव्र असून अतिशय आवेश, हर्ष, किंवा तल्लीनता उत्पन्न करणारा आहे; परंतु सोमरसानें केव्हांहि उन्माद मात्र चढत नाहीं हें श्रुतिमध्यें निक्षून सांगीतलेलें आहे. सोमरसाच गुण इतका अमोलिक आहे कीं, सोमवृक्ष हा श्येनपक्ष्यानें स्वर्गांतून भूलोकीं आणला अशी आख्यायिका वेदांत सांगितली आहे.

सोमाचें पेय तयार करण्याची कृति अगदीं साधी आहे. सोमाचा रस पिळून तो देवाला अर्पण करण्याच्या क्रियेला "**सवन**" म्हणतात. हीं "सवनें" दिवसांतून तीन असतात. सोमपल्लव बहुतकरून पाटयावर चुरीत, त्याला अभिषवणफलक म्हणत; केव्हां केव्हां लोखंडाच्या खलांतहि चुरून त्याची लुगदी करीत. पाला वाटण्याचा किंवा कुटावयाचा जो वत्ता त्याला "**अद्रि**" किंवा "**ग्रावा**" हें नांव होतें. सोमपल्लव अभिषवण फलकावर किंवा खलांत बारीक वाटून तो पाण्यांत कुसकरून त्याचा रस काढीत. या उद-



0101 —

-काला " **वसतीवरी** " असें नांव आहे. हा रस प्रथम ज्या पात्रांत काढावयाचा त्याला "चमू" असें म्हणत. रस चमूपात्रांत काढल्यावर तो घुसळून किंवा कोळून तो एकसारखा करावयाचा असतो. नंतर तो लोंकरीच्या वस्त्रांतून गाळून स्वच्छ करीत. या ऊर्णावस्त्राला " **पवित्र** " म्हणत. ऊर्णापवित्रांतून रस गाळावयाचा तो द्रोणकलशांत गाळून घेत. गाळतांना त्याच्या ज्या असंख्य धारा गाळण्यांतून पडतात त्यांचें रसभरित वर्णन नवव्या मण्डलांत आहे.

ऋक्संहितेमध्यें प्रकाशालाच उपलक्षणानें " धेनू " किंवा " गो " असें म्हटलेलें आहे. ईश्वरानें " इन्द्र "रूपानें जो पराक्रम केला तो हा कीं, पूर्वीं जगतीतलावर निविड अन्धार होता, आकाश अभ्राच्छादित होतें, आणि पृथ्वी शुष्क होऊन गेली होती. अशा दुरवस्थेंत इन्द्रानें वज्रप्रहार करून वृत्राचा म्हणजे अन्धकार उत्पन्न करणाऱ्या अभ्रपटलाचा उच्छेद करून भूमीवर प्रकाश उत्पन्न केला, आणि आकाशांतून प्रचण्ड जलवृष्टि करून नद्या दुथडी भरून समुद्राकडे वहात जातील असें केलें. पृथ्वीवर ज्ञानगंगा वहातील व ज्ञानसूर्य प्रकाशेल असें जो करणारा तो इन्द्र म्हणजे परमेश्वर होय. कारण " **इन्द्र** " या शब्दाचा अर्थ " **जगत् नियन्ता** " असा आहे. **वरुण** म्हणजे जगताला पातका-पासून ' आंवरून धरणारा ' हेंहि ईश्वराचेंच नांव होय.

वेदमंत्रांचें भाषांतर करितात त्यांत नेहमीं आढळून येणाऱ्या '**वस्यम्**,' '**रयिः**,' '**वाजम्**,' '**गौः**,' '**इषः**,' '**मदः**' '**वृषा**' इत्यादि शब्दांची छाननी कितीतरी चिकित्सक बुद्धीनें व कौशल्यानें केली पाहिजे.

